मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

सत्यमेव जयते
महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

उमेशचंद्र बॅनर्जी ■ दादाभाई नवरोजी ■ बद्रुद्दीन तय्यबजी ■ जॉर्ज यूल ■ विल्यम वेडरबर्न ■ फेरोजशहा मेहता ■ पी. आनंद चार्लू ■ अल्फ्रेड वेब ■ सुरेंद्रनाथ बॅनर्जी ■ रहिमतुल्ला मोहंमद सयानी ■ सी. शंकर नायर ■ आनंद मोहन बोस ■ रमेशचंद्र दत्त ■ नारायण गणेश चंदावरकर ■ दिनशा एडलजी वाछा ■ लाल मोहन घोष ■ सर हेन्री कॉटन ■ गोपाळ कृष्ण गोखले ■ राशबिहारी घोष ■ पं मदन मोहन मालवीय ■ विशन नारायण दार ■ रंगनाथ नृसिह मुधोळकर ■ नबाब सइद मोहंमद बहादूर ■ भूपेंद्रनाथ बसू ■ सत्येंद्र प्रसन्न सिन्हा ■ अंबिकाचरण मझुमदार ■ ॲनी बेझंट ■ सईद हसन

---

# नवभारत

वर्ष ३९ । अंक ३–४–५ डिसें. १९८५, जाने.-फेब्रु. १९८६

## इंडियन नॅशनल काँग्रेस १८८५–१९८५

### खंड १ : स्वातंत्र्यपूर्व काळ

---

इमाम ■ पं मोतीलाल नेहरू ■ लाला लजपत राय ■ सी. विजय राघव चारियार ■ देशबंधू चित्तरंजन दास ■ मौ. अबुल कलाम आझाद ■ मौ. महंमद अली ■ महात्मा गांधी ■ सरोजिनी नायडू ■ एस्. श्रीनिवास अय्यंगार ■ मुख्तार अहमद अन्सारी ■ पं. जवाहरलाल नेहरू ■ वल्लभभाई पटेल ■ राजेंद्र प्रसाद ■ सुभाषचंद्र बोस ■ आचार्य कृपलानी ■ पट्टाभी सीतारामय्या ■ पुरुषोत्तमदास टंडन ■ यू. एन. ढेबर ■ नीलम संजीव रेड्डी ■ के. कामराज ■ एस. निजलिंगप्पा ■ जगजीवनराम ■ शंकरदयाळ शर्मा ■ देवकांत बरूआ ■ इंदिरा गांधी ■ राजीव गांधी ■ ■ ■ ■ ■ ■ ■

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

## काँग्रेस शताब्दी विशेषांक

### खंड : १

वर्ष ३९ । अंक ३-४-५ । डिसें.८५, जाने.-फेब्रु. ८६

या अंकाची किंमत २५ रुपये

वार्षिक वर्गणी ३० रुपये

आजीव सदस्य वर्गणी–

व्यक्ती : रु. ३००/– संस्था : रु. ५००/–



---



**संपादक**

मे. पुं. रेगे

**साहाय्यक संपादक**

अ. र. कुलकर्णी, एस. डी. इनामदार,

अ. ना. ठाकूर.

---

**संपादकीय पत्रव्यवहार :**

मे. पुं. रेगे,

संपादक, 'नवभारत' मासिक,

द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,

वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**

श्री. ग. दीक्षित,

व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,

द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.

(जि. सातारा)

---

या नियतकालिकाच्या प्रकाशनार्थ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले.

# नवभारत

डिसें. १९८५, जाने.-फेब्रु. १९८६

अ नु क्र म



## लेखक-परिचय

■ **किशोर बेडकिहाळ :** सामाजिक कार्यकर्ते, ३, यादोगोपाळ पेठ, सातारा. ■ **वसंत पळशीकर :** 'समाज-प्रबोधन-पत्रिके'चे काही काळ संपादक; विविध सामाजिक-राजकीय विषयांचे आणि समस्यांचे व्यासंगी अभ्यासक; हेमराजभुवन, मु. पो. मंचर (ता. राजगुरुनगर), जि. पुणे. ■ **यशवंत दिनकर फडके :** राज्यशास्त्राचे नामवंत प्राध्यापक, तसेच व्यासंगी संशोधक आणि लेखक; साहित्य-सहवास, वांद्रे, मुंबई–४०० ०५१. ■ **ग. प्र. प्रधान :** प्रसिद्ध सामाजिक-राजकीय कार्यकर्ते; ९२६, सदाशिव पेठ, पुणे–४११ ०३०. ■ **प्र. म. बांदिवडेकर :** रामनारायण रुइया कॉलेज, मुंबई येथे राज्यशास्त्राचे प्राध्यापक, ४६/१५८१ सुभाषनगर, चेंबूर, मुंबई–४०० ०७१. ■ **रत्नाकर हातेकर :** किसन वीर महाविद्यालय, वाई येथे अर्थशास्त्राचे प्राध्यापक, धर्मपुरी, वाई–४१२ ८०३. ■ **मे. पुं. रेगे :** विद्याभारती, पुणे व गो. ध. पारीख शैक्षणिक अभ्यास केंद्र, मुंबई ह्या संस्थांचे माजी संचालक; प्राज्ञ-पाठशाळा मंडळाचे उपाध्यक्ष; निवास : रागिणी, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई–४०० ०५१. ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी :** विद्वान, विचारवंत, लेखक व मराठी विश्वकोशाचे प्रमुख संपादक, वाई–४१२ ८०३. ■ **अ. ना. ठाकूर :** मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरण विज्ञान इ. विषयांचे संपादक, वाई–४१२ ८०३.

# संपादकीय

ह्या काँग्रेस शताब्दी विशेषांक (खंड १) वाचकांच्या हाती देताना आम्हाला आनंद होत आहे.

काँग्रेसच्या स्थापनेपासून स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतच्या तिच्या इतिहासाचा आढावा ह्या अंकात घेण्यात आला आहे.

भारतीय जनतेने राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या सिद्धीसाठी घडविलेले संघटनात्मक साधन हे काँग्रेसचे ह्या कालखंडातील स्वरूप होते. स्वायत्तता व प्रातिनिधिक लोकशाही ह्यांना मूर्त करणारे राजकीय स्वातंत्र्य ही संकल्पना जशी भारताच्या सामाजिक, सांस्कृतिक इतिहासात नवीन होती तशीच जात, वंश, धर्म, भाषा ह्यांना छेद देणाऱ्या आणि त्यांच्यावर आधारलेल्या भेदांना स्वतःमध्ये विलीन करणाऱ्या भारतीय राष्ट्रीयत्वाची संकल्पनाही नवीन होती. ह्या दोन्ही, परस्परांत गुंतलेल्या संकल्पनांचे आणि साध्यांचे प्रतिनिधित्व काँग्रेसने केले. राजकीय स्वातंत्र्याच्या राष्ट्रीय आंदोलनाचे युग हे नवराष्ट्र-निर्मितीचेही युग होते. हे आंदोलन जसजसे प्रखर आणि व्यापक होत गेले तसतशी भारतीय जनतेच्या भिन्न विभागांची आणि थरांची राजकीय-सामाजिक जाणीवही तीव्र होत गेली. ही जाणीव स्वतःच्या विशिष्टत्वाचीही होती आणि समान भारतीयत्वाचीही होती. आणि तिच्या ह्या दोन पैलूंत अनेकदा ताण आणि प्रसंगी विरोधही होता. म्हणून भारतीय जनतेच्या प्रत्येक जागृत घटकाला आणि थराला काँग्रेसच्या नेतृत्वाखाली चाललेल्या राष्ट्रीय आंदोलनाच्या संदर्भात स्वतःची भूमिका, विरोधी-संवादी भूमिका निश्चित करावी लागली. पण सर्व विभागांच्या आणि थरांच्या पलीकडे जाणाऱ्या आणि त्यांना एकात्म करणाऱ्या भारतीय राष्ट्रीयत्वाचे आपण प्रतिनिधित्व करतो हा काँग्रेसचा दावा, देशाची फाळणी तिने नाइलाजाने स्वीकारली तरी, यशस्वी ठरला.

ह्या कालखंडात काँग्रेस हा जसा भारतीय राजकीय जीवनाचा एक ध्रुव होता तसा ब्रिटिश सत्ता हा दुसरा ध्रुव होता. आपली राजवट टिकवून धरण्यासाठी भारतीय जनतेतील भेदांचा ब्रिटिश सत्तेने भरपूर उपयोग करून घेतला, त्यांना पद्धतशीरपणे खतपाणी घातले. तरीही हे कावेबाज राजकारण तिने घटनात्मक कायद्याच्या चौकटीत केले. तुटेपर्यंत न ताणण्याचे शहाणपण तिने एकंदरीत दाखविले. देशाची फाळणी स्वीकारावी लागली हे काँग्रेसइतकेच तिचेही अपयश होते. स्वतः उठविलेली भुते तिच्या कह्याबाहेर गेली होती.

ह्या इतिहासाकडे तटस्थपणे पाहता यावे एवढे आपण त्याच्यापासून दूर आलो आहोत. त्याच्या-कडे अशा तटस्थपणे पण चिकित्सकपणे पाहण्याचा हा प्रयत्न आहे.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काँग्रेसची राष्ट्रीय जीवनातील भूमिका बदलली. तिच्या पूर्वीच्या भूमिकेत आणि नंतरच्या भूमिकेत सातत्य आहे, पण फरकही आहे. तिच्या शताब्दीच्या प्रसंगी ह्या उत्तर कालखंडातील तिच्या कर्तृत्वाचा आढावा घेणे आवश्यक आहे. तो मे-जून ८६ मध्ये प्रकाशित होणाऱ्या विशेषांकाच्या दुसऱ्या भागात घेण्यात येईल.

ज्या लेखकांनी ह्या विशेषांकासाठी आमच्या निमंत्रणाला मान देऊन लेखन केले त्यांचे आम्ही ऋणी आहोत.

ह्या विशेषांकाचे संयोजन श्री. वसंत पळशीकर यांनी केले आहे आणि तो शक्य तितका सर्वांगीण व्हावा म्हणून त्यांनी जे परिश्रम घेतले आहेत त्याबद्दल त्यांचे विशेष आभार मानणे आवश्यक आहे.

ज्या जाहिरातदारांनी आणि अनेक अन्य हितचिंतकांनी ह्या विशेषांकाला विविध मार्गांनी साहाय्य केले त्यांचेही आम्ही कृतज्ञतापूर्वक आभार मानतो.

⊙ ⊙ ⊙

अनुक्रमणिका

# कै. बापूराव नाईक



श्री. बापूराव शिवराम नाईक यांचे गेल्या ३१ डिसेंबर १९८५ दिवशी पहाटे २ वाजता दुःखद निधन झाले. निधनसमयी त्यांचे वय ६५ वर्षांचे होते. त्यांचा जन्म वेंगुर्ल्याजवळील मांजरी या गावी ९ मार्च १९२० रोजी झाला. प्राज्ञपाठशाळा मंडळ या संस्थेशी त्यांचा दीर्घकाळ ऋणानुबंध होता. सु. १५ वर्षे या मंडळाच्या संचालक समितीचे ते सदस्य होते. मराठी विश्वकोश निर्मितीशी त्यांचा प्रथमपासून म्हणजे १९६२ सालापासून घनिष्ठ संबंध होता. मराठी विश्वकोशाच्या सचित्र एक हजार पृष्ठांच्या प्रथम खंडाचे मुद्रण मौज प्रिंटिंग प्रेसमध्ये कै. श्री. विष्णुपंत भागवतांच्या देखरेखीखाली १९७५ मध्ये झाले. त्या वेळेस मुद्रणतज्ञ म्हणून बापूरावांनी महत्त्वाची कामगिरी बजावली; मराठी विश्वकोशाची मुद्रणपद्धती किंवा मुद्रणाचा नमुना हा अत्यंत वेगळा असा बापूरावांच्या मार्गदर्शनाखाली तयार झाला. वेगळा म्हणण्याचे कारण ह्या प्रकारचे मुद्रण आतापर्यंत मराठीमध्ये झालेले नाही.

अनुक्रमणिका

बापूराव हे महाराष्ट्रातील नव्हे, तर भारतातील एक श्रेष्ठ मुद्रणतंत्रज्ञ होते. जागतिक मुद्रणव्यवसायाचे त्यांनी अध्ययन केले होते. अक्षर-लेखन वा लिपितंत्र यांचा इतिहास त्यांनी अभ्यासिला होता. मुद्रणव्यवसायाची त्यांना प्रथमपासूनच विशेष आवड होती. १९४१ साली येरवडा प्रिंटिंग प्रेसमध्ये त्यांनी मुद्रणतंत्रज्ञान शिकण्याकरता उमेदवारीस प्रारंभ केला. मशीनमन, असिस्टंट ओव्हरसिअर व ओव्हरसिअर असे क्रमाक्रमाने चढत गेले. मुद्रणकार्यातील बारीकबारीक तपशिलांत शिरून तंत्रज्ञता मिळवली. १९५१ ला इंग्लंडला जाऊन मुद्रणविषयक अभ्यासक्रम पूर्ण केला. त्यानंतर महाराष्ट्राच्या शासकीय मुद्रणालयाचे उपव्यवस्थापक व व्यवस्थापक ही पदे प्राप्त करून घेतली. नंतर महाराष्ट्र सरकारच्या मुद्रण आणि साधनसामग्री खात्याचे ते उपसंचालक झाले. १९६१ साली पानशेतच्या महापुरामुळे पुण्यातील मुद्रणालयांवर आणि मुद्रकांवर बेकारीची आपत्ती कोसळली, त्या वेळी त्यांनी सरकारदरबारी आटोकाट प्रयत्न करून मुद्रकांना मदत मिळवून दिली. १९६७ साली महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळाची निर्मिती झाली. त्या मंडळाची उभारणी आणि घटना तयार करण्यास बापूरावांनी अतोनात परिश्रम घेतले. प्राथमिक शालेय पाठ्यपुस्तकांचे राष्ट्रीयीकरण झाले तेव्हा त्यातही त्यांचा पुढाकार प्रभावी ठरला.

आशियाई राष्ट्रांची कौलालंपूर येथे शालेय पाठ्यपुस्तकविषयक विचारविनिमय करण्यासाठी परिषद भरली. या परिषदेत त्यांनी भारताचे नेतृत्व केले. त्या वेळी महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळास प्रथम क्रमांकाचे पारितोषिकही मिळाले. या परिषदेतील त्यांचे नेतृत्व सर्व प्रतिनिधींनी मान्य केले.

मुंबई मराठी साहित्य संघाची स्थापना होण्यापासून आतापर्यंत त्यांनी अत्यंत निरलसपणे सेवा केली. मुंबईतील मराठी साहित्य संघाची मुख्य प्रेरकशक्ती म्हणजे कै. डॉ. भालेराव हे होते. त्यांचा उजवा हात म्हणजे बापूराव नाईक हेच होते. मराठी नाट्यपरिषद, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ आणि वाई येथील मराठी विश्वकोश कार्यालय या संस्थांशी त्यांनी केलेले सहकार्य अत्यंत मोलाचे ठरले आहे. मराठी साहित्य संघाचे ते २० वर्षे कार्याध्यक्ष होते. त्यांचा नाट्याचा आणि रंगभूमीरचनेच्या तंत्राचा अभ्यास सखोल होता.

त्यांची बौद्धिक व्यासंगाची आवड त्यांच्या ग्रंथांच्या द्वारे निदर्शनास येते. अत्यंत सूक्ष्म व किचकट आकडेवारीचा त्यांना कंटाळा नव्हता. विविध प्रकारच्या लिपींच्या प्रकारांचे सूक्ष्म अध्ययन त्यांनी केलेले त्यांच्या ग्रंथांमध्ये दृष्टोत्पत्तीस येते. त्यांनी तंत्रविषयक इंग्रजी आणि मराठी अनेक पुस्तके लिहिली आहेत. त्यांची पुस्तके येणेप्रमाणे प्रसिद्ध झाली आहेत : १) कागद (१९४२), २) टायपॉग्राफी ऑफ देवनागरी (इं. १९६५), ३) त्याचेच रूपांतर देवनागरी मुद्राक्षरे व लेखन-कला (१९८२), ४) मुंबईचा वृत्तान्त (१९८० संपादन), ५) प्रा. प्रियोळकर आणि मुद्रणसंशोधन (१९७६).

महाराष्ट्राच्या, विशेषत: मुंबईच्या सांस्कृतिक जीवनात बापूरावांचे कर्तृत्व उजळून दिसत होते. अत्यंत उत्साही, धडाडीचा सर्वशक्तिनिशी काम करणारा असा हा कार्यकर्ता आता कायमचा दृष्टिआड झाला आहे.

अनुक्रमणिका

# आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास

लेखक : ऋग्वेदी

**आकर्षक मुखपृष्ठ, साईज डेमी, पृष्ठसंख्या ४००**

या सुप्रसिद्ध व दुर्मिळ पुस्तकाची तिसरी आवृत्ती प्राज्ञप्रकाशनातर्फे प्रसिद्ध करण्यात आली आहे. प्रस्तुत ग्रंथात प्रमुख भारतीय-विशेषतः महाराष्ट्रातील-सणांची साधार माहिती दिली असून त्यांचे नैतिक व सामाजिक हेतू व बोध सविस्तर वर्णिले आहेत. शास्त्रोक्त विधी व परंपराप्राप्त रूढी यांचा खुलासा केला आहे. हा ग्रंथ प्रत्येक ग्रंथालयात तसेच कुटुंबात ठेवण्याच्या योग्यतेचा आहे.

**किंमत रु. ४०** **टपाल खर्च रु. ४**

**ग्रंथालये व शैक्षणिक संस्था यांना १५% कमिशन देण्यात येईल.**

आपली मागणी खालील पत्त्यावर पाठवावी

चिटणीस,

**प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई** (जि. सातारा) ४१२ ८०३

अनुक्रमणिका

# ‘ काँग्रेस ’ स्थापनेची पूर्वपीठिका

किशोर बेडकिहाळ

यंदाचे वर्ष काँग्रेस शताब्दीचे आहे. शंभर वर्षे सातत्याने टिकणे व स्वातंत्र्यपूर्व तसेच स्वातंत्र्योत्तर काळात देशाच्या राजकारणात प्रभुत्वस्थानी असणे ही गोष्ट अलौकिक आहे. सातत्याने प्रभुत्वस्थानी राहणाऱ्या या संघटनेच्या जन्माची कुंडली मांडणे म्हणूनच मग आवश्यक ठरते. काँग्रेससारखी संघटना एकाएकी निर्माण होते का? किंवा झाली का? याचे उत्तर स्पष्ट ‘नाही’ असे आहे. मग ही संघटना निर्माण कशी झाली? त्यामागच्या प्रेरणा कोणत्या होत्या? या प्रश्नांचा विचार या लेखात करावयाचा आहे.

प्रस्तुत लेखाचे सूत्र पुढीलप्रमाणे आहे :

इंग्रजी राजवट भारतात स्थिर झाल्यावर इथल्या समाजात जे जनजागरण घडले, त्यातून काही नव्या आधुनिक मूल्यांवर अधिष्ठित अशा चळवळींचा व संघटनांचा जन्म झाला. तसेच नव्या प्रकारचे सामाजिक/राजकीय नेतृत्व निर्माण झाले. समाजाचे प्रश्न मांडण्याच्या व ते सोडविण्याच्या नव्या रीतीचा स्वीकार झाला. या सगळ्यातून नव्या राजनीतीचाही आरंभ झाला. यातूनच अखेर ‘इंडियन नॅशनल काँग्रेस’चा जन्म झाला आणि भारतीय पातळीवर संघटित राजकारणाचा आरंभ झाला.

या सूत्राच्या आधारे या लेखाची मांडणी तीन भागांमध्ये केली आहे. पहिल्या भागात इंग्रजी राज्याच्या विस्ताराची थोडक्यात माहिती व त्याचा परिणाम यांचा ऊहापोह, दुसऱ्या भागात १९ व्या शतकातील काँग्रेसपूर्व विविध राजकीय संघटनांचा परिचय व त्यांची कामगिरी यांचा आढावा, तसेच काँग्रेसनिर्मितीच्या राजकारणाचा आढावा, तिसऱ्या भागात काँग्रेसच्या बाबत काही निष्कर्ष येतील.

— १ —

भारताची आधुनिक अर्थाने ‘राष्ट्र’ म्हणून घडण होण्याच्या दृष्टीने एकोणिसावे शतक सर्वांत महत्त्वाचे. भारत कोणत्या प्रकारचे ‘राष्ट्र’ म्हणून पुढे येणार, याबाबतचा निर्णय याच शतकात झाला. कोणती राज्यपद्धती स्वीकारायची हेही याच शतकात स्पष्ट झाले. इंग्रजी राज्यस्थापनेचाच हा परिणाम होता. निरनिराळ्या सामाजिक/राजकीय चळवळी या शतकात निर्माण झाल्या. पारंपरिक समाजजीवनाचे अधिष्ठान व सामाजिक–राजकीय संस्था यांची चिकित्सा, धर्मविषयक प्रबोधन या साऱ्या बाबी या शतकात घडल्या. म्हणून या शतकाला भारतीय ‘राष्ट्र’ घडणीच्या अर्थाने फार महत्त्व आहे. येथे हेही लक्षात ठेवले पाहिजे की, या साऱ्या चळवळी उभ्या करणारा जो वर्ग होता त्याची निर्मिती पण ईस्ट इंडिया कंपनीच्या व पुढे ब्रिटिश राज्यामुळेच झाली.

इ. स. १७५७ मध्ये इंग्रजांनी प्लासीची लढाई जिंकली. १७६४ च्या बक्सारच्या लढाईनंतर १७६५ मध्ये मोगल बादशहाकडून बंगालच्या दिवाणीचे अधिकार इंग्रजांना मिळाले. १८१८ मध्ये पेशवाई खालसा होऊन मराठ्यांचे आव्हान संपुष्टात आले व १८४९ अखेरपर्यंत रणजितसिंहाचा पराभव होऊन भारतभर इंग्रजांचा एकछत्री अंमल प्रस्थापित झाला. इंग्रजांचे (ईस्ट इंडिया कंपनीचे) राज्य स्थिर होण्यासाठी येथल्याच विविध समाजघटकांचे इंग्रजांना साहाय्य झाले. ईस्ट इंडिया कंपनीने ज्या परिस्थितीत आपले वर्चस्व निर्माण केले, ती परिस्थिती व काळ हा भारतातल्या अनियंत्रित राजसत्तांच्या ऱ्हासाचा व परस्परसंघर्षांचा काळ होता औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोगल साम्राज्याच्या केंद्रस्थानीच पोकळी निर्माण झाली होती. पण तिचा फायदा घेऊन मराठ्यांना भारतावर आपला एकछत्री अंमल बसविता आला नाही. पेशव्यांकडे पराक्रम होता, पण स्वराज्य वा साम्राज्य स्थापनेची कोणतीच दूरदृष्टी नव्हती. उलट, पेशवे व

त्यांचे सरदार यांच्या राजकारणामुळे मूळच्या अनागोंदीतच भर पडली. आपणास असे दिसते की, जोवर बादशाहीवरील वा मराठ्यांची स्वराज्यावरील निष्ठा लुप्त झाली नव्हती तोवर ईस्ट इंडिया कंपनी आपल्या पायरीनेच वागत होती व स्वतः सार्वभौम होऊ शकत नव्हती. बादशाहीच्या सार्वभौमत्वाला तिला मान्यता द्यावीच लागत होती. तात्कालिक स्वार्थी राजकारणामुळे, तसेच देशाचे किंवा राज्याचे हित प्रसंगी आपल्या हितापेक्षा मोठे न मानण्याच्या वृत्तीमुळे येथील समाज एरवी संपन्न, प्रगल्भ व समर्थ असूनही राजकीयदृष्टचा कमालीचा दुबळा बनला. स्वराज्य, साम्राज्य या संकल्पना इथल्या राज्यकर्त्यांनीच मोडीत काढल्यावर फक्त लुटारूपणा व ऐषआराम, विलास उरला. पेशवाईचा उत्तरार्ध या दृष्टीने लक्षात घेण्यासारखा आहे. या परिस्थितीत ईस्ट इंडिया कंपनीच्या हाती हिंदुस्थानचा कारभार आला. ईस्ट इंडिया कंपनीचे नोकर असलेल्या मंडळींमध्येही स्वार्थी लुटारूपणा नव्हता असे नाही. चटकन श्रीमंत होण्याच्या लालसेने अनेक तरुण माणसे ईस्ट इंडिया कंपनीत नोकरीसाठी इंग्लंडातून येत असत. पण केवळ व्यापारी नफ्यासाठी येथें आलेल्या या मंडळींमध्ये त्याच वेळी ज्वलंत राष्ट्रीय भावनाही होती. युरोपातील तत्कालीन राज्यसत्तांच्या परस्परस्पर्धेतून त्यांच्या राष्ट्रीय भावनेचा परिपोष झाला होता. इंग्रजांची खरी ताकद यातच होती. त्यामुळे सैन्यामध्ये बहुसंख्येने भारतीयांची भरती असतानाही येथील लहानमोठी राज्ये बघताबघता पाऊणशे वर्षांच्या काळात इंग्रजांच्या अंकित झाली. भारतीय समाज राजकीय दास्यात अडकला खरा, पण एवढ्याने त्याची प्रगल्भता, क्षमता संपली नव्हती व याचा प्रत्यय लगेचच्याच काळात येऊ लागला. राष्ट्रसभेच्या निर्मितीची उकल करून घेताना या समाजाच्या क्षमतेचे व प्रगल्भतेचे यथार्थ भान ठेवावयास हवे.

कंपनीच्या राज्याची काही वैशिष्टये लक्षात घेतल्याखेरीज भारतीय समाजाने नंतरच्या काळात दिलेल्या प्रतिसादाची यथार्थ उकल होत नाही. दीर्घकाळपर्यंत मुंबई, मद्रास व कलकत्ता या तीन प्रमुख व्यापारी ठाण्यांची वाढ शहरे म्हणून होत राहिली. इंग्रजांच्या व्यापारी उलाढालींमध्ये त्यांना वेगवेगळ्या प्रकारे साहाय्यभूत होणाऱ्या दुभाषे, दलाल, कारकून, पेढीवाले, भागीदार इत्यादी मंडळींची वस्ती या शहरांमधून वाढत गेली. इंग्रजांच्या राज्याच्या विस्ताराबरोबर १७६० नंतरच्या काळात या शहरांची व त्यांतील हिंदी मंडळींची भरभराट होत गेली. यांतील कित्येक कुटुंबे धनाढ्य बनली. त्याच वेळी आंग्ल संस्कृती, पाश्चात्त्य विद्या यांचाही गाढ परिचय व संस्कार त्यांच्यावर झाला. तत्कालीन हिंदुस्थानी राज्यांमधील व समाजातील सर्वोच्च पातळीवरील जातिजमातींमधून हे लोक आलेले नव्हते, तर काहीशा मध्यम व कनिष्ठ थरांमधून बव्हंशी ते आलेले होते. कंपनीच्या नोकरवर्गाबाबतही हीच स्थिती होती. त्यामुळे असेल, तसेच व्यापारात गुंतलेले होते म्हणूनही असेल, हिंदी व इंग्रज, दोघांनाही, परस्परांशी मिळूनमिसळून वागण्यात कोणता अडसर आला नाही. पाश्चात्त्य विद्या, रीतिरिवाज व राजकीय-आर्थिक व्यवहार यांत मुरलेला एक नवाच धनाढ्य खानदानी वर्ग या शहरांमध्ये उदयास आला. या शहरांमधील कंपनीचे राज्य औपचारिक नियमांमध्ये व उच्चनीच श्रेणींमध्ये जखडबंद नव्हते; ते अनौपचारिक, भ्रष्ट, खुले आणि राजकारणाने ओतप्रोत होते. उच्च कारभारी मंडळींवर भर बाजारातही टीकाटिप्पणी चाले, व बाजारगप्पाही रंगत. पारंपरिक राजकीय व सामाजिक चौकटीच्या व वातावरणाच्या बाहेर असलेल्या, वरिष्ठतम इंग्रज अधिकाऱ्यांबरोबर बरोबरीच्या नात्याने ऊठबस करण्याचे वळण अंगी मुरलेल्या या नवश्रीमंत व सुविद्य हिंदी वर्गाने धार्मिक-सामाजिक प्रबोधनाच्या चळवळीत तसेच राजकीय-आर्थिक चळवळींच्या क्षेत्रात विशेष भूमिका वठविली.

ईस्ट इंडिया कंपनीच्या चाकरीत राहून झटपट गडगंज पैसा कमावून परत जाणाऱ्या मंडळींनी इंग्लंडमधील समाजजीवनावर व राजकारणावर प्रभाव टाकण्यास सुरुवात केल्यावर, व्यापारी कंपनीचे रूपांतर 'कंपनी सरकार'मध्ये झाल्यावर तिच्या कारभारावर नियंत्रण घालण्याचा मुद्दा पुढे आला. कंपनीने ब्रिटिश सरकारकडे कर्जाची मागणी केल्यावर नियंत्रण प्रस्थापित करण्याचा मार्ग खुला

झाला. १७७३ ते १८५८ या पाऊणशे वर्षांत, एकीकडे कंपनीच्या भारतातील राज्याचा विस्तार होत असताना दुसरीकडे कंपनी सरकारचे रूपांतर टप्प्याटप्प्याने ब्रिटिश पार्लमेंटच्या नियंत्रणाखालील 'ब्रिटिश राज्या'त होत होते. यांतले प्रमुख टप्पे पुढीलप्रमाणे सांगता येतील.

१) १७७३ व १७८४ च्या कायद्यांनी कंपनी सरकारचे सार्वभौमत्व संपुष्टात आले. कंपनीचाही निवाडा करणारी उच्चतर सत्ता अस्तित्वात आली. त्या सत्तेकडे दादफिर्याद करता येते ही गोष्ट उघड झाली. गव्हर्नर-जनरल झाला तरी त्याच्या कौन्सिलातही 'विरोधी पक्ष' काम करू शकतो, याचे दर्शन वॉरन हेस्टिंग्जच्या काळातच घडले.

२) १७९३ नंतर कॉर्नवॉलिसच्या कारकीर्दीत, जमीनमहसूल, न्यायदान, लष्कर व सर्वसाधारण प्रशासन व सुव्यवस्था या क्षेत्रांत 'इंग्लिश पद्धतीं'चा जाणूनबुजून अवलंब करण्यात आला. इंग्लिश पद्धतींनी राज्य करण्यास हिंदी माणसे स्वभावतःच अपात्र आहेत असे ठरविण्यात आले, व सर्व वरिष्ठ जागा केवळ इंग्रज व्यक्तींनाच देण्यात याव्यात असा निर्णय झाला. इंग्रज नोकरांचे पगार खूप वाढविले गेले. इंग्रज व हिंदी यांच्यातले सामाजिक, मानसिक अंतर वाढण्यात, वंशश्रेष्ठत्वाची भावना रुजण्यात याचा परिणाम झाला.

३) १८१३ व १८३३ साली, कंपनीच्या सनदेची मुदत वीस वर्षांनी वाढवून देत असताना तिची व्यापारी मक्तेदारी (प्रथम भारताबरोबरील व्यापाराच्या व पुढे चीनबरोबरील व्यापाराच्या संदर्भात) संपुष्टात आणली गेली. ख्रिश्चन धर्मप्रसारकांना पूर्वी असलेला मज्जाव हटवून मोकळीक देण्यात आली. हिंदी लोकांचा उद्धार करण्याचे कार्य हे इंग्रज राष्ट्रावर ईश्वराने सोपविलेले ऐतिहासिक जीवितकार्य आहे (white man's burden) ही भूमिका जवळपास अधिकृतपणे घेतली गेली. या भूमिकेमधून शासनाने शिक्षणाचे व धार्मिक-सामाजिक सुधारणेचे काम हाती घ्यावे असे वळण निर्माण झाले. व्यापारी मक्तेदारी (मीठ व अफू या वस्तूंचा अपवाद वगळता) उठल्याने खाजगी व्यापारी मोठ्या प्रमाणावर येथे आले. व्यापारी भरभराटीत येथील हिंदी व्यापारी पेढ्यांचीही भरभराट झाली. पूर्वी कंपनीच्या वखारींमध्ये काम करणारे कर्मचारी, लष्करातील अधिकारीच (क्लाइव्ह, माल्कम, इ.) कर्तृत्वाच्या जोरावर प्रशासक बनत. दीर्घकाळच्या वास्तव्यात येथील लोकजीवनाचा, समाजस्थितीचा त्यांना जवळून परिचय घडलेला असे. १८ व्या शतकाच्या अखेरीपासून थेट इंग्लंडमधून विशीतली पोरे प्रशासक म्हणूनच येऊ लागली. १८०९ नंतर हेलीबरी येथे प्रशासकांचे प्रशिक्षण रीतसर होऊ लागले. अज्ञ, मागास व नालायक हिंदी जनतेवर तिच्या कल्याणार्थ, उद्धारार्थ राज्य करण्यासाठी आपण राज्यकर्ते या नात्याने जात आहोत, आपण इंग्रजच तेवढे लायक आहोत हा अहंभाव बाळगूनच हे तरुण येथे येऊ लागले.

या टप्प्याचे महत्त्व ध्यानात येण्यासाठी आणखी काही गोष्टींचा निर्देश उपयुक्त ठरेल. १८१८ साली पेशवाई बुडविल्यावर भारताच्या सर्व मुख्य भागांवर ब्रिटिशांचा अंमल प्रस्थापित होऊन ती मोगल बादशाहीची जागा घेणारी सत्ता बनली. त्याच वेळी नेपोलियनचा पाडाव होऊन इंग्लंड हे जगातील सर्वांत प्रबळ राष्ट्र ठरले होते. औद्योगिक क्रांतीला वेग येत होता. बूर्ज्वा वर्ग व त्याचे संपूर्ण खुल्या व अनिर्बंध व्यापाराचे तत्त्वज्ञान यांचा वरचष्मा प्रस्थापित होण्याचा हा कालखंड होता. याच काळात गिरण्यांमध्ये तयार झालेले सुती कापड इंग्लंडहून येथे मोठ्या प्रमाणावर आयात होऊ लागले व इथला वस्त्रोद्योग मारला गेला. ग्रामीण अर्थव्यवस्थेवर हा एक जबर आघात होता. सर्व जगावर साम्राज्य स्थापन करण्याच्या आकांक्षेचा प्रकर्ष याच काळात झालेला आपणास दिसतो. त्याच बरोबर गौरेतर लोकांना मागास, निर्बुद्ध अवस्थेतून सुबुद्ध, सुसंस्कृत व पुढारलेल्या अवस्थेप्रत आणून सोडण्याच्या कार्याचे ईश्वरदत्त ओझे आपल्यावर आहे अशा प्रामाणिक धारणेचा उगम व विकासही याच काळात झाला. मिल्ल, बेंथॅमप्रणीत उदारमतवादी व उपयुक्ततावादी विचारांचा अंगीकार करून शास्त्रपूत सुखी समाजाची उभारणी करण्याच्या आकांक्षेने भारलेली व ह्या विचारांचा गाढ संस्कार घेतलेली प्रशिक्षित इंग्रज माणसे ह्याच कालखंडात इथल्या सनदी प्रशासकीय सेवेत दाखल होऊ लागली. येथील जनतेच्या कल्याणासाठी आपले राज्य अनिश्चित दीर्घकाळपर्यंत हिंदुस्थानावर टिकून

अनुक्रमणिका

राहणे आवश्यक आहे अशी या मंडळींची गाढ श्रद्धा होती. एकोणिसाव्या शतकातील इंग्लिश साम्राज्य-वादी मानसाचे रसायन वरील तीन घटक मिळून बनलेले होते, हे सतत ध्यानी बाळगणे आवश्यक आहे.

४) बेंटिंक, ऑकलंड, आणि डलहौसी या गव्हर्नर जनरलांच्या कारकीर्दीमध्ये, १८२८ ते १८५६ या काळात राज्यविस्तार, धार्मिक व सामाजिक सुधारणा, जमीनमालकीहक्कसंबंध आणि जमीनमहसूल आकारणी व वसुली, न्यायदान, रेल्वे, तारायंत्रे व टपाल, सार्वजनिक बांधकामे या स्वरूपात अर्थ-व्यवस्थेची व प्रशासनाची पुनर्रचना, प्रशासन या सर्वच क्षेत्रांमध्ये इंग्रजी राज्याची भूमिका आक्रमक राहिली. संस्थाने खालसा करण्याचा डलहौसीचा सपाटा, धार्मिक निर्बंध व समजुतींना न जुमानता सैन्यावर परदेशगमनाची सक्ती, चरबी लावलेल्या काडतुसांचा वापर, अशा गोष्टी या आक्रमक परिवर्तनवादी युटिलिटेरियन-ईव्हँजेलिकल भूमिकेचाच भाग होत्या.

१८५७ चा उत्तर भारतातील उठाव हा याचाच परिपाक होता. बंडाच्या सरंजामदारी पुढाऱ्यांचा बादशाहीचे पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न होता हे खरे; पण उत्तरेतील सर्वसाधारण लोकांचा इंग्रजी अंमलाविरूद्धचा व्यापक असंतोष नजरेआड होता कामा नये. अत्यंत क्रौर्याने, सूडबुद्धीने उठाव मोडून काढण्यात आला.

कंपनीच्या राज्याची जागा 'ब्रिटिश राज्या'ने औपचारिक रीत्या घेतली. १८५८ साली महाराणी व्हिक्टोरियाने काढलेला जाहीरनामा ब्रिटिश राज्याचे यापुढील काळातील धोरण स्पष्ट करणारा होता. संस्थानिक, राजेरजवाडे व पारंपरिक सरंजामदारवर्ग यांना धक्का लावला जाणार नाही, धार्मिक समजुती, रीतिरिवाज यांचा आदर केला जाईल, असे आश्वासन राणीच्या जाहीरनाम्यामध्ये दिलेले होते. याच्याच जोडीला हिंदी प्रजाजन हे ब्रिटिश राज्याचे नागरिकच असल्याचा निर्वाळा देऊन जाहीरनाम्याने घोषित केले की, 'And it is our further will, so far as may be, our subjects, of whatever race or creed, be freely and impartially admitted to offices in our service, the duties of which they may be qualified by their education, ability and integrity, duly to discharge.'

१८१३ नंतरच्या काळात ईस्ट इंडिया कंपनीच्या हाती राज्य राहिले तरी सर्व क्षेत्रातील घडामोडींना वेग आला, आणि या घडामोडी केवळ व्यापारी उलाढालींच्या क्षेत्रातील होत्या असे नाही. ख्रिश्चन धर्मप्रसारकांच्या हल्ल्यांमुळे हिंदुस्थानातील विविध धर्मीयांना, विशेषतः इंग्रजांच्या संपर्कात आलेल्या नवशिक्षितांना आपापल्या धर्मांचे, आचारविचारांचे, कर्मकांड व रूढी यांचे आत्मपरीक्षण करण्याचे आव्हान मिळाले व त्याने येथल्या सामाजिक व धार्मिक जीवनात चांगलीच खळबळ माजली. ख्रिश्चन धर्मप्रसारकांनी इंग्रजी शिक्षणाची मूहूर्तमेढ रोवली. अव्वल इंग्रजी काळातील प्रशासकांनीही पाश्चात्त्य विद्यांच्या प्रसाराचे काम हाती घेतले. धर्मप्रसारकांचे कार्य, नव्या 'शास्त्रपूत' तत्त्वावर समाजाची पुनर्रचना करण्याचा प्रयत्न आणि उच्चपदस्थ राज्यकर्त्यांपैकी काहींची भूतदयावादी / मानवतावादी दृष्टी यांमधून सामाजिक सुधारणांच्या चळवळींचा आरंभ झाला. न्यायदान, जमीनमहसूल, प्रशासन, सार्वजनिक बांधकामे, शिक्षण या क्षेत्रांतील विस्तारातून शिक्षित मध्यमवर्गाचा उदय झाला ही एक महत्त्वाची गोष्ट घडून आली. काही ब्रिटिश प्रशासकांच्या वैयक्तिक पुढाकाराने संस्कृती, इतिहास, संस्कृत व इतर भाषा यांचे अध्ययन, संशोधन यांसारख्या गोष्टीही सुरू झाल्या. इंग्रजी पोशाख, आचार, विचार, खाण्यापिण्याच्या सवयी, शिष्टाचार याही नव्या वर्गाच्या अंगवळणी पडू लागल्या. एकंदर 'इंग्रजी' वळण आत्मसात केलेल्या या वर्गाला स्वप्नेही इंग्रजीतच पडत असावीत असा गमतीदार शेरा भूदेव मुखर्जींनी या संदर्भातच मारलेला आढळतो.[१] इंग्रजी शिक्षणाचा परिणाम पुढील एका उताऱ्यातून अधिक नेमकेपणाने व्यक्त होतो. "It proclaimed supremacy of reason over faith, of individual conscience over outside authority, and brought in its train new conceptions of social justice, and political rights.

A new idealogy suddenly burst forth upon the static life, moulded for centuries by a fixed set of religious ideas and social conventions. It gave birth to a critical attitude towards religion and a spirit of enquiry into the origin of state and society with a view to determine their proper scope and functions." [२]

कंपनीचे राज्य असतानाही अव्वल इंग्रजीत, म्हणजे १८१३ च्याही आधी, येथील तीन प्रमुख इलाख्याच्या शहरांमधील नवश्रीमंत हिंदी वर्गाला ब्रिटिश वळणाचे राजकारण परिचित होते. इंग्रजी शिक्षणाच्या प्रसाराने, मिल्ल-स्पेन्सर-बेंथॅम यांच्या व इतर पंडितांच्या ग्रंथांच्या अध्ययनाने नवशिक्षित वर्गाची तात्त्विक बैठकही पक्की झाली. येथील शासन ' ब्रिटिश राज्य ' येथे प्रस्थापित करण्याच्या ओघात नंतरच्या काळात नवनवे कायदेकानू करू लागले, धोरणे अंगिकारू लागले, कर बसवू लागले, धार्मिक व सामाजिक रीतीरिवाज व रूढींमध्ये हस्तक्षेप करू लागले तेव्हा त्यांचे खंडनमंडन सहजपणे इंग्रजी वळणाच्या युक्तिवादाने व सनदशीर इंग्लिश पद्धतीने केले जाऊ लागले. काँग्रेसच्या स्थापनेचा इतिहास लिहिणाऱ्या प्रा. मेहरोत्रा यांनी आपल्या ग्रंथात[३] याचे गमतीदार उदाहरण दिले आहे. सतीची चाल बंद करण्याच्या सरकारी निर्णयाचा विरोध करताना सनातन्यांनी १७ जानेवारी १८३० रोजी जी सभा घेतली त्या सभेचे एकंदर कामकाज इंग्लिश पद्धतीचे कसे होते हे त्यांनी स्पष्ट केले आहे. सभा भरवून निषेध नोंदविणे, सभेत ठराव पसार करणे, सह्यांनिशी अर्ज सादर करणे, या सर्व गोष्टी जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीतील रिवाजांना अनुसरून होत्या. ब्रिटिश राज्याला साजेशा राजकारणाच्या रीतींचा अंगीकार एकोणिसाव्या शतकातील मुंबई, मद्रास, कलकत्ता, पुणे आदी शहरांमधील शिक्षित वर्गांनी विनासायास व पूर्ण आत्मविश्वासाने केलेला आढळतो.

हिंदी नवशिक्षितांनी व नवश्रीमंत वर्गांनी आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्यासाठी इंग्लिश राजकीय पद्धतींचा वापर केला याचे श्रेय तत्कालीन ब्रिटिश प्रशासकांनाही योग्य प्रमाणात दिले पाहिजे. हिंदुस्थानवर कशा पद्धतीने व कोणते उद्दिष्ट बाळगून राज्य करावे या मुद्यांवरून इंग्रज शास्त्यांमध्ये दोन तट होते. येथील प्रजेला शहाणे करून, ते जेव्हा शहाणे होऊन पात्र होतील तेव्हा त्यांच्या हाती ब्रिटिश राज्याची सूत्रे सोपवून आपणास परत जावयाचे आहे ही भूमिका स्वीकारून शहाणे करण्याचे, उद्धार करण्याचे जीवितकार्य पार पाडावे असा ' व्हाइट मॅन्स बर्डन ' वाला एक पक्ष होता. दुसरा पक्ष हिंदुस्थान आपण शस्त्रबळाने जिंकला आहे व आपल्या राष्ट्राच्या फायद्यासाठीच त्याचेवर राज्य केले पाहिजे असे म्हणणारा होता. येथल्या समाजाच्या सुधारणा करण्याच्या फंदात आपण पडण्याचे कारण नाही असा या गटाचा युक्तिवाद होता. दोन्हीही गटांना इंग्रजांचे राज्य दीर्घकाळ टिकावे ही बाब समान होती. येथील रहिवाशांना कशा प्रकारचे शिक्षण द्यावे, त्याचे माध्यम कोणते असावे यांवरही येथे बराच वादविवाद झाला. अखेर मेकॉले–ट्रेव्हलिन–ग्रँट प्रभृतींच्या धोरणाचा विजय झाला. इंग्रजी माध्यमातून उच्चशिक्षण देण्याचा निर्णय झाला. १८१३ ते १८८० या काळात उद्धारक-पालक पक्ष वरचढ होता, येथे तसेच इंग्लंडमध्येही. या विचाराचे ब्रिटिश प्रशासक ( क्वचित व्हाइसरॉय व गव्हर्नरदेखील ) नंतरच्या काळातही अनेक होऊन गेले, पण त्यांच्या हाती सूत्रे राहिली नाहीत. आपल्या या निर्णयाने काय होऊ शकेल हे मेकॉले प्रभृतींनी तर्काने जाणले होते पण तरीही इंग्लंडसारख्या राष्ट्रांनी हेच केले पाहिजे अशी त्यांची धारणा होती. (याबाबत मेकॉलेचे १० जुलै १८५३ चे कॉमन्स सभागृहातील भाषण पाहण्यासारखे आहे.) या भूमिकेमधून ज्या ब्रिटिश राज्याची उभारणी होणार होती त्यामध्ये तत्कालीन उच्चशिक्षित भारतीयांना महत्त्वाचे स्थान होते, त्यांच्या राजकीय आशा-आकांक्षा सफल होण्याची यात शक्यता होती, हे लक्षात घेता या उच्चशिक्षित मंडळींनी इंग्रजी राजवटीला मनापासून मान्यता दिली किंवा इंग्रजांच्या न्यायबुद्धीवर विश्वास ठेवला याची नेमकी स्पष्टता होते. या अर्थाने उच्चशिक्षित राजनिष्ठांचा एक वर्ग एकोणिसाव्या शतकात निर्माण झाला. या वर्गाने गाऱ्हाण्यांची दाद लावून

घेण्यासाठी संघटित व्हावे, चळवळी कराव्यात हे योग्यच आहे, ही एक स्वागतार्ह घटना आहे, आणि या वर्गाची मदत घेऊन येथील राज्य आपण केले पाहिजे अशी वृत्ती १८५७ च्या उठावाआधी राज्यकर्त्यांच्याजवळ होती. प्रशासनाशी संबंध नसलेल्या हिंदुस्थानातील इंग्रज मंडळींचीही सुशिक्षित हिंदी वर्गांना या काळात साथ होती. हक्कप्राप्तीच्या चळवळी व संघटना यांना आकार येण्यामध्ये या स्वागतशील वातावरणाचा व भूमिकेचा महत्त्वाचा वाटा होता.

१८५७ नंतर ब्रिटिश शासनाची, येथील प्रशासनाची, येथील इंग्रज जमातीची दृष्टी बदलली. सुशिक्षित वर्गांच्या संघटना व चळवळी या उपद्रवकारक वाटू लागल्या. १८५७ च्या उठावाची धास्ती इतकी बसली होती की, कोठे खुट्ट जरी झाले तरी बंडाळीच्या कटकारस्थानाचा संशय प्रशासकांना येऊ लागला. चळवळींना व संघटनांना हरप्रकारे मोडता घालण्याचे प्रयत्न हिंदुस्थान सरकारातील लहानमोठी धेंडे करू लागली. पण एव्हाना देशातील शिक्षितांच्या आकांक्षा व त्यांचे प्रयत्न यांना इतकी गती प्राप्त झाली होती की, १८८५ साली 'इंडियन नॅशनल काँग्रेस'ची स्थापना झाली तेव्हा या घटनेचे, तोंडदेखले का होईना पण स्वागतच व्हाइसरॉयना करणे भाग पडले.

– २ –

ईस्ट इंडिया कंपनी व तिचे नोकर यांच्या व्यापारी उलाढालींमध्ये सहभागी असलेल्या काही हिंदी व्यक्ती धनाढ्य बनल्या हे आपण वर नमूद केले आहे. या धनिक मंडळींकडे तत्कालीन हिंदी समाजाचे त्या त्या शहरांमध्ये प्रवक्तेपण आले असल्यास नवल नाही. १८१३ साली व्यापारी मक्तेदारी संपुष्टात आल्यावर या वर्गाची भरभराट आणखी झाली. इंग्रज व हिंदी दोन्ही समाजांत कंपनीशी संबंध नसलेला धनिक व्यापारी पेढीवाला वर्ग उत्पन्न झाला. बंगालमध्ये या धनिक वर्गापैकी अनेक कुटुंबे मोठ्या जमीनदारवर्गात दाखल झाली. त्याची हकीकत अशी : कॉर्नवॉलिसने मोगल बादशाहीत सारावसुलीचे अधिकार असलेल्यांना जमीनमालक बनवून कायमधारा पद्धतीखाली एक नवाच जमीनदारवर्ग निर्माण केला. ज्या जमीनदारांनी वेळीच सारा भरला नाही त्यांच्या जमीनदाऱ्या लिलावात काढल्या. तेव्हा कलकत्त्यामधील धनिकांनी त्या विकत घेतल्या. पूर्वापार जमिनीशी जागिरदार-वतनदार म्हणून संबंध नसलेली अनेक कुटुंबे नव्याने 'खानदानी' जमीनदार बनली. राजा, महाराजा असे किताबही मिरवू लागली. ब्रिटिश पार्लमेंटचे नियंत्रण प्रस्थापित झाल्यावर, गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्यासाठी प्रांतिक गव्हर्नरच्या कौन्सिलच्याही वर, पार्लमेंटकडे जाण्याची सोय उत्पन्न झाली. नव्या औपचारिक व्यवस्थेत कंपनीचे नोकर वा अधिकारी नसलेल्यांना औपचारिकरीत्या शासनापुढे जाणे भागही पडू लागले.

यामुळे १८३६–३७ या वर्षांमध्ये मुंबई येथे बाँबे चेंबर ऑफ कॉमर्स व कलकत्त्यात लँडहोल्डर्स सोसायटी या संघटना स्थापन झाल्या. दोन्ही संघटनांमध्ये त्या त्या शहरातील हिंदी व इंग्रज दोन्ही मंडळी सामील होती. बाँबे चेंबर ऑफ कॉमर्समध्ये १५ युरोपियन व १० हिंदी कंपन्या सभासद होत्या. लँडहोल्डर्स सोसायटीच्या स्थापनेमागे थिओडोर डिकन्स या इंग्रज गृहस्थाची प्रेरणा होती. यामध्ये थिओडोर डिकन्स, प्रसन्नकुमार टागोर व विल्यम हरी हे या संघटनेचे सेक्रेटरी व राधाकान्त देब हे अध्यक्ष होते. हिंदी–युरोपियन जमीनदार-मंडळींची ही संमिश्र संघटना होती. तिचा पाया समान हितसंबंध हा होता. केवळ हितसंबंधांवर आधारलेली व त्यासाठी जाति-पातीचा किंवा धर्माचा विचार आड येऊ न देता निर्माण झालेली ही भारतातील पहिलीवहिली संघटना होय. संघटनेच्या उद्दिष्टांत याचा प्रत्यय येतो. संघटनेच्या उद्दिष्टांत असे म्हटले आहे की, "To promote the general interest(s) of the landholders ...... ( and a ) cordial and friendly communication between all classes interested in land without distinction of colour, caste, birth, place, or religion" (अधोरेखित माझे). सरकारला निरनिराळी निवेदने देणे, जमीनदारवर्गांच्या विरोधी जाणाऱ्या कायद्यांना विरोध करणे, असे सामान्यत: या संघटनेचे स्वरूप राहिले. हे करत असतानाच न्यायालयात बंगाली भाषेचा वापर केला जावा, स्टँपड्यूटी कमी केली जावी याही बाबतीत संघट-

नेनें लक्ष घातल्याचे दिसते. पोटापाण्यासाठी मॉरिशसला निर्गमन करणाऱ्या मजुरांचे करारनामे व स्थिती हा प्रश्नही विचारात घेतलेला आढळतो. तत्कालीन बंगाली समाजाचे हे नवश्रीमंत जमीनदार स्वाभाविक प्रवक्ते मानले जात असल्याने जमीनदारांची संघटना असूनही या वर्गाने इतर घटकांच्याही प्रश्नाचा त्यांच्या चौकटीत का होईना, पण विचार केला.[५]

१८३९ मध्ये इंग्लंडमध्ये ब्रिटिश इंडिया सोसायटीची स्थापना झाली. तिची शाखा कलकत्त्यात उघडण्यात आली. तो बेंगॉल ब्रिटिश इंडिया सोसायटी या नावाने ओळखली जाते. ईस्ट इंडिया कंपनीने हिंदुस्थानात ज्या पद्धतीने राज्याचा विस्तार केला, कंपनीच्या नोकरांनी येथील जनतेची व राजेरजवाड्यांची बेदरकार बनवेगिरीने व क्रूरतेने लूटमार करून गडगंज संपत्ती केली व मनमानी कारभार चालविला त्याविरुद्ध इंग्लंडात मोठा असंतोष होता. एका दृष्टीने विचार केला तर, हिंदुस्थानातून लुटून आणलेल्या पैशाच्या जोरावर ब्रिटिश राजकारणात आपले प्रभुत्व जमविण्याच्या अनेकांच्या डावपेचाची, हा असंतोष ही प्रतिक्रिया होती. दुसऱ्या दृष्टीने पाहिले तर त्या काळातील इंग्लंडच्या सामाजिक/धार्मिक/राजकीय जीवनात वरचष्मा असणाऱ्या व ख्रिश्चन धर्माचा प्रसार करण्याचे जीवितकार्य आपले आहे असे मानणाऱ्या भूतदयावादी व मानवतावादी भावनेचा हा परिणाम होता. कंपनीच्या एकाधिकारवादी कारभाराविरुद्ध व मक्तेदारीविरुद्ध ब्रिटिश पार्लमेंटमध्ये परिणामकारक आवाज उठवावा ही दृष्टी ठेऊन ब्रिटिश इंडिया सोसायटीची स्थापना झाली. वेळोवेळी हिंदुस्थानमधील माहिती मिळावी म्हणून तिची शाखा बेंगॉल ब्रिटिश इंडिया सोसायटी या नावाने निघाली. जॉर्ज थॉम्पसन हे इंग्रज गृहस्थ १८४३ पर्यंत या संघटनेचे अध्यक्ष होते. जेमतेम २/३ वर्षे ही संघटना टिकली. राजकीय व प्रशासकीय स्वरूपांच्या मागण्यांबरोबरच बंगालमधील 'कुलीन' ब्राह्मणांचे बहुपत्नीत्व, तसेच विधवा-विवाह, स्त्रीशिक्षण या विषयांकडेही संघटनेचे लक्ष वेधले गेले होते असे दिसते. १८३३ साली ईस्ट इंडिया कंपनीला दिलेल्या सनदेमधील कलम ८७ वर– ज्या अन्वये जात, धर्म, लिंग इ. बाबींमुळे सरकारी नोकऱ्या-चाकऱ्यांत पक्षपात केला जाणार नव्हता– संघटनेचा भर होता. या संघटनेतील काहींना सरकारने डेप्युटी मॅजिस्ट्रेट केले[६] व संघटनेला गळती लागली.

ब्रिटिश पार्लमेंटने वेळोवेळी कंपनीच्या हिंदुस्थानातील राज्यकारभाराची चौकशी केली तिचे वृत्तांत, देशाच्या अंतर्भागात कंपनीचे राज्य रीतसर प्रस्थापित झाल्यापासून घडून येत असलेले बदल व त्यांची पोचणारी खबर, आणि 'ब्रिटिश राज्या'च्या तात्त्विक अधिष्ठानाची व उद्दिष्टांची इंग्रजांकडूनच होणारी स्पष्टता यामुळे इंग्रजी राज्याची परखड चिकित्सा याच काळात सुरू झाली. देशी वर्तमानपत्रांमधून लेख येऊ लागले. येथे लोकहितवादींच्या 'शतपत्रां'ची सहजच आठवण व्हावी. बंगालमध्ये क्रिस्तोदास पाल यांचे नाव डोळ्यांसमोर येते. इंग्रजी राज्यात इंग्रज अंमलदारांच्या हाताखाली अनेक नवशिक्षित मंडळी कामे करीत असल्याने इंग्रजी राज्याचे उणेपण लपून राहणे इतःपर शक्य नव्हते. दोन तीन मुद्दे सर्वांच्याच लक्षात आलेले दिसतात. येथील इंग्रजी राज्य प्रत्यक्षात 'जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धती'च्या तत्त्वापेक्षा अस्मानीसुल्तानी पद्धतीनेच चालत आहे; तरुण इंग्रज साहेब हा अज्ञानी तर असतोच, पण पुष्कळदा कार्यतत्परही नसतो; आणि राज्य करण्याची लायकी अनेकानेक लहानमोठ्या इंग्रजसाहेबांइतकीच आपली पण आहे. मुंबई व कलकत्त्यासारख्या शहरांच्या कारभारातही या गोष्टी लोकांच्या अनुभवाला येत होत्याच.

पण नेमक्या याच काळात हेलीबरी कॉलेजात शिकल्याने सर्वज्ञपणाचा आव अंगी बाणलेली, अहंमन्य तरुण सनदी प्रशासकांची जमात 'पोलादी चौकटी'च्या स्वरुपात हिंदुस्थानवर आपली पकड पक्की करीत चालली होती. वंशश्रेष्ठत्वाची भावना प्रकर्ष पावत होती. मुंबई, कलकत्ता, मद्रास या शहरांतही पूर्वीचे खेळीमेळीचे वातावरण व संमिश्र सांस्कृतिक जीवन उरले नव्हते. १८२८ नंतरच्या आक्रमक सुधारकी पवित्र्यामुळेही हिंदी व अँग्लो-इंडियन (युरोपियन) यांच्यात अंतर व ताण वाढत होता. १८४५ साली सरकारने वारसाहक्काचा हिंदू कायदा बदलण्याचा मनोदय जाहीर केला. यान्वये धर्मांतर

केलेल्या हिंदूंना वारसाहक्कात वाटा मिळणार होता. एका अर्थाने हा कायदा धर्मनिरपेक्ष वारसाहक्क देणारा होता तर दुसऱ्या बाजूने हिंदू धार्मिक कायद्यात हस्तक्षेप करणारा होता. याबाबत मद्रास व कलकत्ता येथील हिंदूंनी विरोध केला होता. राज्य-कारभार, प्रशासन, व्यापार सर्वच क्षेत्रांमध्ये इंग्रजांचे व हिंदी लोकांचे हितसंबंध वेगळे व परस्परविरोधी होत चालले होते. संयुक्त संघटनांचा कालखंड संपुष्टात आला होता.

१८५१ साली कलकत्त्यास ब्रिटिश इंडियन असोसिएशन स्थापन झाली. या संघटनेत एकही अँग्लो-इंडियन सभासद नव्हता, ही गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. देवेंद्रनाथ टागोर हे या नव्या संघटनेचे सेक्रेटरी होते. इ. स. १८५३ मध्ये कंपनीच्या सनदेची मुदत वाढवून घ्यायच्याबाबत फेरविचार होणार होता. या संदर्भात कंपनीच्या कारभाराचा फेरविचार व्हावा, आपणास भेडसावणाऱ्या प्रश्नांवरील उपायांचा नव्या सनदेत समावेश व्हावा ह्या संदर्भात या संघटनेने प्रामुख्याने कार्य केले. मुंबई व मद्रास शहरातील संघटनांना पत्र लिहून, सर्वांचे संयुक्त प्रतिनिधी मंडळ इंग्लंडला पाठवावे व कंपनी कारभारातील उणीवांचे दिग्दर्शन करावे, तसेच या निमित्ताने सर्व संघटनांचा मिळून एकच अर्ज इंग्लंडला धाडावा अशीही कल्पना संघटनेनें समोर ठेवली. या संघटनेच्या वतीने असे प्रयत्न होऊनही मुंबई व मद्रास येथील संघटनांनी आपल्या इलाख्यांमधून वेगळे अर्ज पाठविले. मुंबईमध्ये १८५२ मध्ये बाँबे असोसिएशनची स्थापना झाली. या संघटनेतही सर्व हिंदी माणसेच होती. पारशी, हिंदू, मुसलमान, ज्यू आदी सर्व मात्र एकत्र आले होते. मद्रास येथे प्रथमतः ब्रिटिश इंडियन असोसिएशनची शाखा स्थापन करण्यात आली. तथापि कलकत्त्याच्या ब्रिटिश इंडियन असोसिएशनच्या वतीने तयार करण्यात आलेल्या अर्जात मध्यम व कनिष्ठ वर्गाचे प्रतिनिधित्व नाही म्हणून मद्रास शाखेने सदर अर्ज स्वीकृत न करता, उलट मद्रास नेटिव्ह असोसिएशन या नावाने वेगळीच संघटना स्वतंत्रपणे स्थापन करून आपल्यावतीने वेगळा अर्ज पाठविला. पुण्यातही १८५२ मध्ये डेक्कन असोसिएशन ही संघटना स्थापन करण्यात आली. या संघटनेत नवशिक्षितांसोबत सरदार, इनामदार मंडळीही एकत्र आलेली होती.

काँग्रेसच्या स्थापनेच्या आधी तीसपस्तीस वर्षे हिंदुस्थानातील सुशिक्षित मंडळींच्या मागण्या काय होत्या ते पाहणे उद्बोधक ठरेल.

ब्रिटिश इंडियन असोसिएशनच्या अर्जात इंग्रजी राज्याबद्दल पुढील तक्रारी नोंदविलेल्या होत्या: जमीन महसुलाचा बोजा अती आहे. जमीन महसूल व इतर कर यांद्वारा कंपनी मोगलकाळापेक्षा कितीतरी जास्त उत्पन्न गोळा करीत असूनही दळणवळणाच्या सोयी समाधानकारक नाहीत; व्यक्तीचे जीवित व मालमत्ता सुरक्षित नाही; कंपनीच्या कारभाराचा खर्च फार आहे; दिवाणी व फौजदारी खटल्याच्या कामकाज पद्धती फार जाचक व गैरसोयीच्या, किचकट आहेत; न्यायदानाचे काम व्यवस्थित व तत्परतेने होत नाही; वगैरे. दळणवळणाच्या सोयी वाढविणारी सार्वजनिक कामे काढली जावीत, त्यामुळे व्यापार व उद्योगांना चालना मिळेल; उच्च अधिकाऱ्यांचे लठ्ठ पगार कमी करावेत तसेच सरकारी खर्चात काटकसर करावी; एतद्देशीय धार्मिक संस्था व रीतिरिवाज यांच्यात ढवळाढवळ न करण्याची हमी द्यावी; (सरकारी खर्चाने केलेल्या कलकत्त्याच्या बिशपच्या नेमणुकीस उद्देशून) सरकार संमिश्र जातिजमातींसाठी व विविध धर्मीयांसाठी असल्याने शासकीय तिजोरीतून कोणत्याही धर्मासाठी खर्च होऊ नये; जमीन महसुलाचा बोजा कमी करावा; न्यायखात्याचा कारभार सुधारावा; मीठ या वस्तूच्या व्यापारावरील, व इतरही बाबतीतली कंपनीची मक्तेदारी संपुष्टात आणावी, शिक्षणाच्या पर्याप्त सोयी कराव्यात, हिंदी व्यक्तींना वरिष्ठ पदे प्रशासनात दिली जावीत अशा प्रकारच्या सुधारणाही सुचविलेल्या आढळतात.

राज्यकारभाराची व्यवस्था कशी असावी, जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा अवलंब करण्याच्या दृष्टीने कोणती पावले टाकावीत या विषयातही सविस्तर सूचना केलेल्या आढळतात. हिंदुस्थान सरकारचा कारभार अर्धवट कलकत्त्याहून व अर्धवट इंग्लंडातून चालविला जातो त्याऐवजी जास्तीत-जास्त १२ सभासदांच्या एका मंडळाकडे एकहाती

कारभार सोपवावा, गव्हर्नर-जनरलच्या अखत्यारीतील वरिष्ठ सरकारकडे राजकीय, परराष्ट्रीय व लष्करी बाबी तेवढ्या असाव्यात, त्याखेरीज इलाख्यांच्या गव्हर्नरांवर सर्वसाधारण नियंत्रण तेवढे असावे, कायदे करण्याचा अधिकार असलेल्या मंडळाच्याच हाती राजकीय व कार्यकारी सत्ता नसावी, कायदेमंडळावर लोकप्रतिनिधी असावेत, अशी व्यवस्था सुचविली आहे.

मद्रास नेटिव्ह असोशिएशनच्या अर्जात, तसेच बाँबे असोसिएशनच्या अर्जातही पुष्कळ मुद्दे ब्रिटिश इंडियन असोसिएशनच्या अर्जातलेच आढळावेत यात आश्चर्य नाही. कलकत्त्याच्या मंडळींनी प्रसृत केलेला खर्डा नमूना म्हणून समोर ठेवला गेला असण्याचीही शक्यता आहे. मद्रासच्या संघटनेने पाठविलेल्या अर्जात रयतवारी व जमीनदारी पद्धतींची तौलनिक चिकित्सा केली जावी व मोगलपूर्वकालीन ग्रामप्रधान पद्धती स्वीकारावी, न्यायदानाच्या बाबतीतही कोर्टकचेरीच्या महागड्या व जाचक इंग्लिश पद्धतीच्या जागी जुनी गावपातळीवरील न्यायपंचायतीची पद्धती स्वीकारावी, असे सुचविले आहे. सनदी प्रशासकांना प्रशिक्षण देणाऱ्या हेलीबरी संस्थेस अर्जात विरोध दर्शविला आहे, व उच्च श्रेणीच्या जागांवर हिंदी लोकांची नेमणूक केली जावी अशी मागणी केली आहे. कर भरणाऱ्यांचा मतदार संघ बनवून, निवडणुकांद्वारे लोकप्रतिनिधी निवडले जावेत, व विधिमंडळात किमान निम्मे सभासद लोकनियुक्त असावेत असे म्हटले आहे. ( बाँबे असोसिएशनच्या अर्जातील महत्त्वाचा काही भाग याच अंकात पृ. १० व ११ वर उद्धृत केला आहे तो पहावा.)

१८५७ च्या उठावाचा नवशिक्षितांच्या चळवळी व संघटना यांच्यावर मोठा प्रतिकूल आघात झाला असला तर नवल नाही. कंपनीमुळे अस्तित्वात आलेला व कंपनीच्या वाढविस्ताराबरोबर भरभराट पावलेला धनिक, नवश्रीमंत जमीनदार व व्यापारी वर्ग १८५७ नंतर राजकीय स्वरुपाच्या चळवळी व संघटना यांच्याबाबतीत सावध बनला. १८५८ नंतर खुद्द राणी सरकारचे ब्रिटिश राज्यच सरळसरळ प्रस्थापित झाल्याने न्यायबुद्धीनेच येथले राज्य यापुढे चालेल अशी खात्री वाटली असेल.

ते काही असो, वर उल्लेखिलेल्या सर्व संघटना लौकरच बव्हंशी निष्क्रीय बनलेल्या आढळतात. त्यांपैकी काही, उदाहरणार्थ ब्रिटिश इंडियन असोसिएशन व बाँबे असोसिएशन, १८६५ च्या नंतर परत सक्रिय बनल्या.

१८५२ च्या आसपास स्थापन झालेल्या संघटनांच्या मागे विद्यापीठ युगापूर्वीच्या धनिक व शिक्षित मंडळींची शक्ती व प्रेरणा होती. १८३५ च्या मेकॉलेच्या सूत्रानुसार सरकारने इंग्रजी शिक्षण देणाऱ्या शाळा व कॉलेजे काढली, विद्यापीठे स्थापन केली. मुंबई, मद्रास व कलकत्ता या विद्यापीठांचे पदवीधर, तसेच विलायतेस जाऊन शिकून आलेले बॅरिस्टर आदी १८६० नंतर समाजजीवनात सक्रिय झाले. १८६० नंतरच्या काळात शासनाच्या विस्ताराबरोबर, कोर्टकचेऱ्यांच्या, रेल्वे–तार–टपाल खात्यांच्या विस्ताराबरोबर विद्यापीठांचे पदवीधर सरकारी नोकऱ्यांमध्ये व शिक्षकी, वकिलीसारख्या व्यवसायांमध्ये हिंदुस्थानातील बहुतेक शहरांपर्यंत जाऊन पोचले. या मंडळींचे एक देशव्यापी जाळे विणण्यासाठी, त्यांना संघटित करण्यासाठी अनुकूल अशी परिस्थितीही या काळात निर्माण झाली: रस्ते, रेल्वे, टपाल-तारा यंत्रे, यांमुळे निर्माण झालेल्या दळणवळणाच्या सोयी, देशी भाषांतील वृत्तपत्रे, आणि इंग्रजी शिक्षणामधून तयार होणारे समान मानस व समान आकांक्षा यांमधून ही अनुकूल परिस्थिती निर्माण झालेली होती. वकिली, शिक्षकी, पत्रकारिता, वैद्यक अशा काही व्यवसायांमधील मंडळी ही स्वतंत्र होती; सरकारी नोकरांवरही या काळात तुलनेने कमी निर्बंध होते. यापुढच्या काळात न्यायमूर्ति रानडे व तेलंग, फेरोझशहा मेथा, आनंदमोहन बोस, सुरेंद्रनाथ बॅनर्जी प्रभृती उच्चशिक्षित पदवीधर मंडळींनी राजकीय चळवळीची सूत्रे आपल्या हाती घेतली.

ज्या नव्या राजकीय व आर्थिक तत्त्वांवर इंग्रजी राज्याचा कारभार चालविला जात होता त्याचे आर्थिक दुष्परिणाम १८७० च्या आसपास ठळकपणे उघड होऊ लागले होते ब्रिटिश भांडवलाच्या प्रचंड प्रमाणावरील गुंतवणुकीसोबत व्याजापोटी दरवर्षी बाहेर पाठवावी लागणारी संपत्ती वाढत चालली. सनदी-नोकरांच्या लठ्ठ पगाराच्या रूपाने संपत्तीचा

ओघ परदेशी वहात होताच. सर्व प्रकारच्या जिनसा आयात केल्या जात. त्यासाठी परत पैसा बाहेर पाठवावा लागे. साम्राज्याच्या विस्ताराचा आर्थिक बोजाही हिंदी जनतेवरच टाकला जात होता. मोठ्या प्रमाणावर गोरे सैन्य येथे १८५७ नंतर कायमचे ठेवले जाऊ लागले. त्यांच्यावरील खर्च हिंदुस्थाननेच करावयाचा. साऱ्याच्या रूपाने सरकार शेतकऱ्यांच्या उत्पन्नाचा इतका मोठा हिस्सा सालोसाल काढून घेई की, शेतीत नवी भांडवल गुंतवणूक तर होणे राहोच, पण शेती व शेतकरी दोघांचाही ऱ्हास सुरू झाला. दुष्काळी वर्षांमध्ये पोटापाण्याची सोय म्हणून धान्यसाठे शिल्लक ठेवता न आल्याने दुष्काळांचे परिणाम उत्तरोत्तर भीषण होत चालले. वस्त्रोद्योग तर मारला जात होताच. त्याची जागा इतर उद्योग घेत होते असेही नाही. इंग्लंडमधील उद्योगांसाठी बाजारपेठ म्हणून सरकार हिंदुस्थानकडे पाहात असल्याने येथे उद्योगधंदे वाढविण्याचे धोरण नव्हते. ताग व कापडगिरण्यांचाच काय तो अपवाद काही प्रमाणात म्हणावा लागेल. नीळ, चहा, कॉफी यांचे मळे

## १८५२ साली बाँबे असोसिएशनने पार्लमेंट सभेस पाठविलेली अर्जी :

(नमुन्यादाखल यातील काही मजकूर खाली दिला आहे.)

पार्लमेंट सभेंतील ग्रेट ब्रिटन आणि ऐरलंड एथील प्रजेचे नामदार प्रतिनिधी यांशीप्रति,

२. तुमचे अर्जदार ही गोष्ट पूर्तेपणीं जाणून आहेत व ती ते सैतोषानें कबूल करितात कीं त्यांस इंग्रजांच्या अमलांत पुष्कळ सुखें आहेत; परंतु ही सुखें इंग्रजांच्या चांगल्या गुणांमुळे प्राप्त जाहलीं आहेत; हिंदुस्थानांत राज्याची धर्ती आजपर्यंत जशी चालत आली आहे तिजवरून हीं सुखें प्राप्त जाहाली असा अर्थ नाहीं. ही राज्याची पद्धत जसजसे प्रसंग पडत गेले तदनुसार घडून आली आहे; ती योजना करून ठरविलेली आहे असें नाहीं. सबब या देशाच्या हल्लींच्या स्थितीस व प्रजेच्या रास्त इच्छेस ही राज्याची पद्धत फारशी माफक (अनुरूप) आहे असे नाहीं.

९. विलायतेंतील हें बोर्ड म्हणजे राज्यकारभार चालविणारी मंडळी, इजमध्यें बारा सभासद असावे, किंवा चोवीस असावे ... ... ... ... ... ... ... ... ... मोठाले हुशार लोक त्या बोर्डातील हुद्दा पत्करीत एवढी त्यांस देणगी असावी, व बादशाहाचा दिवाण खेरीजकरून बाकीचे सभासद पूर्वी हिंदुस्थानांत राहिलेले असावे, असा नियम करून ठेवावा.

१०. तुमच्या अर्जदारांकडून आणखी अशी सूचना आहे कीं, या देशचा राज्यकारभार चांगल्या प्रकारें चालला असतां ज्यांचें वास्तविक हीत आहे, अशा लोकांच्या मंडळीनें हे कामदार निवडून नेमीत जावे.

१७. तुमच्या अर्जदारांचें आणखीं असें म्हणणे आहे कीं चवथ्या विलियम राजाच्या अमलांतील चवथ्या आणि पांचव्या कायद्याच्या ८७ व्या कलमांत असा ठराव जाहालेला आहे कीं, हिंदुस्थानचा हरएक नेटिव किंवा त्या देशांत जन्मलेल्या रयतेंतून कोणी यास त्यांचा धर्म किंवा जन्मभूमि किंवा वंश किंवा शरीराचा रंग एवढ्याच फक्त कारणांवरून सरकारी काम मिळण्यास अधिकार नाहीं असें समजूं नये. हा ठराव आजपर्यंत बहुधा रद्द जाहाल्यासारिखा तसाच पडून राहिलेला आहे.

२२. जे न्यायाचीं कामें शिकले नाहींत व ज्यांजमध्यें तीं कामें चालविण्याचा स्वभावसिद्ध गुण नाहीं, अशांच्या हातीं अदालतीचीं कामें दिल्यानें त्याचा असा परिणाम होतो कीं, होईल तितकें करून गैर इनसाफ न होई असें करण्याकरितां कित्येक अपिलें व तपासण्या करण्याची गरज पडत्ये .........तेव्हां हिंदुस्थान सरकारच्या न्यायखात्यांत सुधारणा करण्याची जशी फारच आवश्यकता आहे, अशी दुसऱ्या कोणत्याही खात्यांत नसेल.

काढण्यासाठी ब्रिटिश भांडवलास उत्तेजन देऊन येथील शेतीव्यवस्थेची घडी विस्कटून टाकण्याचेही काम चालले होते. सरकारची तिजोरी या काळात वरचेवर रिकामी पडू लागली. आयात मालावर जकात बसविण्यास ब्रिटिश उद्योगपती व व्यापारी यांचा सक्त विरोध, व त्यांचे हितसंबंध जपण्यास ब्रिटिश पार्लमेंट बांधील. तेव्हा मग जमीन महसुलात वाढ करणे, व्यापारउदीम व व्यवसाय यांच्यावर कर बसविणे, आयकर बसविणे, नगरपालिका व लोकल बोर्डे यांच्या खर्चाचा भार स्थानिक लोकांवर टाकणे, असे सुरू झाले. साऱ्याची वसुली कडक केल्याने कर्जापायी जमिनी सावकारांच्या हाती मोठ्या प्रमाणावर जाऊ लागल्या, पिढीजात शेतकरी देशोधडीला लागू लागले. शहरांमध्ये व खेड्यांमध्ये, शिक्षित पांढरपेशांमध्ये व अशिक्षित शेतकऱ्यांमध्ये असंतोष वाढण्याला सतत कारणे उपस्थित होऊ लागली. ग्रामीण भागात कोठे कोठे असंतोषाचे उद्रेकही होऊ लागले.

१८७० च्या आसपास आर्थिक गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्यासाठी लहानमोठ्या स्थानिक व देश-

---

२५. तुमच्या अर्जदारांचें आणखी असें बोलणें आहे कीं, हिंदुस्थानांतील दिवाणी कामदारांचे पगार असावे त्यापेक्षां फारच मोठाले आहेत. हौस आव कामन्सच्या सेलेक्ट कमीटीपुढे असा इकरार (साक्ष) कोणी दिलेला तुमच्या अर्जदारांच्या दृष्टीस पडला आहे कीं, कंपनीच्या सनदी चाकरांस जेवढा पगार असतो त्याच्या यत्किंचित् अंश पगारावर बेसनदी कामदार सरकारचीं कामें फार चांगल्या रीतीनें करितात, आणि नेटीव कामदारांची साधारण वर्तणूक ही अगदीं रास्त असत्ये. सबब हल्लींच्या पेक्षां पुष्कळ नेटीव लोकांस सरकारी कामावर नेमणें योग्य आहे.

२६. अशीं सरकारी हुद्दे पुष्कळ आहेत कीं, त्यांजवर जे हेड म्हणजे मुख्य असतात ते तीं कामें शिकलेले नसतात. यामुळें त्यांच्यानें ती तेवढी चांगल्या प्रकारें बहुंधा चालवत नाहींत व त्यांचा सर्व भरंवसा त्यांच्या हाताखालच्या कामदारांवर असतो. हे हुद्दे पुनः त्यांजकडेस कांहीं थोडा वेळपर्यंत मात्र असतात. यामुळें ज्या पुष्कळांच्या मनांत काम चांगलें व्हावें असे असत्यें त्यांस ते काम शिकण्यास कांहींच उमेद येत नाहीं.

२८. तुमच्या अर्जदारांस आणखीही एक गोष्ट आपल्या सभेस निवेदन करावयाची आहे कीं, या इलाक्यांत, रहदारीच्या साधनांची फार खूट [ उणीव ] आहे. अशी रहदारी नसल्यामुळें, माल पिकविणारांस आपला माल ज्या ठिकाणीं अधिक दर येत असेल तेथें नेतां येत नाहीं, सबब त्यांस अधिक माल उत्पन्न करण्याची उमेद येत नाहीं. आणि एकादें आफतीचें [ आपत्तीचे ] साल पडलें असतां ज्या ठिकाणीं धान्याची समृद्धि असेल तेथून आफतीच्या ठिकाणीं धान्य नेऊन तेथें स्वच्छता [ स्वस्तता ] करितां येत नाहीं.

३१. याजकरितां तुमच्या अर्ज करणारांची नम्रतापूर्वक अशी प्रार्थना आहे कीं, हिंदुस्थानांतील पुढे राज्यकारभार कोणत्या प्रकारें चालवावा याविषयी ठराव करण्याचा प्रसंग आपल्या सभेस येईल तेव्हां त्या ठरावांत या अर्जात जें मागणें केलें आहे त्याप्रमाणें कलमें ठरविण्यांत यावीं, व विश्वासू योग्य आणि निष्पक्षपाती अशा ठिकाणाहून जेवढी माहितगारी समजण्याजोगी असेल तेवढी समजेपर्यंत हिंदुस्थान सरकारचा राज्यकारभार कशा प्रकारें चालवावा याविषयीं अखेरीचा ठराव करण्याचें तकूब ठेवावें. आणखी तुमचे अर्जदार अशी आशा बाळगीत आहेत कीं, इतक्या कोट्यावधि इंग्रज सरकारच्या रयतेच्या हिताच्या गोष्टी पार्लमेंटसभेपुढे विचार करण्याकरितां वारंवार दाखल करितां याव्या म्हणून हिंदुस्थानचा पुढील राज्यकारभार चालविण्याविषयी कंपनीला जी सनद द्यावयाची ती दाहा दाहा वर्षांचीच देत जावी, जास्त मुदत देऊं नये, असा आपल्या सभेनें नियम करून टाकावा.

आणि आपले अर्जदार निष्ठापूर्वक आपले
कल्याणाची इच्छा करीत आहेत.

अनुक्रमणिका

व्यापी चळवळी उत्पन्न होऊ लागल्या. चळवळींसाठी काही ना काही मुद्दे सतत उपस्थित असत. जागोजाग पदवीधर मंडळी शैक्षणिक, सामाजिक-सांस्कृतिक उपक्रम ( वाचनालये, व्याख्यानमाला, शाळा, वृत्तपत्रे, सभा, संस्था ) करू लागली होती. राजकीय स्वरुपाच्या चळवळी चालविणारी, ज्वलंत प्रश्नांविषयी माहिती गोळा करून पाठविणारी, नवनव्या विचारांचा, मागण्यांचा प्रसार करून जागृती उत्पन्न करणारी, आणि संघटना बांधणारी कार्यकर्ते मंडळी बहुतेक लहानमोठ्या जिल्ह्यांच्या ठिकाणी दोनपाच तरी असतच. त्यांचे मुंबई, कलकत्ता, मद्रास अशा इलाख्याच्या शहरांमधील पदवीधर–पुढाऱ्यांशी मैत्रीचे, व्यावसायिक व नात्यागोत्याचे संबंधही असत. १८७० नंतरच्या काळात कमीअधिक क्रियाशील असणाऱ्या संघटना सतत उत्पन्न होत राहिलेल्या आढळतात.

या नव्या पदवीधर मध्यमवर्गाला ईस्ट इंडिया कंपनीच्या काळातील व्यापारी उलाढालींच्या आश्रयाने श्रीमंत बनलेल्या नव 'खानदानी' धनिक शेठ वा जमिनदार वर्गाशी आपले काही जवळचे अनुबंध आहेत असे अनुभवाला येत नव्हते. बौद्धिक, सांस्कृतिक व सामाजिक तिन्ही दृष्टींनी अंतर फार मोठे होते. नवी पदवीधर मंडळी इंग्लिश साहित्य, इतिहास, व मिल्ल-स्पेन्सर-बेंथॅम यांच्या तत्त्वज्ञानावर पोसलेली होती. मुंबई, कलकत्ता, दख्खनमधील पुढील काळातील घडामोडी बघितल्यावर असे आढळते की, १८५० च्या आसपास पुढारीपण करणाऱ्या धनिक व शिक्षित मंडळींकडे प्रसंगानुरूप ज्येष्ठत्वाचा मान राहिला. पण नव्या संघटना व नवे नेतृत्व पुढे आले. बंगाल व मद्रास इलाख्यांमध्ये नव्याच संघटना बांधल्या गेल्या. पुण्यातही नवी संघटना स्थापन झाली. मुंबईत मात्र नव्या-जुन्यांचे संमिश्रण होत राहिले. दादाभाई नवरोजी यांचे व्यक्तित्व व कार्य यांमुळे, आणि मुंबईच्या विशेष बहुभाषिक-बहुधार्मिक व बहुढंगी बांधणीमुळे तेथील घडामोडी गुंतागुंतीच्याच राहिल्या.

सुरेंद्रनाथ बॅनर्जींच्या इंडियन असोसिएशनने बंगालमधील मध्यमवर्गीय सुशिक्षितांना व्यासपीठ पुरविले. बंगाली पदवीधर या काळात सर्व उत्तर भारतात नोकरी–व्यवसायानिमित्त पसरले होते. त्यांच्या आधारे सुरेंद्रनाथ बॅनर्जींनी आपल्या अमोघ वक्तृत्वाने उत्तर भारतातील प्रमुख शहरांमधील पदवीधरांमध्ये जागृती निर्माण केली. इंडियन असोसिएशनच्या स्थापनेच्या आधी दोन वर्षे 'इंडियन लीग' या नावाची संघटना 'अमृत बझार पत्रिके' चे संपादक शिशिरकुमार घोष यांच्या पुढारीपणाखाली काम करीत होती. बंगाल इलाख्याचे गव्हर्नर रिचर्ड टेंपल यांच्या प्रेरणेने निघाली असल्याने 'टेंपल लीग' म्हणूनही ओळखली जात असे. १८७७ साली लॉर्ड लिटन यांनी भरविलेल्या दिल्ली दरबाराचे वेळी लीगने ५००० सह्यांचे निवेदन दिले. हिंदी लोकांच्या प्रश्नांना व मागण्यांना वाचा फोडण्याच्या आड काही मंडळी आल्याने अंतर्गत ताण व धुसफूस होती. १८७६ साली इंडियन असोसिएशन स्थापन झाल्यावर लीगचे बहुसंख्य सभासद असोसिएशनला येऊन मिळाले. असोसिएशनच्या १८७६ ते १८८८ या काळातील सभासदांचे व्यवसाय पाहिले तर असे दिसते की, कायदा क्षेत्रातून एकूण २६ ( यात ५ बॅरिस्टर, ५ ॲटोर्नी व १६ प्लीडर्स ), पत्रकार व वृत्तपत्रांचे संपादक ८, डॉक्टर–१, ( ख्रिश्चन ) धर्मगुरु– १, शिक्षक–२, जमीनदार–६, व्यापारी–२ व निरनिराळ्या संस्थांचे कार्यवाह–२, अशी मंडळी यात होती.[७] यावरून नव्या मध्यमवर्गाचे प्रतिनिधित्व ही संघटना करत होती हे स्पष्ट दिसते. संघटनेच्या नावातही 'ब्रिटिश' हा शब्द नाही, हेही लक्षणीय आहे. सुरेंद्रनाथ बॅनर्जी, आनंदमोहन बोस यासारख्यांनी या संघटनेचे नेतृत्व केले. इतर इलाख्यातल्या संघटनांशी संपर्क साधणे, देशभर दौरे करून जागृती करणे, अधिकाधिक लोकांपर्यंत पोचण्याचा प्रयत्न करणे असे या संघटनेच्या कार्याचे स्वरूप राहिले. १८७६ ते १८७९ पर्यंत इंडियन सिव्हिल सर्व्हीसच्या प्रश्नांवर बॅनर्जींनी पुष्कळच रान उठविले. कुळांचे हक्क, १८७८ व्हर्नाक्युलर प्रेस ॲक्टचा निषेध, याही बाबत या संघटनेने आवाज उठविला. संपूर्ण इटालीमध्ये ऐक्य घडवून आणून राष्ट्र या स्वरूपात इटालीची निर्मिती करणाऱ्या मॅझिनीचा आदर्श बॅनर्जीपुढे होता. राष्ट्रसभेची निर्मिती होईपर्यंत ही संघटना टिकून राहिली व सर्व राजकीय संघटनांनी एकत्र

अनुक्रमणिका

येण्याच्या प्रक्रियेतही या संघटनेने महत्त्वाची भूमिका बजावली.

महाराष्ट्रात या नवशिक्षित मध्यमवर्गाचा प्रभाव पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या रूपाने प्रकट झाला. या काळात मुंबईच्या मानाने पुणे हे राजकीय हालचालींचे अधिक संघटित केंद्र होते. २ एप्रिल १८७० रोजी सार्वजनिक सभेची स्थापना झाली. न्या. रानडे १८७१ ला पुण्यात आले तेव्हा त्यांच्या चैतन्यदायी व्यक्तिमत्त्वाचा सभेला फायदा मिळाला. आरंभापासून सभेत सरदार, जमीनदार, व्यावसायिक, वकील, शिक्षक, सरकारी नोकर यांचा भरणा होता. हिंदू/मुसलमान/ख्रिश्चन हेही त्यात होते. हिंदूमध्ये बहुसंख्या ब्राह्मणांची होती. बंगालमधल्या दुष्काळात मदतनिधी, शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणाची चिकित्सा व पाहणी, स्वदेशीची चळवळ, ५० रु. वर कर देणाऱ्याला मतदानाचा हक्क, १८७५ मध्ये बडोद्याचे महाराजा गायकवाड पदच्युती प्रकरण, पर्यायी न्यायसभेची चळवळ इ. बाबत सभेने काम केले. सरकारी अधिकारी अतिशय शंकेने सभेकडे पाहत. त्यांच्या अवकृपेचा फटका स्वतः रानडयांना बदली रूपाने व बढती उशीरा मिळणे या स्वरुपात बसला. १८७७च्या दिल्ली दरबाराच्या वेळी देशातील प्रमुख संघटनेच्या नेत्यांनी आपसात सल्लामसलत करावी याबाबत १८७६ मध्ये सभेने सर्व संघटनांना पत्र पाठविले. त्याच वेळी नेटिव्ह प्रेस असोसिएशनच्या स्थापनेचा प्रयत्नही सभेने केला. सार्वजनिक सभेचे शिष्टमंडळ कलकत्याला पाठवून तेथील नेत्यांशी सल्लामसलत करून व मुंबईत मार्च १८७८ मध्ये नेटिव्ह प्रेस असो. चे पहिले अधिवेशन घेण्याचा प्रस्ताव घेऊनच शिष्टमंडळ माघारी आले. मार्च १८७८ मध्ये हे अधिवेशन होऊन त्यात व्हर्नाक्युलर प्रेस अॅक्टचा निषेध व्यक्त केला गेला.

दरबार प्रसंगी पाठविलेल्या मागण्यांच्या खलित्यात सभेने ब्रिटिश राज्यामुळे झालेल्या फायद्यांची प्रशंसा करून भारतीयांना उच्च स्वरुपाच्या नोकऱ्यात प्रवेश मिळावा, संस्थानिकांना प्रतिनिधित्व दिले जावे, विधिमंडळाचा विस्तार केला जावा व जबाबदार प्रतिनिधी त्यावर घेतले जावेत, कायमधारा पद्धतीत सुधारणा करून सबंध हिंदुस्थानला ती लागू करावी, अशा स्वरूपाच्या मागण्या केल्या होत्या. दिल्ली दरबारानिमित्त येणाऱ्या प्रमुख भारतीयांच्या विचारार्थ सभेने प्रमुख अकरा मागण्यांचे निवेदन सर्व संघटनांना पाठविले होते. या सर्व संघटनांचे अधिकाधिक सहकार्य व्हावे व समान प्रश्नांवर एकमत होऊन अखिल भारतीय संघटना निर्माण व्हावी असा सभेचा प्रयत्न होता. हा प्रयत्न सभेने काँग्रेसच्या स्थापनेपर्यंत चालविला. पहिल्या राष्ट्रीय काँग्रेसचे यजमानपद या सभेकडे आले हे लक्षणीय आहे. एकंदरीत सार्वजनिक सभेने महाराष्ट्राच्या राजकीय जीवनात चैतन्य निर्माण केले असे म्हणल्यास वावगे होणार नाही.

सार्वजनिक सभेचे नेतृत्व सुशिक्षितांचे, त्यांचे हितसंबंध सभा पुढे मांडतच होती. पण सर्वसामान्यांचे हित दुर्लक्षित करून फक्त आपल्याच हिताचे राजकारण करणे ही गोष्ट सभेने केली नाही असे ठामपणे म्हणता येते. सर्वांना बरोबर घेऊन जाण्याचे शहाणपण सभेनी दाखविले हा न्या. रानडे यांच्या मूक पण विशाल कर्तृत्वाचा परिणाम होता,

मुंबई हे व्यापारउदीमाशी निगडित शहर असल्याने, आणि इंग्रजी राज्याचे मुख्य राजकीय केंद्र कलकत्ता येथे असल्याने मुंबईला व्यापारी व आर्थिक मुद्यांना धरूनच १८६८ नंतरच्या काळात चळवळी प्रामुख्याने झाल्या असे आढळते. रानडयांच्या सार्वजनिक सभेचा वा सुरेंद्रनाथ बॅनर्जींच्या इंडियन असोसिएशनचा रानडे व बॅनर्जी यांच्यामुळे अंतर्भागातील ग्रामीण भाग व शहरातील घडामोडींशी, व्यक्तींशी जसा सतत घनिष्ठ संबंध होता तसा मुंबईच्या मंडळींचा व संघटनेचा नव्हता. पुष्कळदा सार्वजनिक सभा वा इंडियन असोसिएशन वा ब्रिटिश इंडियन असोसिएशन यांनी चालना दिल्यानंतर बाँबे असोसिएशन वा ईस्ट इंडिया असोसिएशनची मुंबई शाखा निवेदने, खलिते पाठविण्याबाबत हालचाल करी. असे असले तरी दादाभाईंच्या प्रेरणेमुळे व सततच्या संपर्कामुळे आधीच्या पिढीतील नवरोजी फर्दुनजी, भाऊ दाजी, मंडलिक व पुढील काळातील तेलंग, वागळे, फेरोजशहा मेथा यांच्या द्वारा मुंबईत सर्व महत्त्वाच्या प्रश्नांवर लोकमत जागृत व संघटित करण्याचे प्रयत्न जारी राहिले.

अनुक्रमणिका

व्हिक्टोरिया राणीस 'हिंदुस्थानची सम्राज्ञी' हा किताब दिला गेल्याच्या सन्मानार्थ १८७७ साली लॉर्ड लिटन यांनी भरविलेला दिल्ली दरबार ही ब्रिटिश सत्तेच्या सार्वभौमत्वाचे व दिमाखाचे प्रदर्शन करणारी घटना होती. इंग्रजी शिक्षण घेतलेल्या वर्गाच्या जागी जुन्या सरंजामदार राजेरजवाडे, जागीरदार, वतनदारवर्गाच्या आधारे हिंदुस्थानवरील राज्याचे स्थैर्य कायम राखण्याचा इरादा प्रकट करणारी ती घटना होती. नवशिक्षितांची मुस्कटदाबी करणारा व्हर्नाक्यूलर प्रेस ॲक्ट, हिंदी लोकांना शस्त्र धारण करण्यास (खास पक्षपाती धोरणाने) प्रतिबंध करणारा आर्म्स ॲक्ट, ब्रिटिश साम्राज्यविस्तारासाठी हिंदुस्थानला राबवून घेण्याचे धोरण, भीषण दुष्काळ, वाढते दारिद्र्य, सामान्य इंग्रज सोजिरांकडूनदेखील वाटेल तेव्हा व वाटेल त्याची होणारी मानहानी यांविषयीची येथील शास्त्यांची बेपर्वाई, या सगळ्यांमुळे सुजाण व जागृत शिक्षित मंडळींनी स्वतःच पुढाकार घेऊन

### १ नोव्हेंबर १८५८ रोजीच्या 'राणीच्या जाहीरनाम्या'तून :

ज्याप्रमाणे आम्ही आमचे हक्क, प्रतिष्ठा व सन्मान सांभाळतो, त्याचप्रमाणे देशातील संस्थानिकांचे हक्क, प्रतिष्ठा व सन्मान आम्ही राखू. अंतर्गत शांतता व चांगले सरकार असेल, तरच भरभराट व सामाजिक सुधारणा होऊ शकतात. आणि अशी भरभराट व सुधारणा यांचा लाभ संस्थानिक व जनतेला झाला पाहिजे, अशी आमची इच्छा आहे.

इतरत्र असणाऱ्या आमच्या रयतेविषयी जी कर्तव्ये करणे आम्ही आवश्यक मानतो, त्या कर्तव्यांना आम्ही भारतातील जनतेच्या बाबतीतही बांधलेले आहोत. सर्वशक्तिमान परमेश्वराच्या कृपेने आम्ही ही कर्तव्ये पार पाडण्याचा मनःपूर्वक व प्रामाणिकपणे प्रयत्न करू.

आमचा ख्रिस्ती धर्माच्या खरेपणावर ठाम विश्वास आहे व धर्मपालनातून मिळणाऱ्या समाधानाबद्दल आम्ही कृतज्ञ आहोत असे असले, तरी आमची धार्मिक मते आमच्या रयतेपैकी कोणावरही लादण्याचा अधिकार आम्हाला आहे असे आम्ही मानीत नाही व आमची तशी इच्छाही नाही. आपापली धार्मिक श्रद्धा अथवा धर्माचरण या कारणापायी कोणच्याही बाबतीत पक्षपात होणार नाही, त्यामुळे कोणालाही त्रास सहन करावा लागणार नाही अथवा पीडा देण्यात येणार नाही.

शिक्षण, हुशारी व सचोटी या बाबतींत लायक ठरू शकणाऱ्यांना कार्यालयीन सेवेत निःपक्षपातीपणे सामावून घेण्याची आमची इच्छा असून या बाबतीत एखाद्याची जात वा वंश आड येणार नाही.

पूर्वापार वंशपरंपरेने चालत आलेल्या (वडिलोपार्जित) जमिनीविषयी भारतीय लोकांना असणाऱ्या ममत्वाच्या भावनेची आम्हाला जाणीव असून आम्ही त्या भावनेचा आदर करतो. आणि देशाच्या वाजवी गरजा लक्षात घेऊन या भावनांशी निगडित असणाऱ्या त्यांच्या सर्व हक्कांचे रक्षण करण्याची आमची इच्छा आहे.

ईश्वरकृपेने जेव्हा देशांतर्गत शांतता पुन्हा प्रस्थापित होईल, तेव्हा देशातील उद्योगधंद्यांना उत्तेजन द्यावे, लोकोपयोगी व कल्याणकारी अशा सार्वजनिक स्वरूपाच्या कामांमध्ये वाढ करावी आणि देशातील सर्व रयतेचे हित साधले जाईल अशा तऱ्हेने राज्यकारभार करावा अशी आमची मनापासून इच्छा आहे. जनतेच्या उत्कर्षातच आमची शक्ती असेल. तिच्या सुखासमाधानात आमची सुरक्षितता असेल आणि तिची कृतज्ञता हेच आमचे बक्षीस असेल (असे आम्ही मानतो). लोककल्याणाविषयीच्या आमच्या या इच्छाआकांक्षा पूर्ण करण्याचे सामर्थ्य आम्हाला व आमच्या अधिकाऱ्यांना तो सर्वशक्तिमान परमेश्वर देवो !

अनुक्रमणिका

'हिंदुस्थानचे पार्लमेंट' भरविले पाहिजे, सुसूत्रपणे व संघटितपणे राष्ट्रीय पातळीवर राजकीय हक्क-प्राप्तीची चळवळ चालविली पाहिजे हा बोध येथील पुढाऱ्यांनी घेतला.

लॉर्ड रिपन यांच्या कारकीर्दीमुळे हा बोध पक्काच मनावर ठसला. १८८० सालच्या निवडणुकांमध्ये इंग्लंडमध्ये लिबरल पक्ष सत्तेवर आला. या निवडणुकांचे वेळी हिंदुस्थानातील स्थिती, लोकांची दुःखे व गाऱ्हाणी, व शिक्षण घेऊन पात्र बनलेल्यांच्या मागण्या ब्रिटिश मतदारांपुढे माँडण्यासाठी येथील संघटनांच्या वतीने हिंदी प्रतिनिधी इंग्लंडात पाठविले गेले होते. पार्लमेंटच्या अनेक लिबरल व रॅडिकल सभासदांनी या मागण्या उचलून धरलेल्या होत्या. या पार्श्वभूमीवर लॉर्ड रिपन भारतात व्हाइसरॉय म्हणून आले होते. देशी वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करणारा कायदा मागे घेण्यात आला. नगरपालिका व लोकलबोर्ड या पातळीवर लोकनियुक्त प्रतिनिधींना कारभारात सहभाग द्यावा

ॲलन ऑक्टॅव्हियन ह्यूम यांनी 'कलकत्ता विद्यापीठातील पदवीधरां'ना दि. १ मार्च १८८३ रोजी लिहिलेल्या पत्रातून :

तुम्ही सर्वाधिक उच्च शिक्षण घेतलेल्या भारतीयांच्या एका मोठ्या गटाचे घटक आहात व त्यामुळे स्वाभाविकपणेच भारतात होणाऱ्या मानसिक, नैतिक, सामाजिक व राजकीय अशा सर्व सुधारणांची सुरुवात तुमच्यापासून व्हायला हवी. ह्या सुधारणांच्या बाबतीत तुम्ही पुढाकार घेण्याचीच वेळ वाट पाहत आहे. भारताच्या व भारतीयांच्या हितासाठी माझ्यासारखे भारत व भारतीयांवर प्रेम करणारे परदेशी नागरिक आपला वेळ व श्रम देऊ शकतील; पैसा व कल्पना पुरवू शकतील; संघर्ष व त्याग करू शकतील; सल्ला व सूचनांद्वारे मदत करू शकतील; आपला अनुभव, चातुर्य व ज्ञान कार्यकर्त्यांना देऊ शकतील. परंतु ते या देशाचे स्वाभाविक नागरिक नसल्याने हे सर्व व्यर्थ ठरेल. तुम्हा मंडळींजवळ तुम्ही संपादिलेल्या उच्च शिक्षणाशिवाय निःस्वार्थीपणा, नैतिक सामर्थ्य, आत्मसंयम व उपकारबुद्धीची वृत्ती हे गुण असणे आवश्यक असून सहजगत्या मनात येणारा प्रश्न आहे तो हा की, तुमच्यापैकी किती जणांजवळ हे गुण आहेत हा............जर या कार्याचा पाया घालणारे फक्त पन्नास लायक व सच्चे लोक मिळू शकले तर सर्व काही जमून येऊ शकेल आणि पुढील वाटचाल त्यामानाने सुकर होईल... स्वार्थत्यागाची पुरेशी क्षमता असणारे, आपल्या देशाविषयी पुरेसे प्रेम व अभिमान बाळगणारे, अस्सल व निःस्वार्थी देशप्रेम असणारे आणि वेळ आली तर आपले उरलेले आयुष्य ध्येयपूर्तीसाठी झोकून देणारे असे पन्नास जण तुमच्यासारख्या निवडक थोर लोकांतही आढळणार नसतील तर भारताच्या बाबतीत आशा बाळगायला नको. जर तुमच्यासारखे लोक वैयक्तिक बाबी व स्वार्थी हेतू बाजूला ठेवून आपल्यासाठी व आपल्या देशासाठी अधिक स्वातंत्र्य मिळविण्याकरिता निग्रहपूर्वक संघर्ष करू शकत नसतील, तर तुमचे मित्र म्हणविणाऱ्या आमचेच चुकत आहे आणि आमचे प्रतिपक्षी म्हणतात ते बरोबर आहे. महत्त्वाच्या कार्यालयांतून तुमच्यापेक्षा इंग्रज लोकांची अधिक प्रमाणात भरती केली जाते अशा तक्रारी यापुढे करू नका; कारण राष्ट्रीय बाणा, जनतेच्या कल्याणापुढे वैयक्तिक सौख्य गौण मानण्याची वृत्ती आणि सच्चे देशप्रेम हे इंग्रजांमध्ये असणारे गुण तुमच्यात नसतील, तर तुमच्या ऐवजी त्यांची निवड होणे साहजिकच आहे. आणि त्यांनी तुमच्यावर राज्य करणे उचित व अपरिहार्यदेखील आहे. व्यक्तीला अथवा राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवायचे असेल आणि उत्कर्ष साधायचा असेल, तर निःस्वार्थीपणा व परहिततत्परता या गुणांची गरज असते. जोपर्यंत तुम्हाला या शाश्वत सत्याची जाणीव होत नाही व जोपर्यंत तुम्ही त्यासाठी प्रत्यक्ष कृती करण्याला सिद्ध होत नाहीत, तोपर्यंत ते तुमचे राज्यकर्ते म्हणून राहणार आहेत.

याविषयीचा १८६४चा हिंदुस्थान सरकारचा ठराव व १८७३ साली व्हॉइसरॉय लॉर्ड मेयो यांनी पुढे ठेवलेली या संबंधातली योजना कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने रिपन यांनी प्रस्ताव मांडला. वरिष्ठ पातळ्यांवर राज्यकारभाराची सूत्रे दीर्घ काळपर्यंत इंग्रजांच्याच हाती राहिली पाहिजेत हे मान्य; पण एक दिवस हिंदी लोक स्वराज्यास पात्र बनावयाचे असतील तर आज त्याची सुरुवात स्थानिक संस्थांपासून करावयास हवी, व यासाठी पात्र असा शिक्षितांचा वर्ग आज अस्तित्वात आलेला आहे, ही रिपन यांची साधी भूमिका होती. पण या बाबतीतही रिपन यांना सनदी प्रशासक व प्रांतिक सरकारे यांची पूर्ण साथ मिळाली नाही. त्यांना आपल्या मूळ प्रस्तावाला, तडजोडी करून, सौम्य रूप द्यावे लागले. स्थानिक स्वराज्य संस्थांचे प्रवर्तक म्हणून रिपन यांचा गौरव हिंदी सुशिक्षितांनी केला. युरोपियन व्यक्तींचा न्यायनिवाडा हिंदी न्यायाधीश करू शकत नसत ( अपवाद म्हणजे, इलाख्याच्या शहरी चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट असलेल्या हिंदी न्यायाधीशाचा ). हिंदी न्यायाधीशांची संख्या पुष्कळ मोठी झालेली होती व त्यांची पात्रताही सर्वमान्य होती. हा भेदाभेद काढून टाकावा या प्रस्तावास आरंभी सर्व प्रांतिक सरकारांनी स्वीकृती दिली. तेव्हा व्हाइसरॉय यांच्या कार्यकारी मंडळातील लॉ मेंबर इल्बर्ट यांनी त्या अर्थाचे विधेयक मांडले. हिंदी ( काळे ) व इंग्रज ( गोरे ) यांना समान लेखण्याची कल्पना वांशिक श्रेष्ठत्वाने पछाडलेल्या हिंदुस्थानातील अँग्लोइंडियन जमातीला सहन झाली नाही. त्यांनी संघटित विरोधाचा जो गदारोळ उडविला त्यापुढे रिपन यांना माघार घ्यावी लागली. हिंदी न्यायाधीशापुढे युरोपियनांचा खटला चालेल तेव्हा युरोपियन ज्यूरीकडून आपला निवाडा व्हावा अशी मागणी करण्याच्या हक्कास कायद्याने त्यांना कबुली द्यावी लागली. रिपन यांनी हिंदी लोकांना न्याय देण्यासाठी शर्थ केली, त्यासाठी मोठी मानहानी सहन केली, या दृश्याने हिंदी सुशिक्षितवर्गाचे हृदय हेलावून गेले. त्यांना प्रेमादराने निरोप देण्यासाठी निरनिराळ्या प्रांतांमधील प्रमुख शहरांमध्ये ज्या प्रचंड सभा झाल्या त्यांतून रिपन यांच्या कारकीर्दीतील विपरित घटनांमुळे हिंदी लोकांमध्ये जो क्षोभ निर्माण झाला त्याचे, तसेच चळवळीला जे उधाण आलेले होते त्याचेही दर्शन घडले. नव्या प्रांतिक संघटना उत्पन्न होण्यास, असलेल्या संघटना सक्रिय बनण्यास चालना मिळाली. १८८३ साली कलकत्त्यास एक राष्ट्रीय प्रदर्शन भरणार होते. त्या वेळी देशाच्या वेगवेगळ्या भागांमधून लोक गोळा होणार या गोष्टीचा लाभ घेऊन सुरेंद्रनाथ बॅनर्जींनी राष्ट्रीय परिषद भरवली. इल्बर्ट बिलाला विरोध करण्यासाठी अँग्लो-इंडियन जमातीने सुसूत्रपणे अखिल भारतीय संघटन उभारले होते त्याचाच कित्ता हिंदी लोकांनी आता गिरविला होता.

१८८३ नंतर निरनिराळ्या प्रांतांत त्या-त्या प्रांतातील लोक एकत्र यावयास आरंभ झाला. सप्टेंबर १८८४ मध्ये मद्रास महाजन सभेचे अधिवेशन झाले. त्याला ७० प्रतिनिधी होते. १८८४ च्या ख्रिसमसमध्ये थिऑसॉफिकल सोसायटीचे वार्षिक अधिवेशन मद्रासमधील अडचार येथे भरले होते. (अॅलन ह्यूम हे बराच काळ थिऑसॉफिस्ट होते.) त्या वेळी मद्रासमधील नेते रघुनाथराव यांच्या घरी थिऑसॉफीच्या अधिवेशनानिमित्त निरनिराळ्या प्रांतांतून आलेल्या नेत्यांनी चर्चा करून एकत्र येण्याचा कार्यक्रम ठरविला. पुण्याच्या सार्वजनिक सभेने या स्वरूपाचा प्रयत्न चालविला होताच. १८८३ साली कलकत्त्याच्या इंडियन असोसिएशनने असा प्रयत्न केला होताच. भारतीय राजकारणाच्या नेमक्या या अवस्थेत ( १८८२ नंतर ) ह्यूम ह्या निवृत्त इंग्रज अधिकाऱ्याने महत्त्वाची भूमिका बजावली.

मार्च १८८५ मध्येच ह्यूम यांनी परिपत्र पाठवून ख्रिसमसच्या वेळी अखिल भारतीय परिषद भरविण्याचा इरादा जाहीर केला होता. बंगालमधील नेते व संघटना यांच्याशी ह्यूम यांचे काही कारणांनी सूत यावेळी जुळून येऊ शकले नाही. त्यामुळे सुरेंद्रनाथ बॅनर्जींच्या पुढाकाराने ब्रिटिश इंडियन असोसिएशन, इंडियन असोसिएशन व सेंट्रल मोहमेडन असोसिएशन यांच्या वतीने १८८५ च्या डिसेंबरात कलकत्त्यास एक आणि दादाभाई, ह्यूम व पश्चिम भारतातील नेते व संघटना यांच्या पुढाकाराने मुंबईस एक अशा दोन राष्ट्रीय परिषदा भरल्या. मुंबईच्या परिषदेत इंडियन नॅशनल काँग्रेसचा जन्म झाला. ७७ प्रतिनिधी

देशभरातून आले होते, व उमेशचंद्र बॅनर्जी हे बंगाली बॅरिस्टर अध्यक्षस्थानी होते. १८८६ पासून सुरेंद्रनाथ बॅनर्जी पण याच प्रवाहात सामील झाल्याने काँग्रेस ही खऱ्या अर्थाने राष्ट्रीय बनली.

ह्यूम यांच्या मते भारतभर देशात भरपूर असंतोष पसरला होता व केव्हाही त्याचा स्फोट होऊ शकत होता. तेव्हा इंग्रजी राज्य यातून वाचवायचे असेल तर येथल्या जनतेची गाऱ्हाणी व असंतोष सरकारपर्यंत पोचवणारी यंत्रणा असायला हवी. वर्षातून एकदातरी सुशिक्षितांचा मेळावा (पार्लमेंट) भरवावा व इंग्रजी उच्चपदस्थांनी ही गाऱ्हाणी ऐकून, त्यांची तीव्रता अजमावून आपल्या धोरणात आवश्यक ती लवचीकता आणावी. यातून आपली दाद घेतली जाते हेही येथल्या शिक्षितांना पटविता येईल व साम्राज्यही तरेल असा तर्क होता. या अर्थाने राजनिष्ठ सुशिक्षितांचा गट निर्माण होणे आवश्यक होते. ह्यूम यांचे विविध भारतीय नेत्यांबरोबर संबंध चांगले होते. त्यांचा संपर्कही भरपूर होता. रिपनना निरोप देण्याच्या निमित्ताने भरलेल्या सभांचे वेळी अनेकांशी बोलून काँग्रेसची कल्पना कितपत व्यवहार्य आहे हेही त्यांनी अजमावले होते.

– ३ –

मागे वळून पाहताना आरंभीच्या काँग्रेसचे अर्जविनंत्यांचे राजकारण बालिश व भित्रे वाटते. 'अर्जविनंत्यांचे राजकारण' ह्या शब्दातूनही काहीसा हेटाळणीचा सूर व्यक्त होतो. पण हा निवाडा चुकीचा आहे. काँग्रेसची निर्मिती, तिची सारी प्रक्रिया हा सर्वस्वी नव्या राजवटीने उपस्थित केलेल्या आव्हानाला भारतीय समाजाने दिलेला परिपक्व प्रतिसाद होता. भारतीय समाज राजकीयदृष्टचा दास्यात जखडला गेला तरी सामाजिक-सांस्कृतिक प्रगल्भता व बौद्धिक-व्यावहारिक क्षमता त्याने गमावलेली नव्हती. येथील समाजाच्या क्षमतेची अव्वल इंग्रजी काळातल्या एल्फिन्स्टन, मन्रो प्रभृती प्रशासकांना जाणीव होती. भारतीयांच्या उत्कर्षाच्या काळात व ऱ्हासाच्या काळात जी ब्रिटिश प्रशासक मंडळी भारतात होती त्यांना भारतीयांच्या कर्तृत्वाची, राज्य चालविण्याच्या क्षमतेची चांगली जाणीव होती.

ईस्ट इंडिया कंपनीच्या विस्ताराबरोबर उत्कर्ष पावलेला नवशिक्षित वर्ग अगदी अल्प काळात इंग्रजांच्या बरोबर त्यांच्या बरोबरीचा म्हणून आत्मविश्वासाने वागू लागला. काही नवशिक्षित इंग्रजांपेक्षाही सफाईने इंग्रजी (मातृभाषा असल्यासारखी) बोलत. ब्रिटनमधील राज्यव्यवस्थेच्या बुडाशी असलेली तत्त्वे या वर्गाने अल्पावधीत आकलन करून घेतली. कंपनीच्या कारभारावर ब्रिटिश पार्लमेंटचे नियंत्रण वाढत चालले तेव्हा या नवशिक्षितांनी ब्रिटिश सरकार व हिंदुस्थानातील सरकार यांतला भेद चटकन जाणला. आपले प्रश्न व कंपनी सरकारचा कारभार यांबाबत इंग्लंडमधल्या सरकारला त्यांनी निवेदने द्यावयास सुरुवात केली, हे याचेच प्रतीक होय. १८५७च्या बंडानंतर हिंदुस्थानचा कारभार प्रत्यक्ष ब्रिटिश सरकारने आपल्या हाती घेतला. तेव्हा या बदललेल्या परिस्थितीचा फायदा या नवशिक्षित मंडळींनी घेतला, तर नवल नाही. ही जी क्षमता प्रकट झाली ती केवळ अनुकरण पातळीवरची नव्हती, तर प्रतिसादाच्या पातळीवरची होती. भारतीय समाजधुरिणांचे हे वर्तन सर्वस्वी व सर्व क्षेत्रांत पराभूत झालेल्यांचे वर्तन नव्हते, तर प्राप्त परिस्थितीचे आव्हान अल्पावधीत स्वीकारून दिलेला तो पक्व प्रतिसाद होता.

आरंभीची काँग्रेसची पिढी राजनिष्ठ होती. पण आज राजनिष्ठ या शब्दातून जो हेटाळणीचा सूर व्यक्त होतो त्या अर्थाची ही राजनिष्ठा नव्हती. इंग्रजी राज्य हे इथल्या अनियंत्रित, व्यक्तिप्रधान राजेशाहीपेक्षा व लहरी सरंजामशाहीपेक्षा निश्चितच वेगळे होते यात शंका नाही. या नव्या राजवटीचे काही विशेष (उदा. कायद्यासमोर सर्वांना समान नागरिक म्हणून प्राप्त होणारे हक्क, व्यक्तिनिरपेक्ष शासनयंत्रणा, वगैरे) काँग्रेस स्थापन करणाऱ्या पिढीने अचूक टिपले होते. या पिढीची खरी निष्ठा होती ती इंग्लंडमधल्या त्या वेळच्या राज्यपद्धतीमागच्या तत्त्वांना. राजनिष्ठेचे हे स्वरूप लक्षात घेतले तर मग एकाच वेळी राजनिष्ठ राहणे व बरोबरीचे हक्क मागणे या आज विसंवादी वाटणाऱ्या गोष्टींच्या संगतीची उकल होऊ शकते. आम्ही ब्रिटिश साम्राज्याचे राजनिष्ठ नागरिक आहोत म्हणूनच बरोबरीचे हक्क मागण्याचा अधि-

कार आम्हाला प्राप्त होतो, असाच मुळी या मंडळींचा दावा होता. इंग्लिश राज्यव्यवस्थेमागची तत्त्वे नाकारून स्वीकारण्याजोगी पर्यायी पद्धत या नवशिक्षित वर्गासमोर नव्हती. जो पर्याय होता, तो पुन्हा बादशाही, पेशवाईकडे व सरंजामशाहीकडे नेणारा होता. या पर्यायापासून नवशिक्षित वर्ग कटाक्षाने दूर राहिलेला होता, व ही त्याच्या प्रागतिकतेचीही खूण मानावी लागेल. १८५७ चा उठाव फसला, तो मोडून काढण्यात आला आणि इंग्रजी राज्य येथे भक्कमपणे स्थिरावले या गोष्टीचे या वर्गाला मनोमनी समाधान वाटले. दुसऱ्या बाजूने पाहिले तर असेही दिसते की, हक्क आणि कर्तव्ये या बाबी काय किंवा असंतोष प्रगट करण्याची बाब काय, या गोष्टी इंग्लिश राज्यव्यवस्थेच्या विशिष्ट स्वरूपामुळे व त्यामागील तत्त्वांमुळेच शक्य होत्या. ब्रिटिशपूर्व तत्कालीन राजवटींचा या दृष्टीने, म्हणजे राज्यकर्त्यांना जाब विचारणे या अर्थाने विचार केला तर या म्हणण्याचे महत्त्व स्पष्ट होईल. इंग्रजी राज्याच्या अस्तित्वाशी या वर्गाच्या अस्तित्वाची व प्रगतीची नाळ जोडली गेली होती. हा एक जैव संबंध होता व जैव होता म्हणूनच तो नाकारणे किंवा तोडणे शक्य व इष्ट नव्हते. म्हणूनच रिपन व डफरीन या व्हाइसरॉयांच्या काळात नवशिक्षितांमधला असंतोष तीव्र होऊनही इंग्रजी राज्यावरील (व पर्यायाने त्यामागील तत्त्वांवरील) या वर्गाची निष्ठा कमी झाली नाही. राजनिष्ठ राहूनही ह्या वर्गाने असंतोष प्रगट केला व असंतोष प्रगट करूनही हा वर्ग राजनिष्ठ राहिला याचे मर्म या जैव स्वरूपाच्या संबंधात आहे.

काँग्रेसच्या निर्मितीच्या संदर्भातील दोन-तीन वैशिष्ट्यांचा अखेरीस थोडा ऊहापोह केला पाहिजे. काँग्रेसची स्थापना ही इंग्रजी राज्याला प्रतिसाद म्हणून झाली. हे इंग्रजी राज्य क्रमाक्रमाने हिंदुस्थानभर पसरत गेले इतकेच नाही तर त्याचे स्वरूप व रचनाही क्रमशः बदलत गेली. ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापारी उलाढालींचे वळण साऱ्या कारभाराला होते, तोवर वाहत्या गंगेत आपले हात धुवून घ्यावेत याच मर्यादेत येथील हिंदी मंडळींचे वागणे राहिले : तेही व्यापारात, धनसंचयात गढले. १८१३ सालच्या पार्लमेंटच्या कायद्याने ठळकपणे फरक पडला. तोवर राज्याचा विस्तार मुंबई, मद्रास व कलकत्ता या शहरांच्या बाहेर फार मोठ्या प्रमाणावर झालेला होता, आणि व्यापारी कंपनी हे स्वरूपही यानंतर ईस्ट इंडिया कंपनीचे राहिले नाही. कंपनीचे व्यापारी हितसंबंध पुढे रेटण्यासाठीचे राजकारण करणारे आता निखळ राज्यकर्ते बनले होते. या इंग्रजी राज्याला आपले राज्य म्हणून प्रतिसाद काय, हा प्रश्न १८१३ नंतरच्या काळात खऱ्या अर्थाने उपस्थित झाला. राज्य परक्यांचे ही गोष्ट उघड असली तरी पारतंत्र्यात आपण बंदिस्त झालो आहोत ही भावना इलाख्याच्या शहरातील वरिष्ठ हिंदी समाजात आढळत नाही. धनिक-शिक्षित हिंदी व इंग्रज यांची भागीदारी या नव्या राज्यातही टिकून राहिलेली दिसते. इलाख्यांचा कारभार पुष्कळ स्वतंत्रच असल्याने अखिल भारतीय संघटनेचा विचार अप्रस्तुत होता. किंबहुना, अंतर्भागातील हिंदी जनता व या शहरांमधील धनिक-शिक्षित हिंदी यांच्यातच एकप्रकारे मोठे अंतर होते. कंपनीच्या कारभाराची सनद वाढवून देण्याच्या १८३३ च्या कायद्यात राज्यकर्ते इंग्रज व प्रजाजन हिंदी या प्रकारचा भेद ठळकपणे प्रस्थापित झाला, व कालपावेतो इलाख्याच्या शहरातील जीवनात व व्यापारात भागीदार असलेला धनिक-शिक्षित वर्गही हिंदी म्हणून प्रजाजनांमध्ये सामील केला गेला. सगळ्या हिंदुस्थानात एक सुसूत्र व केंद्रीभूत सत्ता असल्याचे अनुभवास जसे आले तसा हिंदी मंडळींचा प्रतिसादही अखिल भारतीय असावा हा विचार मूळ धरू लागला. इंग्रजांनी साम्राज्यवादी वळण घेतले तसे येथे राष्ट्रवादी वळण निर्माण झाले. १८५२ साली पार्लमेंटला अर्ज पाठविण्याच्या मुद्द्यावरून हे बदललेले वळण स्पष्ट झाले. तरीही हिंदी मंडळींच्या बाजूने हे राष्ट्रवादी वळण इंग्रज वा साम्राज्यविरोधी नव्हते. थोरली पाती, धाकटी पाती अशीच जास्त दृष्टी होती.

म्हणूनच १८५७ च्या उठावापासून हा वर्ग कटाक्षाने दूर राहिला. नव्हे, हा उठाव हे मोठे अरिष्ट कोसळले आहे असेच या वर्गाला वाटले. त्यांच्या डोळ्यासमोरील राष्ट्रबांधणीत जुन्या सरंजामदार वर्गाला स्थान नव्हते. सर्वसामान्य खेडूत जनतेचेही नेमके स्थान काय आहे याची स्पष्टताही फार होती असे आढळत नाही.

अनुक्रमणिका

१८६० नंतरच्या काळात या वर्गाच्या मनाची व दृष्टीची क्षितिजे रुंदावत गेली. इलाख्याच्या शहरांबाहेरच्या भागांमधून एक नवा शिक्षित वर्ग उदयास आला, त्याची व इलाख्याच्या शहरांतील शिक्षितांची एक फळी तयार झाली. देशाच्या सामाजिक व आर्थिक स्थितीची, इंग्रजी राज्याच्या चांगल्या तशाच वाईट परिणामांची ओळख साक्षात संपर्कामधून वाढत चालली. हिंदी जनतेची व हिंदी सुशिक्षितांची, दोन्ही वर्गांची दडपणूक व पिळवणूक जशी स्पष्ट झाली तसा राष्ट्रवादाचा आशय सखोल व व्यापक झाला. इंग्रजी शिक्षण घेतलेल्यांचा अडाणी गोरगरीब जनतेशी संबंध जुळून येऊ लागला. तरीही हिंदी राष्ट्रवाद हा नकारात्मक, इंग्रजद्वेष्टा संकुचित राष्ट्रवाद बनला नाही ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे.

हिंदी पार्लमेंटची गोष्ट लोकहितवादींनीही केली होती. हिंदुस्थानचे पार्लमेंट भरविण्यासाठी जी चळवळींची, संघटनांची व व्यक्तींची उभारणी व बांधणी करावयास हवी ते काम पार पाडण्यात दादाभाई नवरोजी यांनी उचललेला वाटा फार महत्त्वाचा व मोठा होता. ब्रिटिश पार्लमेंटचे स्थान व महत्त्व ओळखून इंग्लंडमध्ये हिंदुस्थानचा आवाज उठविण्यासाठी १८५५ साली ते इंग्लंडात गेले. तेथे त्यांनी ईस्ट इंडिया असोसिएशनची स्थापना केली. या संस्थेत भारताविषयी आस्था असणाऱ्या इंग्रजा गृहस्थांनाही त्यांनी सहभागी करून घेतले. ब्रिटिश मतदारांचे प्रबोधन, ब्रिटिश पार्लमेंटमध्ये वेगवेगळे प्रश्न उपस्थित करणारी विधेयके मांडली जाण्याची तयारी व व्यवस्था करणे, पार्लमेंटच्या सभासदांमधून एक दबाव गट बांधणे, ही सर्व कामे या संस्थेद्वारा त्यांनी अनेक वर्षे केली. त्याच वेळी, शिकण्यासाठी हिंदुस्थानातून येणाऱ्या विद्यार्थ्यांनाही त्यांनी हिंदुस्थानच्या परिस्थितीचा व प्रश्नांचा अभ्यास करण्यास, निबंधवाचन करण्यास आणि देशकार्यासाठी तनमनधन खर्च करण्यास प्रेरित करण्याचे काम सातत्याने केले. इंग्लंडमध्ये काम करीत असतानाच मुंबईतील संघटना व चळवळी यांची जोपासना करीत राहण्यावरील लक्ष कोणत्याही प्रकारे त्यांनी कमी केले नाही. मुंबई ही तर त्यांची आद्य कर्मभूमी होती. आपल्या विद्यार्थ्यांकरवी साऱ्या पश्चिम भारतामध्ये ते सतत संपर्क ठेवीत. भारताच्या वाढत्या विपन्नावस्थेची मीमांसा करून त्यांनी राष्ट्रवादी चळवळीला एक वेगळे परिमाण प्राप्त करून दिले. सतत साठएक वर्षे दादाभाईंनी अत्यंत धीराने व सातत्याने देशाच्या अंतर्भागापासून ते थेट पार्लमेंटपर्यंत सुसूत्र अशी एक रचना निर्माण केली, व ती कार्यरत ठेवली. त्यांना पितामह अशी पदवी हिंदी सुशिक्षित वर्गाने बहाल केली ती अगदी सार्थ होती.

⊙ ⊙ ⊙

**संदर्भ :**

१. प्रा. आर. सी. मुजुमदार, द हिस्टरी अँड कल्चर ऑफ द इंडियन पीपल, खंड १० : ब्रिटिश पॅरामाऊंट्सी अँड इंडियन रेनेसांस, पृ. ४६५.
२. उपरोक्त ग्रंथ, पृ. ८९,
३. एस्. आर. मेहरोत्रा, द इमर्जन्स ऑफ इंडियन नॅशनल काँग्रेस, पृ. ४.
४: उपरोक्त ग्रंथ, पृ. ९.
५. उपरोक्त ग्रंथ, पृ. १२.
६. उपरोक्त ग्रंथ, पृ. ३१.
७. अनिल सील, द इमर्जन्स ऑफ इंडियन नॅशनॅलिझम, पृ. २१५.

# स्वातंत्र्यचळवळीची पायाभरणी

## १८८५–१९०५ : राष्ट्रसभेची पहिली वीस वर्षे

वसंत पळशीकर

– १ –

ब्रिटिश राज्यावर प्रीती आणि निष्ठा असणाऱ्या नवशिक्षितांनी इंडियन नॅशनल काँग्रेसची ( हिंदी राष्ट्रसभेची ) स्थापना केली. जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धती हे ब्रिटिश राज्याचे व्यवच्छेदक वैशिष्टय होय आणि लोकांची संमती व लोकांचा सहभाग हे त्याचे अधिष्ठान आहे, ही ब्रिटिश राज्याविषयीची त्यांची मूलभूत व मध्यवर्ती समज होती. नागरिक प्रतिष्ठा व नागरिक स्वातंत्र्य, कायद्याचे राज्य व कायद्यासमोर सर्व समान या तत्त्वांची बूज राखण्याची बांधिलकी पत्करलेल्या राज्याचे आपण नागरिक आहोत याचा काँग्रेसच्या संस्थापकांना अभिमान वाटत होता.

काँग्रेसची चळवळ ही ब्रिटिश राज्याच्या विरोधातील चळवळ नसून ती खऱ्या अर्थाने ब्रिटिश राज्याची पुष्टी करणारी, तिचे सार्थकत्व वाढविणारी चळवळ आहे असे काँग्रेसच्या नेत्यांचे आग्रही प्रतिपादन होते. १८८६ साली राष्ट्रसभेच्या दुसऱ्या अधिवेशनाच्या अध्यक्षीय भाषणात दादाभाई नवरोजी यांनी या मुद्याची स्पष्टता करताना सांगितले की, ब्रिटिश राज्याचे स्थैर्य वाढविणारीच ही चळवळ आहे. ब्रिटिश राज्याविषयी अप्रीती निर्माण करणारी, तिचे आसन डळमळीत करणारी ही चळवळ आहे अशी कल्पना तरी कोणी कसे करू शकते, असा सवाल त्यांनी केला. ते पुढे म्हणाले, This is absurd. Let us speak out like men and proclaim that we are loyal to the backbone; that we understand the benefits English rule has conferred on us; that we thoroughly appreciate the education that has been given to us...teaching us that kings are made for the people, not people for the kings; and this new lesson we have learned amidst the darkness of Asiatic despotism only by the light of the free English civilisation But the question is, do the Government believe us? Do they believe that we are really loyal to them; that we do truly appreciate and rely on British rule; that we veritably desire its permanent continuance; that our reason is satisfied and our sentimental feelings gratified as well as our self interest ?"

[ हे विपरीत आहे. आपण असे बजावून सांगूया की शरीराच्या शेवटच्या अणूरेणूपर्यंत आम्ही राजनिष्ठ आहोत; इंग्रजी अंमलामुळे आम्हाला जे लाभ झाले आहेत त्यांची जाण आम्हाला आहे. राजे लोकांसाठी असतात, लोक राजांसाठी नसतात ...असे शिकविणारे जे शिक्षण आम्हाला देण्यात येत आहे त्याच्या महत्त्वाची आत्यंतिक कदर आम्हाला आहे. स्वतंत्र इंग्रजी संस्कृतीच्या प्रकाशामुळेच केवळ आशियाई अस्मानीसुलतानीच्या काळोखात हा नवीन धडा आम्ही शिकलो. पण प्रश्न असा आहे की सरकारचा आमच्यावर विश्वास आहे का ? आम्ही खरोखर त्यांच्याशी एकनिष्ठ आहोत, इंग्रजी अंमलाचे आम्ही खरोखर कौतुक करतो आणि त्यावर विसंबून असतो, तो चिरकाल टिकावा अशी आमची मनापासून इच्छा आहे, आमची बुद्धी, आमच्या भावना आणि आमचा स्वार्थ ह्या सर्वांचे इंग्रजी राज्यात समाधान होते ह्यावर त्यांचा विश्वास आहे का ? ]

अनुक्रमणिका

याच भाषणात दादाभाई पुढे असेही म्हणतात की, ' आमची स्पष्टोक्ती ही जेवढी आमच्या भल्यासाठी आहे तेवढीच ती त्यांच्याही (ब्रिटिशांच्या) भल्यासाठी आहे ', ती ' ब्रिटिश राज्याच्या मुळावर घाव घालण्यासाठी नाही ', हे ज्यांना समजते, असेच ज्यांचे मत आहे असे ब्रिटिश शास्ते सुदैवाने होऊन गेले आहेत व ह्यातही आहेत. असे म्हणून त्यांनी लॉर्ड रिपन यांचा हवाला दिला आहे.

इंग्रजी राज्याच्या प्रस्थापनेपूर्वी हिंदुस्थानात जी वेगवेगळी राज्ये अस्तित्वात होती त्यांचे वर्णन करण्यासाठी 'आशियाई अस्मानीसुलतानी' हा शब्दप्रयोग दादाभाईंनी केला आहे. या वर्णनाच्या पार्श्वभूमीवर ब्रिटिश राज्यावरील निष्ठेचा तात्त्विक आशय ते स्पष्ट करतात ही गोष्ट महत्त्वाची आहे. पण याहूनही अधिक महत्त्वाच्या तीन गोष्टी लक्षात घेण्यासारख्या आहेत. दादाभाई कृतज्ञ आहेत, नम्र व आर्जवी आहेत; पण शिक्षित हिंदी लोक हे इंग्रज माणसांइतकेच व त्याच दर्जाचे ब्रिटिश राज्याचे नागरिक आहेत ही त्यांची भूमिका आहे. दुसरी गोष्ट ते अशी सांगतात की, लोकांच्या हितासाठी राज्य चालविण्यासाठी राजा (वा राज्यकर्ते) असतात हा बोध तुम्ही इंग्रजांनीच आम्हाला शिकविलात, तो आम्ही शिकलो आहोत. आणि काँग्रेसची चळवळ हा याच शिकवणुकीचा स्वाभाविक व उचित परिणाम आहे हेही त्यांना सूचित करावयाचे आहे. आमच्या भल्यासाठी ज्या गोष्टी आम्ही मागतो आहोत त्या तुमच्याही हिताच्या गोष्टी आहेत, कारण जीवनाचे श्रेय ज्या गोष्टींमध्ये आहे असे तुम्ही इंग्रज लोक आग्रहानें सांगत आला आहात त्याच स्वातंत्र्य, समता, जबाबदार सहभाग, इत्यादींचा परिपोष आमच्या मागण्या मान्य करण्यामधून होणार आहे, ही तिसरी गोष्टही दादाभाईंनी सांगितलेली आहे.

राजकारणी डावपेच म्हणून राज्यकर्त्यांना, बेसावध अवस्थेत दिलेल्या अभिवचनांमध्ये पकडून ठेवण्याचा हा शब्दांचा खेळ नव्हता हे जाणणे महत्त्वाचे आहे. इंग्रजी राज्याचे, इंग्लिश संस्कृतीचे व इंग्रज माणसाचे इंग्लिशपण याच काही गोष्टींमध्ये आहे असे एकप्रकारचे साक्षात्कारी दर्शन तत्कालीन आंग्लशिक्षित हिंदी माणसांना घडलेले होते. १८८६ सालच्या काँग्रेसच्या अधिवेशनात पंडित मदनमोहन मालवीय यांनी काढलेले पुढील उद्गार याची साक्ष देतात : ' What is an Englishman without representative institutions? Why, not an Englishman at all, a mere sham, a base imitation, and I often wonder, as I look around at our nominally English magnates, how they have the face to call themselves Englishmen, and yet deny us representative institutions and struggle to maintain despotic ones. Representative institutions are as much a part of the true Briton as his language and literature. Will any one tell me that Great Britain will in cold blood deny us, her freeborn subjects, the first of these, when, by the gift of the two latter, she has qualified us to appreciate and incited us to desire it? "

[प्रातिनिधिक संस्था वगळल्या तर इंग्रजी माणसात काय उरते ? तो इंग्रज राहतच नाही, ते केवळ एक सोंग, भ्रष्ट नक्कल असेल. मी जेव्हा आजूबाजूच्या आमच्या नामधारी इंग्रज सत्ताधाऱ्यांकडे पाहतो तेव्हा मला अनेकदा ह्याचे नवल वाटते की, स्वतःला इंग्रज म्हणवून घेत असताना आम्हाला प्रातिनिधिक संस्था नाकारण्याचे आणि आपले सुलतानी प्रघात कायम राखण्यासाठी धडपडण्याचे धैर्य तरी ह्यांना कसे होते ? खराखुरा ब्रिटिश माणूस घेतला तर त्याची भाषा व साहित्य ह्यांच्याप्रमाणेच प्रातिनिधिक संस्था हाही त्याच्या अस्तित्वाचा अविभाज्य भाग असतो. ग्रेट ब्रिटनचे प्रजाजन म्हणून, स्वतंत्र नागरिक म्हणून जे आम्ही जन्माला आलो आहोत त्यांना इंग्रजी भाषा आणि साहित्य ह्यांची भेट आम्हाला बहाल केल्यानंतर आणि तिच्या योगे प्रातिनिधिक संस्थांचे मूल्य जाणण्याची कुवत आणि त्यांची अभिलाषा आमच्यात निर्माण केल्यानंतर

ग्रेट ब्रिटन मख्खपणे आम्हाला ह्या संस्था नाकारील असे कोण म्हणेल ? ]

मालवीयांनी हिंदी शिक्षितांना उद्देशून "free born subjects" हा शब्दप्रयोग केला आहे हे लक्षात घ्या. मालवीय पुढे म्हणतात, "India has found a voice at last, in this great Congress, and through it we call on England to be true to her traditions, her instincts and herself, and grant us our rights as freeborn British citizens."

[ह्या महान काँग्रेसमध्ये भारताला त्याचा उद्‌गार सापडला आहे, आणि त्याच्या द्वारा इंग्लंडने स्वतःच्या परंपरांशी, स्वतःच्या सहजप्रवृत्तींशी आणि स्वतःशी इमान राखावे, आणि स्वतंत्र ब्रिटिश प्रजाजन म्हणून आमचे जे हक्क आहेत ते आम्हाला द्यावे असे आवाहन आम्ही इंग्लंडला करीत आहोत.]

म्हणजे, येथे इंग्रज माणसाच्या इंग्लिशपणाची एक व्याख्या, एक प्रतिमा पुढे ठेवलेली आहे. त्याच वेळी ही व्याख्या, प्रतिमा हा इंग्रज राज्यकर्त्यांच्या वर्तनाचा, धोरणांचा, कारभाराचा निवाडा करण्याचा मानदंडही आहे. ही कसोटी लावल्यास तत्कालीन ब्रिटिश शास्ते हे खऱ्या अर्थाने आशियाई सुलतानी गाजविणाऱ्यांच्या अधिक जवळचे आहेत असा गर्भित आरोपही केलेला आहे.

व्यापारी नफेखोरी आणि दरोडेखोरी, लूट यांमुळे बदनाम झालेल्या कंपनी सरकारकडून हिंदुस्थानचे राज्य काढून घेण्याच्या दीर्घकालीन प्रक्रियेत (१७७३ ते १८५८) ब्रिटिश सरकारांनी आणि राजकारणी व्यक्तींनी, तसेच हिंदुस्थानातील अनेक ज्येष्ठ व कनिष्ठ शासकांनी, खंडप्राय आकाराच्या या परमुलुखावर आपले राज्य प्रस्थापित करण्याचे जे उदात्त नैतिक समर्थन दिले होते, ज्या नैतिक भूमिकेतून वेळोवेळी जी अभिवचने दिली होती (उदा. राणी व्हिक्टोरियाचा १८५८ चा जाहीरनामा), आणि इंग्रजी राज्याची जी गुणवैशिष्ट्ये समोर ठेवली होती त्यांच्याच आधारे काँग्रेसच्या संस्थापकांनी चळवळ चालविली होती.

हिंदुस्थानातील प्रजेला कोणत्या भाषेतून व कोणच्या विषयांचे शिक्षण द्यावे यासंबंधी १८३०-च्या आसपास झालेल्या वादात मेकॉलेने घेतलेली भूमिका व काढलेले उद्‌गार प्रसिद्ध आहेत. वर्णाने काळीसावळी, व वंशाने भिन्न पण अंतर्यामी पुरेपूर इंग्लिश असलेली प्रजा हिंदुस्थानात निर्माण करण्याचे स्वप्न त्याने रंगविले होते: इंग्रजी शिक्षण हे या आमूलाग्र क्रांतिकारक परिवर्तनाचे साधन त्याने मानले होते. अशा कृष्णवर्णीय व वंशीय 'इंग्लिश' माणसांच्या खांद्यावर सुखासमाधानाने राज्याची धुरा ठेवून मायदेशी परतण्याची कल्पनाही त्याने केली होती. हिंदुस्थानवरील इंग्रजी राज्याचे जीवितकार्य त्या क्षणी पार पडलेले असेल, आणि त्या क्षणी ब्रिटिश राष्ट्र कृतार्थता अनुभवेल असे त्याने म्हटले होते.

काँग्रेसची स्थापना करणारी माणसे मेकॉलेप्रणित इंग्रजी शिक्षणाचे बाळकडू पचवून येथे 'ब्रिटिश राज्य' साकार करण्यासाठी प्रतिज्ञाबद्ध असलेली, त्या अर्थाने व त्या मर्यादेत अंतर्यामी 'इंग्लिश' बनलेलीच माणसे होती. काँग्रेसच्या व्यासपीठावरून ते वापरीत असलेली भाषाच केवळ इंग्रजी होती असे नाही, त्यांचे सारे युक्तिवाद इंग्लिश होते, आणि पुष्कळदा युक्तिवादाच्या पुष्ट्यर्थ ते उदाहरणेही इंग्रजी साहित्यातील वा इतिहासातील देत.

– २ –

१७७३ ते १८५८ या कालखंडात ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभाराची अत्यंत कठोर चिकित्सा ब्रिटिश पार्लमेंटने वेळोवेळी केलेली होती. कंपनीच्या भ्रष्ट, अन्याय्य व क्रूर कारभाराची लक्तरे वेशीवर टांगण्याच्या बाबतीत ब्रिटिशांनीच पुढाकार घेतला होता. कंपनीवर अधिकाधिक नियंत्रणे प्रस्थापित करीत असता, कंपनीच्या राज्याचे रूपांतर 'ब्रिटिश राज्या'त करीत असताना ब्रिटिश राजकारण्यांनी 'ब्रिटिश राज्या'मागील तत्त्वांचा, अधिष्ठानाचा सतत पुनरुच्चार केला होता. सर्वांना समान लेखणारे कायद्याचे राज्य, न्याय ही तत्त्वे ज्या राजवटीत आविष्कृत होत नाहीत ते सुसंस्कृत राज्य म्हणता येत नाही; तसेच, सुसंस्कृत राज्य हे जबाबदार राज्य असले पाहिजे, या प्रकारचा युक्तिवाद केला गेला होता. कोणास जबाबदार ?, या प्रश्नाचे उत्तर, कंपनीच्या संदर्भात, ब्रिटिश पार्लमेंटला, असे इंग्रजांनी द्यावे ही गोष्ट स्वाभाविक होती. १७७३ ते १८५८ या काळात ब्रिटिश पार्लमेंटने जी भूमिका वठविली

तिचा उदयोन्मुख हिंदी शिक्षित वर्गाच्या मनावर ठसा उमटला. ब्रिटिश राष्ट्राची सदसद्विवेकबुद्धी ब्रिटिश पार्लमेंटमध्ये वास करते ही श्रद्धा नवशिक्षितांच्या पहिल्या तीनचार पिढ्यांच्या मनात फार पक्की रुजली. न्याय प्रस्थापित करण्याला, सर्वांना समान लेखणाऱ्या कायद्याचे राज्य प्रस्थापित करण्याला, जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा अवलंब करण्याला ब्रिटिश पार्लमेंटची बांधिलकी आहे; कोणतेही हितसंबंध वा स्वार्थ आड येऊ न देता पार्लमेंट वरील गोष्टींना अग्रक्रम देते व त्यांचा आग्रह धरते, अशी हिंदी नेत्यांची प्रामाणिक धारणा आढळून येते.

ब्रिटिश राजकारण आणि ब्रिटिश पार्लमेंट या दोन्हींविषयी हा गैरसमज होता यात काही शंका नाही. ब्रिटिश राजकीय तत्त्वविचार, इंग्लंडच्या इतिहासाचा विशिष्ट कोनामधून लावलेला अन्वयार्थ आणि राजकारणाचा व्यवहार यांतील अंतर यांची पुरेशी जाण येण्यासाठी पुष्कळ काळ लागला. हिंदुस्थानातील घडामोडींमध्ये लिबरल व रॅडिकल पार्टीतील काही ब्रिटिश राजकारण्यांना आणि सनदी सेवेमध्ये येथे अधिकारी म्हणून दीर्घकाळ काम केलेल्या काही व्यक्तींना रस होता. काँग्रेसच्या चळवळीविषयी त्यांना आस्था होती आणि काँग्रेसच्या मागण्यांना त्याचा पाठिंबाही राहिला. ब्रिटिश पार्लमेंटवर आशा केंद्रित होण्याचे एक मोठे कारण या ब्रिटिश व्यक्तींचे अस्तित्व व पार्लमेंटमधील कार्य हे होते.

'ब्रिटिश राज्या'वरील श्रद्धा आणि ब्रिटिश पार्लमेंटवर केंद्रित केलेल्या साऱ्या आशा यांमुळे भारतीय स्वातंत्र्यचळवळ दीर्घकाळ दुबळी राहिली असा निष्कर्ष काढणे मात्र चुकीचे होईल. ही श्रद्धा हे, आरंभीच्या कालखंडातच नव्हे तर, अखेरपावेतो स्वातंत्र्यचळवळीचे एक सामर्थ्यस्थळ होते ही गोष्ट जाणणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे ब्रिटिश पार्लमेंटमध्ये आशा केंद्रित झालेल्या असल्यामुळेच सातत्याने ३०/३५ वर्षे पार्लमेंटवर चळवळीने दबाव कायम ठेवला व त्याचे फळही पदरात पडले, ही गोष्टही विसरता कामा नये.

'ब्रिटिश राज्या'वरील श्रद्धेच्या अभावी हिंदुस्थानवरील राज्य शस्त्रबळाच्या जोरावर जिंकलेले, व शस्त्रबळाच्या आधारेच चालविलेले व टिकविलेले राज्य आहे असे म्हणून शस्त्रबळाच्या जोरावरच उलथून टाकण्याची भूमिका घ्यावी लागली असती. व्यवहारात हे कधीच शक्य झाले नसते असे म्हणण्याचे कारण नाही. प्रत्यक्षात शस्त्रबळावर जिंकून घेतलेले असूनही, वेगळ्या आधारावर व वेगळी उद्दिष्टे डोळ्यांसमोर ठेवून ते आपण चालविणार ही प्रतिज्ञा व्हिक्टोरिया राणीच्या जाहीरनाम्याद्वारे इंग्लंडने केली होती. पूर्ण गांभीर्याने राणीने हे अभिवचन दिलेले होते. राज्यसत्तेचे संघटन ज्या तत्त्वांवर करणे योग्य ठरेल अशीच सर्वव्यापी (युनिव्हर्सल) तत्त्वे 'ब्रिटिश राज्या'मागील तत्त्वे म्हणून सांगण्यात आलेली होती. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या शब्दांवर पूर्ण विश्वास ठेवून केलेले स्वातंत्र्यप्राप्तीचे (म्हणजेच भारतात 'ब्रिटिश राज्या'चा अवतार घडवून आणण्याचे) राजकारण ही त्या त्या वेळच्या राज्यकर्त्यांच्या इमानाची अखंड व सततची सत्त्वपरीक्षा होती. या परीक्षेचा ताण असह्य होऊन वा आपल्या अभिवचनाला व प्रतिज्ञेला न जागता पाशवी बळाचा वापर करून भारतीय स्वातंत्र्याची चळवळ दडपून टाकण्याचा प्रयत्न वेळोवेळी हिंदुस्थान सरकारने केला. ब्रिटिश राज्याची तत्त्वे हिंदुस्थानात लागू होत नाहीत, येथे इंग्रजांची एकाधिकारशाहीच चालली पाहिजे असा विद्वतापूर्ण युक्तिवादही बड्या बड्या असामींनी वेळोवेळी केलेला आढळतो. पण यातील आत्मप्रतारणेची जाणीव ब्रिटिश समाज फार काळ दडपू शकला नाही असे पुनःपुन्हा घडत गेले. कारण ब्रिटिश राजकारणी काही म्हणोत वा कसेही वागोत, ब्रिटिश जनतेच्या जीवनात वा जाणिवेत जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीच्या मुळाशी असलेली मूल्ये, तत्त्वे व उद्दिष्टे खोलवर रुजलेली होती ही गोष्ट खरीच होती. 'ब्रिटिश राज्या'वरील श्रद्धा, त्यामागील तत्त्वे, मूल्ये व उद्दिष्टे यांच्या आधारे केलेल्या स्वातंत्र्याच्या चळवळीला शस्त्रबळाच्या निर्घृण वापरापासून अभय होते. १८८५ च्या आसपास ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या हाती असलेले शस्त्रबळ व त्यांनी १८५७ चा उठाव चिरडून टाकून निर्माण केलेली दहशत यांची कल्पना केली आणि काँग्रेसमध्ये एकत्र आलेल्यांची संख्या, बळ आणि मनाची तयारी लक्षात घेतली तर हे अभय किती महत्त्वाचे

होते, हे केवढे मोठे सामर्थ्यस्थळ होते ही गोष्ट लक्षात येते.

ब्रिटिश पार्लमेंटवर आशा केंद्रित करण्याचीही गोष्ट अशीच आहे. इंग्रजी राज्याच्या औपचारिक रचनेतही सार्वभौमत्व ब्रिटिश पार्लमेंटकडेच होते हे तर झालेच. पण, वर्षानुवर्षे सातत्याने व चिकाटीने पार्लमेंटपुढे आपल्या गाऱ्हाण्यांची दादफिर्याद करण्याचे व्रत निष्ठेने पाळण्याचा एक परिणाम लक्षात घेण्यासारखा आहे. ब्रिटिश राज्यघटनेनुसार येऊन पडणारी जबाबदारी, सदसद्विवेकबुद्धीने योग्यायोग्य विवेक करून निर्णय करण्याची जबाबदारी अजिबातच टाळता आली असती तर पार्लमेंटच्या बहुधा ते फारच पथ्यावर पडले असते. पण चारदोन सभासदांच्या द्वारे का होईना पण 'हिंदुस्थानचा प्रश्न' हटकून उपस्थित होत राहिल्याने पार्लमेंटला आपल्यावरील जबाबदारी पार पाडीत राहावे लागले. ब्रिटिश पार्लमेंटचा एकंदर कारभार कसा चालत असे हे आज आपणास माहीत आहे. १८७० नंतरच्या काळात हिंदुस्थानशी संबंधित बाब चर्चेला येई तेव्हा सभागृह ओस पडत असे. स्वार्थी हितसंबंधी युक्तिवाद प्रबळ ठरून पुष्कळ निर्णय होत. या दोन्ही गोष्टी खऱ्या असल्या तरी, पार्लमेंटपुढे आपल्या प्रस्तावाचे समर्थन करावयाचे आहे, पार्लमेंटला जाब द्यावयाचा आहे, पार्लमेंटच्या चव्हाट्यावर गोष्टी उघड कराव्या लागणार आहेत याचे दडपण ब्रिटिश मंत्रिमंडळातील भारतमंत्र्यावर सतत असे. मग तो कोणत्याही पक्षाचा वा प्रणालीचा असो. सर्व व्हाइसरॉय व भारतमंत्री यांच्यातले पत्रव्यवहार अलीकडच्या काळात अभ्यासले गेले आहेत. या अभ्यासामधून ही गोष्ट फार चांगल्या प्रकारे अगणित वेळा आढळून येते.

१८५८ साली व्हिक्टोरिया राणीने हिंदी जनतेला उद्देशून काढलेल्या जाहीरनाम्याविषयी दादाभाईंनी १८८६ काँग्रेसच्या अध्यक्षीय भाषणात असे म्हटले की, 'आपल्या हक्कांचा मॅग्नाकार्टा म्हणून आपण पूज्यभावाने शाही जाहीरनाम्याचे निरंतर स्तोत्र गायिले पाहिजे ('We should for ever praise in reverence as our Magna Charta'). या शब्दांमागे केवळ धोरणीपणा नव्हता. दादाभाईंच्या दृष्टीने ही खरोखरच स्वराज्याची सनदच होती. राणीच्या जाहीरनाम्याचे एवढे महत्त्व का त्याचेही स्पष्टीकरण त्यांनी दिले आहे, व ते ध्यान देऊन ऐकण्यासारखे आहे. याच भाषणात ते १८५७ च्या उठावाचा निर्देश करून म्हणतात, 'When they had completely vanquished all their adversaries, the English nation came forward, animated by the same high and noble resolve, as before, and gave us that glorious Proclamation'

[आपल्या सर्व गनिमांचा पूर्णपणे पाडाव केल्यानंतर इंग्लिश राष्ट्राने पूर्वीप्रमाणेच उच्च व उदात्त निर्धाराने प्रेरित होऊन तो देदीप्यमान जाहीरनामा आम्हाला दिला.]

उठाव पूर्णपणे चिरडल्यानंतर, एका अर्थी इंग्लिश राष्ट्र सूडबुद्धीने पेटलेल्या अवस्थेत असताना, झाले गेले विसरून, कोणताही आकस न बाळगता, भेदभाव न करता समत्वबुद्धीने व न्यायाने वागविण्याचा मनोदय **आपण होऊन**, हा जाहीरनामा घोषित करते, या गोष्टीचे अलौकिकत्व दृष्टिआड होऊ देता कामा नये. खुद्द राणीनेच आपल्या नावे शाही जाहीरनामा प्रसृत केल्याने त्याला जे वजन प्राप्त झाले तेही ध्यानात घ्या. जोवर विरुद्ध अर्थाचा दुसरा शाही जाहीरनामा प्रसृत होत नाही तोवर ब्रिटिश राष्ट्राला त्याचा कधीच अव्हेर करता येणे शक्य नव्हते; कोणत्याही ब्रिटिश शास्त्याची ही हिंमत होणे अशक्य होते. या जाहीरनाम्याचा हवाला देऊन जेव्हा दादाभाई म्हणतात की, 'I have said enough to show our rulers that our case is complete and has been made out by themselves' [आमची बाजू अगदी भक्कम आहे. आणि (जाहीरनाम्याच्या आधारे) ती आमची आम्हीच मांडली आहे हे आमच्या सत्ताधीशांना दिसून यायला मी बोललो ते पुरेसे ठरावे.] तेव्हा कोणाही ब्रिटिश राजकारण्याला वा व्हाइसरॉयला त्यांना प्रत्युत्तर करता येत नाही.

काँग्रेसच्या संस्थापक नेत्यांनी आपल्या चळवळीला आधारभूत म्हणून या तीन गोष्टी निवडल्याने ती जन्मास आल्या क्षणापासून ब्रिटिश

राज्यकर्त्यांची अवस्था कोंडीत पकडल्यासारखी होऊन बचावाचा पवित्रा घेणे त्यांना भाग पडले.

– ३ –

एकोणिसाव्या शतकात ब्रिटिश साम्राज्याचा जगभर विस्तार झाला. हा विस्तार घडवून आणण्यात आणि जगावरील प्रभुत्व कायम टिकवून धरण्यात हिंदुस्थानवरील राज्याचे वेगवेगळ्या कारणांनी महत्त्व होते. लॉर्ड कर्झन यांची धारणा तर अशी होती की, साम्राज्यात हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयची सत्ता ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या बरोबरीचीच असायला हवी : म्हणजे असे की, इंग्लंडचा बादशहा व हिंदुस्थानचा व्हाइसरॉय यांनी मिळून ब्रिटिश साम्राज्याचा विस्तार करावा, कारभार पहावा व जगावर प्रभुत्व प्रस्थापित करण्याचे राजकारण करावे. मंत्रिमंडळाचे भारतमंत्र्यांमार्फत आपल्यावर नियंत्रण असावे ही गोष्ट त्यांना फार खटके. मुद्दा असा की, सत्तेच्या जागतिक व्यूहामध्ये ब्रिटिश साम्राज्यांतर्गत हिंदुस्थानला पार पाडावयाची एक भूमिका आहे व ती पार पाडता येण्यासाठी हिंदुस्थानवर इंग्रजी राज्य अबाधित टिकून राहावयास हवे, अशी तत्कालीन ब्रिटिश राज्यकर्त्यांची ठाम धारणा असल्याचे आढळते. लिबरल, रॅडिकल, कॉन्झर्व्हेटिव्ह सर्वच पक्षांनी साम्राज्यसत्ता व ब्रिटनचे जगावरील प्रभुत्व गृहीतच धरले होते.

जगातील वेगवेगळ्या देशांतील लोकांचा उद्धार होण्यासाठी, त्यांची प्रगती होण्यासाठी या देशांवर ब्रिटिशांचे साम्राज्य प्रस्थापित होणे ही मोठी उपकारक ठरणारी गोष्ट आहे अशी इंग्रजी शिक्षण घेतलेल्या बहुतेक हिंदी उच्चशिक्षित पुढाऱ्यांची प्रामाणिक धारणा होती असे आढळते. खऱ्या अर्थाने सुसंस्कृत व्हावयाचे, प्रगत बनावयाचे तर इंग्लंडमध्ये जाऊन शिकले पाहिजे, किंवा काही वर्षे किमान राहिले तरी पाहिजे ही समजूत सार्वत्रिक होती. रवींद्रनाथ टागोर, अरविंद घोष यांना म्हणूनच लहानपणीच विलायतेस पाठविण्यात आले होते. ब्रिटिश साम्राज्यात आपण आहोत याचा मोठा गौरव त्या काळात शिक्षित मंडळींना वाटत असे. तुलना केली जावयाची ती रशियाशी. रशियन राज्यपद्धती ही अस्मानीसुलतानी, रानटी व प्रतिगामी तर ब्रिटिश राज्यपद्धती ही जबाबदार प्रातिनिधिक, सुसंस्कृत व प्रगत अशी मांडणी केली जाई.

ब्रिटिश साम्राज्यात राहावयास, जागतिक पातळीवरील ब्रिटिश साम्राज्यवादी राजकारणात आपला वाटा उचलण्यास काँग्रेसच्या पुढाऱ्यांची हरकत नव्हती. असा सहभाग देता आला तर ती त्यांना गौरवाची गोष्टही वाटली असती. या कारणाने हिंदुस्थानच्या राज्यातील व्हाइसरॉय, गव्हर्नर, सेनापती इत्यादींसारखी अनेक वरिष्ठ पदे इंग्रज व्यक्तींच्या हातीच अनिश्चित काळपर्यंत राहावीत व राज्याची सूत्रे अंतिमत: ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या हाती राहावीत याला त्यांची मन:पूर्वक संमतीच राहिली असती, असे म्हणता येते.

जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा अवलंब हिंदुस्थानात केला जावा, न्यायदान आणि सरकारी नोकऱ्या व अधिकाराच्या जागा यांबाबतीत इंग्रज व हिंदी असा भेदाभेद केला जाऊ नये, आणि हिंदुस्थानचे राज्य हिंदी जनतेच्या हिताला डावलून चालविले जाऊ नये अशा तीन प्रमुख मागण्या त्यांच्या होत्या. या मागण्या १८५३ साली पाठविलेल्या अर्जामध्ये ठळकपणे आलेल्या आहेत. बरोबरीच्या नात्याने आपणास सहभागी करून घेतले तर ब्रिटिश साम्राज्याची आपण तेवढ्याच निष्ठेने सेवा करू, साम्राज्य वाढविण्याचे व बलशाली बनविण्याचे काम करू, असा गर्भित संदेश त्याही वेळेस होताच.

राज्यकारभारातील सहभाग, नोकऱ्याचाकऱ्या यांबाबतीत पात्रता असेल तरच बरोबरीची संधी दिली जावी ही शर्त काँग्रेसच्या संस्थापक पुढाऱ्यांना मंजूर होती. अव्वल इंग्रजीतील वरिष्ठतम इंग्रज शासकांनी यासंबंधी ज्या कसोट्या सांगितल्या त्या कसोट्यांवर आमची पारख केली असता आमच्यापैकी अनेकजण वरिष्ठ जागांवर काम करण्यास इंग्रज व्यक्तींइतकेच पात्र आहेत असा दावा केला जात होता.

मग, घोडे पेंड कोठे खात होते ?

– ४ –

हिंदुस्थान सरकारच्या वेगवेगळ्या खात्यांमधील सनदी सेवेतील तसेच बिगर–सनदी श्रेणीच्या जागांवर काम करणाऱ्यांचे पगार, लट्ठ, त्यांचे अधि-

कार व्यापक, त्यांचा रुबाब राजाचा अशी स्थिती कारभाराचे 'आंग्लीकरण' करण्याच्या कॉर्नवॉलिसच्या धोरणामुळे उत्पन्न झाली होती. येथील काळ्यांवर राज्य करणारे आपण गोरे राज्यकर्ते श्रेष्ठ वंशाचे ही भावना दृढ झाली होती. भारतभर प्रशासनयंत्रणा स्थिर स्वरूपात अस्तित्वात आल्यावर या इंग्रज अधिकाऱ्यांची एक बंदिस्त जमातच तयार झाली. प्रगत स्वरूपाचे राज्य फक्त गोरे लोकच करू शकतात, काळी माणसे ही मुळातच या कामी अपात्र आहेत, हा युक्तिवाद कमीअधिक प्रच्छन्नपणे केला जाऊ लागला. हिंदुस्थानात या अधिकारी मंडळींनी आपली जवळपास अभेद्य अशी एकजूट केली. हिंदुस्थानात सनदी प्रशासक व त्यांची 'पोलादी चौकट' हेच सर्वेसर्वा अशी स्थिती होती. व्हाइसरॉय व इलाख्यांचे गव्हर्नर, सेनापती, व व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळावरील एखादा सभासद हेच काय ते सरळ इंग्लंडहून येत; सनदी सेवेत नसलेली एवढीच काय ती माणसे. भारतमंत्र्याच्या 'इंडिया कौन्सिल'वरही निवृत्त झालेल्या सनदी नोकरांचाच भरणा असे. अशा रीतीने शंभरांतील पन्नाससाठ टक्के राज्याची धोरणे हीच मंडळी ठरवीत व पंचाण्णव टक्के कारभार हेच चालवीत अशी स्थिती होती. यांचा विरोध पत्करून धोरणे ठरविणे वा ती अमलात आणणे व्हाइसरॉय वा भारतमंत्री यांना सामान्यतः शक्य नसे. अंतस्थपणे कारवाया करून कार्यभाग बुडविण्याची वा प्रसंगी असहकार पुकारण्याची यांची ताकद फार मोठी होती. त्यामुळे, लॉर्ड कर्झन यांच्यासारखा एखादाच अपवाद वगळता, बहुतेक सर्व व्हाइसरॉय व गव्हर्नरांना यांच्या कलाने घ्यावे लागे. इतकेच नाही तर, यांच्या कान फुंकण्यामुळे, आरंभी स्वतंत्रवृत्ती बाळगणारे गव्हर्नर व व्हाइसरॉय अल्पावधीत अतिसावध बनून यांच्या हातातले बाहुले बनून कारभार पाहणे पसंत करीत.

या 'सनदी सेवकां'ची मनोभूमिका, आपल्या भूमिकेचे त्यांनी शोधलेले तात्त्विक समर्थन आणि त्यांचे हितसंबंध जाणून घेतले की घोडे कोठे पेंड खात होते ते स्पष्ट होईल.

मायकेल एडवर्डस यांनी आपल्या 'ब्रिटिश इंडिया' या ग्रंथात, १८५७ नंतरच्या इंग्रजी राज्याची तत्त्वे व व्यवहार यांसंबंधीच्या विवेचनात, समकालीन ब्रिटिश मंडळींच्या लेखनातील मार्मिक उतारे उद्धृत केले आहेत. १८६४ ते १८६९ या काळात व्हाइसरॉय राहिलेले लॉर्ड जॉन लॉरेन्स ( १८५८ साली ) लिहितात, 'We have not been elected or placed in power by the people, but we are here through our moral authority, by the force of circumstances, by the will of providence. This alone constitutes our charter to govern India. In doing the best we can for the people, we are bound by our conscience, and not by theirs.'

[ आम्हाला लोकांनी निवडलेले नाही किंवा लोकांनी आम्हाला सत्तास्थानी आणून ठेवलेले नाही. तर आमचा नैतिक अधिकार, परिस्थितीचा रेटा आणि ईश्वरी इच्छा यांच्या बळावर आम्ही येथे (भारतात) आहोत. भारतावर राज्य करण्याची आमची सनद ह्याच्यात सामावलेली आहे. लोकांच्या हिताप्रीत्यर्थ जास्तीत जास्त प्रयत्न करायला आम्ही आमच्या सदसद्विवेकबुद्धीच्या आदेशानुसार बांधलेले आहोत, त्यांच्या नव्हे. ]

व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळावर १८६८ नंतर काम केलेल्या जॉन स्ट्रॅचींनी लिहून ठेवले आहे की, कारभाराचे अधिकार नेटिवांच्या हाती दिल्यास साम्राज्याचा विलय अटळ आहे. ते म्हणतात, 'In this there is nothing offensive or disparaging to the Natives of India. It simply means that we are foreigners, and that, not only in our interests, but because it is our highest duty towards India itself, we intend to maintain our dominion. We cannot forsee the time in which the cessation of our rule would not be the signal for universal anarchy and ruin, and it is clear that the only hope for India is the long continuance of the benevolent but strong government of Englishmen. Let us give to the Natives the largest possi-

ble share in the administration ... But let there be no hypocrisy about our intention to keep in the hands of our own people those executive posts on which, and on our political and military power, our actual hold of the country depends. Our Governers of Provinces, the chief officers of our army, our magistrates of districts and their principal executive subordinates ought to be Englishmen under all circumstances that we can now foresee.'

[ हिंदुस्थानच्या नेटिवांचा मानभंग ह्यामुळे होतो किंवा त्यांना कमी लेखण्यात येते असे नाही. ह्याचा अर्थ एवढाच की, आपण परके आहोत आणि केवळ आपल्या हितासाठीच नव्हे तर खुद्द भारताच्या बाबतीत आपले जे सर्वोच्च कर्तव्य आहे ते पार पाडण्यासाठी आमचे अधिराज्य कायम राखण्याचा आमचा इरादा आहे. आमची सत्ता संपुष्टात येताक्षणीच जेव्हा येथे सार्वत्रिक अंदाधुंदी आणि विनाश फैलावणार नाही असा काळ भविष्यात कितीही दूर पाहिले तरी दृष्टोत्पत्तीस पडू शकत नाही आणि इंग्रजांचे हितकर पण बळकट असे राज्य दीर्घकाळ टिकून राहिल्यानेच हिंदुस्थानच्या भविष्याविषयी काही आशा बाळगणे शक्य होते हे स्पष्ट आहे. हिंदुस्थानच्या नेटिवांना शासनव्यवस्थेत शक्य तितका मोठा सहभाग आपण जरूर देऊया...... पण ह्या देशावरील आपली पकड ज्या शासकीय स्थानांवर आणि आपल्या ज्या राजकीय व लष्करी सत्तेवर अवलंबून आहे ती आमच्या लोकांच्याच हाती ठेवण्याचा आमचा इरादा आहे. ह्याविषयी दांभिकपणा करण्याचे कारण नाही. ज्या भविष्याची आपण आशा करू शकतो त्याच्यात कोणत्याही परिस्थितीत प्रांतांचे गव्हर्नर, प्रमुख लष्करी अधिकारी, जिल्ह्यांचे मॅजिस्ट्रेट आणि त्यांचे प्रमुख कार्यकारी कनिष्ठ अधिकारी हे इंग्रजच राहिले पाहिजेत. ]

ख्रिश्चन धर्मप्रसारक ईव्हँजेलिकल प्रेरणेची जागा साम्राज्यप्रसाराच्या-जगदोद्धाराच्या जीवितकार्याच्या प्रेरणेने घेतल्यानंतर धर्माच्या संदेशाची जागा सुखी व प्रगत समाजाची निर्मिती करणाऱ्या 'कायद्यां'च्या संकल्पनेने घेतली. हा कायदा अमलात आणण्यासाठी बलशाली, रोखठोक व कार्यक्षम प्रशासनाची अर्थातच गरज होती. राज्यपद्धती प्रातिनिधिक असणे गैर, एकाधिकारवादी असणे उचित व आवश्यक, हा निष्कर्ष स्वाभाविकपणेच निघत होता. १८६९ ते १८७२ या काळात व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळावर कायद्याचे खाते सांभाळणाऱ्या फिट्झजेम्स स्टीफन या प्रख्यात लिबरल-युटिलिटेरियन सदस्यांनी याची तात्त्विक मांडणी ठासून केली. त्यांनी म्हटले की राज्यसत्तेच्या हातातील दंडशक्तीच्या बळावरच, जबरदस्तीने गोष्टी गळी उतरविण्याच्या सत्तेवरच कायद्याचे राज्य प्रत्यक्षात साकार करता येते. प्रातिनिधिक विधिमंडळांच्या निर्मितिद्वारा राज्यसत्तेचे बळ खच्ची न करणे जरुरीचे आहे. हिंदुस्थानच्या संदर्भात स्टीफन लिहितात की, 'If the essential character of the enterprise is misunderstood and the delusion that it can be carried out by assemblies representing the opinions of the natives is admitted, nothing but failure, anarchy, and ruin can be the result.'

[ ह्या उपक्रमाचे जे सम्यक् स्वरूप आहे ते जर नीट ध्यानी घेतले नाही आणि नेटिवांच्या मताचे प्रतिनिधित्व करणाऱ्या विधानसभांकडून तो पार पाडला जाईल हा भ्रम जर बाळगण्यात आला तर अपयश, अंदाधुंदी आणि विनाश यांहून दुसरे काही निष्पन्न होणार नाही.]

हिंदुस्थानची जुनी घडी पूर्णपणे मोडून काढून येथे लिबरल-युटिलिटेरियन तत्त्वांवर एक नवा समाज कायदा व शासन यांच्या साहाय्याने निर्माण करण्याचा 'उद्योग' आपण हाती घेतला आहे हे विसरून भागणार नाही, आणि या उद्योगात सफलता मिळावयाची असेल तर शासनाच्या हातातील सर्वाधिकार कमी होता उपयोगी नाही, हा इशारा त्यांना द्यावयाचा होता. या भूमिकेतून त्यांनी अशी शिफारस केली की, हिंदुस्थानातील इंग्रजी राज्याचा चिरेचा दगड म्हणजे जिल्ह्याचा कलेक्टर; त्याची अधिसत्ता निरंकुश व सार्वभौम आहे हे

अनुक्रमणिका

प्रजेला नित्य प्रत्ययाला यायला पाहिजे. म्हणून फौजदारी गुन्ह्यांचा न्यायनिवाडा त्याच्या अधिकारात ठेवला पाहिजे, कारण राज्य कोण करते हे, गुन्हेगारांना शासन कोण करते या प्रश्नाच्या उत्तरावरून ठरते. जिल्ह्याच्या कलेक्टरची भूमिका 'राजा'ची आहे, नोकर वा सेवकाची नाही असे स्टीफन यांचे प्रतिपादन होते. ते लिहितात, 'The maintenance of the position of the District Officers is absolutely essential to the maintenance of British Rule in India.'

[ जिल्ह्याच्या अधिकाऱ्यांचे जे स्थान आहे ते तसेच राखणे हे भारतात ब्रिटिश अंमल टिकवून धरण्यासाठी अगदी आवश्यक आहे.]

येथल्या लोकांवर एकाधिकारवादी राज्य चालवायचे; पण त्या राज्याचे समर्थन मात्र नैतिक पायावरच केलेले आहे : लोकांचे भले करण्यासाठीच इंग्रजी राज्याची ईश्वरी योजना आहे; लोकांप्रती आपले कर्तव्य चोखपणे पार पाडण्यासाठी आपल्या हातात सर्वाधिकार व निरंकुश सत्ता ठेवणे ही आपली जबाबदारी आहे. या भूमिकेतील ही गुंतागुंत दृष्टिआड होऊ देता कामा नये. हिंदुस्थानातील गोरगरीब रयतेविषयीची आत्मीयता, त्यांच्या कल्याणाला वाहिलेले आयुष्य, देशाला प्रगतिपथावर घेऊन जाण्याला बांधिलकी, कर्तव्यतत्परता, अथक परिश्रम करण्याची वृत्ती, इमान या सगळ्या गुणवैशिष्ट्यांचा ज्या सनदी प्रशासकात आढळ होई तोच प्रशासक दुसऱ्या अंगाने जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा कट्टर विरोधक, व काँग्रेससारख्या स्वराज्याधिकारासाठी चाललेल्या चळवळींचा शत्रू असू शके.

काँग्रेसच्या पहिल्या पंधरा वर्षांच्या काळात वेडरबर्न व रमेशचंद्र दत्त हे दोन सनदी प्रशासक, निवृत्तीनंतर, काँग्रेसचे निष्ठावंत कार्यकर्ते व पुढारी बनले. काँग्रेसचे अध्यक्षपदही त्यांनी भूषविले. सनदी प्रशासन सेवेच्या 'पोलादी चौकटी'ची वैगुण्ये उघड करीत असतानाच त्यांनी या सेवेत काम करणाऱ्या व्यक्तींचे इमान, त्यांची कर्तव्यतत्परता, त्यांचे अथक परिश्रम, यांचा आवर्जून गौरवही केलेला आढळतो. वेडरबर्न यांनी सनदी प्रशासन यंत्रणेचा हितसंबंधीपणाही उघड केला, त्याकडे वळू.

राष्ट्रसभेच्या पाचव्या अधिवेशनाचे अध्यक्ष सर विल्यम वेडरबर्न हे सनदी सेवेतून निवृत्त झालेले गृहस्थ होते. त्यांच्या वडिलांनी व वडील बंधूंनी सनदी सेवेतच आयुष्य घालविले होते. आपल्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी सनदी सेवेच्या वाखाणण्याजोग्या परंपरांचा आवर्जून उल्लेख केला, पण एकंदरीने ही 'पोलादी चौकट' हिंदी जनतेच्या विरोधी काम करणारी कशी व का आहे याची स्पष्टता केली. काँग्रेसच्या चळवळीच्या मार्गातील अडथळे कोणते आहेत, हा प्रश्न उपस्थित करून ते म्हणाले, 'unfortunately,... in certain important particulars the professional interests of our administrators in India are in antagonism with the interests of the Indian tax payer whose affairs they administer. The main interests of the Indian tax payer are peace, economy and reform. But all those are necessarily distasteful to the civil and military classes. A spirited and well equipped army naturally desires, not peace, but active service. And who can reasonably expect officials to love economy, which means reduction of their own salaries; or reform, which means restriction of their authority ?'

[ दुर्दैवाने...कित्येक महत्त्वाच्या बाबतीत भारतातील आमच्या शासकांचे व्यावसायिक हितसंबंध हे ज्या भारतीय करदात्यांसाठी ते कारभार करतात त्यांच्या हिताशी विरोधी आहेत. भारतीय करदात्यांच्या दृष्टीने शांतता, काटकसर आणि (कारभारातील) सुधारणा ह्यांत त्यांचे हित आहे. पण नागरी आणि लष्करी अधिकारीवर्गाला न रुचणाऱ्या अशा ह्या गोष्टी आहेत. उत्साही, दमदार आणि सुसज्ज सैन्याला शांतता नको असते, लष्करी मोहिमा हव्या असतात. आणि अधिकाऱ्यांना काटकसर आवडेल अशी रास्त अपेक्षा कुणी बाळगू शकेल का, कारण त्यामुळे त्यांचे पगार कमी होतील;

किंवा त्यांना सुधारणा आवडतील का? कारण त्यांच्यामुळे त्यांच्या अधिकारावर निर्बंध येतील.]

पार्लमेंटच्या नियंत्रणाची खरी अवस्था काय होती याचेही अंतरंगदर्शन त्यांनी आपल्या भाषणात घडविले. १८५८ च्या आधी विशेषाधिकारसंपन्न मक्तेदार खाजगी कंपनी म्हणून पार्लमेंटला ईस्ट इंडिया कंपनीविषयी तीव्र दुःस्वास वाटे. दर २० वर्षांनी चौकशी केल्याविना सनद वाढवून न देण्याची कायदेशीर तरतूदच केलेली होती. राज्य-कारभाराविषयीच्या गाऱ्हाण्यांची, तक्रारींची चौकशी अगदी कसून केली जाई, आणि लोकांना लाभदायी अशा हक्क व सवलतींचा लक्षणीय विस्तार करण्याच्या अटीवरच मुदतवाढ दिली जाई. १८५८ नंतर (कागदावर तरी) पार्लमेंटच राज्य करीत असल्याने दुःस्वासही संपला आणि चौकशीही बंद झाली. बरे राज्य तरी पार्लमेंट करते काय? वेडरबर्न म्हणतात, भारतमंत्र्याच्या सल्लागार इंडिया कौन्सिलच्या रूपाने, 'the official administrators have now been admitted into the innermost sanctum of authority; and, as Council to the Secretary of State, form a secrect Court of Appeal for the hearing of all Indian complaints. They first decide all matters in India, and then retire to the Indian Council at Westminster to sit in appeal on their own decisions.'

[सनदी प्रशासकांना राज्यसत्तेच्या अगदी अंतर्गाभाऱ्यात आता प्रवेश मिळाला आहे. भारतातून ज्या तक्रारी येतात त्यांचा सेक्रेटरी ऑफ स्टेट यांचे काउन्सिल म्हणून निवाडा करणारे गुप्त, दाद घेणारे वरिष्ठ न्यायमंडळ हे रूप त्यांनी धारण केले आहे. (म्हणजे) ते भारतात सर्व गोष्टींविषयी निर्णय घेतात. आणि मग वेस्टमिन्स्टरला इन्डियन काउन्सिलमध्ये येऊन आपल्याच निर्णयांविषयी दाद मागितली असता निर्णय देतात.]

म्हणजे पार्लमेंटचे नियंत्रण हा केवळ बुरखा बनला. वास्तवात पार्लमेंटच्या सार्वभौम सत्तेचा पाठिंबा सनदी पोलादी चौकटीलाच मिळू लागला. नियतकालिक चौकशी बंद झाल्याने, हिंदुस्थान सरकार कोणालाच जाब द्यायला बांधील राहिले नाही; जाब विचारणेच थांबले. वेडरबर्न म्हणतात, 'There is now no day of reckoning.'

[ज्या दिवशी सर्व गोष्टींचा झाडा द्यावा लागेल असा दिवसच राहिला नाही.]

परमार्थ व स्वार्थ यांची विलक्षण गुंफण व गल्लत झालेली होती! आपली भूमिका नैतिक व रयत-हितैषी आहे याविषयी अनेकांची इतकी निःशंकता असल्यामुळे तिचा भेद करणे अत्यंत अवघड होते. साम्राज्यवादाच्या चढत्या कमानीच्या काळात, साम्राज्याच्या विस्ताराने व प्रशासनाने व्यक्तित्वाला व जीवनाला एक विशाल परिमाण लाभत असल्याचा जबरदस्त प्रत्यय येत असल्याच्या ऐन काळात काँग्रेसची चळवळ साम्राज्यसेवेच्या बिनीच्या शिलेदारांना आव्हान देत होती.

— ५ —

बंगालच्या फाळणीमुळे उत्पन्न झालेल्या चळवळीने काँग्रेसच्या कामाचा संदर्भ व काँग्रेसचे स्वरूप यांत मोठा फरक घडून आला. त्याआधीच्या पहिल्या वीस वर्षांच्या कालखंडाचा सलग विचार करता येतो, व तसा तो करणे अर्थपूर्णही आहे.

या काळातील काँग्रेसच्या कार्याचे चार पैलू वेगळे करून पाहता येतात. काँग्रेसची चळवळ स्थिर पायावर उभी करणे; काँग्रेसला सर्व देशातून पुरेशा प्रमाणावर शिक्षित वर्गाचा पाठिंबा मिळविणे व या मार्गे काँग्रेसची राष्ट्रीयता व प्रातिनिधिकता निर्विवादपणे सिद्ध करणे; लोकांचे प्रबोधन करणे; वेगवेगळ्या प्रश्नांसंबंधी काँग्रेसची भूमिका बनवणे व ती लोकांपर्यंत पोचविणे; आणि हिंदुस्थान सरकार व ब्रिटिश पार्लमेंट यांच्यापुढे मागण्या ठेवून त्या पदरात पाडून घेण्यासाठी सतत दबाव कायम ठेवणे, असे काँग्रेसच्या कामाचे चार पैलू पाडता येतात.

काँग्रेसच्या अधिवेशनांमधील भाषणे वाचल्यास आणखी एक गोष्ट प्रकर्षाने मनात ठसते. काँग्रेसची चळवळ ही अधिकारप्राप्तीची, वेगवेगळ्या मागण्या पदरात पाडून घेण्याची चळवळ आहे, हे खरे; पण ती ब्रिटिश राज्य येथून घालवून देण्यासाठीची चळवळ नसून इंग्रजी राज्य अधिक सुदृढ करणारी चळवळ आहे, काँग्रेस ही राजनिष्ठांची संघटना

अनुक्रमणिका

आहे, ही गोष्ट वर्षानुवर्षे सांगितली जात राहिल्याचे दिसते. देशाच्या वेगवेगळ्या भागांतील वक्ते आपल्या मनातील प्रामाणिक भावना व्यक्त करीत असल्याचा प्रत्यय येतो. त्याचबरोबर ही भाषणे इंग्रज राज्यकर्त्यांना उद्देशून केलेली आहेत, त्यांच्या मनातील संशयाचे निराकरण करण्यासाठी आहेत हे स्पष्ट होते. त्यांच्याबरोबर चाललेला तो या काळातला अखंड वादविवाद व संवाद होता. राजनिष्ठा अभिव्यक्त करण्याची एक व्यावहारिक निकडही होती. देशातील सुशिक्षितांपैकी फार मोठा वर्ग सरकारी नोकरीत असलेल्यांचा होता. खेरीज सरकारची दहशत लोकांमध्ये अद्यापि मोठ्या प्रमाणावर टिकून होती. अमीरउमराव, जमीनदार, व्यापारी अशा नवशिक्षितेतर वर्गांमधील व्यक्तींनाही काँग्रेसच्या चळवळीत सहभागी करून घेण्याचा प्रयत्न होता. ज्या संघटनेच्या व चळवळीच्या राजनिष्ठेविषयी शंका बाळगण्यास थोडीही जागा होती अशा संघटनेशी लोक संबंध ठेवण्यास धजले नसते.

त्या काळात मनाने जावे तर लक्षात येते की १८५७ च्या उठावाचे परिणाम इंग्रज ( वा अँग्लो–इंडियन) जमात व हिंदी लोक (विशेषत: इलाख्याच्या तीन शहरांबाहेरील उत्तर व मध्य भारतातील लोक) यांच्यावर फार खोलवर झालेले होते. उठावाच्या मानसिक धक्क्यातून अँग्लो–इंडियन जमात पुढची पन्नास वर्षे तरी सावरली नाही; लोकक्षोभाच्या अगदी क्षुल्लक घटनांकडे भयग्रस्त व संशयी वृत्तीने पाहिले जात असे, व प्रतिक्रिया अतिरेकी होत असे. अशा संशयाच्या वातावरणात काँग्रेसच्या संघटनेची बांधणी व चळवळीची उभारणी आपणास करावयाची आहे याचे भान ह्यूम, दादाभाई, रानडे या ज्येष्ठ पुढाऱ्यांना सतत होते असे दिसते. १८५७ चा उठाव चिरडून टाकताना जी निर्घृणता व हिंस्रता इंग्रजांनी प्रकट केली तिचेही भान बाळगावे लागत होते. कारण, संघटना/चळवळ चिरडण्याचे सामर्थ्य हिंदुस्थान सरकारपाशी होते यात शंका नाही.

काँग्रेस स्थापन करणाऱ्यांच्या एका फार मोठ्या मर्यादेचा विसर पडू देता कामा नये. इंग्रजी शिक्षण घेतलेल्यांनी काँग्रेसची स्थापना केली हे माहितीचे आहे. जनसामान्यांच्यात काँग्रेसला पाळेमुळे नव्हती ही गोष्ट लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. भारतातील पारंपरिक जातिजमातींच्या सामाजिक व्यवहारांपासून, सांस्कृतिक व भावविश्वापासून काहीशा दूर गेलेल्या शिक्षित मंडळींनी काँग्रेस स्थापन केली. ते उच्चवर्णीय व वर्गीय होते हाही एक भाग आहे. १८५७ ते १९०५ या काळात जनसामान्यांमधून जे लहानमोठे उद्रेक झाले त्यांमध्ये या मंडळींचा सहभाग नव्हता. १८६५ ते १९०० या काळात अनेकवार दुष्काळांचे भीषण परिणाम झाले. १८९६–९७ व १८९९–१९०० या काळात ज्या पाच प्रांतांमध्ये दुष्काळ पडले त्या प्रांतांची लोकसंख्या १८९१ ते १९०१ या दशकात १५ लाखांनी घटली. इतका मोठा आघात होऊनही चळवळ उत्पन्न झाली नाही. जमीन महसूल आकारणी व वसुली, कायदेकानू व न्यायदान यांमुळे समाजात फार मोठे उत्पात या काळात घडत होते. पण त्यांच्या आधारे शिक्षितांना चळवळी उभारता आल्या नाहीत. सार्वजनिक सभा ही या काळातली त्यातल्यात्यात सरस संस्था होती. लोकस्थितीचा अभ्यास शिक्षित प्रतिनिधींच्या मार्फत करणे आणि सरकारपर्यंत माहिती पोचवून, सरकारने काय उपाययोजना करावी हे सुचवणे ही सार्वजनिक सभेच्या कामाची मर्यादा होती. सावकारांच्या वह्या जाळण्यावर भर असलेले ‘ दख्खनचे दंगे ’ यासारख्या उद्रेकांच्या बुडाशी असलेल्या परिस्थितीचा चळवळी उभारण्यासाठी उपयोग करायचा तर लागणारा संबंध नवशिक्षितांचा शेतकऱ्यांबरोबर नव्हता. वासुदेव बळवंतांनी रामोशांना हाताशी धरून बंड करण्याचा प्रयत्न केला पण त्यांची गणना आपण या नवशिक्षितांमध्ये करणार नाही हे एक, व त्यांनी उत्पन्न केलेले बंड १८५७ च्या उठावाच्या धर्तीचेच होते, ही गोष्ट दुसरी. मुद्द्याची गोष्ट अशी की, जनसामान्यांच्यात पाळेमुळे नसलेली काँग्रेसची ही संघटना व चळवळ शासनाच्या दडपशाहीपुढे अजिबात टिकाव धरू शकली नसती. किंबहुना, गोखल्यांनी पुढे म्हटले त्याप्रमाणे, ह्यूम यांच्यासारख्या इंग्रज गृहस्थांच्या सहभागामुळेच काँग्रेसची स्थापना होऊ शकली व कदाचित त्यांच्यासारख्या इंग्रजांच्या–इंग्लंडमधील व येथील–पाठिंब्यामुळे, सक्रिय सहभागामुळे आरंभीच्या

काळात शासनाने तिच्यावर आघात केला नाही. तात्पर्य असे की, काँग्रेसचे रोपटे हे एक अत्यंत नाजुक रोपटे होते, व मोठ्या प्रतिकूल वातावरणात ते कुशलतेने, खटपटीने वाढवावे लागले. ही पार्श्वभूमी लक्षात ठेवून काँग्रेसने पहिल्या वीस वर्षांमध्ये आपली कार्ये कशी पार पाडली हे पाहिले पाहिजे.

दरवर्षी काँग्रेसचे अधिवेशन देशातील वेगवेगळ्या प्रमुख शहरी भरविणे, त्यात खंड पडू न देणे काँग्रेस संघटनेला व्यापक पाठिंबा मिळवून तिला स्थैर्य प्राप्त करून देण्याच्या दृष्टीने सर्वप्रथम आवश्यक होते. १८८५ ते १९०४ या वीस वर्षांच्या काळात मुंबई (५), मद्रास (४), बंगाल (४), सेंट्रल प्रॉव्हिन्सेस अँड बेरार (२), नॉर्थ-वेस्ट प्रॉव्हिन्सेस (आजचा उत्तर प्रदेश) (३), आणि पंजाब (२) अशी सहा प्रांतांमध्ये अधिवेशने भरली. यातही मद्रास व बंगाल इलाख्यांत सारी अधिवेशने अनुक्रमे मद्रास व कलकत्ता या दोन शहरांतच भरली. पंजाब प्रांतातील दोन्ही अधिवेशने लाहोर येथे भरली. मुंबई इलाख्यात मुंबई (३), अहमदाबाद (१) व पुणे (१) या तीन शहरांमध्ये; नॉर्थ-वेस्ट प्रांतात अलाहाबाद (२) व लखनौ (१) या दोन शहरांत, व सी. पी. अँण्ड बेरार या प्रांतात अमरावती (१) व नागपूर (१) अशी दोन शहरांत अधिवेशने भरली. किती प्रतिनिधी अधिवेशनांना उपस्थित होते ?

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मद्रास | १८८७ | १८९४ | १८९८ | १९०३ | वर्ष |
| | ६०७ | ११६३ | ६१४ | ५३८ | उपस्थिती |
| कलकत्ता | १८८६ | १८९० | १८९६ | १९०१ | वर्ष |
| | ४३४ | ६७७ | ७८४ | ८९६ | उपस्थिती |
| मुंबई | १८८५ | १८८९ | १९०४ | | वर्ष |
| | ७२ | १८८९ | १०१० | | उपस्थिती |
| लाहोर | १८९३ | १९०० | | | वर्ष |
| | ८६७ | ५६७ | | | उपस्थिती |
| अलाहाबाद | | १८८८ | | १८९२ | वर्ष |
| | | १२४८ | | ६२५ | उपस्थिती |
| पुणे | | १८९५ | | | वर्ष |
| | | १५०४ | | | उपस्थिती |
| अमरावती | १८९७ | | | | वर्ष |
| | ६९२ | | | | उपस्थिती |
| अहमदाबाद | १९०२ | | | | वर्ष |
| | ४७१ | | | | उपस्थिती |
| नागपूर | १८९१ | | | | वर्ष |
| | ८१२ | | | | उपस्थिती |
| लखनौ | १९०० | | | | वर्ष |
| | ७३९ | | | | उपस्थिती |

काँग्रेसची पोच कोठवर गेली हे यावरून लक्षात येते व तिची मर्यादाही.

काँग्रेस संघटनेला स्थिरता प्राप्त करून देण्यात ह्यूम यांचा वाटा किती मोठा होता याचे एक गमक म्हणजे या सर्व काळात ह्यूम यांच्याकडे सेक्रेटरीचे पद राहिले. त्यातही १८९५ पर्यंत त्यांच्यावरच प्रामुख्याने सेक्रेटरीपदाची जबाबदारी राहिली असे दिसते. पंडित अयोध्यानाथ यांचे सहकार्य त्यांना १८८९ ते १८९२ या काळात मिळाले, पण त्यांचे अकाली देहावसान झाल्यावर ह्यूम यांच्याकडेच परत संपूर्ण जबाबदारी आलेली दिसते. १८९६ पासून मुंबईच्या दिनशा वाच्छा यांनी जबाबदारी उचलल्यापासून काँग्रेस संघटनेची सूत्रे मुंबईहून फेरोझशहा मेथांच्या मार्गदर्शनाखाली हलू लागली.

काँग्रेसची चळवळ स्थिर पायावर उभी करण्याचे श्रेय ह्यूम यांना कसे आहे हे लोकमान्यांनी २८ नोव्हेंबर १८९३ रोजी लिहिलेल्या 'मे. ह्यूमसाहेब यांची शेवटची भेट' या लेखात स्पष्ट केले आहे. टिळक लिहितात, 'आजपर्यंत ह्यूमसाहेबांनी आमचे दोष पदरात घेऊन हा मोठा गाडा कसातरी हाकला होता; पण तसा प्रकार नेहमी होणे शक्य नाही... इतके शिक्षण मिळाल्यावरही जर आम्ही जागच्या जागीच उभे राहू, ह्यूमसाहेबांनी सफा केलेल्या रस्त्यावर पुनः रान वाढू देऊ, तर मग आमची धन्य झाली असेच म्हटले पाहिजे.' पण अशी फजितीची वेळ आली नाही. प्रथम वाच्छांनी व मग त्यांच्या जोडीने नामदार गोखल्यांनी हे काम आपल्या खांद्यावर घेतले.

देशाच्या वेगवेगळ्या भागांतील शिक्षितवर्गाचा पाठिंबा मिळविण्यात काँग्रेसला चांगले यश मिळाले ही गोष्ट उपस्थितीच्या आकड्यांवरून दिसून येते.

काँग्रेसच्या मंडपाखाली पांढरपेशे व्यावसायिकच प्रामुख्याने एकत्र आलेले होते ही गोष्ट उघडच आहे. या संदर्भातही लोकमान्यांची साक्ष काढण्यासारखी आहे. २० डिसेंबर १९०४ रोजी 'वेळ तर हीच आहे' या लेखात ते लिहितात, 'सभा स्थापन होण्यापूर्वी ज्या निरनिराळ्या राजकीय संस्था होत्या त्या या सभेत एकवटून गेल्या. इतकेच नव्हे तर, ज्या इलाख्यांत तशा प्रकारच्या संस्था नव्हत्या तेथे राष्ट्रीय सभेच्या शाखा उत्पन्न झाल्या; आणि त्याबरोबरच सर्व देशभर एक प्रकारची राष्ट्रीय उन्नतीसाठी कळकळ उत्पन्न झाली. तसेच निरनिराळ्या इलाख्यातील व प्रांतांतील लोक एके ठिकाणी आल्याने त्यांच्यामधील दळणवळण व स्नेहभाव वाढून एककार्यत्वामुळे एकराष्ट्रीयत्वाची बुद्धीही अधिकाधिक जागृत होत चालली.' 'हल्लीच्या धोरणावरून असे दिसून येते की, लवकरच मुसलमान लोकही राष्ट्रीय सभेला येऊन मिळतील' असेही त्यांनी पुढे लिहिले आहे.

– ६ –

काँग्रेसच्या अधिवेशनांच्या कामकाजांचे अहवाल चाळले तर लक्षात येते की इंग्रजी राज्याच्या वेगवेगळ्या धोरणांमुळे आणि हिंदुस्थान सरकारच्या कारभाराच्या पद्धतीमुळे देशाच्या बिघडत चाललेल्या स्थितीबद्दल वेळोवेळी ऊहापोह केला जात राहिला. कायदेकौन्सिलांची सुधारणा करून लोकनियुक्त प्रतिनिधींची संख्या वाढवावी, त्यांचे अधिकार वाढवावेत, किंवा सुशिक्षितांना वरच्या जागा मिळाव्यात या स्वरूपाच्या बुद्धिजीवी 'बाबू' लोकांच्या स्वार्थाच्या मागण्याच तेवढ्या सालोसाल पुढे ठेवल्या जात होत्या अशातली गोष्ट नाही. हिंदी रयतेच्या वाढत्या दैन्यदारिद्र्याची मीमांसा दादाभाईंनी १८८६ सालच्या त्यांच्या अध्यक्षीय भाषणात केलेली आढळते. काँग्रेसचे हे दुसरेच अधिवेशन होते. वारंवार पडणाऱ्या दुष्काळांचे अलीकडच्या इंग्रजी राज्यातच भीषण परिणाम का होत आहेत याचीही मीमांसा वेळोवेळी होत आली. शेतकरी कंगाल का बनत चालला आहे याची मीमांसा सुप्रसिद्ध आर्थिक इतिहासकार रमेशचंद्र दत्त यांनी आपल्या १८९९ च्या अध्यक्षीय भाषणात केली. सनदी प्रशासक म्हणून त्यांचा प्रदीर्घ अनुभव त्यांच्या विश्लेषणाच्या पाठीशी होता. शेतकऱ्यास भांडवल पुरवठा करणाऱ्या शेतकी बँका काढण्याची योजना प्रथमतः मांडणाऱ्या वेडरबर्न यांनी, त्यांच्या १८८९ च्या अध्यक्षीय भाषणात, येथील राज्ययंत्रणेने ती कशी कुजवून टाकली त्याची हकीकत सांगितली. इंग्रजी राज्याच्या विस्ताराबरोबर अबकारी उत्पन्न वाढविणाऱ्या धोरणामुळे दारूचे व्यापारी गुत्ते कसे वाढले आहेत व त्यामुळे गरीब कुटुंबे कशी उद्ध्वस्त होत आहेत याचे चित्रण चौथ्याच अधिवेशनात प्रतिनिधींनी सभागृहासमोर ठेवलेले आढळते. तात्पर्य असे की, काँग्रेस ही त्या काळी बुद्धिजीवी सुशिक्षित वर्गाची संघटना व चळवळ होती हे खरे असले तरी, हिंदुस्थानच्या खेडूत जनतेच्या समस्यांकडे, त्यांच्या दुःखांकडे काँग्रेसचे लक्ष प्रथमपासूनच गेलेले दिसते. त्या त्या काळातील सरकारी धोरणांसंबंधी परखड टीकाटिप्पणी हे काँग्रेसच्या अधिवेशनांचे वैशिष्टयच होते.

काँग्रेसचे कामकाज लोकांपर्यंत कितपत पोचत असे ? काँग्रेसचे सारे कामकाज इंग्रजीमधून चालत असे. त्या वेळची स्थिती अशी होती की ते अन्य कोणत्याच भाषेत चालविण्याची कल्पना करता आली नसती. पण काँग्रेसच्या स्थापनेमुळे स्थानिक पातळीवर लहानमोठ्या संस्थांची उत्पत्ती झाली, प्रांतिक सभा भरू लागल्या आणि राष्ट्रीय समस्यांची चर्चा अधिक होऊ लागली. लोकांपर्यंत काँग्रेसचा संदेश पोचविण्याची कामगिरी खऱ्या अर्थाने स्थानिक भाषांमधील देशी वृत्तपत्रांनी पार पाडली असे म्हणायला हवे. ज्ञानप्रकाश, केसरी यांची आठवण सहजच होते. अशी वर्तमानपत्रे सर्व प्रांतांमध्ये या काळात निघाली. इंग्रजी भाषेतही हिंदी मंडळींनी चालविलेली वर्तमानपत्रे महत्त्वाची कामगिरी पार पाडीत होती.

काँग्रेस हे हिंदी लोकांनी भरविलेले राष्ट्रीय पार्लमेंट आहे असे म्हणता आले असते का ? इंग्रजी शिक्षण घेतलेल्या वर्गाने भरविलेली ही पार्लमेंट सभा होती असे म्हणता येईल. मुसलमान समाजापैकी उत्तर भारत वा बंगालमधील खानदानी वळणाचा उच्च समाज काँग्रेसपासून फटकून राहिला. त्याचप्रमाणे जुन्या सरंजामदार वर्गाचाही मर्यादित पाठिंबाच मिळाला. संस्थानिकां-

पका काही महत्त्वाच्या सुजाण व्यक्तींची काँग्रेसला सहानुभूती व मदत होती असे दिसते. धनिक व्यापारी उद्योगपती वर्गाचीही स्थिती अशीच होती. हिंदुस्थान सरकारचे, व एकंदरीतच ब्रिटिश राज्याचे, धोरण हिंदी व्यापारी, उद्योगपती व भांडवलदार यांना नावडतीची वागणूक देणारे आहे याची वेळोवेळी स्पष्टता जशी होत चालली तसा या वर्गातील व्यक्तींचा काँग्रेसला पाठिंबा मिळत गेला. काँग्रेस ही बव्हंशी पांढरपेशा मध्यमवर्गीय व्यावसायिकांची व नोकर पेशातील मंडळींनी चालविलेली संघटना व चळवळ राहिली, पण ती या वर्गाची स्वार्थी हितसंबंधी चळवळ मात्र नव्हती. ब्रिटिश राज्यकर्त्यांपर्यंत हिंदी जनतेची स्थिती, तिच्या समस्या व गाऱ्हाणी, व तिच्या हिताच्या मागण्या पोचविणे, लोकांच्या हिताच्या कोणत्या गोष्टी करावयास पाहिजेत ते सुचविणे हे काम काँग्रेसच्या अधिवेशनांमधून व काँग्रेसशी संलग्न प्रांतिक सभा व अन्य उपक्रमांद्वारे होत आले. या अर्थाने काँग्रेसला 'हिंदी पार्लमेंट' म्हणावयास कोणतीच हरकत असू नये.

१८९५ साली पुण्यास काँग्रेसचे अधिवेशन भरले असता महात्मा जोतिराव फुले यांचे सहकारी श्री. भालेकर यांनी काँग्रेसच्या मंडपापुढे एका दुष्काळपीडित मनुष्याचे चित्र उभे करून त्याच्या हातात दिलेल्या फलकावर "सभेत शेतकऱ्यांची कळकळ बाळगणारे वीस तरी लोक आहेत काय" असा प्रश्न लिहिला होता. खरी कळकळ आहे यांचे गमक कोणते मानावयाचे, आणि शेतकऱ्यांचे प्रश्न खरोखरी कोणते आहेत, या दोन प्रश्नांच्या उत्तरांवर बरेच काही अवलंबून आहे ही गोष्ट उघड आहे. शेतकऱ्यांची लुबाडणूक व फसवणूक करणारी उच्चवर्णीय मंडळीच काँग्रेसमध्ये पुढाकाराने दिसतात; त्यांना कळकळ असूच शकत नाही, असे भालेकर सरळ सरळच म्हणाले असते. या त्यांच्या विश्लेषणात व आरोपात मोठे तथ्य होते हे मान्य केल्यावरही, आपण दुसऱ्या पक्षाला न्याय देण्याच्या दृष्टीने असे म्हटले पाहिजे की, काँग्रेसच्या संस्थापक पुढाऱ्यांना शेतकऱ्यांच्या दैन्यदारिद्र्याच्या प्रश्नाचे जे बौद्धिक आकलन झालेले होते त्या आकलनाच्या मर्यादा जरूर होत्या; त्या आकलनाच्या चौकटीत मात्र ते प्रामाणिक होते व त्यांची कळकळही खरी होती.

भालेकरांनी उपस्थित केलेला मुद्दा एरवी टिळकांनाही मान्य होता. केसरीतील ज्या लेखात त्यांनी भालेकरांच्या निषेधात्मक आव्हानाची ओझरती दखल घेतली त्याच्या पंधरा दिवस आधी त्यांनीच असे लिहिले होते की, 'सर्व शेतकरी, कुळंबी, माळी, साळी, कोळी यांस जेव्हा राष्ट्रीय सभेचे ठराव समजून देऊन त्यांच्यात या ठरावाप्रमाणे वर्तनक्रम ठेवण्याची बुद्धी आम्हांस उत्पन्न करता येईल तरच राष्ट्रीय सभेचे हेतू तडीस जातील. आम्ही शिकलेले लोक दरवर्षी एकत्र जमल्यापासून काही विशेष व्हावयाचे नाही' (२४ डिसेंबर १८९५). महात्मा फुले व लोकमान्य टिळक यांच्यातले अंतर या म्हणण्याने मिटत नाही, पण काँग्रेसची पोच कोणापर्यंत होती व तिची मर्यादा काय होती या गोष्टी स्पष्ट होतील.

हिंदी रयतेचे प्रतिनिधित्व हा मोठा वादाचा मुद्दा होता. सनदी प्रशासन यंत्रणेचा दावा असा होता की, हिंदुस्थानातील शहरी, उच्चवर्णीय बुद्धिजीवी कारकुंड्या पांढरपेशा 'बाबू' लोकांपेक्षा आम्हीच रयतेमध्ये जास्त मिसळतो; त्यांच्याशी आमची साक्षात जवळीक आहे; त्यांच्या हिताची आम्हाइतकी कोणास कळकळ नाही; आणि त्यांची सुखदुःखे आमच्यासारखी कोणी जाणत नाही. काँग्रेसच्या व्यासपीठावरून पल्लेदार वाक्यांची फेक करणाऱ्या अनेक पुढाऱ्यांच्या तुलनेत खरोखरच अनेक सनदी सेवक हे खेडूत जनतेमध्ये अधिक खोलवर जाऊन पोचले होते, व त्यांच्या हिताविषयी त्यांना कळकळ होती. इंग्रजी अमदानीत दुष्काळांचे परिणाम भीषण होण्यामागे इंग्रजी राज्याची विशिष्ट धोरणे व भूमिका होत्या हे खरेच; पण दुष्काळाच्या परिणामांशी शर्थीने सामना करण्यात इंग्रज अधिकारीच पुढे असत. दुष्काळ निवारणाच्या कार्यात काँग्रेसचे पुढारी झीज सोसून पुढे झाले नाहीत ही वस्तुस्थिती होती. वर उल्लेख केलेल्या २४ डिसेंबर १८९५ च्या लेखातच लोकमान्य लिहितात, 'जनरल बूथसारख्या मिशनरी गृहस्थाने मोठ्या कळकळीने हिंदुस्थानातील शेतकऱ्यांची स्थिती सुधारण्याकरिता एक मोठा बेत करावा आणि दरवर्षी हिंदुस्थानातील

चांगली शहाणी हजारो माणसे एके ठिकाणी जमून अशा तऱ्हेची आम्हास काही व्यवस्था करता येऊ नये ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे.' तात्पर्य असे की, प्रामाणिकपणे किंवा आपमतलबीपणाने असो, रयतेचे खरे प्रतिनिधी तुम्ही नाहीतच असे ज्या वेळी महात्मा फुल्यांच्याच भूमिकेतून येथील 'सनदी सेवक' म्हणत तेव्हा त्यातील तथ्यांश दुर्लक्षिता कामा नये.

– ७ –

आपल्या वेगवेगळ्या मागण्यांसाठी काँग्रेस ब्रिटिश सरकारवर–हिंदुस्थान सरकार त्याच्या पोटात आलेच –दबाव कितपत आणू शकली, या प्रश्नाकडे व काँग्रेसच्या चौथ्या कार्याकडे आता वळू. हिंदी नवशिक्षितांच्या मुख्य मागण्या १८५० ते १८८५ या काळातच निश्चित झालेल्या आपणास आढळतात. १) हिंदुस्थानचा राज्यकारभार लोकाभिमुख व जबाबदार होण्याच्या दृष्टीने केंद्रीय व प्रांतिक विधिमंडळांवर लोकनियुक्त प्रतिनिधींची संख्या वाढवावी. विधिमंडळात अंदाजपत्रक मांडले जावे व त्यावर चर्चा करण्याचा अधिकार असावा. वेगवेगळ्या सरकारी खात्यांच्या कारभारासंबंधी प्रश्न विचारण्याचा अधिकार असावा. २) नगरपालिका व लोकलबोर्डे यांच्या पातळीवर लोकनियुक्त प्रतिनिधींची बहुसंख्या असावी व त्यांचे कारभारावर नियंत्रण असावे. ३) हिंदुस्थान सरकारचा कारभार फार महागडा व उधळपट्टीचा आहे, त्याची चौकशी व्हावी, व त्यात काटकसर केली जावी. ४) लष्करी खर्चाचा बोजा हिंदुस्थानच्या जनतेवर अन्यायकारक प्रमाणात टाकण्यात आलेला आहे, येथील राज्यकर्त्यांच्या विस्तारवादी महत्त्वाकांक्षेने हाती घेतलेल्या मोहिमांमुळे त्यात वाढ होते, व उपयोगी विधायक रचनात्मक ( उदा. दळणवळणाची साधने, शिक्षण इ.) कामांसाठी पुरेसा पैसा उरत नाही. तरी मुळात विस्तारवादी धोरणे अंगिकारू नयेत, व ब्रिटिश साम्राज्याच्या रक्षणासाठी जर मोहिमा आवश्यक असतील तर त्यांचा सारा खर्च हिंदुस्थानवर टाकला जाऊ नये. लष्करी खात्यावरील खर्चात कपात करावी. ५) सनदी सेवेत भरती करण्यासाठीच्या परीक्षा इंग्लंड व हिंदुस्थान दोन्ही देशांत घेतल्या जाव्यात. परीक्षेस बसण्याची वयोमर्यादा २१ वरून १९ वर आणली गेली आहे, ती परत २१ केली जावी. ६) सरकारच्या सर्व खात्यांमध्ये लायक हिंदी माणसांची, कोणताही भेदभाव न करता वरिष्ठतम श्रेणीच्या जागांवर नेमणूक केली जावी. राणीच्या जाहीरनाम्यात दिलेले अभिवचन पाळले जावे. ७) प्रशासकीय अधिकार गाजविणाऱ्या अधिकाऱ्याला न्यायदानाचेही अधिकार आहेत, तरी या दोन्हीत फारकत केली जावी. ८) न्यायदान व्यवस्थेत सुधारणा केल्या जाव्यात, व या क्षेत्रात हिंदी व अँग्लो-इंडियन यांच्यात भेदभाव केला जातो तो दूर करावा. ९) जमीन महसुलाचे मान फार अधिक आहे, व त्यात दर २०/२० वर्षांनी भरमसाठ वाढ केली जात आहे. त्यामुळे रयत देशोधडीला लागत आहे. तरी बंगालमधील कायमधारा पद्धतीचे अनुकरण करून सर्व देशात जमीन महसुलाची कायम आकारणी एकदाच केली जावी. १०) हिंदी लोकांवर आधीच करांचा बोजा फार मोठा आहे. तो वाढवू नये, उलट कमीच करावा. सरकारी तिजोरीत पैसा कमी पडत असेल तर आयात मालावर जकात बसवून पैसा उभा करावा. व्यापारउदीम व आयकराच्या बाबतीतही भेदभाव केला जातो तो करू नये. ११) शस्त्र बाळगण्यासाठी हिंदी लोकांना परवाना काढावा लागतो, पण अँग्लो-इंडियन मंडळींना विनापरवाना शस्त्रे बाळगता येतात. एका सबंध प्रजेचे असे निःशस्त्रीकरण त्या प्रजेच्या ठायीची वीरवृत्ती नष्ट करणारे असून, ब्रिटिश राज्यावरील संकटप्रसंगी, या राज्याच्याच अडचणीची ती गोष्ट ठरेल. तरी हे बंधन दूर करावे. पण सरकारला हे बंधन आवश्यक वाटत असल्यास मग आजचा भेदभाव काढून टाकावा; अँग्लो-इंडियन मंडळींनाही परवाना घेण्याचे बंधन असावे. (१२) शिक्षणावर सरकार फार कमी खर्च करीत आहे. देशाच्या भौतिक सुधारणेसाठीही सरकारने अधिक रक्कम खर्च केली पाहिजे.

या प्रकारच्या मागण्या हिंदी पुढाऱ्यांनी कराव्यात याचा अर्थ ब्रिटिश राज्यच इथून घालवून देण्याची आकांक्षा ते बाळगीत आहेत, असा संशय घेतला जाऊ लागला. इंग्लंडचा इतिहास वाचून व इंग्रजी शिक्षण घेऊन आपण इंग्लिश धर्तीच्या स्वराज्यास लगेचच पात्र झालो आहोत असे समजण्याचे औद्धत्य व मूर्खता हिंदी सुशिक्षित प्रकट करीत आहेत अशी

टीका केली जाऊ लागली. दूरवरच्या भविष्यातही स्वराज्यास हिंदी लोक पात्र होणार नाहीत, कारण हिंदुस्थानच्या इतिहासात तशा परंपराच नाहीत; इंग्लंडला काही शतकांचा लोकप्रातिनिधिक राज्यकारभाराचा इतिहास आहे, असा युक्तिवाद केला जाऊ लागला.

राज्याची सूत्रे अनिश्चित काळपर्यंत ब्रिटिशांच्या हातीच राहिली पाहिजेत असेच हिंदुस्थानचा पक्ष घेणाऱ्या लिबरल व काँझर्व्हेटिव्ह या दोन्ही पक्षांतील मुत्सद्यांचे ठाम मत या काळात होते. दादाभाई, ह्यूम, रानडे, सुरेंद्रनाथ प्रभृतींचेही मत असेच होते की सत्तेची अंतिम सूत्रे तूर्त ब्रिटिशांनी आपल्या हाती ठेवणेच उचित आहे.

काँग्रेसच्या संस्थापकांचे म्हणणे असे राहिले की आम्ही ब्रिटिश राज्यकर्त्यांची जागा घेऊ इच्छित नाही. ब्रिटिश पार्लमेंटचेच व ब्रिटिश व्यक्तींचेच राज्य आम्हांसही हवे आहे. 'ब्रिटिश राज्या' ची वैशिष्टचपूर्ण तत्त्वे म्हणून जी सांगण्यात येतात त्या तत्त्वांना अनुसरून हिंदुस्थानचा कारभार चालविला जात आहे एवढे ब्रिटिश पार्लमेंटने बघावे एवढेच आमचे मागणे आहे, असे ते स्पष्ट करताना दिसतात. या साऱ्या कालखंडाचा सखोल अभ्यास असलेल्या बलराम नंदा यांनी या मुद्द्याची मांडणी 'द मॉडरेट इरा इन इंडियन पॉलिटिक्स' या पुस्तिकेत पुढील प्रमाणे केली आहे : (काँग्रेसच्या संस्थापकांचे म्हणणे की) 'They were only trying to bring the machinery of goverment into closer accord with Indian opinion. True, they had asked for larger legislative councils with an increase in the number of non-official members, but they had not called for elected majorities for the subordination of the executive to the legislature. They had called for the extension of franchise, but only to those who were capable of exercising it "wisely and independently." They had agitated for simultaneous cxaminations for entry to the I. C. S. in India and Britain, but they had not asked for any special favour for Indian candidates. They had pleaded for a "modification" of the British administrative system, but not for its replacement. They had demanded not revolutionary reforms, but the redress of specific grievances, such as reduction in military expenditure, the scaling down of land revenue, abolition of the salt duty, and separation of judicial and executive functions.'

[सरकारी यंत्रणेचा भारतीय मतप्रवाहाशी अधिक मेळ असावा एवढाच त्यांचा प्रयत्न होता. कायदेमंडळे अधिक मोठी असावीत आणि त्यांत बिनसरकारी सभासदांची संख्या अधिक असावी, ही त्यांची मागणी होती हे खरे आहे; पण सरकार कायदेमंडळाच्या हुकमतीखाली असावे ह्या उद्देशाने त्यांच्यात लोकांनी निवडलेले प्रतिनिधी बहुसंख्य असावेत अशी मागणी ते करीत नव्हते. मताधिकार अधिक व्यापक असावा असे त्यांचे आवाहन होते. पण त्याचा 'शहाणपणाने आणि स्वतंत्रपणे' वापर करण्याची ज्यांची कुवत होती त्यांच्यापुरताच हा विस्तार मर्यादित रहायचा होता. आय्. सी. एस्. मध्ये प्रवेश मिळण्यासाठी भारत आणि ब्रिटन येथे एके वेळीच परीक्षा घेतली जावी यासाठी ते चळवळ करीत होते, पण भारतीय उमेदवारांना विशेष अनुकूल वागणूक मिळावी असे ते मागत नव्हते. ब्रिटिश शासनव्यवस्थेत काही 'बदल' घडून यावेत अशी त्यांची विनवणी होती; ती रद्द करून तिच्याजागी दुसरी व्यवस्था यावी अशी नव्हती. क्रांतिकारक सुधारणांचा आग्रह ते धरीत नव्हते; लष्करी खर्च कमी करावा, साऱ्याची आकारणी कमी प्रमाणात व्हावी, मिठावरील कर रद्द करावा आणि कार्यकारी अधिकाऱ्यांची कार्ये व न्यायदानाची कार्ये ह्यांची फारकत व्हावी अशा विशिष्ट गाऱ्हाण्यांची दाद ते मागत होते]

पण ज्या सनदी प्रशासकांच्या हाती हिंदुस्थानचे राज्य होते त्यांची व काँझर्व्हेटिव्ह पक्षातील साम्राज्यवादी राजकारण्यांची १८८६ ते १९०६ या वीस वर्षांमध्ये अशुभ युती झालेली होती.

यात भर पडली ती ब्रिटिश भांडवलदारांच्या व ब्रिटिश सरकारच्या व्यापारी, औद्योगिक व आर्थिक हितसंबंधांची.

ब्रिटिश लोकमतावर व पार्लमेंटवर प्रभाव पाडणे वा दबाव उत्पन्न करणे यासाठी, जनसामान्यांची तर सोडाच, सुशिक्षित बुद्धिजीवींची आंदोलनात्मक चळवळ उभारता येण्यासारखी परिस्थिती नव्हती. थोडा धाक घालणारे परिपत्रक ब्रिटिश अधिकाऱ्यांनी काढायचा वा नजर वाकडी करून पाहण्याचा अवकाश, लोक काँग्रेसच्या अधिवेशनासही जाण्यास घाबरत.

अशाही परिस्थितीत कुशलतेने कार्यभाग साधून घेण्यासाठी लागणारी चिकाटी, दीर्घोद्योग व दूरदृष्टी हे गुण दादाभाई नवरोजी व त्यांचे काही हिंदी व ब्रिटिश सहकारी यांच्यापाशी होते ही भाग्याची गोष्ट. ब्रिटिश राष्ट्र व 'ब्रिटिश राज्या'ची संकल्पना यांच्यावर या मंडळींची श्रद्धा होती म्हणूनच केवळ आरंभीच्या वीस वर्षातली काँग्रेसची चळवळ त्यांनी चालविली.

वीस वर्षांच्या प्रयत्नांनंतर काँग्रेसच्या मागण्यांपैकी किती मागण्या पदरात पडल्या यांचा आढावा १९०४च्या काँग्रेसच्या अधिवेशनात फेरोझशहा मेथांनी घेतला. १८९२ सालचा कौन्सिल सुधारणांचा कायदा, हिंदुस्थान सरकारच्या जमाखर्चाची चौकशी करणाऱ्या रॉयल कमिशनची नेमणूक, सनदी सेवेत भरती करण्यासाठीच्या परीक्षांबाबत काँग्रेसचे म्हणणे मान्य करणाऱ्या ठरावास पार्लमेंटमध्ये मंजुरी, हिंदी लोकांना शासकीय खात्यांमध्ये नोकऱ्या देण्याबाबतचे धोरण ठरवून देण्यासाठी नेमलेले पब्लिक सर्विसेस कमिशन, कार्यकारी सत्ता व न्यायदान हे दोन व्यवहार एकाच्या हाती न ठेवता त्यांची फारकत केली जावी या मागणीची यथार्थता सर्वांनी मान्य केली ही घटना, पोलिस खात्याच्या कारभाराची आमूलाग्र पुनर्रचना व सुधारणा करण्यासाठी पोलिस कमिशनची नेमणूक अशा काही गोष्टींचा उल्लेख त्यांनी केला आहे. ब्रिटिश पार्लमेंटमध्ये एखादी गोष्ट ठरली, किंवा आयोगाने शिफारशी केल्या तरी व्यवहारात सुधारणांचे पाऊल पुढे पडू नये या दृष्टीने कोठे कशी खीळ घालावयाची ते सनदी प्रशासनयंत्रणा तत्परतेने पाही, हे फेरोझशहांनी खास त्यांच्या शैलीत स्पष्ट केले.

याच भाषणात फेरोझशहांनी एका सत्यावर अचूक बोट ठेवले आहे. काँग्रेसच्या अत्यंत शालीन, आर्जवी, संयमित व मुद्देसूद युक्तिवादांपुढे सनदी प्रशासन यंत्रणेला, ती सर्वशक्तिमान असूनही, बचावात्मक पवित्रा घ्यावा लागला. सर्वपल्ली गोपाल यांच्या पुढील विवेचनात त्याचे स्पष्टीकरण मिळते. 'ब्रिटिश पॉलिसी इन इंडिया १८५८–१९०५' या आपल्या ग्रंथात ते लिहितात, 'The Indian National Congress had emerged as a pressure group in British politics; and the Liberal and Irish members of the House of Commons took an interest in India and insisted on attention being given to Indian demands.'

[ भारतीय राष्ट्रसभेला ब्रिटिश राजकारणातील एक 'दबाव-गट' हे स्थान प्राप्त झाले होते. हाउस ऑफ् कॉमन्सचे उदारमतवादी आणि आयरिश सभासद भारतात रस घेत असत आणि भारतीय मागण्यांकडे लक्ष देण्यात यावे असा आग्रह धरीत असत. ]

सनदी प्रशासनयंत्रणेपाशी काँग्रेसच्या अभ्यासू व मुद्देसूद, नेमक्या टीकाटिप्पणीच्या उत्तरादाखल समर्थ युक्तिवाद नसल्याकारणाने त्यांचा आत्मविश्वास गमावल्यासारखे झाले. बचावात्मक पवित्रा पुष्कळदा बाह्यतः आक्रमक व अरेरावी रूप धारण करतो. पूर्वी सरकारी समित्यांचे अहवाल, पुढे आलेला पुरावा, सरकारी प्रस्ताव चर्चेसाठी प्रसिद्ध केले जात, व होणारी चर्चा लक्षात घेऊन हिंदुस्थान सरकार ब्रिटिश सरकारला खलिता पाठवी. आता सरकार सर्व कामकाज गुप्तपणे चालविण्याकडे झुकली. या बदललेल्या भूमिकेचा अन्वयार्थ लावताना फेरोझशहा म्हणाले, 'It seems to benighted non-officials like us that this course is an exaggeration of the demoralised attitude of a secret and irresponsible bureaucracy Sir Charles Dilke once called it' [ आमच्यासारख्या

अनुक्रमणिका

शासनाबाहेर असलेल्या मूढ मंडळींना असे वाटते की सर चार्ल्स डिल्के यांनी जिचा गुप्त आणि बेजबाबदार नोकरशाही असा उल्लेख केला होता तिच्या भयाकुल मनोवृत्तीचा अतिरेकी आविष्कार ह्या मार्गाचा अवलंब करण्यात दिसून येतो. ] कर्झन यांच्या कारकीर्दीतील ऑफिशियल सिक्रेट्स ॲक्टला उद्देशून ते पुढे म्हणाले, ‘The Act puts a premium on corruption, on the one hand, and, on the other, it surely and inevitably deteriorates and demoralises irresponsible officials working in the dark.’ [ एका बाजूने हा कायदा भ्रष्टाचाराला उचलून धरतो आणि दुसऱ्या बाजूने अंधारात कामे करणाऱ्या बेजबाबदार अधिकाऱ्यांची अवनती घडवून आणतो, त्यांचे नीतिधैर्य खच्ची करतो. ] सनदी प्रशासन यंत्रणेला बचावाचा पवित्रा घेणे भाग पडले ही काँग्रेसच्या कार्याची सर्वांत मोठी जमेची बाजू होय.

काँग्रेसच्या व्यासपीठावरून केल्या जाणाऱ्या युक्तिवादांना आपल्यापाशी उत्तरे नाहीत आणि काँग्रेसची चळवळ तर दिवसेंदिवस दृढ होत चालली आहे, असे लक्षात आल्यावर काँग्रेसला खच्ची करण्यासाठी वेडेवाकडे उपाय करण्यास सनदी प्रशासनयंत्रणा प्रवृत्त झाली. त्यातून लोकजागृती व लोकक्षोभ दोन्हींची वृद्धी होत जाणे अपरिहार्य होते. उदाहरणार्थ, बंगाल इलाख्याची फाळणी प्रशासकीय सोय म्हणून करणे इष्ट होते. राजकीय हेतू न घुसडता इलाख्याचे विभाजन करणे शक्य आहे ही गोष्ट बंगाल प्रांताचे चीफ सेक्रेटरी राहिलेल्या सर हेन्री कॉटन यांनी १९०४ सालच्या काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून भाषण करताना सांगितली. बिहारचा प्रदेश वेगळा करून बिहार हा एक वेगळा प्रांत करता येईल वा बंगालच्या लेफ्टनंट-गव्हर्नरच्या मदतीला कार्यकारी मंडळ देता येईल असे दोन पर्याय त्यांनी सुचविले. पण अर्थातच त्यांची सूचना विचारात घेतली जाण्याची काही शक्यता नव्हती. बंगालच्या फाळणीच्या प्रस्तावाबद्दल त्यांनी म्हटले की, ‘we shall recognise that this is a matter of more than local interest when we recall that the sinister aspect of the proposal is to shatter, if it be possible to do so, the unity and to undermine the feelings of solidarity which are so happily established among the members of a compact and national branch of the Empire.’

[ साम्राज्याच्या सलग आणि राष्ट्र म्हणून एकात्म असलेल्या एका शाखेच्या सदस्यांमध्ये एकात्मतेची आणि एकोप्याची जी स्वागतार्ह भावना प्रस्थापित झाली आहे तिचा चक्काचूर करण्याचा, (हे अर्थात शक्य असेल तर) प्रयत्न असे ह्या प्रस्तावाचे दुष्ट रूप आहे ही गोष्ट मनात आणली की, ही बाब केवळ स्थानिक महत्त्वाची उरत नाही, त्याच्या पलीकडे जाते हे आपल्या ध्यानी येईल. ]

बंगालच्या फाळणीचा परिणाम अगदी विपरीत झाला. राष्ट्रीय चळवळ खच्ची होण्याऐवजी लोकआंदोलनाचा व्यापक पाया तिला पहिल्याप्रथम लाभला. काँग्रेसची चळवळ बौद्धिक युक्तिवादांच्या मर्यादेत कोंडून पडते आहे, तिला पुढे कसे न्यावे अशा चिंतेत काँग्रेसचे पुढारी असतानाच, सनदी प्रशासकांच्या अविवेकामुळे कोंडी फुटली.

– ८ –

१८८५ ते १९०५ या कालखंडातील घडामोडींचा परामर्श घेणे आवश्यक आहे. कायदेकौन्सिलांची सुधारणा, प्रशासनात हिंदी लोकांना जास्त प्रमाणात व वरिष्ठ श्रेणीच्या जागा मिळाव्यात, तसेच सनदी सेवेसाठीची परीक्षा इंग्लंडात व हिंदुस्थानात घेतली जावी व परीक्षेची वयोमर्यादा परत पूर्वीइतकी वाढविली जावी या मागण्यांना काँग्रेसचे पुढारी विशेष महत्त्व देत होते. रयतेची वाढती विपन्नावस्था, करांचा वाढता बोजा, महागडी साम्राज्यवादी साहसे इत्यादी गोष्टी दुरुस्त करण्यासाठीही कायदेकौन्सिलांमध्ये व प्रशासनात हिंदी माणसे असणे प्रथम आवश्यक आहे असा युक्तिवाद होता.

या दृष्टीने कायदेकौन्सिलांच्या मध्ये लोकनियुक्त प्रतिनिधी पाठविता येणे, तेथे सरकारला प्रश्न विचारता येणे, अंदाजपत्रकावर चर्चा करता येणे,

अनुक्रमणिका

या गोष्टींस सर्वाधिक महत्त्व दिले गेले. हो–नाही करताकरता, अखेरीस १८९२ मध्ये हा कायदा झाला. निवडणुकीचे तत्त्व स्वीकारण्यास पार्लमेंटने अधिकृतपणे संमती दिली नाही, पण व्हाइसरॉय लॅन्सडाऊन यांनी आपल्या अधिकारात व्यवहारात ते तत्त्व संकेत म्हणून प्रविष्ट केले. याने काँग्रेसच्या पुढाऱ्यांचे, पूर्ण नाही तरी, बरेचसे समाधान झाले असे म्हणता येते. अंदाजपत्रकाची चर्चा करणे, प्रश्न विचारणे या गोष्टीही शक्य झाल्याने समाधान वाटले.

पण काँग्रेसच्या इतर मागण्या हिंदुस्थान सरकार मंजूर करण्याचे कोणतेच लक्षण दिसेना. तेव्हा ह्यूम यांनी काँग्रेसजनांना उद्देशून काढलेल्या परिपत्रकात, काँग्रेसजनांचा आळस झटकून त्यांना सक्रिय बनविण्यासाठी, निष्क्रिय राहिल्यास दारिद्र्याने गांजलेली प्रजा उठाव करण्याचा परिणाम भोगावा लागण्याचा धाक घातला. टिळकांनी या विषयासंबंधी केसरीत लेख लिहिला. त्यांत या परिपत्रकातील जो उतारा दिला आहे त्यातील पुढील वाक्ये लक्षात घेण्यासारखी आहेत. फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वीची स्थिती देशात आहे असे सुचवून ह्यूम लिहितात की, जेव्हा लोक उठाव करतील तेव्हा 'लोकांपुढे सरकार व तुम्ही या दोघांचाही टिकाव लागणार नाही. इंग्रज सरकारचे राज्य आहे तोपर्यंत तुमची वढती व मान्यता आहे... करिता वेळीच जागे व्हा व सरकार झोप घेत असले तर त्यासही जागे करा.' असे दिसते की १८५७ च्या उठावाचे भूत ह्यूम यांच्या मनावरही वेळीअवेळी चटकन स्वार होई. सनदी सेवेतील व त्याबाहेरील अँग्लो–इंडियन मंडळींच्याही मानगुटीला हे भूत बसलेलेच होते. ह्यूम यांच्या परिपत्रकाने काँग्रेसची मंडळी किती सक्रिय झाली त्याची शंकाच आहे, पण ह्यूम हे काँग्रेसचे एक मुख्य प्रवर्तक असल्यामुळे काँग्रेस चळवळीविषयी अँग्लो–इंडियन जमातीचा संशय व भीती अधिक पक्की झाली.

जून १८९३ मध्ये हाऊस ऑफ कॉमन्सने एक प्रस्ताव पास करून सनदी सेवा परीक्षा इंग्लंड व हिंदुस्थान दोन्हीकडे घ्यावी अशी शिफारस केली. या शिफारसीवर कृती करण्यास हिंदुस्थान सरकारने ठाम नकार दिला. इंग्लंडमध्ये लिबरल पक्ष सत्तेवर असूनही या मुद्द्यावर ब्रिटिश सरकारने आग्रह धरला नाही. काँग्रेसची एक मुख्य मागणीच अशी डावलली गेल्याने असंतोष किती निर्माण झाला याची काही कल्पना टिळकांनी केसरीत लिहिलेल्या दोन लेखांवरून येते.

हिंदुस्थान सरकारच्या जमाखर्चाची तपासणी करून सुधारणा सुचविण्यासाठी १८९५ साली वेल्बी यांच्या अध्यक्षतेखाली आयोगाची नेमणूक झाली. दादाभाई हे या आयोगाचे एक सभासद होते. हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची सर्वांगीण चौकशी केली जावी अशी काँग्रेसची मागणी होती. मंजूर झालेली गोष्ट तुलनेने फारच मामुली होती. पण या संधीचाही पूर्ण फायदा काँग्रेसने उठविला. न्यायमूर्ती रानडे व ग. व्यं. जोशी यांच्या मार्गदर्शनाखाली कसून तयारी करून गोपाळ कृष्ण गोखले यांनी जी साक्ष दिली तीमुळे साऱ्या हिंदी राष्ट्रवादी मंडळींच्या नजरेत ते भरले. गैर गोष्टींवर व एकंदरीतच केला जाणारा अव्वाच्यासव्वा खर्च ही गोष्ट आमच्या रयतेच्या दैन्यदारिद्र्याच्या मुळाशी आहे असे सांगून आयोगाचे अध्यक्ष वेल्बी यांच्याजवळ आपल्या मनातील आशा व्यक्त करताना दादाभाईंनी लिहिले की, 'If England redeems her honour and honesty in this most vital matter, everything will fall into its natural condition– finances, and loyal satisfaction of the people upon which British rule rests.' [ ह्या अत्यंत जिव्हाळ्याच्या बाबतीत आपली नेकी आणि प्रामाणिकपणा इंग्लंडने परत प्रस्थापित केला तर सर्व गोष्टी आपले स्वाभाविक स्वरूप धारण करतील– राज्याचा आयव्यय आणि जनतेचे समाधान आणि निष्ठा, ज्याच्यावर ब्रिटिश राज्य अवलंबून आहे. ] पण आयोगाने हिंदी सुशिक्षितांची निराशाच केली. दादाभाई, वेडरबर्न व केन यांना भिन्नमतपत्रिका जोडण्यावरच समाधान मानावे लागले.

१८९७ साली संमतिवयाच्या विधेयकावरूनचा मोठा गदारोळ झाला. सनातनी व सुधारक असे दोन तट हमरीतुमरीवर आल्याचे दृश्य या प्रसंगी दिसले. अखेरीस संमतिवयाची मर्यादा १० पासून

अनुक्रमणिका

१२ वर्षांपर्यंत वाढविणारा कायदा पास झाला. तेव्हा परकीय सरकार धर्मात पुन्हा एकवार ढवळाढवळ करण्यास निघाले आहे अशी धास्ती निर्माण होऊन देशात असलेल्या असंतोषात भर पडण्यास मदतच झाली.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस उत्तर भारतात हिंदु-मुसलमानांमध्ये तेढ वाढीस लागली. १८९३ साली मुंबईस मोठा दंगा झाला, व नंतरच्या काही वर्षांमध्ये महाराष्ट्रात इतरही दंगे झालें हे आपणास परिचित आहे. ही तेढ इंग्रज अधिकाऱ्यांनी उत्पन्न केली नाही. इंग्रजी राज्याचा एक परिणाम असा झाला की, हिंदुस्थानातील विविध धार्मिक जमाती व हिंदू समाजातील जाती या स्वतःच्या सामाजिक-धार्मिक अस्मितांबद्दल, 'हक्कां'बद्दल आग्रही बनल्या. काँग्रेस चळवळीला प्रतिशह म्हणून मुस्लिम समाजाला मुसलमानपणाच्या आधारे राजकीयदृष्ट्या संघटित करण्याचे प्रयत्न उत्तर भारतात या काळात होत होते त्यांचाही परिणाम वैमनस्याचे वातावरण वाढण्यात झाला. इंग्रज अधिकाऱ्यांनी दोन जमातींमधील तेढीचा अदूरदृष्टीने राजकारणी उपयोग मात्र करून घेतला.

१८९६–९७ साली देशात मोठा दुष्काळ पडला. पाठोपाठ १८९७ साली मुंबई व पुणे या शहरांत प्लेगने हाहाःकार माजवला. पुण्यात महाराणी व्हिक्टोरियाच्या हीरकमहोत्सवाच्या समारंभाच्या रात्री रँड व आयर्स्ट यांच्यावर गोळ्या झाडण्याची घटना झाली. ही घटना या समारंभाच्या रात्री, व तीही पुण्यात, घडल्याने मुंबई सरकारला इंग्रजी राज्यच धोक्यात आले आहे असे वाटले. सरदार नातू बंधूंना जुन्यापुराण्या रेग्युलेशनखाली विनाचौकशी खटला न भरता तुरुंगात डांबले गेले. टिळकांनाही शिक्षा झाली.

एकंदरीने पाहता वेगवेगळ्या घटनाक्रमांमुळे देशात क्षोभ उत्पन्न होत होता व प्रशासनयंत्रणेलाही उठाव होतो की काय याची धास्ती वाटत होती. हिंदू व मुस्लिम समाज एकत्र आले तर आपली धडगत नाही असे वाटून भारतमंत्र्यांनी व्हाइसरॉय एल्गिन यांना लिहिले, 'The solidarity, which is growing, of native opinion and races and religion in antagonism to our rule frightens me as regards the future. Education and the press will enhance that bad feeling and we ought to leave no stone unturned to counteract this dangerous tendency.'

[आमच्या सत्तेविरुद्ध नेटिवांच्या मतांमध्ये, आणि भिन्न वांशिक व धार्मिक समुदायांमध्ये जी एकी वाढत चालली आहे तिच्यामुळे मला भविष्याविषयी भय वाटते. शिक्षण आणि वर्तमानपत्रे यांच्यामुळे ही दुस्वासाची भावना बळकट होत जाईल, आणि ह्या भयप्रद प्रवृत्तीविरुद्ध कोणताही उपाय योजण्याचे आपण बाकी ठेवता कामा नये.] (ब्रिटिश पॉलिसी इन इंडिया १८५८–१९०५.)

ज्यूरी मागण्याचा हक्क असल्याने मोठे गुन्हेगार सहीसलामत सुटतात; कारण, ज्यूरीने निर्दोषी म्हणून निवाडा दिल्यानंतर, हायकोर्टातही न्यायाधीश सहसा निकाल फिरवीत नाही, अशी काही इंग्रज प्रशासकांची पक्की धारणा झालेली होती. तर ज्यूरी मागण्याचा हक्क हा हिंदी लोकांना मोठ्या कष्टाने मिळालेल्या हक्कांपैकी एक आहे अशी तत्कालीन नवशिक्षितांची धारणा होती. १८९३ साली खून व तत्सम गुन्ह्यांच्या खटल्यांमध्ये ज्यूरी मागण्याची तरतूद काढून घेण्याचा आदेश बंगाल प्रांतापुरता हिंदुस्थान सरकारने काढला. वस्तुतः सरकारला चांगले माहीत होते की, हा राजकीयदृष्ट्या नाजूक प्रश्न आहे. ज्यूरीची पद्धत अधिक सार्वत्रिक करावी ही काँग्रेसची एक मागणी होती. अँग्लो–इंडियनांना ज्यूरी मागण्याचा हक्क इल्बर्ट बिलाच्या वेळी दिला गेला होता, त्यामुळे मामला अधिकच स्फोटक बनलेला होता. सरकारच्या आदेशामुळे चळवळ उत्पन्न झाली. हिंदुस्थानातील निरनिराळी प्रांतिक सरकारे आणि ब्रिटिश मंत्रिमंडळ व पार्लमेंट यांनाही हिंदुस्थान सरकारचा आदेश चुकीचा वा अनावश्यक वाटत असल्याने अखेरीस हा आदेश मागे घेण्यात आला. हिंदी लोकांचा विजय झाला.

भावनात्मक गुंतवणूक असलेल्या या प्रश्नावर प्रतिक्रिया किती तीव्र होत्या हे यासंबंधीचे टिळकांचे केसरीतील लेख पाहिल्यास लक्षात येते. सरकारच्या खलित्यावर आपले अनुकूल मत न्यायमूर्ती तेलंग यांनी दिल्यावर टिळकांनी त्यांची संभावना करून

खरडपट्टी काढलेल्या लेखास 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' असा मथळा दिला. ज्यूरीपुढे खटला चालावा हा हक्क यावेळपावेतो राजकीय हक्क बनलेला होता, व याच दृष्टीने त्याकडे पाहिले पाहिजे असे टिळकांचे प्रतिपादन आहे. त्या वर्षीच्या काँग्रेसच्या अधिवेशनात उमेशचंद्र बॅनर्जींनी याच मुद्द्यावर अत्यंत समतोल विवेचन केले आहे. फौजदारी खटल्यातील कामकाजाची पद्धती कशी सदोष व सर्वस्वी असमाधानकारक आहे हे दाखवून, ज्यूरी पद्धतीची इष्टता व उपयुक्तता त्यांनी सिद्ध केली. काँग्रेसचे संस्थापक-पुढारी आपला संयत युक्तिवाद किती कुशलतेने व समर्थपणे करीत त्याचे ते एक चांगले उदाहरण आहे.

साम्राज्यवादी धोरणे व त्यासाठीच्या लष्करी मोहिमा यांमुळे हिंदुस्थान सरकारच्या तिजोरीवर सतत ताण असे. १८९३ साली व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळातील फायनान्स मेंबरांनी आयात कर बसवून पैसा उभा करावा अशी सूचना केली. इंग्लंडहून येथे येणाऱ्या मालावर कर बसविल्यास ब्रिटिश कारखानदारांना पक्षपाती आवडतीची वागणूक दिली जाते या आक्षेपाचे निरसन होऊन हिंदी लोकांचा पाठिंबा मिळेल असे व्हाइसरॉयनी सुचवले. तर, ब्रिटिश पार्लमेंटमध्ये ही गोष्ट कदापिही मंजूर होणार नाही असे भारतमंत्र्यांनी बजावले. खुल्या व्यापाराचे तत्त्व हे आर्थिक धोरणांचे पायाभूत तत्त्व राहणार हे त्यांनी स्पष्ट केले. पण तुटीचा आकडा १८९४ साली साडेतीन कोट रुपयांवर गेल्यावर पैसा उभा करण्याचा मुद्दा टाळता येण्याजोगा राहिला नाही. अखेरीस हो-नाही करताकरता सुती कापड सोडून इतर आयात मालावर ५ टक्के आयात-कर बसविण्यात आला. ब्रिटिश हितसंबंधांची पुष्टी करणारे हे धोरण आहे अशी साहजिकच ओरड झाली. इंग्लंडहून येणाऱ्या सुती कापडावर आयात-कर बसवायचाच असेल तर हिंदुस्थानात तयार होणाऱ्या, व ब्रिटिश कापडाशी स्पर्धा करणाऱ्या, कापडावर व अधिक नंबराच्या सुतावरही अबकारी कर बसवावा असे भारतमंत्र्यांनी सुचवले. कापड गिरण्यांच्या एकमेव नव्या आधुनिक उद्योगास प्रोत्साहन व संरक्षण द्यावे अशी भूमिका व्हाइसरॉयनी घेतली, पण तिला भारतमंत्र्यांकडून मंजुरी मिळाली नाही. इंग्लंडहून आयात होणाऱ्या जाडाभरड्या कापडावर आयात-कर व त्याचवेळी हिंदुस्थानात २० नंबरावरील सुतावर अबकारी कर बसविला गेला. पण ब्रिटिश कारखानदारी हितसंबंधाचे एवढ्याने समाधान झाले नाही. पुरते पक्षपाती धोरण अंगिकारण्यास ब्रिटिश मंत्रिमंडळाने हिंदुस्थान सरकारला भाग पाडले. याविरुद्ध हिंदुस्थानात आरडाओरड मोठी झाली. 'ब्रिटिश राज्या'ची तत्त्वे पाळायला ब्रिटिश सरकार व हिंदुस्थानातील त्याचे प्रतिनिधी (एजंट) तयार नाहीत, स्वार्थासाठी ढळढळीत अन्याय करायलाही ते मागेपुढे पहात नाहीत हा बोध पक्का ठसला. ब्रिटिशांच्या न्यायबुद्धीवरील विश्वास उडण्यात याचा परिणाम झाला.

– ९ –

१८९८ साली लॉर्ड कर्झन व्हाइसरॉय म्हणून येथे आले तेव्हा, अशा रीतीने, वेगवेगळ्या कारणांनी रयत व सुशिक्षित दोन्ही वर्ग असंतुष्ट व अशांत होते. कर्झन यांच्या कारकीर्दीमुळे अखेरीस यात भरच पडली. इतकी भर पडली की भडका उडाला.

पण हे असे व्हायलाच पाहिजे होते असे नाही. सनदी प्रशासनयंत्रणा आणि ब्रिटिश भांडवलदार हितसंबंध या दोन्हीही प्रबळ शक्तींना न धूप घालता स्वतंत्र बुद्धीने धोरण आखण्याची व ते अमलात आणण्याची हिंमत व कुवत कर्झन यांच्या ठायी होती. सुदैवाने त्यांना ब्रिटिश मंत्रिमंडळाचा पूर्ण पाठिंबा होता. त्यांच्या ठायी हिंदुस्थान व हिंदी जनता यांच्या उद्धाराविषयीची एक कळकळही होती.

मायकेल एडवर्ड्स यांनी कर्झन यांच्या मनोभूमिकेचे, प्रेरणांचे, व्यक्तित्त्वाचे चित्रण मोठ्या मार्मिकतेने केलेले आहे. त्यांच्या 'ब्रिटिश इंडिया' या ग्रंथातील पुढील उतारे बोलके आहेत:

'(Curzon) sought to restore to British rule in India the creative energy of the first era of reform; he tried, too, to purge it of that contempt for even the best of Indian civilisation and culture which had corroded and helped to destroy the reformist purpose. ...Curzon believed that the destiny

अनुक्रमणिका

of the Indian people had been entrusted by Providence to the British. ... (This view) raised the British empire from a mere conquest and a continuing tyranny to the status of a dynamic crusade, pledged to the greatest happiness of the greatest number. Its motivating force was duty, and its purpose to construct the promised land.'

[ सुधारणेच्या पहिल्या युगात जे सर्जनशील चैतन्य आढळून येत असे ते ब्रिटिश सत्तेला परत प्राप्त करून देण्याचा कर्झनचा प्रयत्न होता. आणि भारतीय सभ्यता आणि संस्कृती ह्यांतील सर्वोत्कृष्ट गोष्टींविषयीसुद्धा त्या युगात जी तुच्छता आढळून येत होती आणि जिच्यामुळे हा सुधारणावादी उद्देश दुबळा होऊन नष्ट व्हायला मदत झाली होती ती वर्ज्य करून हे चैतन्य त्याला शुद्ध राखायचे होते... ईश्वराने भारतीय जनतेचे भवितव्य ब्रिटिशांच्या हाती सोपविले आहे असा कर्झनचा विश्वास होता... ( ह्या विचारसरणीमुळे ) ब्रिटिश साम्राज्याला, अंकित करून घेतलेला प्रदेश आणि त्याच्यावर चालू ठेवलेला निरंकुश अंमल ह्यांच्या पलीकडचे रूप प्राप्त झाले होते; अधिकात अधिक संख्येचे अधिकात अधिक सुख साधायला वाहून घेतलेले चैतन्यशील धर्मयुद्ध हे त्याचे स्वरूप बनले होते. कर्तव्यभावना ही त्याच्यामागची प्रेरक शक्ती होती; ईश्वराने ज्या स्वर्गभूमीचे अभिवचन दिले होते तिच्यात प्रवेश करणे हे त्याचे साध्य होते. ]

हिंदुस्थानचा व्हाइसरॉय बनून ब्रिटिश राष्ट्रावर नियतीने सोपविलेली ही थोर कामगिरी पार पाडणे हे आपले जीवितकार्य आहे अशी कर्झन यांची धारणा होती. हे काम पार पाडण्यासाठी आपल्याशिवाय अन्य कोणी लायक व्यक्ती नाही अशी निःशंक खात्री वाटण्याइतके त्यांचे स्वतःविषयी चांगले मत होते.

सनदी प्रशासनयंत्रणेबरोबरील लढाईत हिंदी सुशिक्षितांची व कर्झन यांची युती होऊ शकली असती. सनदी सेवकांनी चालविलेल्या राज्यकारभाराविषयी कर्झन यांना केवळ तुच्छभाव वाटत होता असे म्हटले तर ते गैर होणार नाही. सर्व खात्यांच्या कारभारांची आमूलाग्र पुनर्रचना करून त्यांची कार्यक्षमता शिगेला नेऊन पोचवायचा, लोकांच्या भल्यासाठी ती चोखपणे राबेल हे जातीने पाहण्याचा त्यांचा निर्धार होता. राज्य ब्रिटिशांनीच केले पाहिजे ही त्यांची पक्की धारणा होती, पण अशा कित्येक बाबी होत्या की ज्यांच्या संदर्भात ते अँग्लो-इंडियन व हिंदी यांच्यात भेदभाव करण्याच्या विरोधी होते. ब्रिटिश व्यापारी व भांडवलदारी हितसंबंधांसाठी हिंदुस्थानविरुद्ध पक्षपाती धोरणे अंगिकारण्यास त्यांचा विरोध होता. अँग्लो–इंडियन माणसांनी हिंदी माणसांविरुद्ध कोणताही गुन्हा करावा, आणि शिक्षा होणार नाही याबद्दल निर्धास्त असावे याने त्यांचा संताप झालेला आढळतो.

दिवस–न्–दिवस, आणि रात्रीही, ऊर फुटेस्तोवर सतत सात वर्षे कर्झन यांनी स्वतः कष्ट घेतले आणि सनदी सेवकांनाही घ्यायला लावले.

मात्र त्यांच्या व्यूहरचनेत इंग्रजी शिक्षण घेऊन राजकीयदृष्टचा जागृत बनलेल्या वर्गास कोठे स्थान नव्हते. हिंदी रयतेच्या उद्धारार्थ राज्य चालवायचे असेल तर या वर्गास प्राप्त होत चाललेले फाजील महत्त्व पूर्णतः कमी करून टाकायला हवे असा त्यांचा निर्णय होता; राजकीय हक्कांसाठी चळवळ करणारी मंडळी फर्डे इंग्रजी वक्तृत्व गाजवीत असली तरी ती पक्की स्वार्थी, नालायक व विघ्नसंतोषी मंडळी आहेत, असे त्यांचे मत त्यांनी हिंदुस्थानात येण्यापूर्वीच बनविलेले होते. मायकेल एडवर्डस म्हणतात की, ही मनोभूमिका असल्याने कर्झन यांच्या मताने, 'Indian intellectuals Indian nationalists who claimed the right to lead the masses, had to be brushed aside as grit in the great machine.'

[ एखाद्या प्रचंड यंत्रात शिरलेले वाळूचे कण झटकून टाकावे त्याप्रमाणे भारतीय बुद्धिजीवी वर्गाला, भारतीय जनतेचे नेतृत्व करण्याचा दावा करणाऱ्या राष्ट्रवाद्यांना झटकून टाकणे आवश्यक होते. ]

लोकनियुक्त प्रतिनिधींचे अधिकार व त्यांचा सहभाग जेथे जेथे कमी करता येईल तेथे तेथे तो कमी करावयाचा हे कर्झन यांचे धोरण राहिले. काँग्रेसची



अनुक्रमणिका

चळवळ खच्ची करण्याचा त्यांनी सरळसरळ प्रयत्न केला नाही; तिची पूर्ण उपेक्षा करण्याची भूमिका घेतली. कलकत्ता कॉर्पोरेशनच्या कारभारात लोकप्रतिनिधींना असलेला अधिकार कमी करून, सनदी अधिकाऱ्याच्या हाती सूत्रे देणारा कायदा हे या दिशेने टाकलेले पहिले पाऊल होते. या कायद्याच्या निषेधार्थ २८ लोकनियुक्त प्रतिनिधींनी राजीनामे दिले. यासंबंधी केसरीतील लेखात टिळक लिहितात, 'सरकारचे मनगट धरून कोणतीही गोष्ट सरकारास करावयास लावण्याचे सामर्थ्य आमच्या अंगी नाही; आणि युक्तिवादाने किंवा मुद्देसूद रीतीने सरकारास योग्य विनंती केली, तरीही सरकार ऐकत नाही अशी मोठी बिकट स्थिती हल्लीच्या काळात झाली आहे, व त्यातून कसे पार पडावे याचे आमच्या पुढारी मंडळीस मोठेच गूढ पडलेले आहे. आजपर्यंत लोकांची अशी समजूत होती की, कोणचीही गोष्ट सप्रमाण किंवा मुद्देसूद रीतीने सरकारपुढे मांडली असता सरकारकडून तिचा योग्य विचार होऊन लोकांची दाद लागेल; पण हा भ्रम आता बहुतेक दूर झाल्यासारखा आहे.' राजीनामे देऊन निषेध नोंदविण्याचे व अन्याय्य गोष्टीत साथ देण्यात असहकार पुकारण्याचे समर्थन टिळकांनी केले आहे.

१८९९ साली मोठा दुष्काळ पडला. दुष्काळ पडला असता कोणती उपाययोजना करावी यासंबंधी फॅमिनकोड सरकारने बनविले होते. यात सुधारणा करण्यासाठी कर्झन यांनी आयोग नेमला. या आयोगाच्या कामकाजाच्या संदर्भात अमरावतीचे पुढारी मुधोळकर यांनी १९०० च्या काँग्रेसच्या अधिवेशनात कर्झन यांना उद्देशून प्रश्न केला, की 'will Lord Curzon... consider sufficient a mere departmental enquiry addressed to the local Governments in which there will be, so far as we can see, no opportunity for non-official opinion to make itself heard'. [खात्यामार्फत स्थानिक सरकारांकडे केलेली, जिच्यात सरकाराबाहेर असलेल्या लोकांची मते ऐकून घेण्याची संधी असणार नाही– आणि ही संधी दिली जाणार नाही असेच दिसते आहे– अशी चौकशी पुरेशी ठरेल असे लॉर्ड कर्झन यांना वाटते का ? ]

टिळक म्हणत होते त्यापेक्षाही हे एक पाऊल मागे जाणे होते. लोकांचे पुढारीपण करणाऱ्यांचे मन जाणून घेण्याची कर्झन यांच्या दृष्टीने काही जरुरी नव्हती. रयतेची स्थिती काय आहे, प्रश्न कोणते आहेत, प्रशासकीय धोरणे व कारभार यांत दोष काय आहेत याची खरीखुरी माहिती इंग्रज अधिकाऱ्यांना असते व त्यांनाच फक्त असते अशी कर्झन यांची ठाम भूमिका राहिली.

शिक्षणव्यवस्थेची पुनर्रचना करण्याचे काम कर्झन यांनी जेव्हा हाती घेतले तेव्हा एका अत्यंत स्फोटक व नाजूक मुद्द्याला आपण हात घालत आहोत याची त्यांना कल्पना होती. तटस्थपणे विचार केला तर त्यांनी उपस्थित केलेले अनेक मुद्दे योग्य होते असा आज आपण निष्कर्ष काढू. उच्च शिक्षणावर अतिरेकी प्रमाणात होणारा खर्च कमी करून जनसामान्यांच्या प्राथमिक शिक्षणावरील खर्च वाढवावा, विद्यापीठे या केवळ परीक्षा घेणाऱ्या यंत्रणा न राहता तेथे शिकविण्याचे, अभ्याससंशोधनाचे काम चालावे, त्यांच्या रचनेत आटोपशीरपणा यावा, तहहयात मिरास बनल्यासारखा अधिकार सेनेटच्या सभासदांना मिळू नये, संलग्न कॉलेजांचा काही किमान दर्जा राहावा या दृष्टीने त्यांची तपासणी व्हावी व दर्जा नसेल तेथे मान्यता काढून घेण्याची तरतूद असावी, इत्यादी मुद्दे अयोग्य नव्हते. शैक्षणिक पुनर्रचना करण्यासाठी त्यांनी अपार परिश्रम घेतले.

सारे खरे. पण त्यांच्या भूमिकेला साजेशी जी दुसरी गोष्ट त्यांनी केली ती घातक होती. त्यांनी हिंदी पुढाऱ्यांपैकी कोणास या सर्व उपक्रमात सहभागी करून घेतले नाही. काय करायचे आहे ते आपणास ठाऊक आहे, आणि उचापतखोर, स्वार्थी शिक्षित मंडळींना चार हात लांबच ठेवणे बरे अशी भूमिका त्यांनी घेतली. लोकमताचा हा जाणूनबुजून केलेला पाणउतारा होता.

१९०२ सालच्या काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून भाषण करताना सुरेंद्रनाथ बॅनर्जींनी शिक्षण आयोगाच्या अहवालाची सविस्तर चिकित्सा केली आहे. इंग्रजी उच्च शिक्षण, वृत्तपत्र स्वातंत्र्य आणि स्थानिक स्वराज्य या इंग्रजी राज्याकडून मिळालेल्या तीन सर्वांत मोठ्या देणग्या आहेत असे सांगून, त्यातही

शिक्षणाची महती सर्वांत अधिक का त्याचा खुलासा केला आहे. शिकलेला वर्गच राष्ट्राची बांधणी करीत आहे आणि या वर्गाच्या भरवशावरच उद्या देशाला स्वराज्य मिळणार आहे, असे ते म्हणतात.

सिमल्यास भरविलेली शैक्षणिक परिषद गुप्ततेच्या वातावरणात का भरविली हा मुद्दा उपस्थित करून ते म्हणतात, ' Here, if anywhere, popular sympathy and co-operation is necessary. No useful purpose is served by investing educational problems with quasi-political character and raising them to thc dignity of state secrets.' [ जर कुठे लोकांची सहानुभूती आणि सहकार्य आवश्यक असेल तर ते ह्या बाबतीत होय. शैक्षणिक प्रश्नांना अर्धवट राजकीय स्वरूप देण्याने आणि राज्यकारभारातील गुपितांचे स्थान त्यांना देण्याने काही साधत नाही. ] या पद्धतीने काम केल्यामुळे लोकांच्या मनात काय येते त्याचा निर्देश करताना सुरेंद्रनाथ म्हणतात, 'I do not regard the Report ( of the Commission ) as a political manifesto in an academic guise; but I am bound to say that if any such feeling is entertained in any quarter, the hesitating policy of half-trust and half-mistrust is mainly responsible for it.'

[ (कमिशनचा) हा अहवाल म्हणजे विद्यापीठीय वेष धारण केलेला राजकीय जाहीरनामा आहे असे मी मानीत नाही. पण जर त्याच्याविषयी कोणाची अशी भावना झाली तर अर्धवट विश्वास आणि अर्धवट अविश्वास व्यक्त करणारे धरसोडीचे धोरणच त्याला जबाबदार आहे असे म्हणणे मला भाग आहे.]

राजकीय हक्कप्राप्ती, राज्यकारभारात सहभाग, भौतिक सुखसमृद्धी या सर्वच आघाड्यांवर पिछेहाट होत राहिल्यामुळे काँग्रेस संघटनेतील, संस्थापक-पुढाऱ्यांच्या नंतरच्या पिढीतील अनेकांना काँग्रेसच्या कार्यपद्धतीच्या मर्यादा जाचक वाटू लागल्या होत्या. लोकमान्य टिळक हे त्यांपैकी एक होत. काँग्रेसमधील असंतुष्ट आत्म्यांचा उल्लेख करून सुरेंद्रनाथांनी त्यांना धीर न सोडण्याचा सल्ला दिला आहे. सध्याच्या प्रतिगामी राजवटीचे दिवसही एक दिवस सरतील याची खात्री बाळगा असे वडीलकीच्या नात्याने ते सांगतात.

१९०३ साली कर्झन यांनी इंग्लंडमध्ये झालेल्या राज्यारोहण समारंभाचे निमित्त करून येथे दरबार भरविला. कर्झन हेच या दरबारातील सम्राट होते. या दरबारच्या दिमाखाने लोक दिपून जाण्याऐवजी, दुष्काळ व दारिद्र्य यांच्या पार्श्वभूमीवर केली गेलेली उधळमाधळ पाहून देशातील शिक्षित व जाणत्या वर्गांमध्ये असंतोष वाढला.

कर्झन यांना ब्रिटिश साम्राज्याची कमान आपल्या कारकीर्दीत सतत चढती ठेवण्याची आकांक्षा होती. तिबेटवर प्रभुत्व प्रस्थापित करण्याचे धोरण त्यांनी आक्रमकरीत्या अवलंबले. मध्य आशियामध्येही शिरकाव करण्याचा डाव रचला. पर्शिया (आजचे इराण)ला शाही भेट दिली. या साऱ्या घटनांना व व्हाइसरॉयांच्या जबर महत्त्वाकांक्षी स्वप्नांना उद्देशून लाल मोहन घोष यांनी १९०३ च्या अधिवेशनात आपल्या अध्यक्षीय भाषणात इशारा दिला : 'There are some enterprises which might well be called a tempting of Providence'. [ काही उपक्रम म्हणजे विनाकारण नियतीच्या वाटेला जाऊन तिला डिवचण्याचा उपद्व्याप करणारे असतात.] नियतीच्या सहनशीलतेचा अंत कर्झन जणू अनेक आघाड्यांवर पहात होते.

बंगालच्या फाळणीच्या निर्णयाने अखेरीस हिंदी सुशिक्षित वर्गाच्या सहनशीलतेचा अंत झाला. वंगभंगाची चळवळ ही काँग्रेसने पूर्वनियोजित केलेली चळवळ नव्हती. बंगाली समाज फाळणी सहन करू शकणार नाही हे सर्वांनाच स्पष्ट दिसत होते. पण त्यापेक्षा अधिक पुढचे कोणास दिसले होते, वा कोणी कल्पना केली होती असे दिसत नाही.

१९०४ सालच्या राष्ट्रसभेच्या महिनाभर आधी टिळकांनी केसरीत लिहिलेला ' वेडरबर्न साहेबांचा ताजा निरोप ' हा लेख या दृष्टीने मोठा उद्बोधक आहे. ' लॉर्ड कर्झनसाहेब फिरून ताज्या दमाने हिंदुस्थानवर आपल्या कुटिल राजनीतिरूप शस्त्राचे घावावर घाव घालण्यास "सायुध व सशक्तिक"

अनुक्रमणिका

असे सज्ज होऊन, विलायतेतून हिंदुस्थानास यावयास निघाले आहेत' असे लिहून, कोणते आव्हान उपस्थित झालेले आहे याचे त्यांनी स्पष्ट चित्र समोर उभे केले. ते पुढे लिहितात, 'आजपर्यंतच्या इतिहासात केवळ न्याय मागणान्या अर्जदारांनाही अखेर हस्तेपरहस्ते सोटचाचाच आश्रय करावा लागला आहे, व न्याय मिळविण्याच्या कामी आपल्या पंचप्राणांसह इहसर्वस्वाचा बळी देण्यास तयार व्हावे लागले आहे.' पण लगेचच पुढच्या वाक्यात त्यांना असे लिहावेसे वाटले की, 'परंतु ही अर्थात अखेरची पायरी होय.' इंग्लंडात 'कोणा अनाथाच्या वालीच्या कच्छपी लागून पार्लमेंटमध्ये रडगाणे गावे, व अधिकारारूढ असलेल्या पक्षानेही वाटाण्याच्या अक्षता लावल्या म्हणजे मग "गौरिहराचे पूजन करीत वसणान्या वधूप्रमाणे" त्यांचा प्रतिपक्ष अधिकारारूढ होऊन येईल काय, अशी आशा मनात बाळगून, आपल्या कर्माला दोष लावीत किंवा ईश्वराची प्रार्थना करीत स्वस्थ बसावे' अशा, प्रतिपक्षाची खिल्ली उडविणाऱ्या त्यांच्या खास शैलीत, लोकमान्यांनी याच लेखात आधी काँग्रेसच्या कार्यपद्धतीतले दुबळे मर्मस्थान दाखवून दिले असले तरी, त्यांनाही इहसर्वस्वाचा बळी देणारेही कोणी दिसत नव्हते वा निश्चित असा कोणता मार्ग दिसत नव्हता, ही गोष्ट या लेखातून स्पष्ट होते. विलायतेतील लोकमत बदलणे हेच तूर्त आपले मुख्य कार्य, असे त्यांना शेवटी लिहावे लागले, व या कार्यासाठी आवश्यक तेवढा पैसा गोळा करण्यासाठी आवाहन करून थांबावे लागले.

बंगालच्या फाळणीची योजना ७ डिसेंबर १९०३ रोजी प्रसिद्ध झाली. या नंतरच्या काळात फाळणीविरुद्ध बंगालमध्ये सभा होत राहिल्या. लोकक्षोभाची दखल कर्झन यांनी घेतली जरूर. पण ती त्यांच्या स्वभावाला अनुरूप अशा पद्धतीने घेतली : बंगाली बाबूंच्या सभा व निदर्शनांपुढे माघार तर मुळीच घेता उपयोगाची नाही; त्यांची जिरवलीच पाहिजे. सर्वपल्ली गोपाल यांनी त्यांच्या 'ब्रिटिश पॉलिसी इन इंडिया' या पुस्तकात कर्झन यांनी भारत मंत्र्यांना लिहिलेल्या पत्रातला उतारा दिला आहे. कर्झन लिहितात, 'If we are weak enough to yield to their clamour now, we shall not be able to dismember or reduce Bengal again; and you will be cementing and solidifying, on the eastern flank of India, a force already formidable and certian to be a source of increasing trouble in the future.' [ ह्या गहजबापुढे आपण आता वाकलो तर बंगालचे तुकडे पाडणे वा त्याला खच्ची करणे आपल्याला परत शक्य होणार नाही. आणि भारताच्या पूर्वेच्या बगलीवर, जिची ताकद आताच जबरदस्त आहे आणि जी भविष्यात निश्चितपणे वाढता त्रास देणारे आहे अशी शक्ती तुम्ही मजबूत आणि दृढ करून ठेवाल. ] प्रशासकीय सोयीसाठी मुळात पुढे आलेली कल्पना प्रत्यक्षात साकार झाली तेव्हा पुरती राजकारणी योजना बनली होती, व तिचे लक्ष्य बंगाली सुशिक्षित वर्ग व काँग्रेसची चळवळ खच्ची करणे हे बनले होते.

जुलै १९०५ मध्ये फाळणी करण्याचा सरकारी प्रस्ताव प्रसिद्ध केला गेला. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीने वंगभंगाच्या चळवळीच्या योगे वेगळ्या टप्प्यात प्रवेश केला. सर्वपल्ली गोपाल यांचा निवाडा मार्मिक आहे. ते म्हणतात, '(Curzon) failed to discern that Indian nationalism had ceased to be purely intellectual and had attracted emotional support, that it had for the first time secured a grievance which agitated not politicians only but most men of thought and feeling and that it had evolved revolutionary techniques other than terrorism.'

[ भारतीय राष्ट्रवाद हे आता केवळ बौद्धिक आंदोलन उरले नव्हते, त्याने भावनिक पाठिंबा आकर्षून घेतला होता, त्याला प्रथमच असे एक गाऱ्हाणे गवसले होते की, त्याच्यामुळे केवळ राजकारण्यांचाच नव्हे तर बहुसंख्य विचारी आणि भावनाशील व्यक्तींचा क्षोभ झाला होता आणि

शस्त्राचारी दहशतीच्या मार्गाहून भिन्न अशी क्रांतीची साधने त्याने विकसित केली होती ही गोष्ट कर्झन ध्यानी घेऊ शकले नाहीत. ]

### संदर्भग्रंथ


1. The Encyclopaedia of Indian National Congress, Vol. I to Vol. 4, Edited by A M. Zaidi and S. G. Zaidi, S. Chand & Co, Delhi, 1976–78.

2. British Policy in India 1858–1905, S. Gopal, Cambridge University Press, Cambridge, 1965.

3. British India, Michael Edwardes, Sidgwick and Jackson, London, 1967.

४. समग्र लोकमान्य टिळक, खंड, ४, केसरी प्रकाशन, पुणे, १९७६.

5. The Moderate Era in Indian Politics, B. R. Nanda, Oxford University Press, New Delhi, 1983.


⊙ ⊙ ⊙

# नामदार गोपाळ कृष्ण गोखले आणि भारतीय राजकारणातील नेमस्त पर्व

वसंत पळशीकर

— १ —

मिल्ल–बेंथॅमप्रणीत लिबरल–युटिलिटेरियन विचारप्रणाली आत्मसात करून वा ख्रिश्चन धर्मप्रसाराद्वारा जगाचा उद्धार करण्याची ईव्हँजेलिकल भूमिका पत्करून हिंदुस्थानात १८२० ते १८६० दरम्यान आलेल्या ब्रिटिश प्रशासकांपैकी बहुतेकांची, तत्त्वतः तरी, भूमिका अशी होती की, या देशातील लोकांना इंग्रजी शिक्षणाद्वारा शहाणे करावे, आणि शहाणे होत जातील तसे त्यांच्या हाती येथील कारभारही सोपवीत जावा. शहाणे होण्यास दीर्घ काळ लागणार आहे अशीच यांपैकी बहुतेकांची धारणा होती. तसेच अनिश्चित काळपर्यंत अंतिम सूत्रे इंग्रजांच्या हाती असावी लागतील हेही गृहीत होते. या भूमिकेचा व्यवहारात एक फायदा होता. इंग्रजी शिक्षण घेऊन सुशिक्षित बनलेल्यांना राज्यकारभारामध्ये स्थानिक पातळीवर जवळपास पूर्ण तर वरिष्ठतर पातळ्यांवर वाढत्या प्रमाणात सहभागी करून घेण्याची तयारी होती. लोकप्रतिनिधी म्हणून काम करण्यास सुशिक्षित वर्ग हा शिक्षणाच्या योगे सर्वात अधिक पात्र बनलेला आहे यास मान्यता होती. सुशिक्षित हिंदी व्यक्तींचे या भूमिकेत स्वागत होते. लोकनियुक्त प्रतिनिधींचे प्रमाण कोणत्या पातळीवर किती असावे, त्यांना कोणते अधिकार कितपत दिले जावेत, याबाबतीत मतभेदाला वाव असला तरी, प्रतिनिधी लोकनियुक्त असले तरच ते खरे प्रतिनिधी असतात, व त्यांच्या हाती अधिकार असल्याखेरीज जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धती अस्तित्वात येत नाही हे स्वीकृत होते. लॉर्ड रिपन यांच्या ठायी ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या या भूमिकेचा उत्तम आविष्कार झालेला हिंदी सुशिक्षितांना आढळला. म्हणूनच, त्यांच्या कारकीर्दीत फार मोठ्या कोणत्याच गोष्टी न घडूनही, त्यांना या वर्गाने डोक्यावर घेतले.

१८६० नंतरच्या काळात परिस्थितीमध्ये झपाट्याने बदल झाला. आपल्या स्वार्थी राजकीय व आर्थिक उद्दिष्टांसाठी जगाची वाटणी आपापल्या प्रभुत्वक्षेत्रांमध्ये करून घेण्याची स्पर्धा एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात प्रकर्ष पावली. जगदोद्धारापेक्षा स्वामित्वाची व शोषणाची प्रेरणा अधिक प्रबळ होती. वसाहती या साम्राज्यसत्तेच्या फायद्यासाठी वापरून घेण्यासाठीच तर असतात ही वृत्ती बळावली. हिंदुस्थानच्या विशिष्ट संदर्भात १८५७ च्या उठावाला, व सनदी सेवेची एक देशव्यापी व्यवस्था दृढ स्वरूपात आकारास येण्याला महत्त्व आहे. १८५७ चा उठाव निर्घृणपणे निपटून काढण्याच्या ओघात ब्रिटिश समाजाच्या ठायी तामसिक वृत्तींचा विशेष प्रादुर्भाव झालेला आढळतो. यानंतरच्या काळात, हिंदी लोकांशी वागताना, वरिष्ठतम प्रशासकांपासून तो थेट गोऱ्या पलटणींमधील शिपाईगड्यांपर्यंत, त्यांचा उन्मत्तपणा वाढत गेलेला आढळतो. दास वा गुलाम म्हणून हिंदी लोकांकडे बघण्याची, त्यांना तशी वागणूक देण्याची रीत शिष्टमान्य झाली. १८५४ पासून स्पर्धात्मक परीक्षांच्या आधारे येथील प्रशासकांची भरती होऊ लागली. यांना 'सिव्हिल सर्व्हंट' असे औपचारिकतः म्हटले जात असले तरी, आपली निवड जिंकून घेतलेल्या प्रदेशावर राज्य करण्यासाठी म्हणून झालेली आहे या जाणिवेने भारलेल्या, गर्विष्ठ मनोवस्थेतच ही तरुण मंडळी येथे येत व येथे त्यांच्या हाती अनियंत्रित सत्ताही चटकन दिली जाई. त्यांचा शब्द हेच ब्रह्मवाक्य ठरे. श्रेणीबद्ध अशा या यंत्रणेने लौकरच सारा देश व्यापला आणि आपली पोलादी पकड बसवली. आपल्या

सत्तेत कोणी वाटेकरी असावा, लोकप्रतिनिधींनी आपणास जाब विचारावा, आपल्यावर अंकुश ठेवावा ही कल्पनाही आता असह्य वाटू लागली.

पूर्वी भर राज्य 'ब्रिटिश तत्त्वां'वर संघटित करण्यावर व चालविण्यावर होता. ते कायमचे इंग्रजांच्या हातीच राहिले पाहिजे याविषयी अट्टाहास नव्हता. हिंदी लोकांच्या सन्मानपूर्वक भागीदारीस या भूमिकेत वाव होता. हिंदी व इंग्रज हे एकाच ब्रिटिश साम्राज्यातील समान दर्जाचे नागरिक असू शकत होते. लाल मोहन घोष, दादाभाई नौरोजी हिंदी नागरिक राहूनही ब्रिटिश पार्लमेंटची निवडणूक लढवू शकत होते. पार्लमेंटचे सभासद असलेले, सनदी प्रशासनसेवेत आयुष्य काढलेले इंग्रज राष्ट्रसभेचे अध्यक्षपद भूषवू शकत होते, पार्लमेंटमध्ये व इंग्लंडात हिंदुस्थानचा पक्ष घेऊन सक्रिय भूमिका वठवीत होते, याच्या बुडाशी ही भागीदारीने करावयाच्या 'ब्रिटिश राज्या'ची संकल्पना होती. हिंदुस्थानवर केवळ इंग्रजांनीच निरंकुश राज्य करण्याची साम्राज्यवादी संकल्पना याच्या एकदम विरुद्ध अशी होती. १८६० नंतरच्या काळात ती वरचढ ठरली; क्रमाक्रमाने ती जवळपास अधिकृत भूमिका ठरली. १८८५ ते १९०५ या कालखंडात या दुसऱ्या संकल्पनेचा प्रकर्ष होत गेला. कर्झन यांच्या कारकीर्दीत एका अर्थी तिचा कळस गाठला गेला.

वरील दोनपैकी पहिल्या भूमिकेमधून काँग्रेसच्या संस्थापकांनी त्यावेळचे व्हाइसरॉय लॉर्ड डफरिन यांच्याशी सल्लामसलत करून काँग्रेसची स्थापना केली. येथील राज्य चालविण्यामध्ये सनदी प्रशासन यंत्रणेने राष्ट्रसभेचे साहाय्य घ्यावे, तिच्याशी सल्लामसलत करावी, तिच्या सभांना उपस्थित राहावे, या प्रकारची मुळात योजना होती. पण १८८५ च्या आधीचे, रिपन यांच्या कारकीर्दीच्या वेळचे वातावरण एखादे वर्षच फार तर टिकले असेल. खुद्द डफरिनदेखील काँग्रेस चळवळीला अनुकूल राहिले नाहीत. सनदी प्रशासन यंत्रणा तर वर्षदोन वर्षातच राष्ट्रसभेची पक्की शत्रू बनली. राष्ट्रसभा ही साऱ्या हिंदी जनतेची प्रतिनिधी बनू नये या दृष्टीने मुसलमान समाज, येथील पारंपरिक जमीनदार-सरंजामदार वर्ग काँग्रेसपासून दूर राहावा या दृष्टीने डावपेच खेळले जाऊ लागले.

थोडक्यात, काँग्रेसच्या संस्थापकांची भूमिका भागीदारीची तर सनदी प्रशासनयंत्रणेची शत्रुत्वाची होती. ही वस्तुस्थिती स्पष्ट झाल्यावरही काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी भागीदारीची भूमिका निष्ठापूर्वक जोपासली व राबविली. त्यांची आशा ब्रिटिश पार्लमेंटवर होती. म्हणून त्यांनी जाणीवपूर्वक, डोळसपणे इंग्लंडमध्ये मोर्चेबंदी करण्याचे धोरण अवलंबिले. पण, दुर्दैवाने या काळात इंग्लंडात साम्राज्यवादी भूमिकेतून राज्य करण्याविषयी आग्रही असणाऱ्या काँझर्व्हेटिव्ह पक्षाच्या हाती सत्तेची सूत्रे राहिली. लिबरल पक्षातही, ब्रिटिश कारखानदारी स्वार्थी हितसंबंधांच्या विरोधात ठाम भूमिका घेण्याचे धैर्य असलेले नेतृत्व नव्हते; उलट, ब्रिटिश कारखानदारी–व्यापारी व आर्थिक हितसंबंधांना प्राथमिकता, अग्रहक्क देऊनच निर्णय घेतले पाहिजेत याविषयीच एकवाक्यता होती. भागीदारीची भूमिका निष्ठेने उचलून धरणारी अगदीच कोणी मंडळी नव्हती असे मात्र नाही; लिबरल, रॅडिकल व काँझर्व्हेटिव्ह– सर्वच पक्षांत हिंदुस्थानचा कैवार घेणारे पार्लमेंटचे पाच-पंधरा सभासद याही काळात होते. पण त्यांचे फार चालेनासे झाले.

– २ –

काँग्रेसच्या स्थापनेत पुढाकार घेतलेले दादाभाई व ह्यूम हे, काँग्रेसच्या स्थापनेच्या वेळी साठीत होते. त्यांनी ज्यांच्या सहकार्याने काँग्रेसची चळवळ पहिल्या वीस वर्षांमध्ये चालविली ती रानडे, फेरोझशहा, उमेशचंद्र बॅनर्जी, सुरेंद्रनाथ बॅनर्जी, बद्रुद्दिन तयबजी इत्यादी मंडळी १८८५ साली चाळिशीच्या आसपास असलेली मंडळी होती. १८२०–३० च्या काळातील ईव्हँजेलिकल व युटिलिटेरियन प्रभाव येथील इंग्रजी राजवटीवर टिकून असण्याच्या काळात या पिढीचे शिक्षण झाले; त्यांच्या मनावर भागीदारीच्या भूमिकेचे संस्कार दृढ झाले. इंग्रज हे तांत्रिकदृष्ट्या परके खरे, पण 'ब्रिटिश राज्य' मात्र ते परके मानीत नव्हते. 'ब्रिटिश राज्य' येथे दृढ व्हावे आणि ते चालविण्यात आपली भागीदारी वाढत जावी अशी त्यांची इच्छा होती, ते त्यांचे डोळसपणे स्वीकारलेले ध्येय होते. इंग्रजांना येथून लौकरात लौकर घालवून देण्यास ते उत्सुक नव्हते. उदाहर-

अनुक्रमणिका

णार्थ, 'आस्ते कदम, सर्व अंगांनी सुधारणा करीत जाणे' हाच प्रगतीचा योग्य मार्ग आहे अशी न्यायमूर्ती रानडे यांची भूमिका होती. लिबरल मांडणीतील काही मूलतत्त्वे रानड्यांनी स्वीकारली होती; पण त्याच वेळी इथली परिस्थिती ध्यानात घेवून त्यांनी आपली एक स्वतंत्र बैठक घडविली होती. भौतिक व सामाजिक शास्त्रांच्या क्षेत्रातील ज्या नवीन सिद्धांतांनी व ज्ञानाने पाश्चिमात्य देशांना सामर्थ्य प्राप्त झाले होते त्यांचा अभाव देशात प्रकर्षाने आढळत होता. चारित्र्यहीन, गलितगात्र व चैतन्यहीन अवस्थेतून, शून्यातून एक राष्ट्र घडवावयाचे होते, उभे करावयाचे होते. यासाठी तत्कालीन जगातील सर्वांत अग्रेसर व प्रबळ इंग्लिश राष्ट्राचा व आपला संबंध हा हिंदवासीयांच्या दृष्टीने उपकारक ठरणार होता. ज्या तत्त्वांवर नव्या भारताची जडणघडण करावयाची होती त्या संदर्भात हा संबंध उपकारक ठरणार होता. राज्य लोकांना जबाबदार असले पाहिजे आणि ते कायद्याच्या चौकटीत चालले पाहिजे, हे दोन मूलाधार इंग्लंडमधील राज्यसत्तेला होते. याच मूळ तत्त्वांनुसार येथील राज्यही संघटित करावयाचे ध्येय रानडेप्रभृतींचे होते. याच तत्त्वांनुसार येथील राज्य चालविले जाईल हे आश्वासन व्हिक्टोरिया राणीने १८५८ च्या जाहीरनाम्याने दिले होते. जबाबदार प्रातिनिधिक राज्यसत्ता, कायद्याचे राज्य, व्यक्तींची समानता, प्रतिष्ठा व स्वातंत्र्य यांचे धडे इंग्रजांपासून घेणे सर्वांत उत्तम असे त्यांना वाटले. इंग्रजांचे राज्य हे एक ईश्वरी वरदान आहे असे म्हणण्यात रानडेप्रभृती इंग्रजांचे लांगूलचालन करीत नव्हते. ऐतिहासिक दृष्टिकोन बाळगून केलेला तो एक सर्वस्वी बुद्धिनिष्ठ निवाडा होता.

लौकरात लौकर परकीयांना हुसकावून लावून सत्ता हस्तगत करण्याची बाळबोध राष्ट्रवादी भूमिका रानडेप्रभृतींना आत्मघातकी वाटली असल्यास ते विवेकाला धरून– व म्हणून योग्यच– होते. 'लोक स्वराज्याला पात्र बनण्याच्या अगोदर इंग्रजांचे इथले राज्य गेल्यास ती एक आपत्ती ठरेल' अशी त्यांची स्पष्ट भूमिका होती. पात्रता कमाविण्यास त्यांच्या लेखी अतिशय महत्त्व होते. हिंदी लोक स्वराज्याला जसजसे पात्र होत जातील तसतसे त्यांच्या हाती अधिकाधिक प्रमाणात अधिकार आले पाहिजेत याविषयी त्यांचा आग्रह होता. त्या आग्रहाबाबत ते कोणाला हार जाणारे नव्हते. थोडक्यात, स्वराज्याविषयी त्यांच्या आकांक्षेची तीव्रता कोणत्याही प्रकारे कमी होती असे नाही. मात्र केवळ आकांक्षेची तीव्रता पुरेशी नाही असे त्यांचे पुढे म्हणणे होते.

'स्वराज्याची पात्रता अंगी येण्यासाठी हिंदी समाजाची सर्व अंगांनी सुधारणा होण्याची गरज' हे त्यांच्या भूमिकेचे स्वाभाविकच दुसरे सूत्र होते. स्वराज्य म्हणजे 'स्वकीयांचे राज्य' एवढी त्यांची संकुचित कल्पना नव्हती. इंग्लंडमधील जबाबदार प्रातिनिधिक राज्यसत्तेसारखी राज्यसत्ता चालविण्यासाठी लोक पुढारलेले, सुधारलेले असावे लागतात अशी त्यांची समजूत होती. सर्वांगीण सुधारणेवर भर होता तो यासाठी.

शिक्षणाचा व ज्ञानाचा प्रसार, धार्मिक व सामाजिक सुधारणा, उद्योग–व्यापार यांची अभिवृद्धी यांद्वारे लोकशिक्षण व जागरण घडवून आणावे, अशा सुधारलेल्या लोकांचे संघटन बांधावे, आणि त्या संघटनेच्या द्वारे अधिकारप्राप्तीचे राजकारण करावे अशी रानडे व त्यांचे समकालीन पुढारी यांची युद्धनीती होती. अधिकारप्राप्तीच्या राजकारणासाठी इंग्लिश राजकारणी व्यक्ती व इंग्लिश पार्लमेंट यांची मदत आपणास होऊ शकेल या त्यांच्या भूमिकेच्या पाठीशी इंग्रजांची लाचारी पत्करण्याची वृत्ती नव्हती.

रानडे, मेथा, सुरेंद्रनाथ बॅनर्जी वगैरेंच्या पिढीतील हिंदी सुशिक्षितांना इंग्रजी राज्यात आपल्या गुणांना व कर्तृत्वाला पूर्ण न्याय दिला जात नाही, इंग्रजी राज्याचे काही गंभीर दुष्परिणामही होत आहेत, (विशेषत: रयतेचे दारिद्र्य वाढत आहे, संपत्तीचा ओघ देशाबाहेर वाहत आहे; इत्यादी) याची जाण होती. तरी पण योग्य मनोवृत्तीच्या इंग्रजांच्या भागीदारीत येथे आपण 'ब्रिटिश राज्य' स्थापन करू शकू असा त्यांचा विश्वास टिकून राहिला.

१८७० नंतर जी पिढी वयात आली तिचे मानस अगदी वेगळ्या वातावरणात घडले होते. विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आगरकर, अरविंद घोष यांची ही पिढी. अव्वल इंग्रजीतील उदार

प्रगल्भ मनाच्या इंग्रज प्राध्यापक व प्रशासक यांचा यांना अनुभव नव्हता. साम्राज्यवादी मानसाच्या अध्यापक, प्रशासकांचाच त्यांचा सहवास घडला होता. त्यांनी अनुभवले होते ते 'ब्रिटिश राज्य' नव्हते, ती इंग्रजांची परकीय राजवट होती. ही राजवट त्यांना दास म्हणून, जित म्हणून अपमानास्पद वागणूक देत होती. कितीही शिकलात तरी स्वराज्यास तुम्ही लायक बनणार नाही, असे उन्मत्तपणे व तुच्छभावाने ठासून सांगणारी होती. वंशश्रेष्ठत्वाने पछाडलेली राजवट होती.

नेपोलियन बोनापार्टची फ्रेंच साम्राज्यसत्ता युरोपातून उखडून लावण्याच्या प्रक्रियेत एका वेगळ्या जातकुळीच्या राष्ट्रवादी विचारप्रणालीचा उत्कर्ष युरोपात झाला. ही विचारप्रणाली बुद्धीपेक्षा भावनेवर, सर्ववाचीत्वाच्या (युनिव्हर्सल) विरोधात विशिष्ट इतिहास व परंपरा यांच्यावर भर देणारी होती. सर्वसमावेशक आंतरराष्ट्रीयत्वाकडे वाटचाल करण्याच्या विरुद्ध पृथगात्म व आक्रमक राष्ट्रीय अस्मितेच्या परिपोषासाठी प्रयत्नशील होती. इतर राष्ट्रांपासून वेगळेपण व श्रेष्ठपण सांगण्यावर भर देणारी होती. राष्ट्राला उद्देशून 'फादरलँड' व 'मदरलँड' असे शब्दप्रयोग रूढ करणारी ही विचारप्रणाली लोकांच्या मनाची विलक्षण पकड घेणारी होती. धर्म, भाषा, संस्कृती, इतिहास, दैवते, परंपरा यांचे माहात्म्य विलक्षण वाढविणारी होती. या प्रकारच्या युरोपीय राष्ट्रवादी विचारप्रणालींचा व चळवळींचा प्रभाव १८७० नंतरच्या पिढीवर प्रकर्षाने आढळतो. विष्णुशास्त्री व टिळक यांना पेशवाईचा अभिमान वाटे, आपल्या धार्मिक व सांस्कृतिक परंपरांचाही अभिमान वाटे, याचा अर्थ त्यांना पेशवाईचे पुनरुज्जीवन करावयाचे होते वा इंग्रजी शिक्षण नाकारावयाचे होते असे नाही. त्यांच्या राष्ट्रवादाची ती भावनात्मक बैठक होती, व लोकांच्या ठायी राष्ट्रप्रेम जागृत करण्यासाठी धर्म, संस्कृती, इतिहास व परंपराचा ते जाणीवपूर्वक प्रयत्न करण्याच्या पक्षाचे होते.

या नवीन मंडळींना इंग्रजी राज्याचा अनुभव, ते आपल्या मानगुटीवरचे एक परकीय राज्य असाच होता. लौकरात लौकर ते हटविणे हे त्यांचे ध्येय होते. ज्या जातकुळीचा राष्ट्रवाद त्यांनी अंगिकारला होता त्या राष्ट्रवादानुसार 'राष्ट्र' हे नेहमीच श्रेष्ठ, शुद्ध, लायक, सक्षम, वगैरे असते. परक्या राज्यकर्त्यांना हुसकावून लावणेच तेवढे आवश्यक व पुरेसे असते. त्यासाठी आवश्यक असते प्रखर राष्ट्रभक्ती, राष्ट्राला माता (वा पिता) संबोधून तिची अनन्यभावे पूजा बांधणारी राष्ट्रभक्ती.

ही पिढी काँग्रेसच्या चळवळीत १८९० च्या आसपास दाखल झालेली आढळते. पण संस्थापक-पुढारी आणि या पिढीचे प्रवक्ते–नेते यांच्यातले अंतर स्पष्ट व्हायला व काँग्रेस चळवळीमध्ये अंतर्गत तणाव निर्माण होण्यास आणखी दहाबारा वर्षे जावी लागली.

– ३ –

काँग्रेस संघटनेच्या सौम्य व रास्त मागण्यादेखील धुडकावून लावावयाच्या असे धोरण हिंदुस्थान सरकारने अंगिकारल्याने काँग्रेसच्या संस्थापक-पुढाऱ्यांची कोंडी होत गेली. ब्रिटिश पार्लमेंट 'ब्रिटिश राज्या'-मागील तत्त्वांना अधिक जागेल अशी त्यांनी आशा बाळगली. लौकरच त्यांच्या ध्यानात आले की, ब्रिटिश मंत्रिमंडळात भारतमंत्री कोणीही असो, त्याला सल्ला देणाऱ्या इंडिया कौन्सिलच्या प्रतिगामी भूमिकेवर मात करण्याचे साहस तो सहसा करू धजत नाही. इंडिया कौन्सिलवर निवृत्त हिंदी सनदी प्रशासकांचा भरणा असे, आणि हे आपापल्या क्षेत्रातले अनुभवी व जाणकार तज्ज्ञ गणले जात. एकाद्या प्रस्तावाला यांनी नाही म्हटले की ब्रिटिश मंत्रिमंडळ व पार्लमेंटचा कल त्यांच्या नकारावर शिक्कामोर्तब करण्याकडे राही. विशेषतः, शंभरातल्या नव्याण्णव वेळा, सुधारणांच्या, हिंदी लोकांना हक्क व सहभाग देण्याच्या मुद्यांवरून हिंदुस्थान सरकार व इंडिया कौन्सिल यांचे एकमत होई. ते भेदण्याची राजकीय शक्ती व ध्येयदृष्टी क्वचितच कोण्या भारतमंत्र्याने व ब्रिटिश पंतप्रधानाने दाखविली. इंडिया कौन्सिलचे प्रतिगामी संघटन ध्यानात घेऊन आपल्या पहिल्याच अधिवेशनात काँग्रेसने ते रद्द केले जावे अशी मागणी केली होती. पण, अर्थातच, ती कधी मान्य झाली नाही.

हळूहळू काँग्रेसचा सनदी प्रशासनयंत्रणेकडून होणारा दुःस्वास वाढत गेला. यात पुढे कर्झन यांच्या कारकिर्दीत कमीअधिक उघड स्वरूपातील अधिक्षे-

पाची भर पडली. हिंदी सुशिक्षित वर्ग, विशेषतः काँग्रेसमध्ये सामील झालेला वर्ग, हा जणू काही राजद्रोही मंडळींचा वर्ग आहे अशा थाटात या वर्गाबद्दल सतत संशय बाळगून, तोवर प्राप्त झालेले हक्क व दिला गेलेला सहभाग यांच्यापासूनही वंचित करण्याचे धोरण अवलंबिले गेले.

सुशिक्षित मंडळींचा असंतोष वाढत गेला. हा असंतोष काँग्रेसच्या व्यासपीठावरून जसा व्यक्त होई तसाच तो देशी भाषेतील वृत्तपत्रांमधूनही व्यक्त होई. गावोगाव चालणाऱ्या बाजारगप्पांमधूनही व्यक्त होई. आपण वर दोन पिढ्यांमध्ये जे अंतर पाहिले त्या अंतरास अनुरूप असा फरक असंतोषाच्या अभिव्यक्तीतही दिसून येतो.

हिंदी सुशिक्षित वर्गाने पुढे केलेला सहकार्याचा हात झिडकारून टाकत राहिल्यामुळे, ह्यात अधिक्षेपाची भर पडू लागल्याने देशातील तरुण पिढीमध्ये निराशा दाटत आहे, मने क्षोभ पावत आहेत याची दखल काँग्रेसच्या अध्यक्षीय भाषणांमधून १९०१–०२ पासून घेतली गेलेली आपणास पहावयास मिळते. रँड–आयर्स्ट प्रकरणी लोकमान्यांना शिक्षा झाली ती सरकारविषयी अप्रीती ( डिस्अॅफेक्शन ) निर्माण करण्याच्या आरोपावरून. याच प्रकरणात, इंग्लंडमधील मुलाखतीत केलेले आरोप सिद्ध करता येण्याची शक्यता नसल्याने गोखल्यांनी हिंदुस्थानात परतल्यावर माफी मागितली होती. याचा परिणाम असा झाला की, गोखले सुशिक्षितांच्या तरुण पिढीच्या मनातून काही काळ साफ उतरले तर टिळक लोकप्रियतेच्या शिखरावर जाऊन पोचले. तुरुंगातून सुटल्यानंतर टिळक जेव्हा प्रथमतः काँग्रेसच्या अधिवेशनात हजर झाले तेव्हा सभागृहाने टाळ्यांच्या कडकडाटात त्यांचे स्वागत केले.

भारतीय स्वातंत्र्य चळवळीतील जहाल व नेमस्त हा भेद आपणास या उदाहरणाच्या आधारे समजावून घेता येतो. हा भेद समजावून घेत असताना प्रथम दोनतीन गोष्टी पक्क्या ध्यानात ठेवल्या पाहिजेत. पहिली अशी की, टिळकांनी 'केसरी'त १८९७ च्या पुण्यातील प्लेग प्रकरणी लेख लिहिले त्या वेळी ते 'नामदार' होते, गणेशखिंडीत गव्हर्नरच्या प्रासादी झालेल्या ज्युबिली समारंभास ते हजर होते. म्हणजेच, आचार्य जावडेकरांच्या शब्दांत, टिळकदेखील 'दरबारी राजकारण' करणाऱ्यांपैकीच एक होते. दुसरी गोष्ट, 'केसरी'त लेखन करीत असताना राजद्रोहविषयक कायद्याचा भंग जाणूनबुजून करावयाचा अशी टिळकांची भूमिका नव्हती. तिसरी गोष्ट, प्लेग-कमिटीने पुण्याच्या लोकांशी जो व्यवहार केला त्यावरूनचा संताप, व त्याचा निषेध, या दोन्ही बाबतीत टिळक व रानडे पक्ष यांच्यामध्ये फारसे अंतर नव्हते. मग फरक नेमका कोणता होता ?

अधिकारप्राप्तीचे राजकारण काँग्रेसच्या मार्गापेक्षा भिन्न मार्गाने करण्याची टिळकांची कल्पना वा योजना नव्हती. पण १८५७ च्या पद्धतीचा उठाव वा सशस्त्र क्रांतिकारकांच्या 'गुप्त मंडळां'चे राजकारण हे दोन्ही मार्ग टिळकांना वर्ज्य नव्हते; यांपैकी कोणत्याही एका मार्गाने जाऊन यश मिळविण्याची खात्री थोडीफार जरी असती तरी त्यांनी तसा विचार करून पाहिला असता. पुढील इतिहासावरून असेही दिसते की, भविष्यात सशस्त्र क्रांतीचा मार्ग यदाकदाचित व्यवहार्य ठरण्याची शक्यता स्वीकारून त्या दिशेने कार्य करणाऱ्या तरुणांना त्यांची सल्लामसलतही असे, व अशा मंडळींच्या कार्याविषयी त्यांना माहितीही असे. पण प्राप्त परिस्थितीत हे मार्ग अव्यवहार्य म्हणून त्यांनी बाजूस ठेवलेले होते. मात्र मुद्याची गोष्ट अशी की, या देशावरील इंग्रजांचे राज्य जमेल त्या मार्गाने उखडून टाकण्यात त्यांना गैर काही वाटत नव्हते. पहिला फरक इथे होता. काँग्रेस ज्यांनी स्थापन केली त्यांना देशाला कसेही स्वतंत्र करावयाचे नव्हते. किंबहुना, स्वतंत्र या शब्दाचा अर्थही ते अशा एका विशिष्ट प्रकारे करीत की, त्यामुळे 'ब्रिटिश राज्या'ची तत्त्वे आत्मसात करीत, ती क्रमशः व्यवहारात उतरवीत जाण्यातूनच देश स्वतंत्र बनू शकणार होता. आणि, या कामी आणखी बराच काळ इंग्रजांची मदत आवश्यक होती अशी त्यांची समज होती. एरवी परत एकवार अंदाधुंदी व अराजक, वा सरंजामशाही राजेशाह्या यांना आमंत्रण दिल्यासारखे होणार होते. ती राज्ये स्वकीयांची असली तरी त्यांच्या राजवटीतले दास्य आणखी वाईट ठरणारे होते तर, मोठी राज्ये

चालविण्याचा अनुभव, ज्ञान व कसब आमच्यापाशी पूर्वापार आहेच; इंग्रजांकडून यात खास शिकण्यासारखे काही आहे असे नाही, अशी टिळकांसारख्या नव्या राष्ट्रवादी पिढीची भूमिका होती.

दुसरा फरक या पहिल्या फरकाशी निगडित होता. इंग्रजी राज्य उपकारक असल्याने, सांप्रत कितीही निराशाजनक अनुभव येत असला तरी, ब्रिटिश राज्यकर्ते व 'ब्रिटिश राज्य' यांच्यावरील निष्ठेलाच तडा जाईल असे बोलणेचालणे आपल्याकडून होता कामा नये याविषयी काँग्रेसच्या संस्थापकांचा आग्रह होता. राजनिष्ठा हे त्यांच्या राजकारणाचे अधिष्ठानच होते. तो धोरणीपणाचा भाग नव्हता. टिळक, अरविंद घोष प्रभृती तरुण उदयोन्मुख पुढाऱ्यांच्या ठायी या अर्थाने राजनिष्ठेचा पूर्ण अभाव होता. राजनिष्ठ वाटावे असे युक्तिवाद टिळकांच्या लेखनात अनेकवार येतात ते व्यावहारिक धोरणीपणाचा भाग म्हणूनच. खरे पाहता त्यांच्या मनात इंग्रजी राज्याविषयी अप्रीतीच होती. अप्रीती फैलावण्याची प्रत्येक संधी ते कुशलतेने उपयोगी आणत असे म्हणावे, किंवा अशी संधी प्राप्त झाली असता त्यांच्या मनातील अप्रीती चटकन् प्रकट होत असे असे म्हणा, परिणाम एकच.

पुण्यातील प्लेग प्रकरणी अतुलनीय धैर्य टिळक व गोखले या दोघांनीही दाखविले. या दोघांच्या परस्परभिन्न भूमिका असल्याने, एकाने जाहीर माफी मागून तर दुसऱ्याने तुरुंगवासाच्या शिक्षेचा धीरोदात्तपणे स्वीकार करून ते प्रकट केले, एवढेच.

गोखल्यांची भूमिका काँग्रेसच्या संस्थापकांची भूमिका होती. अधिकारप्राप्तीचे राजकारण हे इंग्लंडातील मतदार व ब्रिटिश पार्लमेंट यांचे मतपरिवर्तन करून, त्यांच्यावर नैतिक दबाव आणून यशस्वी करावे लागणार होते, ही तत्कालीन परिस्थितीची शर्त होती. पण, त्याहीपलीकडे जाऊन, दीर्घकाळपर्यंत ब्रिटिशांच्या सहकार्यानेच या देशाची प्रगती साधावयाची असल्याने, हक्कांसाठी चळवळी करीत असतानाही, अन्यायाविरुद्ध आवाज उठविण्याची व दाद मागण्याची गोष्ट करीत असतानाही, दुसरीकडे, संवाद व सहकार्य शक्य राहण्यासाठी आवश्यक तो विश्वास संपादन करण्याचीही आवश्यक शर्त होती. इंग्लंडात दिलेल्या मुलाखतीत जे आरोप केले होते ते सिद्ध करणे अशक्य आहे असे लक्षात आल्यावर, माफी न मागण्याचा पवित्रा गोखल्यांना घेता आला असता. इंग्लंडात त्यांच्यावर खटला चालला असता तर शिक्षा होण्याची शक्यता फार कमी होती. पण असा विचार करून त्यांनी माफी मागायचे टाळले असते तर, इंग्लंडमध्ये त्यांचे नाव 'बिनबुडाचे आरोप करणारा, नालस्ती करणारा, खोटारडा माणूस' म्हणून झाले असते. त्यांनी विश्वासार्हता गमाविली असती. ज्या मार्गाने जाऊन अधिकारप्राप्तीचे राजकारण करावयाचे तो मार्ग अनुसरण्यासाठी विश्वासार्हता संपादन करणे ही सर्वप्रथम गरज होती. कायद्याच्या दृष्टीने किमान आवश्यक तेवढ्यापुरती माफी मागून असा विश्वास संपादन करता येणार नव्हता ही गोष्ट या संदर्भात लक्षात घेण्यासारखी आहे. आपण संपूर्ण व बिनशर्त माफी मागितली तर भारतात आपली कोणत्या कोटीची नाचक्की होईल याची कल्पना गोखल्यांना खासच असणार. 'वैयक्तिक प्रतिष्ठेचा बचाव की देशहित' असाच सवाल गोखल्यांच्या समोर होता. रानड्यांचे शिष्यत्व गोखल्यांनी १८८९ सालीच पत्करले होते. पण या प्रसंगी रानड्यांची भूमिका त्यांना यथार्थपणे आकळली आणि त्यांनी ती आत्मसात केली. आपल्या भावना कितीही उत्कट वा तीव्र असल्या तरी आपल्या वाणीला व लेखणीला विवेकाचा व सावधानतेचा लगाम घालूनच, आपल्या भावना संयमित स्वरूपात प्रकट करूनच अधिकारप्राप्तीचे राजकारण करण्याची निकड त्यांना कळून आली.

इंग्रजी राज्याविषयी अप्रीती निर्माण करण्याची उत्कृष्ट संधीच प्लेग प्रकरणी प्राप्त झाली आणि टिळकांनी त्या संधीचा पुरेपूर फायदा उठविला. जी भाषा आपण वापरतो आहोत तिच्यापायी आपणावर खटला होईल व आपणास तुरुंगवास घडेल हे टिळकांनी गृहीत धरले नव्हते. सरकारने खटला भरला तेव्हा त्यांनी तो शेवटपर्यंत जिद्दीने लढविला. १९२२ साली महात्मा गांधींनी घेतली तशी भूमिका त्यांनी घेतली नाही : हो, इंग्रजी राज्याविषयी अप्रीती निर्माण करणे हे मी माझे कर्तव्य समजतो, असे टिळक म्हणाले नाहीत. अशी भाषा वापरणे यात राजद्रोह नाही, कायद्याच्या चौकटीतच आपले लेखन

आहे, असा युक्तिवाद त्यांनी केला. एका अर्थी, 'ब्रिटिश राज्या'चे अधिष्ठान असलेली जी तत्त्वे, व त्या राज्यातील संस्था व रीती यांचा ते पूर्ण लाभच घेत होते. त्यांचा युक्तिवाद कायद्याच्या चौकटीत योग्य होता आणि तरीही सरकारचेही निदान बरोबरच होते : टिळक हे मुळातच इंग्रजी राज्याविषयी अप्रीती बाळगणारे व अप्रीती फैलावणारे होते.

– ४ –

काँग्रेस संस्थापक-पिढीची भूमिका 'नेमस्त' म्हणून ओळखली जाते. नेमस्त म्हणजे कचखाऊ, भित्रे असा अर्थ टिळकांमुळे मराठी ब्राह्मणी मध्यमवर्गीय सुशिक्षितांमध्ये खोलवर रुजलेला आहे. गोखल्यांना उद्देशून 'कच्चा बोरू' असा शब्दप्रयोग त्यांनी केला. गोखल्यांची कुचेष्टा करणारी गीते गणेशोत्सवी मेळ्यांमधून अनेक वर्षे म्हटली गेली. पण गोखल्यांचे स्वतःचे वर्तन टिळकांइतकेच, किंबहुना काकणभर अधिकच, धैर्यवान झाले हे आपण पाहिले. तुरुंगात जाऊन आपल्या 'नायक'त्वात भरच पडेल याची जाण टिळकांना होती तर माफी मागितल्याने समाजात दीर्घकाळ छी थू होईल याचे पूर्ण भान गोखल्यांना होते. आणि, कचखाऊ, भित्रे वर्तन नेमस्त पक्षातील मंडळींनी अधिक केले की 'जहाल' पक्षातील, असा प्रश्न केला तर, टिळक व गोखले यांच्यासारखी मूठभर धैर्यवान व त्यागी माणसे सोडली तर, दोन्ही पक्षांतील पुढारी व अनुयायी मंडळी सारखीच कचखाऊ व भित्री होती, अशा निष्कर्षावर येणे भाग पडते. १९०८ ते १९१४ मंडालेच्या तुरुंगात शिक्षा भोगून परतल्यावर टिळकांना याची विषादपूर्ण प्रचीती यायची होती.

रानडे यांच्या अर्थाने नेमस्तपणा म्हणजे आपल्यातील उणीवा, दोष जाणून ध्येयपूर्तीच्या दिशेने सर्वांगीण बांधणी करीत एक एक टप्पा पूर्ण करीत वाटचाल करीत राहणे. भावनाविवश वा विकारवश होऊन प्रतिसाद न देणे. सारासार विवेकाचे नियंत्रण कधी ढिले पडू न देणे, क्षमाशील व उदार मनोवृत्तीनेच इतरांशी वर्तन करणे. दादाभाई, रानडे व गोखले हे या अर्थाने नेमस्त होते.

पारतंत्र्याच्या साखळदंडांनी जखडून पडलेल्या मातेचे चित्र उभे करून देशभक्तीची भावना चेतविण्यावर तत्कालीन 'जहालां'चा भर होता. संवेदनाशील मनाच्या तरुणांच्या मनात तीव्र प्रक्षोभ निर्माण होईल अशीच इंग्रजी राज्याची या देशातली चाल होती. या चालीस रोखून, वळण बदलविण्यास राजवटीस भाग पाडण्याऐवजी येथील राजवटीची पुष्टीच ब्रिटिश पार्लमेंट करीत राहिल्याने प्रक्षोभात भर पडत गेली.

देशी भाषेतील वृत्तपत्रे ही त्या काळातली एक मोठी शक्ती होती. ही गोष्ट 'केसरी'च्या एका उदाहरणावरूनही समजू व पटू शकेल. 'केसरी' सारखी भूमिका पार पाडणारी वृत्तपत्रे इतरही प्रांतांमध्ये होती. त्यांना मोठा वाचकवर्गही लाभलेला होता. तरुण सुशिक्षितांच्यात हळूहळू बेकारीचे प्रमाण वाढत होते; म्हणजेच उच्च शिक्षण घेतल्यावर ज्या प्रकारच्या नोकरी-व्यवसायाची अपेक्षा निर्माण होत होती त्या प्रकारच्या नोकऱ्यांमध्ये सहजपणे शिरकाव होऊ शकत नव्हता, आणि व्यावसायिक संधी फार सीमित होत्या. या तरुणांना जहाल युक्तिवादाचे आकर्षण चटकन पडणे स्वाभाविक होते.

आयर्लंड, रशिया, इटाली अशा देशांतील घडामोडींची हकीकत कानावर पडत असल्याकारणाने, सशस्त्र क्रांतिकारक 'गुप्त मंडळ्या' स्थापन करण्याचे, बाँब तयार करण्याची विद्या शिकून घेण्याचे राजकारण तरुणांना आकृष्ट करीत होते. ही तरुण पिढी टिळकांनतरची, त्यांच्याहून १५/२० वर्षांनी लहान असलेली पिढी होती. 'केसरी'सारख्या व त्याहूनही उग्र, प्रक्षोभक जहाल वृत्तपत्रांच्या वाचनातून ज्यांची मने घडली होती अशी पिढी. चाफेकर बंधू, सावरकर, तसेच 'अभिनव भारत' व 'अनुशीलन समिती' या संघटनांमधील तरुणांची पिढी. पण जहाल भूमिका घेणाऱ्या पुढाऱ्यांपाशी 'दरबारी राजकारणा'ला पर्याय नव्हता. तुरुंगातून सुटून आल्यानंतर टिळक परत मुंबई इलाख्याच्या कायदेकौन्सिलच्या निवडणुकीस उभे राहिले, ही या वस्तुस्थितीची द्योतक अशीच घटना आहे.

पेच असा होता : जहाल पुढाऱ्यांच्या भाषणांमुळे वा लेखनामुळे निर्माण होणाऱ्या, वाढणाऱ्या प्रक्षोभामधून जनआंदोलन उभे राहू शकत नव्हते. ज्या मुद्द्यावरून इहसर्वस्वाची होळी करावयास

मोठ्या संख्येने मध्यमवर्गीय सुशिक्षित माणसे बेधडकपणे तयार होतील असा, यांना 'बेभान' करणारा मुद्दा कोणता होता? रयतेचे दैन्यदारिद्र्य, तिचा वाढता कर्जबाजारीपणा, तिच्या हातातील पारंपरिक उद्योगांवर कोसळलेले अरिष्ट हे मुद्दे या मध्यमवर्गाच्या हृदयात प्रक्षोभ निर्माण करीत नव्हते; आणि केलाच तर तो प्रक्षोभ आपल्या वर्गीय वा व्यक्तिगत स्वार्थाचा त्याग करायला प्रवृत्त करण्याइतका खोलवर पोचत नव्हता. १८९५ च्या पुण्याच्या कॉंग्रेस अधिवेशनाच्या वेळी महात्मा फुले यांचे सहकारी भालेकर त्यांनी मंडपासमोर केलेल्या प्रतीकात्मक निदर्शनाची दखल घेताना टिळकांनी 'कोण्या एका गृहस्थाने' अशा शब्दांत त्या निदर्शनाची कुत्सित भावाने दखल घ्यावी इतका भावनात्मक व व्यावहारिक दुरावा शूद्रातिशूद्र रयत व बुद्धिजीवी उच्चवर्णीय मध्यमवर्ग यांच्यात होता. तसेच नोकऱ्याव्यवसायांसाठी हा वर्ग ब्रिटिश राज्याने उभ्या केलेल्या प्रशासन यंत्रणेवर व व्यापारउदीमावरच अवलंबून असल्याने, या मागण्यांच्या संदर्भात दरबारी राजकारणच या वर्गाच्या पथ्यावर पडणारे होते. म्हणजे स्वार्थापरी स्वार्थही साधे, आणि सरकारविषयी जहाल बोलण्याचा, जहाल लेखनाला टाळी देण्याचा परमार्थही साधे. त्यामुळे टिळकासारख्यांनाही, सर्व जहाल युक्तिवाद केल्यावरही, अखेरीस, १९०४ सालच्या लेखातही, राजनिष्ठ दरबारी राजकारणच उचलून धरावे लागले होते. अर्जविनंत्यांच्या राजकारणाला 'भिकेचे' राजकारण म्हटले खरे, पण त्यापलीकडचे राजकारण करण्यासाठी मुद्दाही सापडत नाही व मार्गही दिसत नाही अशी जहालांची स्थिती होती.

जहाल व नेमस्त यांच्या धारणा व मनोवृत्ती यांत मूलभूत अंतर होते, पण मामला तेथेच अटकून पडत होता.

— ५ —

बंगालच्या फाळणीने बंगाली नवशिक्षित 'भद्रलोक' समाजाचा घोर अपमान झाला. इतकेच नाही तर, त्याच्या खच्चीकरणासाठी जाणूनबुजून त्याच्या वर्मी घातलेला तो घाव होता. बंगाली भद्रलोक समाजाला ही गोष्ट सहन झाली नसेल तर नवल नाही. इहसर्वस्वाची होळी करण्यास त्यांच्यातील लहानथोर पुढे आले. रवींद्रनाथ टागोर आपली अलिप्तता सोडून राजकीय चळवळीत उतरले. त्यांनी जी गीते रचली त्यांना उद्देशून प्रख्यात आधुनिक कवी एझरा पाऊंड यांनी म्हटले आहे : 'Tagore has sung Bengal into a nation.'

वंगभंग चळवळीने स्वराज्य, बहिष्कार, स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण ही चतुःसूत्री दिली. या प्रसंगी बंगाली लोकांनी रस्त्यावर येऊन राजकारण केले; हिंदुस्थान सरकारच्या सत्तेला सरळ सरळ आव्हान दिले.

वंगभंग चळवळीचा विस्तार साऱ्या देशभर करावा ही जहालांची आकांक्षा होती. इंग्रजी राज्याविषयी अप्रीती उग्र स्वरूपात उघडपणे अभिव्यक्त होण्यात त्यांना अर्थातच रस होता. ब्रिटिश मालावर बहिष्कार हा कार्यक्रम एका मर्यादित उद्दिष्टापुरता व मर्यादित क्षेत्रात उचलून धरण्यास नेमस्तांची तयारी होती. गोखल्यांनी इंग्लंडातील त्या वेळच्या आपल्या भाषणात बंगाली लोकांनी घातलेल्या बहिष्काराचे, वंगभंग चळवळीचे समर्थन केलेले आढळते. बंगालची फाळणी हा अन्याय्य निर्णय असून तो बदलून घ्यायला हवा याविषयी त्यांचे एकमत होते. पण बंगालच्या फाळणीचे निमित्त करून इंग्रजी राज्यावरील निष्ठेवरच मुळातून घाव घालण्यास, बहिष्काररूपी शस्त्राच्या घावाने ब्रिटिश साम्राज्याशी असलेला आपला संबंध खच्ची करण्यास त्यांचा विरोध होता. इंग्रजी राज्याविषयी अप्रीतीचा सरसकट फैलाव करणे त्यांना आत्मघातकी वाटत होते.

जहाल व नेमस्त यांच्यामधील संघर्ष याला आणखी एक परिमाण होते. कॉंग्रेस संघटनेची सूत्रे कोणाच्या हाती असावीत, कॉंग्रेसचे नेतृत्व कोणी करावे यावरूनचाही तो झगडा होता. लाला लजपतराय, अरविंद घोष, लोकमान्य टिळक, बिपिनचंद्र पाल प्रभृतींना जुन्या पिढीच्या हातून संघटना काढून आपल्या हाती घ्यावयाची होती. सर्व सूत्रे आपल्या हाती ठेवून चालणाऱ्या फेरोझशहा मेथा यांच्या दादागिरीला मंडळी विशेषच उबगलेली होती असे दिसते. वंगभंग चळवळीचा उपयोग कसा करून घ्यावा यावरूनच्या मतभेदाची त्यात भर पडली.

१९०५ ते १९०७, दोन वर्षे दोन तटांमध्ये रस्सीखेच चालली होती. शेवटी १९०७ साली सुरतेस दोरी मध्ये तुटली, आणि काँग्रेसची दोन शकले झाली. १९०७ ते १९१६ अधिकृत काँग्रेस नेमस्तांच्या हाती राहिली. तिचे नेतृत्व गोखल्यांकडे आले. काँग्रेसमधून बाहेर फेकल्या गेलेल्या 'न्यू पार्टी'चे नेतृत्व टिळक व अरविंद घोष यांच्या हाती होते.

सरकारच्या दडपशाहीपुढे वंगभंगाची चळवळ १९०८ पावेतो ओसरल्यासारखी झाली असल्यास नवल नाही. वंगभंगाच्या चळवळीचे व्यापक राष्ट्रीय जनआंदोलनात रूपांतर करण्यात जहालांना यश आले नाही. स्वराज्य, बहिष्कार, स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण या चतुःसूत्रीचा उद्घोष जरूर झाला, पण व्यवहारात पाऊल फार पुढे पडले नाही. टिळक व अरविंद घोष, वेगवेगळ्या प्रकारे, दूर गेल्यावर 'न्यू पार्टी'त जोर असा काही उरला नाही. पण एका वेगळ्या पातळीवर मुद्द्याची गोष्ट घडून आलेली होती. वंगभंगाच्या चळवळीबरोबर वयात आलेल्या पिढीच्या मनात इंग्रजी राज्याविषयी, ते एक परकीयांचे राज्य आहे व त्याच्याशी आपला केवळ शत्रुत्वाचाच संबंध राहू शकतो, या दोन गोष्टी पक्क्या मुरल्या.

अर्जविनंत्यांच्या राजकारणाकडे पाठ फिरवून व्यापक जनआंदोलनांच्या दबावामधून स्वराज्याच्या दिशेने वाटचाल करण्याचा जहाल पण निःशस्त्र प्रतिकाराचा मार्ग वंगभंगचळवळीच्या रूपाने स्पष्ट झाला. पण त्या मार्गावरून साऱ्या देशाची वाटचाल घडवून आणावयास लागणारे संघटन, नेतृत्व चळवळीपाशी नव्हते; तसे मुद्देही चळवळीसमोर उपस्थित नव्हते. याचा अर्थ पुरेसा स्पष्ट करण्याची आवश्यकता आहे. रयतेचे आर्थिक, सामाजिक व राजकीय प्रश्न काही कमी तीव्र नव्हते. त्यांची मांडणी १८८६ ते १९०५ या काळात काँग्रेसच्या व्यासपीठावरून सातत्याने केली जात होती. पण ते मुद्दे घेऊन रयतेच्या व्यापक चळवळी उभारण्यासाठी नवशिक्षित बुद्धिजीवी व रयत यांच्यामध्ये भावनात्मक अनुबंध असणे आवश्यक होते, ते नव्हते. नवा मध्यमवर्ग आणि रयत यांचे आर्थिक, राजकीय हितसंबंध एकच नव्हते ही गोष्ट खरी; पण खरी अडचण ती होती असे म्हणता येत नाही. याबाबतची परिस्थिती तीच कायम राहून १९२० पासून पुढच्या काळात याच बुद्धिजीवी मध्यमवर्गीयांनी कामगार–किसान संघटना बांधल्या, आंदोलने उभी केली. तात्पर्य जसे की, या दोन वर्गांमध्ये असलेले सामाजिक अंतर उल्लंघून जाण्याची मानसिक–भावनात्मक तयारी बुद्धिजीवी नवशिक्षित वर्गाची झालेली नव्हती. त्यामुळे रयतेचे प्रश्न घेऊन जनआंदोलने उभारण्याची गोष्ट होऊ शकत नव्हती. त्यासाठी बंगालच्या फाळणीसारखे, अस्मितेवर मर्माघात करणारे देशव्यापी मुद्देच उपस्थित होण्याची गरज होती. बंगालची फाळणी हा मुद्दा त्या दृष्टीने एका मर्यादेपर्यंतच उपयोगी पडला.

– ६ –

म्हणून वंगभंगाची चळवळ झाल्यानंतरही अर्जविनंत्यांच्या मार्गाने राजकारण करण्याची गरज उरलीच. किंबहुना १९२० नंतरच्या काळात डोकावून पाहिले तरी आपणास असे आढळते की, अर्जविनंत्यांचे राजकारण संपुष्टात आले तरी, कायदेकौन्सिलांचे तसेच वाटाघाटी व शिष्टाईचे राजकारण करण्याची गरज टिकूनच राहिली. याचे आणखी एक कारणही जाणून घेण्यासारखे आहे. हिंदी सुशिक्षित जसजसे पात्र बनतील तसतसे स्वराज्याचे अधिकार क्रमशः त्यांच्या हाती सोपविण्याची नैतिक व प्रबुद्ध भूमिका ब्रिटिश राज्यकर्त्यांनी पूर्णपणे कधीच सोडून दिली नाही. जगदोद्धाराचे जीवितकार्य पार पाडण्याचा भार आपणावर आहे, व या कार्याचा एक भाग शहाणे करून हिंदवासीयांच्या हाती कारभार सोपविणे हा आहे, ही आत्मप्रतिमा सर्वस्वी खोटी नव्हती. ब्रिटिश साम्राज्यवाद ही त्यामुळेच पूर्णपणे नकारात्मक अशी गोष्ट नव्हती; अगणित ब्रिटिश व्यक्तींचे व्यक्तित्व व जीवन यांना एक उदात्त नैतिक परिमाण साम्राज्यवादाच्या कालखंडात प्राप्त झाले. या आत्म-प्रतिमेशी त्यांचे सत्त्व व इमान पण निगडित होते. त्यामुळे कायदेकौन्सिलांचे व शिष्टाईचे राजकारण अखेरपर्यंत अर्थपूर्ण राहिले. भारतीय स्वातंत्र्यचळवळीला ते परिमाण कधी पूर्णपणे धिक्कारता आलेही नसते ही गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. शेवटी, स्वातंत्र्याचे राजकारण हे

अनुक्रमणिका

प्रतिपक्षीयाच्या भूमिकेला प्रतिसाद या स्वरूपाचे असते.

यातून निघणारा निष्कर्ष असा की, कायमचे व केवळ जहाल ( जनआंदोलनात्मक वा सशस्त्र दहशतवादी) राजकारण करीत राहण्याची कुवत तत्कालीन जहाल पक्षाच्या ठिकाणी नव्हती; तत्कालीन परिस्थितीतही त्याच्या शक्यता नव्हत्या. म्हणजेच नेमस्तांच्या मार्गाने राजकारण करणे ही जहाल पक्षाचीही व्यावहारिक गरज होती. आणि ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या आत्मप्रतिमेमुळे या राजकारणाला वठविण्यासारखी एक अर्थपूर्ण भूमिकाही होती.

नेमस्तांच्या हातातून काँग्रेस हिसकावून घेण्याच्या नादात म्हणा किंवा संस्थापक पिढीवर मात करून दाखविण्याच्या ईर्ष्येच्या कैफात म्हणा जहालांच्या ध्यानातून ही गोष्ट सुटली आणि सुरतेस वेळीच त्यांनी आवरते घेतले नाही. नेमस्त मार्गाने राजकारण करणाऱ्या काँग्रेसच्या अंतर्गत दबाव गट म्हणूनच जहालांना एक अर्थपूर्ण भूमिका होती. काँग्रेसपासून फुटून वेगळे झाल्यावर त्यांची कोंडी होणे अटळ होते. इंग्रज राज्यकर्ते त्यांच्याशी संवाद करायला तयार नव्हते, आणि वंगभंग चळवळ ओसरल्यावर सातत्याने करता येण्यासारखा दुसरा पर्यायी कार्यक्रम त्यांच्यापाशी नव्हता. किंवा, असे म्हणायला हवे की, स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण हे स्वराज्यसाधनेचे पर्यायी कार्यक्रम राबविण्याइतकी जहालांचीच या कार्यक्रमांवर निष्ठा नव्हती.

समजा टिळक तुरुंगात डांबले गेले नसते तर, वंगभंग चळवळ ओसरल्यावर, टिळकांनी जहाल भूमिका पुढे कशी रेटली असती ? १९१४ साली मंडालेहून सुटून आल्यानंतरची त्यांची भूमिका, कसेही करून काँग्रेसमध्ये प्रवेश करण्याची राहिली, ही गोष्ट ध्यानात घेता, नेमस्तांच्या मार्गानेच राजकारण करण्याचा आता काळ आला आहे, असा निष्कर्ष त्यांनी काढला असता, असे म्हणावयास जागा आहे. गोखल्यांच्या मृत्यूनंतर, १९१६ साली काँग्रेसमध्ये प्रवेश केल्यावर टिळकांचे काँग्रेसवर प्रभुत्व प्रस्थापित व्हायला वेळ लागला नाही. पण १९१६ ते १९२० या काळात त्यांचे राजकारण गोखल्यांना अनुसरणारेच राहिले. व्यापक जनआंदोलनांच्या उभारणीचे कार्य करण्यासाठी समर्पित वृत्तीने जीवन वाहून टाकणारी चारपाच हजार माणसे मिळवू शकणारा नेता आणि तशी परिस्थिती, दोन्ही गोष्टी समोर नसताना जहाल राजकारणाला खरा वाव नाही ही गोष्ट लोकमान्यांनी अनुभवाने जाणली.

– ७ –

१९०१ मध्ये इंपीरियल कौन्सिलमध्ये निवडून गेल्यानंतर गोखल्यांच्या हाती नेमस्त पक्षाचे नेतृत्व तीनचार वर्षांत, वयाच्या अवघ्या चाळिसाव्या वर्षी आले. १९०१ ते १९०५ त्यांची गाठ कर्झन यांच्याशी पडली. गोखल्यांचा ' बोरु कच्चा ' असता तर कर्झन यांच्यापुढे ते गर्भगळीतच व्हायला हवे होते. गोखले गाजले ते त्यांच्या स्पष्टवक्तेपणामुळे, कर्झन यांच्या डोळ्यास डोळा भिडविणारा युक्तिवाद करण्याच्या क्षमतेमुळे. ब्रिटिश साम्राज्याची व पोलादी चौकटीच्या प्रशासन यंत्रणेची सत्ताच एवढी निरंकुश व सर्वंकष होती की गोखल्यांची जीत होणे शक्य नव्हते. पण त्यांचा पराभव करणे, मानमरातबांच्या जोरावर त्यांना मऊसूत यायला लावणे सरकारला जमले नाही.

बंगालची फाळणी अमलात आली तेव्हा गोखले इंग्लंडमध्ये होते. तेथील व्याख्यानांमध्ये त्यांनी वंगभंगाची चळवळ उचलून धरली. मँचेस्टरला त्यांनी दिलेल्या व्याख्यानात त्यांची भूमिका सामर्थ्याने स्पष्ट होते. ब्रिटिश कापडावरील बहिष्काराचा फटका तुम्हाला बसला आहे याची मला कल्पना आहे असे स्पष्ट करून गोखले म्हणाले, " हिंदुस्थान सरकार, भारतमंत्री आणि ब्रिटिश पार्लमेंट यांच्याकडे बंगाली लोकांनी दाद मागूनही त्यांचे कोणी ऐकले नाही तर त्यांनी काय करावे ? सहा हजार मैलांवरील तुम्हा मतदारांचे लक्ष वेधणे फार अवघड आहे याचा त्यांना अनुभव आहे." गोखले पुढे म्हणाले, " तुम्ही संतापला आहात याची मला खंत नाही. ते इष्टच आहे. मात्र तो राग असाहाय्य रयतेकडे न वळता हिंदुस्थानातल्या ब्रिटिश अधिकाऱ्यांकडे वळू द्या."

" भारतातील राजवटीचे खरेखुरे जुलमी स्वरूप एकदा दिसले की सगळे ब्रिटिश नागरिक एकमताने तो जुलूम थांबवण्यासाठी पावले उचलतील." असा विश्वास त्यांनी याच व्याख्यानात प्रकट केला. १९०५

साली काँग्रेसच्या अध्यक्षपदाकरून त्यांनी कर्झन-शाहीची तुलना औरंगजेबाच्या जुलमी राजवटीशी केली ही गोष्टही सुप्रसिद्ध आहे.

भारतातील ब्रिटिश नोकरशाहीवर इंग्लंडमधून नियंत्रण ठेवणे जवळपास अशक्य आहे, कारण तेवढा वेळही पार्लमेंटला नाही आणि आवश्यक ते ज्ञानही नाही; यासाठी हिंदुस्थानातील लोकांनाच अधिकार देण्याची गरज त्यांनी सांगितली. कॅनडा, ऑस्ट्रेलिया या वसाहतींच्या धर्तीवर हिंदुस्थानलाही साम्राज्यांतर्गत स्वायत्तता व स्वराज्याचे अधिकार मागण्यासाठी आपण आलो आहोत, अशी आपली भूमिका त्यांनी स्पष्ट केली.

'हे काम एका दिवसात पूर्ण होणारे नाही, पण त्याची सुरुवात आज झाली पाहिजे; मात्र इंग्लंडशी असलेला संबंध न तुटता ही गोष्ट घडून यावयास हवी. ही गोष्ट इंग्लिश मतदार व राजकारणी यांच्या साहाय्याने घडून येईल, कारण एका विचार-प्रणालीशी ते एकनिष्ठ आहेत. योग्य आवाहनास त्यांची सदसद्विवेकबुद्धी प्रतिसाद दिल्याखेरीज राहणार नाही' या रानडेप्रणीत भूमिकेत अंतर पडले नव्हते. त्याच वेळी, लोकांच्या उग्र स्वरूपाच्या चळवळीचा आणि बहिष्कारासारख्या साधनाचा निःसंदिग्ध पाठपुरावा त्यांनी खुद्द इंग्लंडमध्ये केला होता. हिंदुस्थान सरकारवर टीका करताना गोखल्यांनी कोणतेच प्रहार करावयाचे बाकी ठेवले नव्हते.

– ८ –

१९०५ च्या अखेरीस इंग्लिश निवडणुकीत लिबरल पक्ष विजयी झाला आणि मोर्ले भारतमंत्री झाले. लिबरल पक्षाच्या कारकीर्दीत हिंदी लोकांना अधिकार देण्याच्या दृष्टीने एक पाऊल पुढे पडणार ही गोष्ट निश्चित होती. अधिकार देण्यावरून येथील सनदी नोकरशाही जास्तीत जास्त अडवणुकीचे धोरण अंगीकारील ही गोष्ट तितकीच स्पष्ट होती. भारतमंत्र्यास सल्ला देणारे 'इंडिया कौन्सिल'ही जुन्या सनदी नोकरांच्या वर्चस्वाखाली होते. त्यामुळे भरीव सुधारणा पदरात पाडून घ्यावयाच्या, तर अत्यंत कौशल्याने शिष्टाईचे राजकारण करण्याची गरज होती. ही कामगिरी गोखल्यांवर येऊन पडली.

वंगभंगाच्या चळवळीच्या पार्श्वभूमीवर शिष्टाईचे काम गोखल्यांना यशस्वीपणे पार पाडावयाचे होते. हिंदुस्थानात जेव्हा जेव्हा लोकक्षोभ प्रकट होई तेव्हा तेव्हा येथील सनदी नोकरशाही त्याकडे बोट दाखवून प्राधिकारशाही राजवटीची आवश्यकता आग्रहाने पुढे मांडीत असे. इंग्रजी राज्यच उलथून पाडण्याचा येथील नवशिक्षित राजकारण्यांचा डाव आहे; इंग्लिश राजकारण्यांच्या एका गटाच्या प्रभावाखाली हिंदी लोकांना अधिकार देऊन फाजील लाडावून ठेवल्यामुळेच हे धाडस ते करू धजत आहेत; त्यांना दिलेल्या फाजील स्वातंत्र्याचा संकोच करूनच त्यांचा हा डाव हाणून पाडता येईल, असा त्यांचा युक्तिवाद असे.

हिंदुस्थानवरील इंग्रजी राज्य धोक्यात आणूनही स्वराज्याच्या अधिकारांचा विस्तार करावा या गोष्टीसाठी ब्रिटिश पार्लमेंटचे मन कोणताच गट वळवू शकत नव्हता. 'राज्य सुरक्षित आहे' याची खात्री पटवून देतदेतच सुधारणांना मंजूरी मिळवावी लागत असे. वंगभंगाची चळवळ ही सनदी नोकरशाहीच्या झारवादी गैरकारभाराचा परिपाक आहे, इंग्रजी राज्य उलथून पाडण्याचे राजकारण त्यामागे नाही, हे पटवून देणे आपल्या शिष्टाईच्या यशस्वितेसाठी आवश्यक आहे याची पुरेपूर जाणीव गोखल्यांना होती.

१९०५ ते १९०८–९ ही चारपाच वर्षे गोखले एकटेच एकाच वेळी किती आघाड्यांवर लढत देत होते ती गोष्ट पाहण्यासारखी आहे. भारतमंत्री मोर्ले यांचा सुधारणांबाबतचा उत्साह टिकवून धरावयाचा, सुधारणा भरीव केल्या जाव्यात म्हणून दबाव कायम ठेवावयाचा, सनदी नोकरशाहीचा प्रभाव मोडून काढावयाचा, ही एक आघाडी. दुसऱ्या आघाडीवर हिंदुस्थानातली आपली 'लीडर ऑफ द ऑपोझिशन' ही जबाबदारी वरिष्ठ कायदेकौन्सिलात नेकीने पार पाडावयाची. काँग्रेससंघटनेत, एकीकडे, फेरोझशहा मेथा व जुनी पिढी आणि जहाल यांच्या रस्सीखेचीत काँग्रेस दुभंगणार नाही यासाठी प्रयत्न करीत राहावयाचे; दुसरीकडे, जहालांच्या बोलण्यामुळे, मागण्यांमुळे घटनात्मक सुधारणांना आवश्यक ते वातावरण टिकवून धरण्यात येणारी अडचण निवारावयाची, म्हणजेच इंग्रजी राज्यच धोक्यात येत



अनुक्रमणिका

आहे हा सनदी नोकरशाहीचा आरोप मतलबी आहे, खोटा आहे, हे इंग्रजी राज्यकर्त्यांना पटावे यासाठी काँग्रेसमध्ये एक फळी उभी ठेवावयाची व देशाचे नेतृत्व करावयाचे. जहालांच्या आक्रमक हिंदू सांस्कृतिक राष्ट्रवादामुळे मुस्लिम समाज आणखीच फुटीर व आग्रही बनत चालला होता. त्याच्याशी संवाद साधण्याची, नवशिक्षित मुसलमान तरुणांना एकात्म राष्ट्रवादी प्रवाहात आणण्याची जबाबदारीही गोखल्यांच्या शिरावर येऊन पडली होती.

'नेटाची गोडीगुलाबी' असे टिळकांनी गोखल्यांच्या राजकारणाचे वर्णन केले आहे. 'शिष्टाईचे सन्मान्य राजकारण' आणि 'नेटाची गोडीगुलाबी' यांत अंतर आहे हे आपण त्यामुळे ध्यानात घेत नाही. या काळात व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो गोखल्यांविषयी काय लिहितात हे पाहण्यासारखे आहे. १९०७ साली पंजाबमध्ये स्थानिक कारणास्तव असंतोषाचा स्फोट झाला. १८५७ च्या उठावाच्या वेळी पंजाबच्या राजनिष्ठेने इंग्रजी राज्यास वाचविले होते. १९०७ साली उठावास पन्नास वर्षे पूर्ण होत होती. पंजाबात चळवळ झाली तेव्हा पुन्हा उठाव करण्याचा हा कट आहे, असा स्वत:चा समज येथील सनदी नोकरशाहीने करून घेतला. पंजाबही राजद्रोही झाला हे पाहून त्यांना मोठा धक्का बसला. लाला लजपतराय व अजितसिंग या दोघांना हद्दपार करण्यात आले. या हद्दपारीच्या विरोधात गोखल्यांनी आपला आवाज उठविला तेव्हा गोखले हे अस्तनीतला निखारा तर नाहीत ना, असे मोर्ले व मिंटो यांना वाटू लागले. गोखल्यांची वरिष्ठ कायदेकौन्सिलवरची निवडणूक आपण रद्द केली नाही हे चुकले, असे मिंटोंनी लिहिले. अशा तऱ्हेने, शिष्टाईचे राजकारण ही सुळावरची पोळी होती, तारेवरची कसरत होती.

हिंदी लोकांना अधिकारांचा आणखी एक हप्ता दिला पाहिजे असा भारतमंत्री मोर्ले यांचा खरोखरच मनोदय होता का, की केवळ गोखल्यांना झालेला तो आभास होता? गोखल्यांचे चरित्रकार श्री. बलराम नंदांनी दिलेला, 'भारतातील राजकीय अस्वस्थता व सुधारणांची आवश्यकता यांकडे मिंटो यांचे लक्ष वेधण्याचा प्रयत्न मोर्ले करीत होते आणि कालहरण करण्याचा व सुधारणांमध्ये पाणी घालून त्या पातळ करण्याचा प्रयत्न धूर्तपणे मिंटो करीत होते' हा अभिप्राय लक्षात घेण्यासारखा आहे.

भारतमंत्री मोर्ले यांचा सुधारणांबाबतचा उत्साह व आग्रह टिकवून ठेवावयाचा आणि सनदी नोकरशाहीचे डावपेच निष्प्रभ ठरवावयाचे ही कामगिरी पार पाडण्याची जबाबदारी आपल्यावर आहे ही गोष्ट गोखल्यांनी ओळखली.

गोखल्यांनी शिष्टाईचे राजकारण केले नसते तरी, स्वत:ची एक विशिष्ट प्रतिमा जपण्यासाठी मोर्ले यांनी अधिकारांचा एक हप्ता हिंदी लोकांच्या पदरात टाकलाच असता ही शक्यता नाकारता येत नाही; पण हिंदी लोकांचे दडपण घटनात्मक सुधारणांच्या बाजूने कायम ठेवण्यासाठी आवश्यक ती शिष्टाई गोखल्यांनी एकट्याने केली हे विसरणे कृतघ्नपणाचे होईल. जहालांच्या राजकारणाने नेमका उलट परिणाम घडून येत होता. घटनात्मक सुधारणांचा आग्रह राखणे कितपत योग्य आहे अशी शंका मोर्ले यांच्या मनात त्यामुळे घर करून राहिली. या शंकेवर मात करून सुधारणांची गरज त्यांना पटवून देण्याचे काम गोखल्यांना हिंदी लोकांच्या वतीने करावे लागत होते. १९०६ साली गोखले इंग्लंडमध्ये गेले होते. भारतात परतण्यापूर्वी १ ऑगस्ट १९०६ रोजी त्यांची व मोर्ले यांची अखेरची मुलाखत झाली. सुधारणांच्या बाबतीत पुढील दोन वर्षांत आपणास ( मोर्ले व मिंटो यांना मिळून ) यश यावयाचे असल्यास 'नेटिव्ह वृत्तपत्रे व पूर्व बंगालमधील चळवळये यांना आळा घातला गेलाच पाहिजे.' असे मोर्लेंनी बजावले.

ही शिष्टाई करताना गोखल्यांनी हिंदुस्थानातील राजवटीवर परखड टीका करण्याचे थांबवले नाही किंवा कायदेकौन्सिलातील 'लीडर ऑफ द ऑपोझिशन'ची भूमिका नेटाने पार पाडण्याचे थांबविले नाही. पूर्व बंगालमध्ये फुल्लर यांच्या दडपशाहीमुळे बंगाली हिंदू भद्र लोकांचा लोकक्षोभ शिगेला पोचला आणि देशातले वातावरण जहालांना अधिक अनुकूल झाले. गोखल्यांची कामगिरी अधिक अवघड झाली १९०६ व १९०७ ही वर्षे काँग्रेस संघटनेच्या इतिहासात अटीतटीची गेली. इकडे सबंध वर्षे उलटले तरी

लिबरल पक्षाच्या राजवटीने, लोकक्षोभ निवळेल अशी एकही भरीव गोष्ट केली नाही. सनदी नोकरशाहीच्या दबावाखाली मोर्लेची गती कल्पनेपेक्षाही मंद झाली. १९०७ हे वर्ष आणखी वाईट गेले. लाला लजपतराय व अजितसिंग यांच्या हद्दपारीमुळे, त्या वेळच्या दडपशाहीमुळे परिस्थिती अधिकच बिघडली. जहालांना अधिक उठाव आला आणि सनदी नोकरशाहीची मोर्ले यांच्यावरील पकड वाढली. गोखल्यांनी लजपतराय यांच्या हद्दपारीविरुद्ध जाहीर निषेधाची भूमिका घेतली. सनदी नोकरशाहीवर त्यांनी जळजळीत टीका केली. मोर्लेंचासुद्धा संशय व रोष ओढवून घेण्याची धिटाई त्यांनी दाखविली. सुरतच्या बखडयाआधी दहा आठवडे गोखल्यांनी वेडरबर्न यांना लिहिले, " जर फूट पडलीच तर अनर्थ ओढवेल; कारण नोकरशाही दोन्ही गटांवर अनायासे वरवंटा फिरवील. "

— ९ —

१९०५ ते १९१० या पाच वर्षांच्या काळात घटनात्मक सुधारणांचा पुढचा हप्ता देण्याची कारवाई चालली होती. वंगभंगाच्या चळवळीला पाठिंबा देत असताना, तिचे समर्थन करीत असताना त्या चळवळीच्या रूपाने अभिव्यक्त झालेला प्रक्षोभ आटोक्यात ठेवावा असा नेमस्तांचा प्रयत्न होता. सुधारणा पदरात पाडून घ्यायच्या तर लिबरल मंत्रिमंडळ व ब्रिटिश पार्लमेंट यांचे मन बिथरवून टाकणाऱ्या चळवळी वा घटना भारतात उत्पन्न होत राहता कामा नयेत याची आवश्यकता नेमस्तांना वाटत होती. जहालांना सुधारणा व्हायला तर हव्या होत्या पण वातावरण निवळलेले ठेवावे याविषयी ते बेपर्वा होते. वंगभंग चळवळीचा उपयोग काँग्रेस अंतर्गत नेतृत्वाच्या झगडयात पूर्णपणे करून घेण्यावर त्यांचा असमंजस भर राहिला. सुरतेला काँग्रेसमध्ये जी फूट पडली त्याचा सर्वाधिक फायदा ब्रिटिश सनदी नोकरशाही व स्वराज्यविरोधी राजकारणी यांना झाला.

काँग्रेस दुभंगण्याचे दुष्परिणाम फार दूरवर पोचणारे झाले. लोकनियुक्त प्रतिनिधींचे प्रमाण वाढवा, त्यांच्या हाती जास्त अधिकार द्या, वरिष्ठ पदांवर, इंडिया कौन्सिल व गव्हर्नर-व्हाइसरॉयची कार्यकारी मंडळे यांच्यावर हिंदी सभासदांच्या नेमणूका करा या मागण्यांचा विचार व्हावा असे वाटत असेल तर आधी तुमच्यातील जहालांना आवरा, असे म्हणण्याची संधी ब्रिटिश राजकारणी मंडळींना प्राप्त झाली. जहालांची दडपणूक बिनदिक्कतपणे करता आली. आणि ती होत असताना, ती करता यावी म्हणून वृत्तपत्रांवरील जाचक निर्बंध वाढविणारा, सभांवरील निर्बंध वाढविणारा कायदा केला जात असताना त्यांविरुद्ध जाहीर भूमिका घेऊन आपला सन्मान व प्रतिष्ठा नेमस्तांना राखता आली नाही. जहाल आणि नेमस्त या दोन प्रवाहांच्या एकत्र राहण्यातूनच काँग्रेसची चळवळ खऱ्या अर्थाने पुढे जाऊ शकणार होती. वाटाघाटी व शिष्टाई करीत असताना सारा सुशिक्षित वर्ग आपल्या पाठीशी आहे याने नेमस्तांना बळ प्राप्त होई. त्याच्या अभावी नेमस्त लुळेपांगळे ठरले. याचा पूर्ण फायदा विरोधी शक्तींनी उठविला.

जहाल आणि नेमस्त ही फूट हिंदी सुशिक्षित वर्गाचेच दोन तुकडे करणारी ठरली. स्थूलमानाने असे म्हणता येईल की सर्व तरुण हे जहाल होते. नेमस्त पक्ष हा चाळिशीच्या पुढील वयस्कर मंडळींचा पक्ष झाला. भारतीय समाजातील नव्या मध्यमवर्गात नेमस्तांची बैठक पक्की न राहिल्याने, ब्रिटिश राज्यकर्त्यांच्यावर नेमस्त पक्षाचे परावलंबन निर्माण झाले असे या पुढच्या काळात दिसून येते. काँग्रेस संघटना व चळवळ ही केवळ राज्यकर्त्यांवर आश्रित अशा एका दुबळ्या दबाव गटात अधःपतित होऊ नये म्हणून १९०८ ते १९१५ या काळात गोखल्यांनी प्रयत्नांची शर्थ केली. हिंदू धार्मिक-सांस्कृतिक जहाल राष्ट्रवादी विचारप्रणालीच्या उत्कर्षाबरोबर मुसलमानच नव्हे तर इतरही समाज, विशेषतः पारशी, काँग्रेस चळवळीपासून दुरावू लागले होते काँग्रेसचे राष्ट्रीय स्वरूप कायम टिकावे, काँग्रेस अस्तंगत होऊ नये, उलट तिचा विस्तार उत्तर भारतात होऊन तिचा पाया विस्तृत व भक्कम व्हावा या दिशेने जवळपास एकाकीपणे केलेल्या त्यांच्या प्रयत्नांना पुष्कळ प्रमाणात यश आले.

पण खरा महत्त्वाचा दुष्परिणाम वेगळाच होता. फुटीर मुस्लिम राजकारणाला १९०५ ते १९१० या काळात जी गतिमानता प्राप्त झाली व पुष्टी मिळाली तीमधून अखेरीस देशाची फाळणी झाली.

अनुक्रमणिका

एका अर्थी, बंगालच्या फाळणीविरूद्धची चळवळ ही देशाच्या फाळणीला जन्म देणारी ठरली. काँग्रेसच्या चळवळीपासून मुस्लिम समाजाने बाजूला राहावे यासाठी सर सय्यद अहमद हे प्रथमपासून पद्धतशीरपणे मोहीमच चालवीत आले. आपल्या हितसंबंधांच्या पूर्ततेसाठी हिंदुस्थान सरकारशी सतत जुळवून घेण्याची नीती मुसलमानांनी अवलंबिली पाहिजे; जबाबदार प्रातिनिधिक राज्यसत्तेच्या प्रस्थापनेला सतत विरोधच केला पाहिजे, असे त्यांचे म्हणणे होते. पण इंग्रजी शिक्षण घेतलेल्या मुसलमानांची एक नवी पिढी स्वराज्याची आकांक्षा घेऊन उदयास आली. हिंदू कुरघोडी करतील या भयापोटी आपण कायम एकाधिकारवादी ब्रिटिश राजवटीला पुष्टी देत राहणे त्यांना अपमानास्पद वाटू लागले. हे तरुण सुशिक्षित मुसलमान काँग्रेस चळवळीकडे आकृष्ट होऊन, काँग्रेस ही पूर्णार्थाने राष्ट्रीय चळवळ बनली तर काँग्रेस आपणास भारी ठरेल ही गोष्ट ब्रिटिश अंमलदारांनी ओळखलेली होती. हिंदू-मुसलमानांमधील दुफळी व तेढ टिकून राहण्यात आपल्या राज्याची सुरक्षितता आहे हे जाणणाऱ्या ब्रिटिश अंमलदारांनी, बंगालच्या फाळणीच्या प्रस्तावाच्या चर्चेच्या वेळी, नवा पूर्व बंगाल व आसाम हा मुस्लिम बहुसंख्याक प्रांत निर्माण करण्याचे राजकारणी फायदे पुढे ठेवले होते ही गोष्ट ध्यानात घेण्यासारखी आहे.

ब्रिटिश अंमलदारांची ही चाल टिळकांच्या लक्षात १८९३ सालच्या हिंदू-मुस्लिम दंग्यांच्या वेळीच आली होती असे म्हणता येईल, व ते खरे आहे. प्रश्न असा आहे की, या चालीवर मात करून मुसलमान समाजातील सुशिक्षित वर्गास काँग्रेसच्या चळवळीत आणण्याचे निर्णायक महत्त्व टिळकांनी जाणले होते का, व यासाठी आपली नीती काय असायला हवी याचा त्यांनी काय विचार केला होता? १८९५ च्या आसपास टिळकांनी या नाजूक व स्फोटक प्रश्नांचा राष्ट्रबांधणीच्या उच्चतर भूमिकेतून विचार फारसा केलेला होता असे आढळत नाही. १९०५ नंतरच्या काळात तरी जहाल पक्षाच्या आचार-विचारात या मुद्‌द्याच्या नाजुकतेचे व स्फोटकतेचे, या मुद्‌द्याची नीट उकल होण्याच्या निर्णायक महत्त्वाचे भान आढळते का? दुर्दैवाने याचे उत्तर नकारार्थीच द्यावे लागते. वंगभंगाची चळवळ ही ब्रिटिश नोकरशाहीविरुद्धची चळवळ राहावी, मुसलमान समाजाविरुद्धची चळवळ असा तिचा विपर्यास करता येऊ नये, यासाठी कोणती पथ्ये सांभाळली पाहिजेत याची चिंता जहाल पक्षाने केली नाही. याचे एक कारण असे की, या काळातील जहाल विचारप्रणाली ही, जहालपणाचाच एक अंगभूत भाग म्हणून, धार्मिक–सांस्कृतिक पृथगात्म अस्मितेचा परिपोष करीत होती; राष्ट्राभिमान व देशभक्ती यांच्या निर्मितीसाठी प्राचीन आर्य संस्कृती, वैदिक धर्म, हिंदूंचा इतिहास यांवर आधारलेली वंशश्रेष्ठत्वाची भावना रुजविण्यावर या विचारप्रणालीचा भर होता.

वंगभंग चळवळीच्या ओघात जहालांच्या हिंदू धार्मिक-सांस्कृतिक राष्ट्रवादाच्या झालेल्या प्रकर्षाने मुसलमान समाजास काँग्रेसच्या व स्वराज्याच्या चळवळीपासून दूर ठेवण्याचा प्रयत्न करणाऱ्या मुस्लिम नेत्यांना व त्यांच्या पाठिराख्या ब्रिटिश अंमलदारांना सुवर्णसंधी प्राप्त झाली. तिचा त्यांनी अत्यंत कुशलतेने उपयोग कसा करून घेतला हे श्री. बलराम नंदा यांच्या गोखले–चरित्रातून चांगले समजून येते. विभक्त मतदारसंघांचा प्रस्ताव हा अनिष्ट आहे असे ठाम मत असलेले मोर्लेही अखेरीस मुसलमानांना झुकते माप देऊन 'समतोल' साधण्याची आवश्यकता मानण्यापर्यंत येऊन पोचले. फुटीर मुस्लिम राजकारणाची भक्कम पायाभरणी या काळात जी एकदा झाली तिचा प्रतिवाद पुढे कधी शक्य झाला नाही.

– १० –

१९१४/१५ साली काँग्रेसमधील दुफळी सांधण्याच्या दृष्टीने प्रयत्न चालला होता. त्या वेळी टिळकांशी गोखल्यांचे सरळसरळ बोलणे झाले होते. आपल्या व टिळकांच्या भूमिकेतील फरक गोखल्यांनी पुढीलप्रमाणे सांगितलेला आढळतो :

"सनदशीर उपायांनी साम्राज्यांतर्गत स्वशासन मिळवणे हे उद्दिष्ट टिळकांना कबूल असले, तरी 'शक्य तेथे सरकारशी सहकार्य व आवश्यक तेथे त्याला विरोध' या तत्त्वावर आधारलेल्या काँग्रेसच्या पद्धती त्यांना मान्य नाहीत. या पद्धतींच्या जागी त्यांना सनदशीरपणाच्या सीमा न ओलांडता

अनुक्रमणिका

सरकारला शुद्ध सरळ विरोधाचा मार्ग, दुसऱ्या शब्दांत म्हणजे आयरिश पद्धतीचे अडवणुकीचे धोरण, अवलंबावयाचा आहे. देशातील कायद्यांच्या मर्यादा न ओलांडता शक्य त्या सर्व बाबतीत सरकारची अडवणूक संघटित करून शासनयंत्रणा निर्जीव करण्यास व अधिकारी वर्गाला नमायला भाग पाडण्यास आपण समर्थ होऊ अशी त्यांची आशा आहे."

टिळकांची भूमिका गोखल्यांना का अमान्य होती आणि त्यांनी काँग्रेसमध्ये टिळकपक्षास प्रवेश का नाकारला त्याचे आणखी स्पष्टीकरण गोखल्यांनी बेझंटबाईंना लिहिलेल्या पत्रात मिळते. गोखल्यांचे हे पत्र विस्ताराने उद्धृत करणे आवश्यक आहे. गोखले लिहितात, "हे दोन गट तुल्यबल नाहीत. देशामध्ये परकीयांबाबत व्यक्त आणि अव्यक्त अशी विरोधाची भावना मोठ्या प्रमाणात आहे. तिच्यामुळे टिळकांचे पारडे खूपच जड झालेले आहे. परकीयांच्या सत्तेशी आपल्याला जुळवून घेतले पाहिजे असे आम्ही देशबांधवांना सांगितलेच पाहिजे... अर्थात हा एक स्थित्यंतराचा टप्पा असेल. आपल्या प्रचाराचे एक अंग ब्रिटिश लोकशाहीच्या न्यायभावनेवरील अंशमात्र विश्वासावर आधारलेले असणे अटळ आहे. यापैकी दुसऱ्याला 'याचकगिरी' आणि पहिल्याला 'अधिकारशाहीपुढे केलेले भेकड व राष्ट्राभिमानशून्य लांगूलचालन' असे संबोधून त्याची खिल्ली उडविण्यास टिळकांना प्रयास पडणार नाहीत. भक्कम अशी राजकीय निर्णयशक्ती असलेली मंडळी देशात थोडी आहेत. अशा व्यक्तींच्या पूर्णपणे विरुद्ध असल्याचा विश्वास ज्याच्याबद्दल आपल्या अंतःकरणाच्या खोल कप्प्यात वाटेल अशा कोणत्याही सकृद्दर्शनी विश्वसनीय पुढाऱ्याच्या मागे जायला सज्ज असलेले व राष्ट्रोद्धाराच्या प्रामाणिक पण अस्पष्ट जाणिवेने भरून गेलेले विवेकशून्य लोक मात्र प्रचंड संख्येने आहेत." टिळकांनी अशा फौजफाट्याच्या साहाय्यानेच १८९५ साली सार्वजनिक सभा काबीज केली, १८९५ ची काँग्रेस जवळपास मोडली, व अखेरीस सुरतेस प्रत्यक्षच मोडली, असे गोखल्यांनी पुढे लिहिले आहे.

गोखल्यांच्या मृत्यूनंतर टिळक व त्यांचे अनुयायी यांना काँग्रेसमध्ये प्रवेश मिळाला. १९१८ साली नेमस्त काँग्रेसमधून बाहेर पडले. टिळकांच्या हाती काँग्रेसची सूत्रे गेल्याचीच ती खूण होती. पण १९१६ ते १९२०च्या दरम्यान टिळकांनी गोखल्यांच्या नेमस्त राजकारणापेक्षा काही वेगळे राजकारण केले असे आढळत नाही. होमरूल लीगचे राजकारण हे नवआंदोलनाच्या स्वरूपाचे नव्हते. १९०५च्या सुमारास जी भाषा जहाल ठरली ती १९१६ साली अंगवळणी पडून मवाळ बनलेली होती; स्वराज्य या शब्दाचा वापर केल्याने कोणी विथरेल ही शक्यता फारशी नव्हती. पहिले महायुद्ध जारी होते आणि अपेक्षेपेक्षा इंग्लंडला ते फार महागात पडले होते. युद्धविरोधी आंदोलन छेडणे ही खरी जहालपणाची कसोटी म्हणता आली असती. त्या अर्थाने जहाल पक्षही जहाल उरला नव्हता.

तरी परंतु नेमस्त १९१८ साली बाजूला का झाले ? टिळकांसारखी जहाल मंडळी नेमस्त राजकारण करीत असली, आणि आपण राजनिष्ठ आहोत असे सांगत असली तरी, ब्रिटिश राज्यावर त्यांची प्रामाणिक राजनिष्ठा नाही, आणि सनदशीर घटनात्मक मार्गच आपण सदैव अनुसरणार अशी त्यांची प्रतिज्ञा नाही हे नेमस्तांना अनुभवाने माहीत होते. दुसरेही एक कारण होते. जनसामान्यांच्या धार्मिक-सांस्कृतिक श्रद्धा यांना आवाहन करून, त्यांच्या भावना व विकार चेतवून केलेले राजकारण नेमस्तांना अप्रबुद्ध, प्रतिगामी व घातक राजकारण वाटत होते. किंबहुना, भावना व विकार यांचा आधार घेतल्याशिवाय जनसामान्यांना राजकारणात ओढता येत नसल्यामुळे राजकारण हे जनसामान्यांच्या हितासाठी पण प्रबुद्ध श्रेष्ठी वर्गानीच करणे योग्य आहे अशी त्यांची धारणा होती. पहिल्या महायुद्धानंतर सर्व जगातच लोकशाहीचा जमाना अवतरला. जनतेला बाजूला वा बाहेर ठेवून राजकारण करण्याची शक्यताच संपुष्टात आलेली होती. या नव्या परिस्थितीत जनसामान्यांसह खऱ्या अर्थाचे नेमस्त राजकारण करण्याची दृष्टी व क्षमता जुन्या पिढीतल्या नेमस्तांपैकी फक्त एक गोखल्यांच्या ठायीच होती.

नेमस्त भारतीय राजकारणामधून पूर्णतः अस्तंगत झाले नाहीत. १९२० नंतरच्या काळातही सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या सेवकांपैकी श्रीनिवास शास्त्री, हृदयनाथ कुंझरू, तसेच तेज-



अनुक्रमणिका

बहादूर सप्रू, मु. रा. जयकर, रँग्लर परांजपे आदी नेमस्त मंडळी भारतीय राजकारणात सक्रिय राहिली. त्यांचे स्थान मानाचे राहिले. ब्रिटिश राज्यकर्त्यांचे सहाय्यक, सल्लागार व भारतीय काँग्रेसबरोबरील संबंधांच्या क्षेत्रांतील मध्यस्थ अशा महत्त्वपूर्ण भूमिका नेमस्त पुढाऱ्यांनी वेळोवेळी बजावलेल्या दिसतात. काँग्रेसच्या बाहेर राहून त्यांनी मौलिक अशी देशसेवा केली असाच निर्वाळा इतिहास देतो.

– १२ –

१९०१ साली न्यायमूर्ती रानडे यांचे निधन झाले. त्यानंतरच्या नेमस्त राजकारणामध्ये एक मोठे न्यून निर्माण झाले. त्याची दखल घेणे आवश्यक आहे. सर्वांगीण सामाजिक सुधारणा हा रानडयांच्या नेमस्त भूमिकेचा एक अंगभूत भाग होता. इंग्रजी राज्य ही एक ईश्वरी योजना व वरदान आहे असे म्हणण्यातला आशय असा होता की, ज्ञान–विज्ञान, व्यापारउदीम, राज्यकारभार, समाजव्यवस्था इत्यादी अंगांच्या बाबतीत आपणास पुष्कळ गोष्टी शिकून घेऊन भारतीयांना स्वतःला नव्याने घडवायचे आहे. आपल्या परंपरेशी सातत्य राखून पण हे सारे करावयाचे आहे. आणि हे प्रवर्तन घडून येण्याच्या दृष्टीने इंग्रजी राज्याची स्थापना ही सर्वोत्तम गोष्ट म्हणायला हवी, कारण तेच या काळच्या जगातील सर्वांत प्रगत, प्रगल्भ व उदात्त असे लोक आहेत. अठराव्या–एकोणिसाव्या शतकातील इंग्लंडविषयी अशी धारणा मार्क्ससारख्या क्रांतिकारकाचीही होती ही गोष्ट येथे ध्यानात घ्यावी. हिंदुस्थानात राष्ट्रबांधणीचे काम विशेष अवघड आहे याची जाणीवही नेमस्त भूमिकेच्या बुडाशी होती. जातिभेदांचा निरास करून एकात्म हिंदु समाज निर्माण करणे, विविध धार्मिक समूहांना एका राष्ट्रीय व्यासपीठावर आणणे या गोष्टींसाठी धीराने, समंजसपणे व हळुवारपणे दीर्घकाळ परिश्रमपूर्वक काम केले पाहिजे याचे तीव्र भान रानडयांना होते. साध्यसाधनविवेक हा रानडयांच्या नेमस्त भूमिकेचा आणखी एक भाग होता.

घटनात्मक सुधारणांचे हप्ते पदरात पाडून घेण्यासाठीचे सनदशीर राजकारण, त्या त्या वेळच्या सुधारणांमुळे हाती आलेल्या जागांवर निवडून जाऊन नगरपालिकांमध्ये वा कायदेकौन्सिलांमध्ये कार्य करणे यावरच सगळा भर लौकरच आला असे आपणास दिसते. रानडे हयात होते तोवर त्यांनी सामाजिक परिषदेचे काम नेटाने लावून धरले. पण नंतर त्याकडे जवळपास संपूर्ण दुर्लक्ष झाले.

हिंदुस्थानात जबाबदार प्रातिनिधिक राज्यसत्ता नाही म्हणून सारे प्रश्न योग्यरीत्या सुटत नाहीत; सुशिक्षित वर्गाने लोकप्रतिनिधी निवडून दिले व त्यांच्या हाती कारभार सोपविला की मग समाजाच्या सर्वांगीण सुधाराचे काम घोडदौडीने होणार असेच जणू काही मानले जाऊ लागले. रानडयांच्या नेमस्त भूमिकेचा हा विपर्यास होता.

नेमस्त निदानपक्षी समाजाच्या सर्वांगीण सुधारणेची गरज स्वीकारीत जहाल तर राष्ट्राभिमान उत्पन्न करण्याच्या ओघात प्राचीन परंपरेचा, इतिहासाच्या वारशाचा असा गौरव करू लागले की, परक्यांना हटवून, पूर्वापार समाजधुरीणत्व करीत आलेल्या उच्चवर्णीय जातींमधील नवशिक्षितांच्या हाती राज्याची सूत्रे दिली की बंधमुक्त झालेला राष्ट्रपुरुष त्याच्या मूळ शुद्ध, प्रबळ व जगत्वंद्य श्रेष्ठ स्वरूपात प्रकट होईल, असा समज दृढ व्हावा.

न्यायमूर्ती रानडे व महात्मा फुले अंशतः समकालीन. फुल्यांना बरोबर घेऊन रानडयांना त्यांचे समाजकारण करता आले नाही. आपण उल्लंघू शकत नसलेल्या सामाजिक अंतराचे भान रानडयांना असावे, आणि त्यांना फुल्यांविषयी आदर असावा असे दिसते. पण विष्णुशास्त्री वा टिळक या जहाल वृत्तीच्या पुढाऱ्यांच्या लेखनात तर कुत्सितभावच प्रकट झालेला आढळतो. टिळकप्रणीत जहाल विचारप्रणालीचा पगडा किती प्रभावी याचे एक गमक म्हणजे आचार्य जावडेकरांच्या 'आधुनिक भारत' या ग्रंथातही फुल्यांचा निर्देश अगदी जुजबी स्वरूपाचा व फुल्यांकडे कमीपणा देणारा आहे, हे होय. पहिले महायुद्ध संपण्याच्या आसपास महाराष्ट्रात व दक्षिणेत ज्या ब्राह्मणेतर चळवळी फोफावल्या त्या, एका अर्थी, जहालांच्या राजकारण-समाजकारणाचाच परिपाक होत्या.

भारतीय राजकारणातील साधारणपणे १९०० ते १९२० या काळातील नेमस्त व जहाल पर्वाचे मूल्यांकन करीत असता जातिभेदांचा निरास करून सामाजिक एकात्मता निर्माण करण्याच्या बाबतीत झालेल्या पिछेहाटीलाही पुरेसे महत्त्व द्यावयास हवे.

○ ○ ○

अनुक्रमणिका

# लोकमान्य टिळकांचे काँग्रेसमधील आणि बाहेरील राजकारण

यशवंत दिनकर फडके

१९८५ अखेर वयाची शंभरी ओलांडणारा इंडियन नॅशनल काँग्रेस (राष्ट्रसभा) हा राजकीय पक्ष स्वातंत्र्यपूर्व काळात नुसता राजकीय पक्ष नव्हता तर त्याने १९२० नंतर एका व्यापक जनआंदोलनाचे रूप धारण केले होते. मुळात मोजक्या इंग्रजीविद्याविभूषित उच्चवर्णीय तसेच उच्च वर्गात जन्मलेल्या व शहरात वाढलेल्या आणि देशातील विविध भागांतून येणाऱ्या नाना धर्मीयांचा व भाषिकांचा दरवर्षी नियमाने भरणारा मेळावा असे काँग्रेसचे रूप होते. काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनास येणाऱ्या प्रतिनिधींमध्ये डॉक्टर, पत्रकार, शिक्षक वगैरे व्यावसायिक असले तरी अनेक वर्षे काँग्रेसवर वकील-बॅरिस्टरांचे प्रभुत्व होते. आरंभीच्या तीस वर्षांत काँग्रेसचे राजकारण हे मुख्यतः अर्ज-विनंत्यांचे राजकारण होते. राज्यकर्त्यांकडे शिष्टमंडळे नेणे, त्यांची मनधरणी करणे, इंग्लंडमधील लोकांना हिंदी जनतेच्या स्थितीविषयी पुरेपूर माहिती असावी यासाठी इंग्लंडमध्ये प्रचार करणे आणि तेथील राजकीय पक्षांपैकी प्रथम लिबरल पक्षाशी (उदारमतवादी) आणि १९०६ नंतर तो पक्ष सत्तारूढ झाल्यावर झालेल्या भ्रमनिरासामुळे मजूर पक्षाशी संधान बांधण्याचे प्रयत्न करणे यावर काँग्रेसचा भर असे. बंदिस्त दिवाणखान्यात किंवा सभागृहात सभा भरवून व्याख्याने दिली जात असत. वृत्तपत्रांत लंबेचौडे लेख प्रसिद्ध करून लोकांच्या गाऱ्हाण्यांकडे नोकरशहांचे लक्ष वेधण्याचा प्रयत्न केला जात असे. हिंदुस्थानचे दारिद्र्य, येथील वाढता लष्करी खर्च, प्रशासकीय सेवेतील उच्च अधिकारपदासाठी घेतल्या जाणाऱ्या स्पर्धात्मक परीक्षांना हिंदी लोकांना बसता यावे म्हणून द्यावयाच्या सवलती, प्रशासनात हिंदी लोकांना अधिकाधिक जागा देण्याची आवश्यकता, न्यायपालिका व कार्यकारी मंडळ यांची फारकत करण्याची गरज, इंग्रजांच्या साम्राज्यातील वसाहतीत, विशेषतः दक्षिण आफ्रिकेत, हिंदी लोकांना दिली जाणारी वागणूक अशा विषयांवर वारंवार ठराव मंजूर केले जात असत. सम्राज्ञीविषयी किंवा सम्राटाविषयी निष्ठा असल्याची ग्वाही देऊन येथील नोकरशाहीच्या कारभारावर कोरडे ओढले जात असत. आपला पोटापाण्याचा व्यवसाय सांभाळून फावल्या वेळात राजकारण करण्याचा काँग्रेस नेत्याचा शिरस्ता होता. आरंभीच्या तीस वर्षांत खरोखरच मूठभर माणसांचे प्रतिनिधित्व करणारी काँग्रेस १९१६ नंतर व्यापक राजकीय आघाडी बनली आणि जनआंदोलनामार्फत परक्या राजवटीला आव्हान देऊ लागली; सहकार्यापेक्षा संघर्षाचे राजकारण करू लागली. लोकमान्य टिळक व महात्मा गांधी यांनी काँग्रेसचे रूप पालटण्यात फार मोठा वाटा उचलला.

काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनाला हजर असलेल्या बहात्तर प्रतिनिधींच्या यादीत लोकमान्य टिळकांचे नाव आढळत नाही. टिळकांचे डेक्कन एज्युकेशन सोसायटीतील सहकारी वामन शिवराम आपटे, गोपाळ गणेश आगरकर हे काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनाला हजर होते. १८८९ च्या मुंबईच्या काँग्रेस अधिवेशनाला प्रथमच गोपाळ कृष्ण गोखले यांच्याबरोबर टिळकही हजर होते. त्या आधी काँग्रेसच्या कामात जसे त्यांनी लक्ष घातले नव्हते तसे राजकीय विषयांवर केसरीतही क्वचित कधीतरी लिहिले होते. १८९० अखेर डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा राजीनामा देऊन बाहेर पडल्यानंतर टिळक हिरिरीने राजकीय आखाड्यात उतरले आणि १८९१ च्या उत्तरार्धात केसरी व मराठा ही पत्रे सर्वस्वी टिळकांच्या मालकीची झाल्यावर ही दोन्ही वृत्तपत्रे टिळकांच्या जहाल राजकारणाची व परंपरानिष्ठ समाजकारणाची मुखपत्रे बनली. १८९१ साली काँग्रेसचे वार्षिक अधिवेशन येथे न भरवता लंडनमध्ये भरवण्याचा

अनुक्रमणिका

विचार तत्कालीन काँग्रेसच्या मवाळ, नेमस्त किंवा उदारमतवादी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या नेत्यांच्या मनात घोळत होता. संमतिवयाच्या विधेयकावरील वादाने वातावरण तापलेले असताना त्यात काँग्रेसच्या संकल्पित लंडन अधिवेशनाच्या अफलातून योजनेची भर पडली. १५ नोव्हेंबर १८९१ च्या मराठा-पत्राच्या अंकात टिळकांनी काँग्रेसच्या प्रस्थापित नेतृत्वावर तोफ डागली. "काँग्रेस अधिवेशन स्थगित करू नका. प्रथम काँग्रेसला जनतेचे खरेखुरे प्रतिनिधित्व करू द्या. मग तिला इंग्लंडमध्ये जाऊन तेथील लोकांसमोर आपली दु:स्थिती मांडता येईल. काँग्रेसला येणाऱ्या बऱ्याच प्रतिनिधींना काँग्रेसच्या कामकाजातील दोन शब्दही समजत नाहीत. अनेकांना चर्चा कोणत्या विषयांवर चालली आहे हेही कळत नसते."[१] काँग्रेसचे तेव्हाचे संयुक्त चिटणीस दिनशा एदलजी वाच्छा यांना टिळकांची ही टीका इतकी झोंबली की त्यांनी टिळक व नामजोशी काँग्रेसची बदनामी करीत असल्याबद्दल दादाभाई नौरोजींना लिहिलेल्या खासगी पत्रात तक्रार केली.[२] नंतर अनेक वर्षे काँग्रेस आपल्या मुठीत ठेवणाऱ्या फेरोझशहा मेहता, दिनशा वाच्छा वगैरे मवाळ नेत्यांबरोबर टिळकांनी जी सतत लढत दिली तिची ही पहिली सलामी होती.

काँग्रेसचे संस्थापक म्हणून ओळखले जाणारे ॲलन ऑक्टेवियन ह्यूम हे आरंभापासून अनेक वर्षे काँग्रेसचे सरचिटणीस होते. १८९२ च्या मार्चमध्ये ह्यूमसाहेबांनी एक परिपत्रक खासगीरीत्या प्रसृत केले. हे परिपत्रक प्रकाशित करावयाचे नाही असे ठरलेले असतानाही काँग्रेसमधील काही राजनिष्ठ घरभेद्यांच्या कारवायांमुळे ते अलाहाबादच्या 'मॉर्निंग पोस्ट' वृत्तपत्राने प्रसिद्ध केले. ह्यूमसाहेब विलायतेला गेल्याची संधी साधून हे परिपत्रक प्रकाशित करण्यात आले होते. हिंदुस्थानातील परिस्थिती इतकी चिघळली आहे की शेतकरी इंग्रजांविरुद्ध बंड करण्यास प्रवृत्त होतील असे ह्यूमसाहेबांनी या परिपत्रकात म्हटले होते. त्यामुळे ह्यूम राजद्रोहाचा गुन्हा करीत आहेत असा 'टाइम्स ऑफ इंडिया', 'पायोनियर' वगैरे कडव्या साम्राज्यवादी वृत्तपत्रांनी एकच गिल्ला केला. मॅक्लीन नावाच्या ब्रिटनच्या संसदसदस्याने ह्यूमना फाशी द्यावे अशी आरोळी ठोकली. ह्यूमसाहेबांचे परिपत्रक वस्तुस्थितीवर आधारलेले असले तरी सरकार ते राजद्रोहात्मक ठरवील आणि त्याच्या आधारे काँग्रेसलाच दडपून टाकील या भीतीने फेरोझशहा व वाच्छा यांच्यासारख्या काँग्रेसनेत्यांच्या वर्चस्वाखालच्या मुंबईच्या स्थायी समितीने ते परिपत्रक प्रसृत करण्याचे नाकारले.[३] याउलट टिळकांनी ह्यूमसाहेबांच्या स्पष्ट व कळकळीच्या विचारांची तरफदारी करणारे लेख केसरीत लेलिहि.

१८९१ मधील संमतिवयाच्या विधेयकावरील वादामध्ये कर्मठ सनातन्यांची कड घेऊन परंपरानिष्ठ टिळकांनी फड गाजवले आणि सामाजिक बाबतीत पुण्याचे पुढारीपण न्यायमूर्ती रानड्यांकडे नसून ते आपल्या हाती असल्याचे सिद्ध केले. त्या काळातील काँग्रेसमध्ये महाराष्ट्र आणि वऱ्हाड-मध्यप्रांत या मराठी भाषिकांच्या मुलखातील ब्राह्मणांचा वरचष्मा होता. सीताराम हरी चिपळूणकर, तेलंग, चंदावरकर, दाजी आबाजी खरे, कृष्णाजीपंत नूलकर, मोरोपंत जोशी, रंगनाथ नरसिंह मुधोळकर, गोपाळ कृष्ण गोखले या नेमस्त विचारसरणीच्या ब्राह्मणांप्रमाणेच टिळक, नामजोशी, गणेश श्रीकृष्ण ऊर्फ दादासाहेब खापर्डे, रघुनाथ पांडुरंग ऊर्फ दादासाहेब करंदीकर हे जहाल विचारसरणीचे नेते काँग्रेसच्या अधिवेशनास नियमाने हजर राहून कामकाजात भाग घेत असत. मुंबई प्रांतिक काँग्रेसमध्ये तसेच मध्यप्रांत-वऱ्हाडात टिळकांच्या गटाचा प्रभाव वाढू लागल्यानंतरच्या काळात म्हणजे १९०० पासून वासुकाका जोशी, शिवरामपंत परांजपे, गंगाधरराव देशपांडे, तात्यासाहेब केळकर, डॉ. मुंजे वगैरे टिळक पक्षातील मंडळीही प्रांतिक काँग्रेसची अधिवेशने गाजवू लागली. टिळकांच्या हयातीत एवढेच नव्हे तर त्यांच्या मृत्यूनंतर जवळजवळ दोन शतके महाराष्ट्र आणि वऱ्हाड, नागपूर येथील (प्रदेश) काँग्रेस समित्यांवर ब्राह्मणांचे प्रभुत्व कायम राहिले. महाराष्ट्रातील काँग्रेस संघटनेत ब्राह्मणांचा फार भरणा असल्याने आणि संघटनेतील मोक्याची अधिकारपदे अनेक वर्षे ब्राह्मण भूषवीत असल्याने महाराष्ट्रातील खेड्यापाड्यांतील बहुजनसमाज किमान पंचेचाळीस वर्षे (१८८५-१९३०) काँग्रेसपासून फटकून राहिला. "एकट्या उपऱ्या आर्यभट

अनुक्रमणिका

लोकांनी नॅशनल काँग्रेस स्थापिली तर तिला कोण विचारतो ?" असा जोतीराव फुल्यांनी सवाल केलेला दिसतो.[४] ते काँग्रेसला 'नारदाचा सुभा' म्हणत. फुल्यांनी स्थापन केलेला सत्यशोधक समाज आणि शाहू छत्रपतींनी पोसलेला ब्राह्मणेतर पक्ष यांच्या दृष्टीने टिळकयुगातील काँग्रेस ही ब्राह्मणांची संघटना होती. आरंभीच्या वर्षात बंगालमधील व महाराष्ट्रातील काँग्रेसनेत्यांचे राष्ट्रसभेत इतके प्रस्थ होते की ४ फेब्रुवारी १८८८ रोजी अलीगडचे मुस्लिम नेते सर सय्यद अहमदखान यांनी उघडउघड विचारले होते, "बंगाली लोक आणि महाराष्ट्रीय ब्राह्मण यांच्याखेरीज काँग्रेसने मंजूर केलेल्या ठरावांचा अन्य कोणास फायदा होईल हे कोणी बंगाली प्रामाणिकपणे सांगेल काय ?"

बहुसंख्य मुसलमान काँग्रेस हा मुख्यतः हिंदूंचा पक्ष आहे असे मानत असल्याने जेवढ्या संख्येने काँग्रेसमध्ये यावे असे काँग्रेस नेत्यांना वाटत होते तेवढ्या संख्येने ते काँग्रेसच्या कामात सहभागी होत नव्हते. १८८७ च्या मद्रास काँग्रेसचे अध्यक्ष बद्रुद्दीन तय्यबजी आणि १८९६ च्या कलकत्ता काँग्रेसचे अध्यक्ष रहिमतुल्ला सयानी यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात या प्रश्नाचा ऊहापोह केला होता. काँग्रेस कोणत्याही विशिष्ट धर्माच्या लोकांची नाही, ती सरकारविरोधी चळवळ नसून तिचा उद्देश हिंदुस्थानातील इंग्रजी राजवट अधिक भक्कम करण्याचा आहे असा रहिमतुल्ला सयानींनी हवाला दिला तरी त्यामुळे मुसलमानांचा काँग्रेसमधील सहभाग वाढला नाही. १८९३-९४ साली प्रभासपट्टण, मुंबई, बेळगाव, येवले, मालेगाव राजापूर येथे हिंदु-मुसलमान दंगली उसळल्या तेव्हा हिंदूंचा कैवार घेऊन टिळकांसारख्या जहाल राजकीय नेत्यांनी मुसलमानांना पाठीशी घालणाऱ्या इंग्रज राज्यकर्त्यांना धारेवर धरले. एवढेच नव्हे तर मुसलमानांना सरकारने फारच लाडावून ठेवल्याने ते शेफारले आहेत असे वाच्छा यांच्यासारखे मवाळ नेतेही तक्रार करू लागले. काँग्रेसच्या प्रचारामुळे व गोरक्षणाच्या प्रचारामुळे दंगली पेटल्या असे राज्यकर्ते म्हणू लागले तेव्हा गोपाळ कृष्ण गोखले व गोपाळराव आगरकर या दोघांनीही सरकारची मीमांसा चुकीची आहे अशी जाहीर टीका केली.[४] सरकारने दंगलीबद्दल हिंदूंवर ठपका ठेवल्याने हिंदूंचे मन सरकारला स्पष्टपणे कळवण्यासाठी पुण्यात १० सप्टेंबर १८९३ रोजी हिंदूंची जाहीर सभा टिळकांनी भरवली. केवळ हिंदूंची सभा न भरवता उभय जमातीच्या लोकांची सभा भरवावी असे न्यायमूर्ती रानडे, फेरोझशहा मेहता, वाच्छा, गोखले वगैरे नेमस्त नेत्यांना वाटत होते. त्यासाठी टिळक-नामजोशी यांनी पुण्यातील प्रतिष्ठित मुसलमानांशी संपर्क साधला होता, पण त्यांनी प्रतिसाद न दिल्याने हिंदूंची जंगी सभा भरवण्याचे टिळकांनी ठरवले. ही सभा भरवू नये म्हणून रानडे, फेरोझशहा, वाच्छा, गोखले यांनी टिळकांवर दडपण आणले, पण त्यास न जुमानता टिळकांनी सभा भरवलीच. या सभेनंतर 'रानडे बोले व पुणे हाले' अशी स्थिती राजकीय प्रश्नांबाबतही राहिली नसून पुण्याचे राजकीय पुढारीपणही टिळकांच्या हाती आल्याचे स्पष्ट झाले.

१० सप्टेंबर १८९३ च्या या हिंदूंच्या जंगी जाहीर सभेची पूर्वतयारी म्हणून खलबते चालली असताना तोपर्यंत खाजगीरीत्या चालणाऱ्या गणेशोत्सवास सार्वजनिक स्वरूप देण्याची कल्पना पुढे आली. सरदार बाळासाहेब नातू, घोटवडेकर यांच्यासारख्या कर्मठ ब्राह्मणांप्रमाणेच भाऊ रंगारी, दगडू हलवाई, नाना भोर, बंडोबा तरवडे, सावडेपाटील वगैरे ब्राह्मणेतरांनीही ही कल्पना उचलून धरली.

१८९४ सालचा गणपती-उत्सव मोठ्या थाटामाटाने साजरा झाला. धार्मिक उत्सव साजरे करण्यास मुभा असल्याने गणेशोत्सवाच्या निमित्ताने विविध जातींच्या हिंदूंना एकत्र आणावयाचे आणि त्यांचे प्रबोधन करावयाचे हा गणेशोत्सवास सार्वजनिक रूप देणाऱ्यांचा उद्देश होता. गणेशोत्सव हे लोकजागृतीचे एक प्रभावी साधन होते. त्यातील मेळा हे मतप्रचारांचे परिणामकारक साधन होते. १८९६ सालापासून गणेशोत्सवाची ही टूम केवळ मुंबई इलाख्यातील मराठी भाषिकांनीच नव्हे तर वऱ्हाड-मध्यप्रांतातल्या आणि निजामाच्या हैद्राबाद संस्थानातील मराठी भाषिकांनीही उचलली आणि सार्वजनिक गणेशोत्सव हे मराठी भाषिकांच्या सांस्कृतिक जीवनाचे एक अविभाज्य अंग बनले.

१८९५ सालच्या एप्रिलअखेरीस रायगडावरील छत्रपती शिवाजी महाराजांच्या समाधीची डागडुजी व तिच्या परिसराची सफाई करण्याच्या आवश्यकते-बद्दलचे लेख केसरीतून प्रसिद्ध होऊ लागले. त्याआधी शिवछत्रपतींच्या समाधीची दुर्दशा पाहून मुंबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल व जेम्स डगलस या इंग्रजां-नाही वाईट वाटले होते. मग महात्मा जोतीराव फुले, गोविंद बाबाजी जोशी-वसईकर वगैरे त्या समाधीची स्थिती पाहून कळवळले यात नवल नाही. न्यायमूर्ती रानडे, तेलंग, आबासाहेब घाटगे, कागल-कर वगैरेंनी १८८५ साली समाधीची दुरुस्ती व्हावी म्हणून काही प्रयत्न केले; पण ते फारसे यशस्वी ठरले नाहीत. १८९५च्या पुण्याच्या काँग्रेस अधि-वेशनाला आलेल्या मदनमोहन मालवीय व सुरेंद्रनाथ बॅनर्जी या नेत्यांनी शिवछत्रपतींचे जाहीर सभेत गुणगान करून टिळकांनी हाती घेतलेल्या चळवळीला पाठिंबा दिला. १८९६ पासून गणेशोत्सवाला शिवाजी-उत्सवाची जोड मिळाली. टिळकांनी सुरू केलेल्या शिवाजी-उत्सवाचे लोण बंगालमध्ये नेले ते १९०२ साली सखाराम गणेश देऊसकर यांनी ! शिवछत्रपती व पहिले बाजीराव पेशवे यांनी स्वरा-ज्याच्या स्थापनेसाठी व रक्षणासाठी दिलेल्या स्फूर्तिदायक लढतीची रोमहर्षक कहाणी बंगाली भाषेत प्रथम टिळकभक्त देऊसकरांनी सांगितली. गणेशोत्सव व शिवाजी-उत्सव साजरे करताना हिंदूंचा प्राचीन धर्म, भारताचा गौरवशाली इतिहास यांची लोकांना आठवण करून दिली जात असे. त्यांच्यामध्ये प्रतिकाराची इच्छा निर्माण केली जात असे. टिळकांच्या हयातीत मेळ्यातील पदांतून किंवा संवादांतून काँग्रेसच्या मवाळ नेतृत्वाची कुचेष्टा केली जात असे, सुधारकांची टर उडवली जात असे तसेच शाळेत शिकणाऱ्या स्त्रिया, धर्मांतर करून ख्रिस्ती झालेले लोक, अस्पृश्य समजल्या जाणाऱ्या जातींचे लोक यांची हेटाळणी केली जात असे.

१८९५ साली काँग्रेसचे वार्षिक अधिवेशन पुण्यात भरणार होते. या अधिवेशनाची पूर्वतयारी काँग्रेसचा एक चिटणीस म्हणून टिळकांनी सुरू केली. त्या वेळी पुण्यातील कर्मठ सनातनी ब्राह्मणांचे धुरीण सरदार बाळासाहेब नातू आणि श्रीधर विठ्ठल दाते यांनी सामाजिक परिषदेचे अधिवेशन काँग्रेसच्या मांडवात भरू नये अशी मागणी केली. सुधारकांनी ते अधि-वेशन काँग्रेसच्या मंडपात घेण्याचा प्रघात पुढे चालवण्याचा हट्ट धरला तर काँग्रेसचा मंडप जाळून टाकण्याच्या धमक्याही श्रीधरपंत दात्यांनी दिल्या. फेरोझशहा मेहता व वाच्छा यांनी पुण्याला येऊन सामाजिक परिषदेचे अधिवेशन काँग्रेसचे अधिवेशन संपताच त्याच मंडपात घेण्याचा परिपाठ चालू ठेवावा असे टिळकांना सांगताच टिळकांनी चिट-णीशीचा राजीनामा दिला. अखेर संघर्ष टाळण्या-साठी न्यायमूर्ती रानड्यांनी सामाजिक परिषदेचे अधिवेशन काँग्रेसच्या मंडपात न भरवता पुण्यातच अन्य ठिकाणी घेण्याचे कबूल केले आणि अशा तऱ्हेने सामाजिक परिषदेची काँग्रेसच्या मंडपातून हकालपट्टी करण्यात टिळक व त्यांचे पाठीराखे १८९५ साली यशस्वी झाले. सामाजिक प्रश्न व राजकीय प्रश्न यांची पुरती फारकत झाली. पुढे गांधीयुगात महात्माजींनी हा तुटलेला सांधा जोडला खरा; पण अस्पृश्योद्धारासारख्या महत्त्वाच्या सामाजिक प्रश्नांचा गुंता सोडविण्यास गांधीजींनी किंवा काँग्रेसने कधीच अग्रक्रम दिला नाही.

सामाजिक प्रश्नांवरील तीव्र मतभेदांमुळे काँग्रेस अधिवेशनात त्यावर चर्चा झाल्यास काँग्रेस ही राजकीय संघटना दुफळीमुळे दुबळी होऊन लयाला जाईल अशी भीती काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्ष उमेशचंद्र बॅनर्जी यांनी जाहीरपणे बोलून दाखवली होती. इतिहासाची विचित्र लीला अशी की ह्यूमसाहेबांसारख्या संस्थापकांना मुळात सामा-जिक प्रश्नांबाबत विचारविनिमय करण्यासाठी काँग्रेसची स्थापना करावयाची होती. १८८५ साली गव्हर्नरजनरल लॉर्ड डफरीन यांनी त्यांना काँग्रेस राजकीय प्रश्नांच्या चर्चेसाठी भरवावी असा आग्रह केला होता. इंग्लंडमधील संसदेतील विरोधी पक्ष जे काम करतो ते काँग्रेसने करावे आणि राज्यकार-भारातील दोष दाखवून सुधारणा सुचवाव्यात असे डफरीनसाहेबांचे म्हणणे होते. केवळ सामाजिक प्रश्नांचा विचार करण्यासाठी काँग्रेस स्थापन झाली असती तर तिला फारच मर्यादित प्रतिसाद मिळाला असता कारण राजकीय प्रश्नांवर एकत्र येण्यास तयार असलेल्या अनेकांचे सामाजिक सुधारणांबाबत मतैक्य नव्हते आणि मतैक्य होणे कठिणही होते.



अनुक्रमणिका

काँग्रेस ही राजकीय चळवळ असून ती सामाजिक चळवळ नाही असे दादाभाई नौरोजी, उमेशचंद्र बॅनर्जी व सुरेंद्रनाथ बॅनर्जी या अध्यक्षांनी काँग्रेसच्या पहिल्या दहा वर्षांत वारंवार स्पष्ट केले होते. म्हणूनच काँग्रेस-अधिवेशनात सामाजिक प्रश्नांवर चर्चा न करता अधिवेशनाचे कामकाज संपताच त्याच मंडपात सामाजिक परिषद भरवण्याचा पायंडा न्यायमूर्ती रानडे, दिवाणबहाद्दूर रघुनाथराव वगैरे सुधारकांनी पाडला होता. सर्वसंमतीने झालेली ही तडजोड १८९५ साली टिळकांच्या गटाने उधळली आणि पुढे अनेक वर्षे सामाजिक सुधारणांबाबत काँग्रेसने ठरावही केले नाहीत.

१८९५ सालच्या जुलै महिन्यात सार्वजनिक सभेच्या वार्षिक सर्वसाधारण सभेत रानडे–गोखले यांचा गट अल्पसंख्य असून टिळकांच्या गटामागे बहुमत असल्याचे सिद्ध झाले. १८९० पासून सार्वजनिक सभेचे चिटणीस म्हणून काम करणाऱ्या गोपाळराव गोखल्यांनी पुण्यातील काँग्रेस अधिवेशन पार पाडल्यानंतर चिटणीसपदाचा राजीनामा दिला. १८७० पासून कार्यरत असलेल्या सार्वजनिक सभेचे खरे सूत्रधार न्यायमूर्ती रानडे होते. टिळकांनी सार्वजनिक सभा काबीज करताच आणि गोखल्यांनी राजीनामा दिल्यानंतर रानड्यांनी डेक्कनसभा नावाच्या प्रतिस्पर्धी सभेची मुहूर्तमेढ रोवली आणि या नव्या संस्थेची जबाबदारी गोखल्यांवर सोपवली. (३१ ऑक्टोबर १८९६.) डेक्कनसभेच्या रानड्यांनी लिहिलेल्या उद्देशपत्रकात लिबरल व मॉडरेट हे शब्द वापरून चालकांची भूमिका स्पष्ट करण्यात आली होती. तसे करताना सार्वजनिक सभेवर टीका करण्यात आली होती. तेव्हा संतापलेल्या टिळकांनी 'हा म्हातारचळ की पोरखेळ ?' असा मथळा देऊन लिहिलेल्या अग्रलेखात रानडे, गोखले यांच्यावर झोड उठवली. रानड्यांच्या हयातीत डेक्कनसभा अधूनमधून सभा घेऊन सरकारकडे अर्ज पाठवीत असे; पण तिला सार्वजनिक सभेची प्रतिष्ठा व तेज कधीच लाभले नाही. रानड्यांच्या मृत्यूनंतर (१७ जानेवारी १९०१) या सभेचे काम पार थंडावले. याउलट, एकदा टिळकपक्षाच्या हाती गेलेली सार्वजनिक सभा पुढे नेहमीच टिळकपक्षाच्या हाती राहिली.

सार्वजनिक सभेसारख्या संस्था काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाला जाणाऱ्या प्रतिनिधींची (डेलिगेट्स) निवड करीत असल्याने सार्वजनिक सभेवरचे टिळकांचे वर्चस्व त्यांना महत्त्वाचे व उपकारक ठरले. १८९५ साली टिळकांनी पुण्याच्या नगरपालिकेची निवडणूक सहज जिंकली. त्याचप्रमाणे ते १८९५ व १८९७ साली मुंबई कायदेमंडळाचे सदस्य म्हणूनही निवडून आले. कायदेमंडळातील लोकनियुक्त सभासदांचे अधिकार तेव्हा फारच मर्यादित असल्याने टिळकांचे नामदारकीत मन रमले नाही. त्यांना कायदेमंडळातील काम म्हणजे निव्वळ फार्स वाटला.

१८९६ व १८९७ साली दुष्काळाने व पाठोपाठ आलेल्या प्लेगने महाराष्ट्रात हाहाःकार उडवून दिला असताना टिळकांनी सार्वजनिक सभेमार्फत आणि केसरी–मराठा वृत्तपत्रांतून शेतकऱ्यांची, विणकरांची आणि प्लेगने हैराण झालेल्या लोकांची गाऱ्हाणी रोखठोक शब्दांत मांडली आणि त्यांना धीर दिला. ठाणे, कुलाबा जिल्ह्यांत सार्वजनिक सभेच्या वतीने अच्युत सिताराम साठ्यांनी, पिके बुडाली असली तर सरकारला सारा देऊ नका असा सरकारी अधिकारी व पोलीस यांच्या उपस्थितीत जाहीर सभेत सल्ला दिला. टिळकांच्या प्रेरणेने सार्वजनिक सभेने चालवलेल्या चळवळीचा परिणाम म्हणून १८९७ च्या जानेवारीत सारातहकुबीबाबत सरकारला काही सवलती जाहीर कराव्या लागल्या. मुंबई–पुण्यात प्लेगने थैमान घातल्याने अनेक लोक पुणे सोडून इतरत्र गेले तरी टिळक पुण्यातच राहिले. एकीकडे केसरीतून ते प्लेगच्या साथीच्या रोगाचे स्वरूप व त्यावर करावयाचे उपचार यांच्याबद्दल लोकांना माहिती देत होते तसेच त्याच वेळी सरकारी अधिकाऱ्यांनी चालवलेल्या दंडेलीवर कडाडून टीका करीत होते. प्लेगनिवारणाचे उपाय योजण्यासाठी नेमलेल्या कॅप्टन रँड या अधिकाऱ्याने आणि त्याच्या हाताखालच्या सोजीरांनी पुण्यात हैदोस घातल्याने पुण्याचे रहिवासी गांजलेले व चिडलेले होते. दुष्काळ व प्लेग यांमुळे लोक मृत्युमुखी पडत असताना व्हाइसरॉय लॉर्ड एल्जिनसकट सारे वरिष्ठ अधिकारी मेजवान्या झोडीत, शिकारीचा आनंद लुटीत दौरे काढीत होते. त्यांच्या भेटीच्या निमित्ताने रोषणाई, दारूकाम केले जात असे; नृत्याचे कार्यक्रम आयोजित



अनुक्रमणिका

केले जात असत. २१ व २२ जून १८९७ ला महाराणी व्हिक्टोरियाच्या राज्यारोहणाचा हीरक-महोत्सव साजरा करण्याचे राज्यकर्त्यांनी ठरवले तेव्हा "ही वेळ हिंदुस्थानात तरी ज्युबिली करण्याची नव्हे" असे टिळकांनी २२ जून १८९७ रोजी केसरीत अग्रलेख लिहून बजावले. त्याच तारखेस रात्री चाफेकर बंधूंनी गणेशखिंडीच्या रस्त्यावर कॅप्टन रँड व लेफ्टनंड आयर्स्ट यांच्यावर गोळ्या झाडल्या. त्यामुळे बिथरलेल्या राज्यकर्त्यांनी जास्तच दडपशाही सुरू केली तेव्हा 'सरकारचे डोके ठिकाणावर आहे काय?', 'राज्य करणे म्हणजे सूड उगविणे नव्हे' आणि 'राजद्रोह कशाला म्हणतात?' हे ओजस्वी लेख टिळकांनी लिहिले.

रँड व आयर्स्ट यांच्या खुनात टिळकांचा व त्यांचे स्नेही नातूबंधू यांचा हात असावा असा मुंबई सरकारला दाट संशय होता पण प्रयत्नांची पराकाष्टा करूनही हे प्रकरण राज्यकर्त्यांना टिळकांच्या अंगाशी भिडविता आले नाही. टिळकही असे वस्ताद की रँड खूनप्रकरणाशी आपला संबंध जोडू पाहणाऱ्या गोऱ्या पत्रकारांवर त्यांनी चक्क अब्रुनुकसानीच्या फिर्यादी ठोकल्या आणि लंडनच्या ग्लोब पत्राला आणि मुंबईच्या टाइम्स ऑफ इंडियाला माफी मागावयास लावली. रँड खूनप्रकरणाशी टिळकांचा संबंध जोडण्यास आवश्यक इतका भक्कम पुरावा हाती येईपर्यंत वाट पाहण्यापेक्षा केसरीतील लेख राजद्रोहात्मक आहेत असा आरोप ठेवून टिळकांवर खटला भरण्याचे राज्यकर्त्यांनी ठरवले आणि टिळकांना दीड वर्षाच्या तुरुंगवासाची शिक्षा ठोठावण्यात आली. टिळक कारावासात असताना १८९७ अखेरीस काँग्रेसचे वार्षिक अधिवेशन अमरावतीस भरले तेव्हा मंडपात टिळकांचे छायाचित्र लावण्याचा खापर्डे वगैरेंनी आग्रह धरला. छायाचित्र लावले तर काँग्रेस राजद्रोहाचे कौतुक करते असा अर्थ केला जाण्याची मवाळ नेत्यांना धास्ती वाटली. अखेर सुरेंद्रनाथ बॅनर्जी व अध्यक्ष शंकरन नायर यांनी टिळकांवर सरकारने अन्याय केल्याचा उल्लेख भाषणात केल्याने हा वाद मिटला. पुण्यात सोजीरांनी दोन स्त्रियांवर बलात्कार केल्याचे विधान करून १८९७ च्या जुलैच्या सुरुवातीस तेव्हा विलायतेत असलेल्या गोखल्यांनी खळबळ उडवून दिली; पण पुराव्याभावी गोखल्यांना हे विधान मागे घेऊन माफी मागावी लागली. या माफीप्रकरणामुळे गोखले इतके अप्रिय झाले होते, की अमरावतीच्या काँग्रेस अधिवेशनात त्यांना प्रतिनिधींनी बोलू दिले नाही. याउलट, टिळकांचे नाव कोणीही घेतले की प्रतिनिधी टाळ्यांचा कडकडाट करून टिळकांचा जयजयकार करीत.

लोकांची कड घेतल्यामुळे टिळकांना कारावास सोसावा लागला. मॅक्समुल्लरसारख्या पंडितांच्या प्रयत्नांमुळे टिळकांची सहा महिने आधीच मुक्तता करण्यात आली. कारावासामुळे त्यांची लोकप्रियता वाढली आणि त्याची प्रचीती १४ मे १९०० रोजी साताऱ्यास भरलेल्या काँग्रेसच्या मुंबई प्रांतिक अधिवेशनात मवाळ नेत्यांनाही आली. विद्यार्थ्यांचे व तरुणांचे ते दैवत बनले असल्याचे त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांना व राज्यकर्त्यांना जाणवत होते. फेरोझशहा मेहता, वाच्छा वगैरे नेमस्त नेत्यांच्या नियंत्रणाखालच्या काँग्रेसमध्ये त्यांच्या नेतृत्वाला आव्हान देणाऱ्या जहाल गटाचे टिळक प्रवक्ते बनले होते. काँग्रेसच्या निष्क्रियपणाबाबत नेत्यांच्या उदासीनतेबाबत आणि ठरावांचे कागदी घोडे नाचवण्यात समाधान मानण्याच्या प्रवृत्तीबाबत तरुणांना वाटणारे असमाधान टिळक स्पष्ट शब्दांत बोलून दाखवीत होते. दक्षिण आफ्रिकेतील भारतीयांच्या दुःस्थितीविषयीचा ठराव मांडण्यासाठी गांधीजी १९०१ च्या कलकत्ता-काँग्रेसला हजर राहिले होते. गोखल्यांच्या मध्यस्थीने गांधीजींचा ठराव मांडला गेला व मंजूर झाला खरा; पण ठराव गोखल्यांनी वाचला आहे असे कळताच फेरोझशहा मेहता, अध्यक्ष वाच्छा यांच्यासकट कोणीही ठराव वाचण्याची आणि त्याचा अर्थ समजावून घेण्याची तसदी घेतली नाही.[५] गांधीजींनी म्हटल्याप्रमाणे वर्षातून फक्त तीन दिवस जागी असणारी व इतर दिवशी झोपी जाणारी संघटना असेच तेव्हा काँग्रेसचे स्वरूप होते.

हे रूप पालटायचे असेल तर राजकीय चळवळ फावल्या वेळात करण्यापेक्षा पूर्ण वेळ पालन करण्याचे व्रत समजून ती बारमहा करावी असे टिळकांचे म्हणणे होते. १९०३ सालच्या मद्रास काँग्रेसपूर्वी ह्यूम, वेडरबर्न व दादाभाई नौरोजी या तिघांनी

एक पत्र प्रसिद्ध करून काँग्रेसची सनदशीर राजकीय चळवळ नेटाने व कळकळीने चालू ठेवण्याचे आवाहन केले होते. ताईमहाराज खटल्यातील अपीलाचा निकाल लागला नसल्याने टिळक मद्रास-काँग्रेसला गेले नाहीत. काँग्रेस अधिवेशनाच्या निमित्ताने त्यांनी केसरीत लिहिलेल्या अग्रलेखाच्या शिरोभागी ऋग्वेदातील मंडूकसूक्तातील एक ऋचा उद्धृत केली होती. तिचा आशय होता, "एकजण बैलासारखा तर एकजण बोकडासारखा ओरडतो. एकजण पिवळट तर एकजण ठिपकेदार. हे बेटे बेडूक देवाने नेमलेल्या बाराव्या महिन्याची वेळ कशी जपून पाळतात, कधीच चुकवीत नाहीत."[६] दरवर्षी काँग्रेस अधिवेशनात हजेरी लावून लंबीचौडी इंग्रजी भाषणे ठोकणाऱ्या आणि वर्षभर पोटापाण्याच्या धंद्यात मग्न असणाऱ्या प्रस्थापित काँग्रेसनेतृत्वाची ही ऋचा उद्धृत करून टिळकांनी टर उडवली होती. १९०४ सालीही टिळकांनी काँग्रेस नेत्यांना सारखे धारेवर धरले तेव्हा बेचैन झालेल्या मेहता, वाच्छा वगैरेंनी 'टिळकांना तुम्ही तरी आवरा' अशी विनंती खासगी पत्रातून, विलायतेत असलेल्या दादाभाई नौरोजी, वेडरबर्न वगैरे बुजूर्ग नेत्यांना केली.[७] वाच्छांच्या विनंतीनुसार दादाभाईंनी तसेच वेडरबर्न, स्विनी वगैरे हिंदुस्थानच्या हितचिंतकांनी टिळकांना पत्रे लिहिली. आपण कधीही काँग्रेसला किंवा सनदशीर चळवळीला विरोध केला नसून इंग्लंडमध्ये हिंदुस्थानच्या बाजूने सतत जोराची चळवळ केल्याशिवाय फक्त हिंदुस्थानातल्या चळवळीतून फारसे काही निष्पन्न होणार नाही असे आपले मत असल्याचे टिळकांनी दादाभाईंना लिहिलेल्या उत्तरात म्हटले होते.[८] काँग्रेसच्या वडीलधाऱ्या नेत्यांपैकी कोणीही राजकीय चळवळीसाठी काही वर्षे देण्यास तयार नाही असे टिळकांनी या पत्रात स्पष्ट म्हटले होते.

दादाभाई, वेडरबर्न वगैरेंच्या पत्रामुळे असेल, टिळकांनी केसरी-मराठा पत्रांतील काँग्रेसवरच्या टीकेचा सूर फारच सौम्य केला. १९०४ च्या मुंबईच्या काँग्रेस अधिवेशनाला ते आपल्या अनुयायांसह हजर राहिले. या अधिवेशनात बंगालच्या फाळणीची कोणतीही योजना आपणास मान्य होणार नाही अशा आशयाचा ठराव काँग्रेसने संमत केला. लॉर्ड कर्झनच्या अरेरावी राजवटीविरुद्ध लोकक्षोभ धुमसत होताच. बंगालच्या फाळणीच्या कल्पनेविरुद्ध सभा भरवून, शिष्टमंडळे नेऊन, वृत्तपत्रांत लेख लिहून काही उपयोग होत नाही असे दिसताच बंगालच्या फाळणीचा निर्णय अधिकृतरीत्या घोषित झाल्यानंतर ७ ऑगस्ट १९०५ रोजी कलकत्त्यास झालेल्या प्रचंड सभेत स्वदेशी व बहिष्कार आंदोलनाचे रणशिंग फुंकण्यात आले. अर्ज-विनंत्यांच्या निष्फळ राजकारणावर सर्वस्वी भिस्त न ठेवता जनआंदोलनाद्वारा राज्यर्त्यांना जेरीस आणण्याच्या लढाऊ राजकारणाची सुरुवात वंगभंगाविरुद्धच्या आंदोलनाने झाली. चिमुकल्या जपानने रशियाच्या झारचा पाडाव केल्याने आणि चिनी लोकांनी अमेरिकन मालावर घातलेला बहिष्कार यशस्वी ठरल्याने हिंदुस्थानातील लोकांनाही प्रतिकार करण्यास प्रेरणा मिळाली होती. कलकत्यातील रस्त्यात शाळकरी विद्यार्थीही वंदेमातरम्चा जयघोष करू लागले. हरताळ, काळी निशाणे हाती घेऊन काढलेल्या मिरवणुका, १४ व १५ एप्रिल १९०६ रोजी बारिसाल येथे झालेल्या बंगाल प्रांतिक परिषदेच्यावेळी झालेला लाठीमार, राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या संस्था काढण्यासाठी जमवण्यात येणारा निधी, १४ ऑगस्ट १९०६ रोजी झालेली राष्ट्रीय महाविद्यालयाची स्थापना या बंगालमधील घडामोडींमुळे अस्वस्थ झालेल्या मवाळ नेत्यांना टिळक बजावू लागले, "शब्द नकोत, कृती पाहिजे आणि तीही निश्चयाची कृती पाहिजे."[९] स्वदेशी व बहिष्कार या दोन अस्त्रांचा वापर करण्याची भाषा बंगालमध्ये केली जाताच टिळकांनी प्रत्यक्ष कृतीचा हा कार्यक्रम उचलून धरला.

"विलायती कापड न वापरता देशी कपडा वापरावा. त्यातच राष्ट्राचे हित आहे ही कल्पना प्रथमतः महाराष्ट्रात निघाली. पुणेकरांस किंवा महाराष्ट्रातील लोकांस ही कल्पना नवी नाही" याची टिळकांनी मराठी भाषिकांना आठवण करून दिली.[१०] एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात शतपत्रांतून लोकहितवादींनी स्वदेशीचा पुरस्कार केला होता. 'सार्वजनिक काका' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या गणेश वासुदेव जोशी यांनी १८७२ नंतर कंदी पागोटे, खादीचा अंगरखा, दाभणकाठी धोतर

असा संपूर्ण स्वदेशी पेहराव करून मृत्यूपर्यंत (१८८०) स्वदेशीचे व्रत आचरिले होते. चेंबूरचे विष्णु रामचंद्र रानडे, सोलापूरचे गणेश बाळाजी माटे, वसईचे रामभाऊ मराठे आणि गोविंद बाबाजी जोशी यांनी देशी आगपेटचा, हातविणीचा कपडा, सूत कातण्याचे यंत्र वगैरे स्वदेशी बनावटीच्या वस्तू वापरण्याची गरज गेल्या शतकातच प्रतिपादन केली होती. टिळकांचे एक निकटचे स्नेही आणि लोकहितवादींचे चिरंजीव नानासाहेब देशमुख यांनी पुढाकार घेऊन स्वदेशीप्रचारिणी सभा स्थापन केली यात नवल नव्हते. विलायती मालावर बहिष्कार घालण्याची बंगाली लोकांची युक्ती ही स्वदेशीच्या नाण्याची केवळ दुसरी बाजू होती. १९०५ सालच्या दसऱ्याच्या दिवशी विनायक दामोदर सावरकरांनी पुण्यात विद्यार्थ्यांची सभा घेऊन टिळक व शिवरामपंत परांजपे यांच्या उपस्थितीत परदेशी कापडाची होळी पेटवली. जहाल विचारसरणीच्या लोकांनी अवलंबिलेल्या कृतिशील राजकारणाचा तो एक नवा आविष्कार होता. बॅरिस्टर अब्दुल रसूल, मौलवी अब्दुल हुसेन वगैरे मुसलमान बंगालमधील स्वदेशी चळवळीत उत्साहाने भाग घेत होते तर महाराष्ट्रातील स्वदेशी चळवळीत मुंबईचे अली मोहम्मद भीमजी, हैद्राबादचे काजी सय्यद सैफुद्दीन, पुण्याचे काजी मोहम्मद अबीदसाहेब रुखमुद्दीन, सोलापूरचे शेख महताब इस्माईल कलबुर्गी, नाशिकचे निजामुद्दीन पीरजादा वगैरे मुसलमान सहभागी झाले होते. काँग्रेसपासून दूर राहिलेल्या मुसलमान समाजातील तरुण मुसलमान स्वदेशी व बहिष्कार चळवळीमुळे प्रभावित होऊन काँग्रेसकडे आकृष्ट झाला असल्याची ही चिन्हे होती.

हिंदुस्थानात तेव्हा सर्व प्रकारचा माल तयार होत नव्हता. संपूर्ण स्वदेशी माल वापरण्याचे व्रत आचरिता आले नाही तर आपद्धर्म म्हणून जपान, जर्मनी, फ्रान्स किंवा अमेरिका या देशांत तयार झालेला माल लोकांनी घ्यावा; पण काही झाले तरी इंग्लंडमध्ये तयार झालेला व हिंदुस्थानात आयात केला जाणारा माल येथील लोकांनी विकत घेऊ नये असे टिळक सांगत असत. स्वदेशी माल वापरण्याची प्रतिज्ञा घेऊन इंग्लंडकडे वाहत असलेला कोट्यवधी रुपयांचा ओघ थांबवावा असा टिळकांचा सल्ला होता. नाक दाबले की तोंड उघडते तसे इंग्लंडच्या व्यापारावर प्रतिकूल परिणाम घडवून आणून राज्यकर्त्यांना वठणीवर आणणे हे स्वदेशी व बहिष्कार आंदोलनाचे उद्दिष्ट होते. लँकेशायर परगण्यातील कापडगिरण्यांशी एरवी स्पर्धा करीत असलेल्या हिंदुस्थानातील कापडगिरण्यांच्या मालकांच्या दृष्टीने स्वदेशी व बहिष्काराची चळवळ म्हणजे पर्वणी होती. विलायती मालावरच्या बंगालमधील बहिष्काराने मुंबई–अहमदाबाद येथील गिरण्यांत तयार होणाऱ्या कापडाची मागणी एकदम वाढली. त्यामुळे हरगोविंददास कांटावाला, अंबालाल साकरलाल देसाई, लालशंकर उमियाशंकर वगैरेंनी अहमदाबादला नव्या कापडगिरण्या सुरू केल्या. १९०५ च्या जूनमध्ये तेथे फक्त ३२ कापडगिरण्या होत्या तर १९१० च्या जूनमध्ये त्यांची संख्या ५२ झाली. मुंबई, अहमदाबादचे गिरणीमालक काँग्रेसपक्षाला आर्थिक साहाय्य करू लागले. गांधीयुगात अहमदाबादच्या गिरणीमालकांचे काँग्रेसबरोबरचे नाते अधिक दृढ झाले. स्वदेशी चळवळीच्या प्रभावामुळे दुकाने, बँका, विमाकंपन्या, जहाजवाहतूक कंपन्या, कापडगिरण्या नव्याने सुरू करण्यात आल्या. आगपेटचा, साबण, काच, साखर यांसारख्या उपभोग्य मालाबाबत परावलंबी राहण्यापेक्षा या वस्तू देशातच तयार कराव्यात या विचाराला चालना मिळाली. अशा सर्व उपक्रमांना टिळकांनी नेहमीच पाठिंबा दिला.

देशातील या बदलत्या वातावरणाचे सावट काँग्रेसवर पडणे स्वाभाविक होते. १९०५ सालच्या अखेरीस बनारसला गोपाळराव गोखल्यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या काँग्रेस अधिवेशनाच्या कार्यक्रमपत्रिकेत स्वदेशी चळवळ, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, ले. गव्हर्नर बॅमफील्ड फुल्लर यांची झोटिंगपादशाही या विषयांचा अंतर्भाव केलेला नव्हता. विलायतेत शिष्टमंडळे पाठवून हक्कांची भीक मागण्यापेक्षा बहिष्कारासारख्या जाज्वल्य हत्यारांचा उपयोग करण्यावर काँग्रेसने भर द्यावा अशी टिळक, लजपतराय, विपिनचंद्र पाल वगैरेंच्या जहाल गटाची मागणी होती. हिंदुस्थानच्या दौऱ्यावर येणाऱ्या प्रिन्स ऑफ वेल्सचे (नंतरचे सम्राट पाचवे जॉर्ज) स्वागत करण्याचा ठराव विषयनियामक समितीत मवाळांचे

अनुक्रमणिका

बहुमत असल्याने वादावादीनंतर मंजूर झाला तेव्हा टिळकांनी खुल्या अधिवेशनात त्या ठरावावर मतदान घेण्याचा पवित्रा घेतला. त्यामुळे दंगल होईल या भीतीने स्वागताध्यक्ष मुन्शी माधवलाल यांनी पोलिसांची मदतही मागवली. अखेर गोखल्यांनी लजपतरायांना व्यक्तिशः आवाहन करून पेचप्रसंग टाळला. खुल्या अधिवेशनात ठराव चर्चेला येईल तेव्हा आपण गैरहजर राहू असे टिळकांच्या संमतीने जहाल गटाच्या वतीने लजपतरायांनी आश्वासन दिले. पण अधिवेशनाच्या अखेरच्या दिवशी केलेल्या भाषणात बंगालमधील दडपशाहीचा धिःकार करून लजपतरायांनी भिक्षापात्र अवलंबिण्याच्या मवाळ नेत्यांच्या धोरणाची रेवडी उडवली. १९०६ च्या आरंभी इंग्लंडमध्ये उदारमतवादी पक्ष अधिकारावर आला आणि जॉन मोर्ले भारतमंत्री झाल्याने मवाळ नेते हुरळले. मोर्लेसाहेब आपणास राजकीय हक्क देतील असा टिळकांचा मुळीच भ्रम नव्हता. कर्झनप्रमाणेच मोर्लेसाहेबांचेही काँग्रेसबद्दल वाईट मत होते. बंगालची फाळणी रद्द करण्याचे कारण नाही असे मोर्लेसाहेबांनी जाहीर केल्यावर 'बरे झाले, भ्रमाचा भोपळा लवकरच फुटला' असे टिळकांनी केसरीच्या वाचकांना सांगितले. येथील इंग्रज अधिकारी वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करीत होते. 'भाला' पत्रावरचा खटला ( १५ डिसेंबर १९०५ ), लजपतरायांच्या मालकीच्या व काशिनाथ कृष्णाजी आठवले यांच्या संपादकत्वाखाली चालणाऱ्या 'पंजाबी' वृत्तपत्रावरचा खटला ( २६ ऑक्टोबर १९०६ ) हे सरकारच्या दडपशाहीच्या धोरणाचे द्योतक होते. १९०६ सालच्या जून महिन्यात टिळक खापर्डे व मुंजे यांना बरोबर घेऊन शिवाजी उत्सवाच्या निमित्ताने कलकत्त्यास गेले. तेथे ते गंगास्नानासाठी गेले तेव्हा त्यांच्यामागोमाग पंचवीस हजार लोकांचा जमाव जात असल्याचे दृश्य दिसले. टिळक आता केवळ मुंबई इलाख्याचे नेते राहिले नव्हते. ते अखिल भारतीय ख्यातीचे नेते बनल्याची साक्ष अशा घटनांमुळे मिळू लागली होती.

१९०६ सालअखेरीस कलकत्त्यास भरणाऱ्या काँग्रेस अधिवेशनाचे अध्यक्षपद लजपतराय किंवा टिळक यांना देण्याचा बिपिनचंद्र पाल यांच्या गटाने चंग बांधला होता. टिळकांच्या जहाल गटाला काँग्रेसचा कारभार करण्याची संधी द्यावी असे वेडरबर्न यांनी गोखल्यांना सुचवले; पण टिळक किंवा अन्य कोणी जहाल नेता काँग्रेसचा अध्यक्ष म्हणून निवडला गेल्यास कलकत्ता-काँग्रेसवर बहिष्कार घालण्याची फेरोझशहांच्या गटाने धमकी दिली. टिळक कलकत्ता-काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडले जाणार असा रंग दिसू लागताच स्वागतसमितीशी सल्लामसलत न करता सुरेंद्रनाथ बॅनर्जी व भूपेंद्रनाथ बसू यांनी लंडनमध्ये असलेल्या वृद्ध दादाभाई नौरोजींना अध्यक्षपद स्वीकारण्याबाबत तारेने विनंती केली. दादाभाईंनी होकार कळविताच जहाल गटाने टिळकांच्या नावाचा आग्रह सोडून दिला. स्वराज्याच्या मागणीप्रमाणेच स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षणाबाबतच्या ठरावांना दादाभाई अनुकूलच असतील असे टिळकांना वाटत होते आणि त्यांची ती अपेक्षा खरी ठरली. या ठरावावरील विषयनियामक समितीतील चर्चा वादळी ठरली. आरडाओरड करून गोखले, मदनमोहन मालवीय यांच्यासारख्या वक्त्यांच्या भाषणांत अडथळे आणले गेले. बिपिनचंद्र पाल, खापर्डे यांना सभात्याग करावा लागला. बहिष्काराचा ठराव फक्त बंगालपुरताच आहे असे मवाळ पक्षाचे म्हणणे होते तर तो सर्व देशाला लागू पडतो असे जहालांचे मत होते. दादाभाई अध्यक्ष असल्याने आणि उभयपक्षांनी समंजसपणे दाजी आबाजी खऱ्यांच्या मध्यस्थीने तडजोड स्वीकारल्याने काँग्रेस कलकत्त्याला दुभंगली नाही पण अधिवेशनाचे सूप वाजताच उभयपक्षांनी १९०७ अखेर नागपूरला भरणार असलेल्या अधिवेशनात होणाऱ्या संभाव्य संघर्षाची तयारी सुरू केली.

महाराष्ट्र, मध्यप्रांत–वऱ्हाड, पंजाब आणि बंगाल या प्रांतांत जहाल गटाचा जोर असला तरी गुजरात, मद्रास व संयुक्तप्रांत हे मवाळांचे बालेकिल्ले होते. कलकत्ता-काँग्रेसनंतर काढलेल्या संयुक्त प्रांतातील दौऱ्यात गोखल्यांनी राजकीय चळवळ सनदशीरच ( कॉन्स्टिटचुशनल ) असावी असे प्रतिपादन केले तेव्हा "जेथे सनदच ( कॉन्स्टिटचुशन ) नाही तेथे सनदेच्या कलमाबरहुकूम चळवळ तरी कसची ?" असा टिळकांनी प्रश्न उपस्थित केला. कायदा करण्याचा अधिकार परकीयांच्या हाती असल्याने

आपली चळवळ कायदेशीर की बेकायदेशीर यावर घोळ घालण्याचे टिळकांना कारण वाटत नव्हते. न्याय, नीती, ऐतिहासिक परंपरा किंवा प्रगती यांच्या आधारे आपण चालवलेली चळवळ परक्या सरकारने बेकायदेशीर ठरवली तर शिक्षा भोगूनही चळवळ चालू ठेवावी असे टिळक म्हणत होते. इंग्रज राजवटीशी आवश्यक तेथे सहकार्य आणि शक्य तेथे विरोध करण्याचे टिळकांच्या जहाल गटाचे धोरण होते तर इंग्रजांबरोबर शक्य तेथे सहकार्य आणि आवश्यकता वाटलीच तर त्यांना विरोध करावा असे नेमस्तांचे धोरण होते. १९०७ सालच्या अखेरीस नागपूरला अधिवेशन भरवावे असे निमंत्रण मुधोळकर व पंडित या दोन मवाळ रावबहाद्दुरांनी कलकत्यास दिले होते. ते स्वीकारले गेल्यानंतर टिळकांना अध्यक्षपद मिळावे या दृष्टीने खापर्डे, मुंजे, अच्युत बळवंत कोल्हटकर, धुंडिराजपंत ठेंगडी, नारायणराव अळेकर, शामराव देशपांडे, भाऊसाहेब दुराणी, वीर वामनराव जोशी वगैरे जहालांनी जोरदार हालचाली सुरू केल्या. त्यांना अरविंद घोष आदी बंगाली तरुणांचा पाठिंबा होता.

१९०७ च्या मे महिन्यात लाला लजपतराय व सरदार अजितसिंग यांना हद्दपार करण्यात आले. २२ सप्टेंबर १९०७ रोजी नागपूरला काँग्रेसच्या स्वागतसमितीच्या सभेत जहाल व मवाळ सभासदांमधील तंटा विकोपाला जाऊन प्रकरण धक्काबुक्की करण्यापर्यंत गेले. मवाळांना डॉ. रासबिहारी घोष अध्यक्ष म्हणून हवे होते. फेरोजशहा, वाच्छा, गोखले वगैरेंनी काँग्रेसचे अधिवेशन नागपूरऐवजी सुरतेस घेण्याचे ठरवले. सहा महिन्यांची हद्दपारी भोगून १८ नोव्हेंबर १९०७ ला लाहोरला परतलेल्या लजपतरायांना काँग्रेसचे अध्यक्षपद देण्याची टिळक, खापर्डे वगैरेंनी सूचना केली; पण गोपाळराव गोखल्यांनी लजपतरायांना पत्र लिहून त्यांचा नकार मिळवला. रासबिहारी घोष यांची अध्यक्ष म्हणून निवड झाल्याचे २४ नोव्हेंबर १९०७ ला जाहीर होताच सुरतेस भरणारी काँग्रेस म्हणजे "मेथा आणि को." यांची मजलस आहे असा टिळकांनी केसरीत अभिप्राय दिला.[१२] जहाल पक्षातील सळसळत्या रक्ताच्या तरुणांना नागपुरास जहालांची वेगळी नवी काँग्रेस भरवावी असे वाटत होते. पण काँग्रेस सोडणे किंवा मोडणे योग्य होणार नाही असे टिळकांना वाटत होते. तसे झाले तर स्वराज्याची चळवळ क्षीण, कमकुवत होईल असे त्यांना वाटत असावे. काँग्रेसमधून अंग काढून घेण्यापेक्षा तीत राहून आपले वर्चस्व स्थापन करणे इष्ट अशी टिळकांची भूमिका होती.

सुरत हा फेरोझशहांचा बालेकिल्ला असल्याने तेथे स्वागतसमितीने काँग्रेस अधिवेशनासाठी भरपूर पैसा जमवलाच. त्याचबरोबर जहाल व मवाळ यांच्यामधील मतभेदांचे पर्यवसान दंगलीत होण्याचा संभाव्य धोका लक्षात घेऊन रणधुमाळीत भाग घेण्यासाठी बऱ्याच गुंडांचा फौजफाटाही तयार ठेवला होता अशी गोखल्यांचे पट्टशिष्य श्रीनिवासशास्त्री यांची साक्ष आहे.[१३] टिळक व बिपिनचंद्र पाल यांनीही जहाल विचारसरणीचे लोक जास्तीत जास्त संख्येने येतील अशी व्यवस्था केली होती. सुरतेला गेलेल्या टिळकांच्या अनुयायांमध्ये पुण्याचे तसेच कऱ्हाड–मध्यप्रांतातले तालीमबाज तरुण होते. अधिवेशनाच्याआधी चारआठ दिवस उभय पक्षांतर्फे आयोजित केल्या जाणाऱ्या जाहीर सभा, पुढाऱ्यांच्या मिरवणुका, नेत्यांची खलबते, मध्यस्थांची तडजोडीसाठी चाललेली धावपळ वगैरेंमुळे अफवांना ऊत आला होता आणि प्रकरण हातघाईवर येणार असा बहुतेकांचा होरा होता. अधिवेशन सुरू होण्यापूर्वी दहा दिवस प्रसिद्ध करण्यात आलेल्या कार्यक्रमपत्रिकेत व विषयांच्या यादीत स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण या चतुःसूत्रीबाबत उल्लेख केलेला नव्हता. अधिवेशन सुरू होण्याआधी एक महिना या विषयांवरील ठरावांचे मसुदे प्रसृत होणे आवश्यक होते. प्रत्यक्षतः ठरावांचे मसुदे २६ डिसेंबरला अधिवेशन सुरू झाले तेव्हा दुपारी अडीचपर्यंत प्रतिनिधींच्या हाती पडले नव्हते हे पुढे गोखल्यांनीही कबूल केले. कलकत्ता अधिवेशनातील ठरावांच्या तुलनेने सुरतेच्या ठरावांच्या मसुद्यात आपण किरकोळ शाब्दिक फेरफार केले असे गोखल्यांचे म्हणणे होते, तर या फेरफारांमुळे ठरावांचा आशय बदलतो असे जहालांचे म्हणणे होते. २६ डिसेंबरला आरडाओरडयामुळे कामकाज स्थगित करावे लागले.

२७ डिसेंबरला अधिवेशनाच्या दुसऱ्या दिवशी अध्यक्षीय निवडीस हरकत घेणारी उपसूचना मांडण्यासाठी टिळक व्यासपीठावर गेले आणि बोलाचाली होऊन खुर्च्या व जोडे फेकले गेले. मंडपात मारामारी झाली आणि काँग्रेस फुटली. टिळकांच्या हट्टामुळे व कारस्थानामुळे काँग्रेस दुभंगली असे मवाळांना वाटले तरी प्रत्यक्षतः टिळक अखेरच्या क्षणापर्यंत आपल्या गटातील उत्साही तरुणांना आवरण्याचा प्रयत्न करीत होते. मध्यस्थांनी केलेल्या तडजोडीच्या प्रयत्नांना मवाळांनी पुरेसा प्रतिसाद न दिल्याने संघर्ष अटळ झाला. सुरतेस काँग्रेसमध्ये फूट पडली त्या प्रकारास टिळक जबाबदार नसून आपण जबाबदार आहोत असे श्री. अरविंदांनी पुढे प्रांजळपणे कबूल केले आहे. 'वंदेमातरम' पत्राच्या १६ फेब्रुवारी १९०८ च्या अंकात अरविंदांनी या दुफळीसंबंधी तीन अंकी नाटिका लिहिली. तो वाचली तरी टिळक काँग्रेसमध्ये दुफळी होऊ नये असाच प्रयत्न करीत असल्याचे श्री. अरविंदांनी चित्रण केलेले दिसते.[१४] कलकत्ता-काँग्रेसने घोषित केलेल्या चतुःसूत्रीवरच्या ठरावाबाबत मवाळ पक्ष वोटचेपे धोरण स्वीकारतो आहे असे वाटल्याने टिळकांनी सुरतेत पक्षांतर्गत संघर्षाला सामोरे जावयाचे ठरवले. विशेषतः स्वराज्य व बहिष्कार यांबाबतच्या ठरावामुळे तोपर्यंत श्री. अरविंदांनी म्हटल्याप्रमाणे, कूर्मगतीने चाललेल्या काँग्रेसच्या चळवळीला गती येईल आणि ती कृतिशील बनेल असा त्यांना विश्वास वाटत होता.[१५]

सुरतेच्या बखेडयानंतर १९०८ च्या मार्च महिन्यात आपल्या गटातल्या चारही उमेदवारांना पुणे नगरपालिकेच्या निवडणुकीत यश मिळवून देऊन आणि पुणे जिल्हासभेच्या पहिल्या बैठकीत आपल्याला हवे तसे ठराव मंजूर करून घेऊन टिळकांनी पुण्यावरील आपले वर्चस्व पुन्हा सिद्ध केले. एप्रिल-अखेर धुळे येथे भरलेल्या मुंबई प्रांतिक अधिवेशनाने त्यावर शिक्कामोर्तब केले. याच काळात टिळकांनी मद्यपान निषेधाची जोरदार चळवळ केली आणि त्यांच्या अनुयायांनी दारुगुत्त्यांसमोर निदर्शने केली. सरकारने निदर्शकांना अटक करून न्यायालयांमार्फत दंड व शिक्षा ठोठावण्याचा धडाका लावला. ३० एप्रिल १९०८ रोजी मुझफरपूरला खुदीराम बोस व प्रफुल्ल चक्रवर्ती यांनी बाँब टाकला. त्याचे पडसाद देशभर उमटले. १६ मे १९०८ रोजी पुण्यात बाँबस्फोटाचा प्रकार घडला. २ जूनला पुण्यात तीन ठिकाणी बाँबस्फोट झाले. या प्रकारामागे काळकर्ते शिवरामपंत परांजपे आणि टिळक यांची फूस असावी असा सरकारला संशय आला; पण तसा भरभक्कम पुरावा हाती येईपर्यंत थांबण्यापेक्षा राजद्रोहात्मक लेखन केल्याचा आरोप ठेवून या दोघांवरही खटले भरणे सरकारला सोपे होते.[१६] टिळकांवरील खटल्याची सुनावणी १३ जुलै १९०८ रोजी मुंबईत सुरू झाली तेव्हापासूनच गडबड सुरू झाली. १६ जुलैपासून कामगार संपावर गेले. १७ जुलैस पस्तीस हजार गिरणीकामगार संपावर होते. २२ जुलैला टिळकांना सहा वर्षांची सजा सुनावण्यात आल्यानंतर २८ जुलैपर्यंत मुंबईच्या गिरणीकामगारांनी पुकारलेला भारताच्या कामगारचळवळीच्या इतिहासातला हा पहिला राजकीय संप चालूच होता. कामगारांची उग्र निदर्शने, दगडफेक, लाठीमार, गोळीबार यांमुळे लेनिननेही या संपाची दखल घेतली. मुंबईतील कापडगिरण्यांतील कामगार, गोदीमध्ये काम करणारे हमाल हे बहुसंख्य ब्राह्मणेतर जातीतील असूनही त्यांनी टिळकांसारख्या ब्राह्मण नेत्याच्या अटकेचा व शिक्षेचा असा तीव्र निषेध केलेला पाहून इंग्रज राज्यकर्तेही अस्वस्थ झाले.[१७] टिळकांनी देशासाठी उपसलेले कष्ट, भोगलेला कारावास, मद्यपानाला आळा घालण्यासाठी केलेले प्रयत्न आणि विशेषतः मुंबईतील कामगारचळवळीच्या आरंभापासून झालेल्या विविध संपांच्या वेळी कामगारांची सातत्याने घेतलेली बाजू यांमुळे कामगारांना टिळकांविषयी आदर वाटत होता हे स्पष्ट दिसते.

साधनानाम अनेकता हे टिळकांच्या राजकारणाचे एक सूत्र होते. देश स्वतंत्र करण्याचे साध्य गाठण्यासाठी सर्व प्रकारची साधने वापरण्यास त्यांची तयारी होती. आवश्यक असेल तर हिंसक मार्गाचा अवलंब करण्यास त्यांची तयारी होती. सशस्त्र स्वातंत्र्यलढा करणे शक्य आहे की नाही, तसा करणे व्यवहार्य ठरेल की नाही ही त्यांच्या दृष्टीने खरी कसोटी होती. गांधीजींप्रमाणे हिंसक मार्गाचे टिळकांना वावडे नव्हते. काळवेळ पाहून सशस्त्र उठावाची शक्यता अजमावून पाहण्यास ते कचरत नसत. स्वतः

टिळकांनी स्वातंत्र्यलढ्यात शस्त्रांचा वापर केला नाही. मात्र सशस्त्र स्वातंत्र्यलढा करू पाहणाऱ्या क्रांतिकारकांबरोबर त्यांचा संपर्क असे. चापेकर बंधू, शामजी कृष्णवर्मा, सावरकर बंधू, सेनापती बापट, विष्णु गणेश पिंगळे, पांडुरंग सदाशिव खानखोजे वगैरे क्रांतिकारकांनी काँग्रेसबाहेर राहून १९२० पर्यंतच्या काळात सशस्त्र लढा देण्याचा निकराचा प्रयत्न केला. या सर्वांना टिळकांनी उत्तेजन दिले, साहाय्य केले. यांतल्या काहींना परदेशी जाण्यास आवश्यक ते साहाय्य केले. बाळकृष्णपंत चापेकर वर्षभर फरारी असताना त्यांना ठिकठिकाणी आश्रय मिळेल अशी टिळकांनी व्यवस्था केली. नेपाळात कृष्णाजीपंत खाडिलकरांना पाठवून रायफली तयार करण्याचा कारखाना सुरू करण्याचे प्रयत्न, बाँब तयार करू इच्छिणाऱ्या गोविंद पांडुरंग बापटांना टिळकांनी केलेले साहाय्य, होत्तीलाल वर्मा यांच्या-मार्फत सेनापती बापटांकडून त्यांनी मिळवलेली बाँबपोथी वगैरे घटना स्वातंत्र्योत्तर काळात उजेडात आल्या आणि तत्कालीन काँग्रेसच्या बाहेर तरुणांनी गुप्त संघटनांमार्फत चालवलेल्या देशमुक्तीच्या राजकारणाबरोबरचे टिळकांचे लागेबांधे स्पष्ट झाले. १९१४ साली मंडालेहून सुटून आल्यानंतर टिळक मवाळ झाले असे अनेकांना वाटले; पण पहिल्या महायुद्धाच्या काळात जर्मनीत असलेल्या गदर पक्षाच्या क्रांतिकारकांनी पाठवलेले हिरे विकून त्या रकमेचा विनियोग बेळगावच्या मराठा लाइट इन्फंट्रीतील सैनिकांना वश करण्यासाठी करावयाचा टिळक–गंगाधरराव देशपांडे–गोविंदराव याळगी यांचा उद्योग लक्षात घेतला तर दीर्घ मुदतीच्या कारावासाचा व उतारवयाचा टिळकांच्या मूळच्या वृत्तीवर कसलाच परिणाम झाला नव्हता हे स्पष्ट होते.

१७ जून १९१४ रोजी मध्यरात्रीनंतर टिळकांना गायकवाडवाड्यात पोलिसांनी आणून त्यांची मुक्तता केली. ४ ऑगस्टला इंग्लंडने जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारले. त्याच महिन्याच्या अखेरीस केसरीत पत्र प्रसिद्ध करून टिळकांनी इंग्रज सरकारला युद्धात शक्य तेवढी मदत करण्याचे आवाहन केले. टिळकांच्या कारावासाच्या काळात काँग्रेसचे काम रुटूखुटू चालले होते. वार्षिक अधिवेशनाला येणाऱ्या प्रतिनिधींची संख्या कमालीची घटली होती. राष्ट्रीय किंवा 'नॅशनॅलिस्ट' नावाने वावरणारे जहाल काँग्रेसबाहेर होते. १९०८ साली ६१७, १९०९ साली २४३, १९१० साली ६३६, १९११ साली ४४६, १९१२ साली अवघे २१२ आणि १९१३ साली ३४९ एवढे प्रतिनिधी काँग्रेसला हजर होते. काँग्रेसला अशी अवकळा पूर्वी कधी आली नव्हती. अशा स्थितीत काँग्रेसमध्ये जाऊन ती काबीज करणे या उद्दिष्टास टिळकांनी अग्रक्रम दिला हे स्वाभाविक होते. जहालांच्या काँग्रेसप्रवेशात मवाळांनी सुरतेच्या बखेड्यानंतर मंजूर केलेल्या काँग्रेसच्या घटनेने अडथळा निर्माण झाला होता. त्या घटनेच्या विसाव्या कलमानुसार काँग्रेस अधिवेशनाला जाणारे प्रतिनिधी (मुखत्यार) जाहीर सभा घेऊन निवडण्याची पूर्वीची प्रथा बंद करण्यात आली होती. मवाळांच्या सभा व समित्या ज्यांना निवडतील त्यांनाच प्रतिनिधी म्हणून कामकाजात भाग घेता येत असे.[१८] हा नियम रद्द करून सार्वजनिक सभेसारख्या संस्थांनी जाहीर सभा भरवून प्रतिनिधी निवडावेत असे टिळकांचे म्हणणे होते. त्याला फेरोझशहा मेहता, वाच्छा वगैरेंचा सक्त विरोध होता. मवाळ व जहाल या दोन पक्षांत समेट घडून यावा यासाठी श्रीमती ॲनी बेझंट, भूपेंद्रनाथ बसू यांनी १९१४ सालच्या मद्रास काँग्रेसपूर्वी प्रयत्न केले; पण ते विफल ठरले. १९१५ सालच्या अखेरीस काँग्रेस मुंबईस भरणार असल्याने तिलाही 'मवाळांच्या क्लबोत्सवाची' कळा येणार असे टिळकांना वाटत होते.

१९१४ च्या मद्रास-काँग्रेसचे अध्यक्ष भूपेंद्रनाथ बसू यांना अधिवेशनापूर्वी गोखल्यांनी गुप्त पत्र पाठवल्याने समेटाची बोलणी मोडली असा आरोप करून टिळकांनी गोखल्यांवर फार कडवट टीका केली. काँग्रेस राष्ट्रीय आहे; टिळकांची नव्हे किंवा गोखल्यांचीही नव्हे असे टिळकांनी गोखल्यांना बजावले.[१९] 'चोराच्या उलटचा बोंबा' या शीर्षकाचा टिळकांचा हा अग्रलेख प्रसिद्ध झाल्यानंतर अवघ्या दहा दिवसांनी गोखल्यांचे निधन झाले. (१९ फेब्रुवारी १९१५) गांधीजी नुकतेच दक्षिण आफ्रिकेतील लढा संपवून हिंदुस्थानात परतले होते. (जानेवारी १९१५) गोखल्यांच्या मृत्यूनंतर जुलै महिन्यात गांधीजींनी मवाळांच्या वतीने टिळकांशी समेटाची





अनुक्रमणिका

बोलणी केली; पण गांधीजींनी सुचवल्याप्रमाणे टिळक मवाळांना शरण जाण्यास तयार झाले नाहीत.[१०] टिळक-गांधी बोलणी होण्यापूर्वी ८, ९ व १० मे रोजी पुण्यास भरलेल्या मुंबई प्रांतिक सभेवर टिळकांचे वर्चस्व असल्याचे मवाळांनाही प्रत्यंतर आले होते. फेरोझशहा मेहतांच्या मृत्यूनंतर (५ नोव्हेंबर १९१५) भरलेल्या मुंबईच्या काँग्रेस अधिवेशनात विसाव्या कलमात अंशतः दुरुस्ती केली गेल्याने टिळकांच्या जहाल राष्ट्रीय पक्षाच्या काँग्रेस प्रवेशाचा प्रश्न सुटणे सोपे झाले. २९ एप्रिल ते १ मे १९१६ रोजी बेळगावला भरलेल्या प्रांतिक सभेत समेटाचा ठराव मंजूर करून घेण्यात टिळकांना गांधीजींनी साथ दिली होती. बेळगाव परिषदेनंतर टिळकांनी होमरूलची स्वराज्याची चळवळ सुरू केली. त्यामुळे झालेल्या राजद्रोहाच्या तिसऱ्या खटल्यात ते दोषमुक्त ठरले. परिणामतः लखनौ येथे १९१६ च्या अखेरीस भरलेल्या काँग्रेस अधिवेशनात टिळक व त्यांचे अनुयायी यांनी नऊ वर्षांच्या गैरहजेरीनंतर काँग्रेसमध्ये पुन्हा प्रवेश केला. तेव्हापासून काँग्रेसला येणाऱ्या प्रतिनिधींची संख्या झपाट्याने वाढली हे आकडेवारीने स्पष्ट दिसले. (लखनौ-काँग्रेस १९१६ : २३०१ प्रतिनिधी; कलकत्ता-काँग्रेस १९१७ : ४९६७; दिल्ली १९१८ : ४८६९; अमृतसर १९१९ : ७०३१; आणि नागपूर १९२० : १४५८३ प्रतिनिधी.) कनिष्ठ मध्यमवर्गातील लोकांना काँग्रेसच्या चळवळीत ओढण्याच्या श्रेयाचा फार मोठा वाटा टिळकांनी केलेल्या राजकारणास दिला पाहिजे.

१९१६ च्या लखनौ-काँग्रेसमध्ये काँग्रेस-लीग करार घडवून आणून टिळकांनी एक महत्त्वाचे पाऊल उचलले होते. १९०५ च्या स्वदेशी आंदोलनामुळे बाल्कन राष्ट्रांच्या युद्धात आणि नंतर पहिल्या महायुद्धात इंग्रजांनी तुर्कस्तानच्या सम्राटाविरुद्ध–खलीफा विरूद्ध–धरलेला वैरभाव, पॅन इस्लामच्या विचारसरणीचा वाढता प्रभाव वगैरे अनेक कारणांमुळे मुसलमान तरुण इंग्रजांविरुद्ध चाललेल्या चळवळीत भाग घेऊ लागले होते. फोडा आणि झोडा या राजनीतीनुसार इंग्रजांनी पोसलेल्या मुस्लिम लीगसारख्या जातीय संघटनेतही अलीबंधूंसारख्या तरुणांना आगाखानसारख्या बुजूर्ग नेत्यांचे इंग्रज-धार्जिणे धोरण पसंत नव्हते. काँग्रेसशी युती करण्यास लीगमधील एक मोठा गट तयार होता. हिंदु-मुस्लिम ऐक्याशिवाय स्वराज्याचा प्रश्न सुटणार नाही हे ओळखून टिळकांनी महम्मदअली जिना यांच्यासारख्या तरुण राष्ट्रवादी मुस्लिम नेत्याच्या मदतीने लखनौकरार घडवून आणला. मुसलमानांना त्यांच्या एकूण लोकसंख्येतील प्रमाणापेक्षा थोड्या जास्त जागा देण्याचे टिळकांचे औदार्य मदनमोहन मालवीय, डॉ. मुंजे यांच्यासारख्या हिंदुधर्माभिमान्यांना मुळीच आवडले नव्हते. हिंदु-मुसलमानांमधील करारामुळे स्वराज्याच्या चळवळीचे भाग्यही फळफळेल [ We have found that luck in Lucknow ], असे टिळकांनी लखनौ अधिवेशनात बोलताना म्हटले.[११] १९१५-१६ नंतरच्या वर्षांत टिळकांची लोकमान्यता फक्त हिंदूंपुरती मर्यादित राहिली नव्हती. त्यांच्या सभांना मुसलमान गर्दी करू लागले.

१९१७ च्या कलकत्ता काँग्रेसच्या अध्यक्षा श्रीमती ॲनी बेझंट यांच्यापेक्षाही टिळकांचे स्वागत जास्त शानदार रीतीने झाले. त्या वर्षीच्या ऑगस्टमध्ये भारतमंत्री माँटेग्यु यांनी इंग्रज सरकारचे भावी धोरण विशद करणारी ऐतिहासिक घोषणा केली. या घोषणेत ‘ जबाबदार राज्यपद्धती ’ असा संदिग्ध शब्दप्रयोग केलेला होता. लायोनेल कर्टिससारखे इंग्रज, कार्यकारी मंडळास जबाबदार असलेले विधानमंडळ असा त्या शब्दांचा अर्थ करीत होते तो टिळकांना मान्य नव्हता. जबाबदार राज्यपद्धती म्हणजे लोकांनी निवडलेल्या कायदेमंडळाला जबाबदार असलेली कार्यकारिणी ( म्हणजेच संसदीय लोकशाही ) असा टिळकांनी १९१७ च्या काँग्रेसमध्ये अर्थ स्पष्ट केला आणि काँग्रेस-लीग करारातील तरतुदी सरकारने स्वीकाराव्या असा आग्रह धरला. याच अधिवेशनात टिळकांनी १९१४ पासून स्थानबद्ध असलेल्या अलीबंधूंच्या मुक्ततेची मागणी करणारा ठरावही मांडला होता. या दिवसांत गांधीजी हिंदी लोकांनी इंग्रजांच्या लष्करात भरती व्हावे असा प्रचार करीत होते. टिळकांनीही सहा महिन्यांत पाच हजार रिक्रूटांची भरती करण्यास आपण तयार आहोत असे गांधीजींना पत्र लिहून कळवले. मात्र टिळकांना त्यासाठी सरकारकडून एक आश्वासन हवे होते. सैन्यातील उच्च अधिकारपदे हिंदी लोकांना मिळावीत, त्यांना लष्करी



अनुक्रमणिका

महाविद्यालयात शिक्षण मिळावे, गोऱ्या अधिकाऱ्यां-प्रमाणेच समान संधी मिळावी अशा टिळकांनी शर्ती घातल्या होत्या.[२२] गांधीजींना सहकार्यासाठी शर्ती घालणे मान्य नव्हते. त्याबरोबरच श्रीमती बेझंट, अलीबंधू आणि टिळक यांच्यासारख्या नेत्यांना न बोलावता युद्धपरिषद बोलावण्याची व्हाइसरॉय चेम्सफोर्ड यांची कल्पनाही त्यांना रुचली नव्हती आणि तसे त्यांनी व्हाइसरॉयला कळवलेही होते. "ज्याच्यासाठी लाखो लोक वेडे झाले आहेत आणि ज्याच्यासाठी लाखो लोक प्राण देण्यास तयार आहेत असा एकच नेता तेव्हा हिंदुस्थानात होता आणि तो म्हणजे टिळक" असे गांधीजी जाहीर सभेत सांगत होते.[२३] १९१८ सालात गांधीजींचे मवाळ पक्षाप्रमाणेच टिळक व ॲनी बेझंट या होमरूल चळवळीच्या नेत्यांबरोबरही मतभेद होते. बेझंटबाईंना सत्याग्रह करण्याची कल्पनाच मान्य नव्हती तर टिळकांनी सत्याग्रह हे दुबळ्यांचे हत्यार समजून त्याचा स्वीकार करण्याची तयारी दर्शविली होती. माँटेग्यु-चेम्सफोर्ड यांनी सुचवलेल्या सुधारणांत दुरुस्त्या सुचवून त्यासाठी लढण्यास मवाळ तयार नव्हते. गांधीजींनी धरलेला अहिंसेचा आग्रह, सत्याग्रहाविषयीची त्यांची कल्पना वगैरे गोष्टी टिळकांना मान्य नसल्या तरी गांधीजींनी काँग्रेसच्या कार्यात सहभागी व्हावे यासाठी टिळक त्यांना पत्र लिहून मन वळवीत होते तर "काँग्रेसमें आनेका मेरा इरादा नहीं है। नरम दलके संमेलनमें भी जानेका इरादा नही है" असे गांधीजी त्यांना उत्तरादाखल लिहीत होते. त्याबरोबरच १० जून १९१८ रोजी मुंबईच्या टाऊनहॉलमध्ये भरलेल्या युद्ध परिषदेचे अध्यक्ष गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन यांनी टिळकांना बोलू दिले नाही त्याचा गांधीजींनी जाहीर निषेध केला होता.

२४ सप्टेंबर १९१८ रोजी चिरोलवर टिळकांनी भरलेल्या खटल्यासाठी टिळक विलायतेस गेले ते खटला हरल्यावर २७ नोव्हेंबर १९१९ रोजी मायदेशी परतले. टिळकांच्या गैरहजेरीत गांधीजींनी रौलट विधेयकांविरुद्ध मार्च १९१९ मध्ये सत्याग्रहाचे अस्त्र उपसले. ६ एप्रिलला मुंबईत पडलेला हरताळ, पंजाबमध्ये अमृतसरच्या जालियनवाला बागेत झालेले हत्याकांड, बाँबे क्रॉनिकलचे संपादक हॉर्निमन यांची हद्दपारी यांमुळे देशातील वातावरण प्रक्षुब्ध झालेले असल्याने १९१९ अखेर अमृतसरला भरणाऱ्या काँग्रेस अधिवेशनाचे अध्यक्षपद कोणास द्यावे हा प्रश्न महत्त्वाचा झाला होता. १९१८ च्या दिल्ली काँग्रेसचे अध्यक्षपद टिळकांना देऊ करण्यात आल्याची तार टिळकांना विलायतेच्या वाटेवर असताना मिळाली होती; पण तेव्हा ते चिरोलखटल्यात गुंतल्याने मदनमोहन मालवीय अध्यक्ष झाले. १९१९ च्या अमृतसर अधिवेशनापूर्वी आपण स्वदेशी परतू की नाही अशी शंका असल्याने टिळकांनी विलायतेतून दा. वि. गोखल्यांना ७ ऑगस्ट १९१९ रोजी पत्र लिहून आपल्या गटाने चित्तरंजनदास, विजयराघवाचारियर, चक्रवर्ती किंवा मोतीलाल नेहरू यांना अमृतसर काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडून देण्याचे प्रयत्न करावेत असे कळवले होते.[२४] विलायतेतील वर्षभराच्या वास्तव्यात टिळकांनी तेथील मजूर पक्षाच्या पुढाऱ्यांशी स्नेहसंबंध जोडला होता. १९१७ साली रशियात अधिकारावर आलेल्या लेनिनच्या कम्युनिस्ट सरकारची टिळक हिंदुस्थानात परतल्यावर तरफदारी करू लागले. रशियातील राज्यक्रांतीमुळे समाजवादी विचारसरणीबद्दल पाश्चिमात्य देशांत आकर्षण निर्माण झाले होते. विलायतेतल्या या नव्या वाऱ्याची झुळूक टिळकांनीही विलायतेत असताना अंगावर घेतली असल्याने विलायतेहून परतल्यावर टिळक ठिकठिकाणच्या कामगारांना भांडवलवाले व श्रमजीवी या दोन वर्गांमध्ये होणाऱ्या लढ्याची संकल्पना समजावून देऊ लागले. बोल्शेविकांची विचारसरणी हे नवे हत्यार हिंदुस्थानचा स्वातंत्र्यलढा तीव्र करण्यासाठी वापरण्याचा अखेरच्या दिवसांत टिळकांचा प्रयत्न चालला होता असे दिसते.

१९१९ च्या अमृतसर अधिवेशनावर टिळक व चित्तरंजनदास यांचे नियंत्रण होते आणि गांधीजींना त्यांच्यावर मात करणे शक्य झाले नाही. माँटेग्यू-चेम्सफोर्ड सुधारणा असमाधानकारक, अपुऱ्या व निराशाजनक आहेत या दासबाबूंनी मांडलेल्या ठरावातील 'निराशाजनक' हा शब्द काढून टाकावा अशी गांधींनी दुरुस्ती सुचविली होती आणि सुधारणा राबवण्यात सरकारशी सहकार्य करण्याची काँग्रेसची इच्छा असल्याबद्दलचा एक नवा परिच्छेद

अनुक्रमणिका

त्यात समाविष्ट करावा असे गांधीजींचे म्हणणे होते. अखेर जयरामदास दौलतराम यांनी सुचवलेली तडजोड गांधींनी मान्य केल्याने ती दासबाबूंनी स्वीकारली तर आपणही ती स्वीकारण्याची तयारी टिळकांनी दाखविली आणि पेचप्रसंग सुटला. अमृतसरच्या या ठरावाबाबत गांधीजींनी यंग इंडियात भाष्य करताना "राजकारणात सारे काही चालते, क्षम्य असते." अशी टिळकांची भूमिका असल्याचा अभिप्राय दिला. तेव्हा गांधीजी आपल्या भूमिकेचा विपर्यास करीत आहेत हे टिळकांनी पत्र लिहून गांधीजींच्या नजरेला आणले. राजकारण हा साधूंचा खेळ नसून सामान्य प्रापंचिक माणसांचा खेळ आहे अशी आपली धारणा असल्याचे बजावून टिळकांनी लिहिले, " 'अक्कोधेन जिने क्कोधं' या गौतमबुद्धाने प्रतिपादन केलेल्या तत्त्वापेक्षा "ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्" या श्रीकृष्णाने सांगितलेल्या तत्त्वावर भिस्त ठेवणे मला अधिक पसंत आहे."[११] गांधीजींबरोबर तात्त्विक मतभेद, काँग्रेसचे धोरण व डावपेच यांबद्दल मतभिन्नता असतानाही गांधीजींचा काँग्रेसवरचा प्रभाव वाढतो आहे हे टिळकांनी हेरले होते. इंग्रजांशी संपूर्ण सहकार्य करावे असे म्हणणारे गांधीजी १९२० सालात संपूर्ण असहकाराची भाषा बोलू लागले. टिळकांनी मात्र तेव्हा प्रतियोगी सहकारितेच्या धोरणाचा पुरस्कार केला. 'शठं प्रति सत्यम्' ही गांधीजींची भूमिका होती तर टिळक 'शठं प्रति शाठ्यम्' या सनातन सूत्राचे पुरस्कर्ते होते.

१२ एप्रिल १९२० च्या 'मराठा' पत्रात टिळकांनी काँग्रेस डेमोक्रॅटिक पार्टी नावाच्या पक्षांतर्गत गटाचा जाहीरनामा प्रसिद्ध केला. शिक्षण द्या, चळवळ करा आणि संघटित व्हा हे आपल्या पक्षाचे ब्रीदवाक्य असल्याचे त्यात म्हटले होते. १९१९ च्या सुधारणांचा कायदा राबवावा, इंग्लंडमधील मजूर पक्षाच्या मदतीने नवे सुधारणा विधेयक तेथील संसदेत मांडले जावे यासाठी प्रयत्न करावेत, हिंदुस्थानचे स्वराज्य बनवून त्याला ब्रिटिश कॉमनवेल्थमध्ये समान हक्क असलेल्या भागीदाराचा दर्जा द्यावा, प्रांतांची पुनर्रचना भाषिक तत्त्वावर करावी, खिलाफत प्रश्नावर मुसलमानांना पाठिंबा द्यावा, प्रादेशिक भाषेतून शिक्षण द्यावे तसेच राष्ट्रभाषेचा विकास करावा, मद्यपानाला, वेठबिगारीला बंदी करावी, सर्व प्रौढांना मताधिकार असावा, सर्वांना शिक्षण सक्तीचे असावे व ते मोफत असावे, प्रांतांना ताबडतोब संपूर्ण स्वायत्तता द्यावी वगैरे बाबींचा या जाहीरनाम्यात अंतर्भाव केलेला होता. असहकाराच्या कार्यक्रमाविषयी चर्चा करण्यासाठी कलकत्त्यास काँग्रेसचे जादा अधिवेशन भरणार होते. त्याचे अध्यक्षस्थान टिळकांनी स्वीकारावे अशी चित्तरंजन दास यांची इच्छा होती पण टिळकांनी अध्यक्षपद स्वीकारण्यास नकार दिला. असहकाराच्या कार्यक्रमांवरच्या मतभेदांमुळे काँग्रेसचे दोनतीन तुकडे होतील आणि एकोपा नष्ट होईल अशी टिळकांना भीती वाटत होती. "ही चळवळ जोरावर येईल आणि नोकरशाहीला स्वराज्याचे बोलणे लोकांशी बोलण्यास भाग पाडील असे मला स्पष्ट दिसत आहे" असे टिळकांनी मृत्यूपूर्वी काही दिवस आधी कृष्णाजी प्रभाकर खाडिलकरांना सांगितले होते.[१२] असहकाराच्या चळवळीत नोकरशाहीच्या अटकेत पडण्यापेक्षा विलायतेस जाऊन वर्षसहा महिने राहण्याच्या विचाराने पासपोर्ट मिळवून तयारी करण्यासाठी टिळक मुंबईला गेले. तेथेच आजारी पडून कालवश झाले. १ ऑगस्ट १९२० लाच गांधींची सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली.

आपण आणि लोकमान्य टिळक यांच्यामधील फरक खुद्द गांधीजींनीच त्यांच्या सूत्रबद्ध शैलीत १९२१ साली विशद केला होता. गांधीजींनी राजकीय नेता म्हणून केलेले लोकमान्यांचे मूल्यमापन लक्षात घेण्यासारखे आहे. गांधीजींनी म्हटले होते, "लोकमान्यांचा मी अनुयायी आहे असा दावा मला करणे शक्य नाही. त्यांची दुर्दम्य इच्छाशक्ती, त्यांचे अफाट ज्ञान, देशाबद्दलचे प्रेम आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांचे विशुद्ध खासगी जीवन आणि त्यांनी केलेला मोठा त्याग यांची त्यांच्या लाखो देशबंधूंप्रमाणे मीही प्रशंसा करतो. आधुनिक काळातील सर्व माणसांमध्ये त्यांनी सर्वांत जास्त लोकांची मने जिंकली. सध्याच्या इंग्रज राजवटीचे दुष्परिणाम त्यांना जसे जाणवले होते तसे कदाचित दुसऱ्या कोणासही जाणवले नव्हते. देशाला त्यांचाच (स्वराज्याचा) संदेश मी देत आहे असा माझा दावा आहे. मात्र माझी पद्धत टिळकांच्या पद्धतीसारखी

नाही याची मला जाणीव आहे. टिळकांचा माझ्या पद्धतीवर विश्वास नव्हता असे नाही. त्यांच्या मृत्यू-पूर्वी अवघ्या पंधरा दिवसांपूर्वी त्यांनी माझी पद्धत अवलंबिण्यास लोकांचे मन वळवता आले तर ती फार चांगली पद्धत आहे असे अनेक मित्रांसमक्ष मला सांगितले होते. हे त्यांचे माझ्याबरोबरचे अखेरचे बोलणे होते. मात्र माझ्या पद्धतीविषयी आपल्या मनात शंका असल्याचेही त्यांनी मला सांगितले होते. मला तर (अहिंसात्मक सत्याग्रहाखेरीज) दुसरी पद्धत माहीत नाही.''[२७] अहिंसात्मक सत्याग्रह या एकाच पद्धतीचा गांधीजी अवलंब करीत होते तर ही पद्धत व्यवहार्य ठरल्यास स्वराज्यप्राप्तीसाठी वापरण्याची साधनानाम अनेकता म्हणणाऱ्या टिळकांची तयारी होती. काँग्रेस पक्षाला गांधीजींनी खेड्यापाड्यांत रुजवले. लोकांना निर्भय बनवले आणि व्यापक जनआंदोलनाची कास धरून स्वातंत्र्यचळवळीचा पाया व्यापक केला हे खरे असले तरी या दिशेने आधी अनेक वर्षे टिळकांनी केलेल्या राजकारणाची जोड मिळाल्याने गांधीजींना असे यश मिळणे शक्य झाले हे विसरून चालणार नाही.

## संदर्भ टिपा


१ ) **मराठा**, १५ नोव्हेंबर १८९१

२ ) आर. पी. पटवर्धन, **दादाभाई नौरोजी कॉरेस्पाँडन्स**, खंड २, भाग १, १९७७, पृ. २७०

३ ) **कित्ता**, पृ. २८३

४ ) य. दि. फडके. **व्यक्ती आणि विचार**, द्वितीयावृत्ती, १९८५, पृ. ३३

५ ) एम. के. गांधी, **ॲन ऑटोबायॉग्राफी**, पृ. ३३९-३४०

६ ) न. चिं. केळकर, **लो. टिळक यांचे चरित्र**, खंड २, भाग २, १९२८, पृ. ३५

७ ) आर. पी. पटवर्धन, **उपरोक्त**, खंड २, भाग २, पृ. ८७५

८ ) एम. डी. विद्वांस ( संपादक ) **लेटर्स ऑफ लोकमान्य टिळक**, १९६६, पृ. २५२

९ ) **केसरी**, १५ ऑगस्ट १९०५

१० ) **केसरी**, २२ ऑगस्ट १९०५

११ ) **केसरी**, १२ फेब्रुवारी १९०७

१२ ) **केसरी**, ३ डिसेंबर १९०७

१३ ) व्ही. एस. श्रीनिवासशास्त्री, **लाइफ अँड टाइम्स ऑफ फेरोझशहा मेहता**, १९७५, पृ. १२०

१४ ) श्री ऑरोबिंदो, **बंदेमातरम : अर्ली पोलिटिकल रायटिंग्ज**, १९७३, पृ. ६७३-६९७

१५ ) श्री ऑरोबिंदो, **बंकिम-टिळक-दयानंद**, १९७०, पृ. २४

१६ ) य. दि. फडके, **लोकमान्य टिळक आणि क्रांतिकारक**, १९८५, पृ. ९१-९३

१७ ) य. दि. फडके, **लो. टिळक आणि मुंबई कामगारांचा उत्स्फूर्त लढा**, **महाराष्ट्र टाइम्स**, ३१ जुलै १९८३

१८ ) **केसरी**, २२ डिसेंबर १९१४

१९ ) **केसरी**. ९ फेब्रुवारी १९१५

२० ) एम. डी. विद्वांस, **उपरोक्त**, पृ. २६५-२६९, टिळकांचे गांधींजींना पत्र

२१ ) **समग्र टिळक**, खंड ७, १९७५, पृ. ४३४
२२ ) एन. आर. फाटक, **सोर्स मटेरिअल फॉर अ हिस्टरी ऑफ द फ्रीडम मुव्हमेंट इन इंडिया**, खंड ३, भाग १ (१९१५–२२), १९६५; पृ. ९७
२३ ) नरहरी द्वा. परीख ( संपादक ), **महादेवभाई की डायरी**, प्रथम खंड ( १९१७ से १९१९), १९६१; पृ. ८६
२४ ) **कॉरेस्पाँडन्स अँड डायरी ऑफ जी. एस. खापर्डे**, १८९७–१९३४, खंड ७, १९७८, पृ. २४
२५ ) एम. डी. विद्वांस (संपादक), **उपरोक्त**, पृ. २८४
२६ ) **सोर्स मटेरिअल फॉर अ हिस्टरी ऑफ द फ्रीडम मुव्हमेंट इन इंडिया**, खंड २ ( १८८५–१९२० ), १९५८, पृ. ३३०–३३१
२७ ) एम. के. गांधी, **होमेज टू द डिपार्टेड**, १९५८, पृ. ४९

○ ○ ○





अनुक्रमणिका

# कॉंग्रेसच्या इतिहासातील गांधीयुग

वसंत पळशीकर

## कॉंग्रेसच्या नेतृत्वपदी विराजमान

– १ –

दक्षिण आफ्रिकेत स्थायिक झालेल्या हिंदी जनतेचे मूलभूत नागरिक हक्क व मानवी प्रतिभा यांच्या-साठीचा लढा दीर्घकाळपर्यंत चालविल्यानंतर, आणि त्यात काही एका टप्प्यापर्यंत यश मिळविल्यानंतर, १९१५ सालच्या जानेवारीत गांधी भारतात परतले. १८९६ साली ते प्रथम भारतात येऊन गेले तेव्हापासून भारतीय कॉंग्रेसच्या नेत्यांशी, येथील वृत्तपत्रांच्या संपादकांशी व उच्चपदस्थ ब्रिटिश अंमलदार मंड-ळींशी त्यांचा सतत संपर्क होता. ते येथे पोचण्या-आधीच त्यांची कीर्ती देशभर झालेली होती. कॉंग्रेस संघटनेची व चळवळीची सूत्रे गांधींच्या हाती सोप-विण्याची आशा गोखल्यांनी मनात बाळगली होती. गांधीही गोखल्यांच्या पायाशी बसून भारतीय राज-कारणाचे धडे घ्यायला उत्सुक होते.

गांधी काय भूमिका घेतात, कोणते कार्य हाती घेतात याकडे वेगवेगळ्या कारणांनी कॉंग्रेसमधील जहाल व नेमस्तपक्षीय पुढाऱ्यांचे तसेच ब्रिटिश उच्चपदस्थांचे लक्ष होते. वर्षभर, येथील राजकार-णात कोणतीही भूमिका घेऊन स्वतःला बांधून न घेता, देशभर हिंडून परिस्थितीचे अवलोकन कर-ण्याचा सल्ला गोखल्यांनी गांधींना दिला. तो गांधींनी मनोभावे पाळला. देशात जागोजाग त्यांच्यासाठी ज्या सत्कारसभा झाल्या त्यात देशाच्या एकात्मतेच्या दृष्टीने एक भाषा राष्ट्रभाषा म्हणून स्वीकारली जाण्याची इष्टता व आवश्यकता, अस्पृश्यतेचा कलंक हिंदुधर्मावरून पुसून टाकण्याची नितांत गरज, हिंदु-मुस्लिम ऐक्याची निकड, अशा अ-राजकीय विषयां-वरच ते बोलले. त्यांचा पेहराव, त्यांची राहणी, त्यांची मते या सगळ्यांमुळे राजकारणात रस अस-लेल्या हिंदी सुशिक्षित तरुणांची घोर निराशाच झाली. हे एक छांदिष्ट व विक्षिप्त गृहस्थ आहेत या निष्कर्षावर ते येऊन पोचले. उदाहरणार्थ, कविवर्य रवींद्रनाथ टागोरांच्या उच्च सांस्कृतिक वातावरणाने भारलेल्या शांतिनिकेतन संस्थेत नोकरचाकरांना रजा देऊन भंगीकाम, स्वयंपाक, सफाई या कामांमध्ये स्वावलंबनाचे धडे गिरविण्यास तेथील शिक्षक व विद्यार्थी यांना गांधींनी प्रेरित केले. अशीच काहीशी गोष्ट गोखल्यांच्या सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीत घडली. कॉंग्रेसच्या ज्येष्ठ पुढाऱ्यांनी व ब्रिटिश राज्य-कर्त्यांनी बहुधा सुटकेचा निःश्वास टाकला असावा.

अहमदाबादजवळ गांधींनी आश्रम स्थापन केला. दक्षिण आफ्रिकेत अनेक वर्षे श्रमनिष्ठ आश्रमीय जीवनपद्धतीचा त्यांनी अंगिकार केलेला होता. त्यांच्या आश्रमातील अनेक मंडळी त्यांच्याबरोबर भारतात आलेली होती. त्यांच्यासह आश्रमीय जीव-नात आध्यात्मिक समूहजीवनाचे त्यांचे प्रयोग पुढे चालू झाले.

– २ –

सप्टेंबर १९१४ साली युरोपात पहिल्या महा-युद्धाचा भडका उडाला. या परिस्थितीत अधिकार-प्राप्तीसाठीची कोणतीही चळवळ हिंदुस्थान सरकार खपवून घेईल अशी शक्यता नव्हती. १९१४ साली टिळक मंडालेहून सुटून आले. पण आपल्या पश्चात सहा वर्षे जहालांनी प्रकट केलेले अकर्तृत्व व देशा-तील रागरंग पाहून त्यांनी सबूरीचे धोरण पत्करले. एकंदरीत, राजकीय क्षेत्रात वातावरण दहशतीचे होते. परिणामी राजकीय जीवन थंडावलेल्या अव-स्थेत होते. फेरोझशहा मेथा व गोखले यांच्या निध-नाने नेमस्तांच्या पक्षात मोठीच पोकळी निर्माण झालेली होती.

पहिल्या महायुद्धात इंग्लंडला चटकन विजय तर मिळाला नाहीच; पण युद्धासाठी सारी शक्ती पणास लावण्याची वेळ आली. हिंदुस्थानची मदत मागण्याची पाळी इंग्लंडवर आली. इंग्लंडची दुबळी अवस्था

अनुक्रमणिका

हिंदी लोकांच्या ध्यानात आल्याशिवाय राहिली नाही. जर्मनीच्याविरुद्ध आपण लोकशाहीच्या रक्षणासाठी लढा देत आहोत असा दावा इंग्लंड करीत होते. हा दावा करणाऱ्या इंग्लंडने हिंदुस्थानच्या जनतेला लोकशाहीचे हक्क नाकारावेत ही गोष्ट कशी काय शोभून दिसणारी होती, असाही सवाल इंग्लंडमध्ये व भारतात विचारला जाऊ लागला.

हिंदू संस्कृती व हिंदू धर्म यांच्या श्रेष्ठत्वाची पावती देणाऱ्या थिऑसफी संप्रदायाचे आकर्षण त्या काळातील सुशिक्षितांना विशेष होते. पाश्चिमात्य सुधारकी भूमिका वठवीत असतानाच स्वधर्म, परंपरा व संस्कृती यांचाही गौरव करण्याची, दोहोंचा एक 'आधुनिक' संयोग साधण्याची शक्यता हे या संप्रदायाच्या आकर्षणाचे एक प्रमुख कारण होते. या संप्रदायाच्या प्रवक्त्या ॲनी बेझंट यांच्याभोवती जबरदस्त मोहक असे वलय होते. तत्कालीन इंग्लिश समाजजीवन आपल्या व्यक्तित्वाने व पराक्रमाने गाजवून त्या भारतात आलेल्या होत्या. भारत हा त्यांनी आपला मायदेश मानला. भारतात त्यांना उच्चशिक्षितवर्गातून अखिल भारतीय अनुयायीवर्ग मिळाला. १९१५ नंतरच्या तीनचार वर्षांमध्ये भारतीय स्वातंत्र्यचळवळीमध्ये पुन्हा एकवार चैतन्य निर्माण करण्याचे मोठे श्रेय त्यांच्याकडे जाते. तत्कालीन जहालांपेक्षाही अधिक जहाल असे त्यांचे विचार होते. उत्तम पत्रकार व प्रभावी वक्त्या असल्याने थोडयाच अवधीत वंगभंग चळवळीच्या वेळची आठवण व्हावी इतके राजकीय वातावरण तापले. होमरूल लीग नावाची संघटना स्थापन करून त्यांनी रान उठवून दिले. चालून आलेल्या संधीचा फायदा घेऊन टिळकांनीही होमरूल लीगची स्थापना केली.

व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळातील गृहखाते सांभाळणारे सभासद रेनिनॉल्ड क्रॅडॉक यांनी या तापलेल्या वातावरणाची नोंद करताना म्हटले, 'Sedition in India is like the tides which evoke the coast line as the sea encroaches. The last high tide was in 1907–08. The tide went out but it is flowing in now rapidly and it will reach a point higher than ever before.' [भारतातील राजद्रोहाची चळवळ ही पुढेपुढे सरकत जाणाऱ्या समुद्राच्या भरतीसारखी आहे. तिने किनाऱ्याची धूपणी होत असते. गेले उधाण १९०७–०८ साली आले होते. ते ओसरले. पण आता ते वेगाने भरू लागले आहे आणि त्याने पूर्वी कधी गाठला नव्हता एवढा उच्च बिंदू ते गाठेल.] या 'राजद्रोही' भरतीच्या लाटांच्या तडाख्याने इंग्रजी राज्यच धोक्यात यायचे नसेल तर सनदशीर मार्गाने घटनात्मक सुधारणांसाठी प्रयत्न करणाऱ्या राजनिष्ठ नेमस्तांची विश्वासार्हता वाढविणारी, त्यांची पुष्टी करणारी पावले उचलली पाहिजेत अशी त्यांची सूचना होती. व्हाइसरॉय चेम्सफर्ड यांनी त्यांच्यापुढील पेच १ फेब्रुवारी १९१७ रोजी केलेल्या नोंदीत अतिशय नेमक्या भाषेत स्पष्ट केला: 'As we stand, it seems to me impossible on paper to draw a distinction between the self-government which we advocate as the ultimate goal of British rule in India and Home Rule as advocated by Mrs. Besant and Tilak, though we know in fact that the two policies are poles apart. I wonld suggest then that our obvious course is to announce our policy with as little delay as possible and set against a visionary Home Rule scheme our sane and practical proposals.' [भारतातील ब्रिटिश सत्तेचे अंतिम साध्य म्हणून ज्या स्वयंसत्तेचा (सेल्फ-गव्हर्मेन्ट) पुरस्कार करतो ती आणि मिसेस बेझन्ट आणि टिळक ज्या स्वराज्याचा (होम रूल) पुरस्कार करीत आहेत ते ह्या दोन धोरणांत दोन ध्रुवांइतके अंतर आहे हे आपल्याला वस्तुतः माहीत आहे. तरीही हा भेद आज कागदावर स्पष्ट करणे अशक्य आहे असे मला वाटते. तेव्हा मला असे सुचवायचे आहे की अगदी सरळ दिसणारा मार्ग असा की आपण शक्य तितका कमी विलंब करून आपले धोरण जाहीर करावे आणि स्वराज्याच्या स्वप्नाळू योजनेसमोर आपले समंजस आणि व्यवहार्य प्रस्ताव ठाकतील अशी व्यवस्था करावी.]

अखेरीस ऑगस्ट १९१७ मध्ये ब्रिटिश सरकारने घोषणा केली की, 'ब्रिटिश साम्राज्याचा अंगभूत भाग म्हणून हिंदुस्थानात जबाबदार प्रातिनिधिक राज्यसत्तेची क्रमशः प्रस्थापना शक्य करण्याच्या दृष्टीने स्वराज्यसंस्थांचा आस्तेकदम विकास करणे आणि प्रशासनाच्या प्रत्येक खात्यामध्ये हिंदी लोकांचा सहभाग वाढविणे' हे ब्रिटिश सरकारचे धोरण राहील. 'मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा' या घोषणेचेच मूर्त फळ होते.

१९१५ नंतर काँग्रेसच्या अधिवेशनांना गांधी नियमाने हजर राहताना दिसतात. काँग्रेसच्या चळवळीपासून ते स्वतःला अलिप्त ठेवू इच्छित नव्हते ही गोष्ट यावरून उघड होते. पण होमरूल लीगच्या वा तत्कालीन काँग्रेसच्या राजकारणात त्यांना फारसा रस नव्हता, आणि आपण वठवावी अशी विशेष कोणती भूमिका समोर आहे असेही त्यांना वाटत नव्हते. किंबहुना, महायुद्धामुळे ब्रिटिश राज्यकर्त्यांची जी कोंडी झाली होती तिचा फायदा उठवून, अडवणूक करून मागण्या पदरात पाडून घेण्याची मतलबी रणनीती त्यांच्या सत्याग्रही विचार व कार्यपद्धतीशी, ते करीत असलेल्या साध्यसाधनविवेकाशी विसंवादी असल्याने ते या साऱ्या चळवळीपासून अलग राहिले. होमरूल लीगच्या कामात त्यांना ओढण्याचा प्रयत्न १९१६ साली बेझंटबाईंनी केला होता, पण त्यात त्यांना यश आले नाही.

— ३ —

जी नैतिक मूल्ये दैनंदिन जीवनात आचरता आल्यानेच केवळ मानवी प्रतिष्ठा सिद्ध होऊ शकते ती मूल्ये दक्षिण आफ्रिकेतील गौरवर्णीय शासन व समाज पायदळी तुडवीत होता. आत्मप्रतिष्ठेने जगण्याचा मूलभूत मानवी हक्क प्रस्थापित करण्यासाठी गांधी राजकारणात उतरले, आणि याच कारणासाठी आयुष्याच्या अखेरपावेतो राजकारणात राहिले. प्रतिपक्षीयांची अप्रतिष्ठा न करता, किंबहुना त्यांच्या मानवतेची काकणभर अधिक कदर करून, परिस्थितीत परिवर्तन घडवून आणण्याच्या मार्गाचा 'सत्याग्रहा'च्या रूपाने आपणास शोध लागला अशी त्यांची धारणा बनली. भारतात परत जावे आणि स्वराज्यप्राप्तीच्या राजकारणात या सत्याग्रह-मार्गाचा अवलंब करून शांती व प्रेम यांचे साम्राज्य इहलोकी प्रस्थापित करण्याचे एक उदाहरण साऱ्या जगाला घालून द्यावे ही त्यांची आकांक्षा व स्वप्न होते.



होमरूल लीग असो की काँग्रेस, हिंदी राजकारण भिन्न पायांवर व वेगळ्याच मार्गांनी चाललेले आहे, आणि सत्याग्रही मार्गाचा अवलंब करण्यास आपणास या संघटनांमध्ये वाव नाही, हे पाहून ते तटस्थ राहिले. सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे सभासदत्व आपणास मिळावे ही इच्छाही त्यांनी याच कारणाने मागे घेतली.

पण गांधी जागरूकपणे, डोळसपणे परिस्थितीचा वेध घेत होते, आणि त्यांची भारतातील उपस्थितीही लोकांच्या नजरेआड झालेली नव्हती. नेतृत्व करण्यास ते उत्सुक होते आणि नेतृत्व त्यांच्याकडे चालूनही आले.

चंपारण्य (बिहार), खेडा (गुजरात) व अहमदाबाद या तीन क्षेत्रांमध्ये गांधींनी, अनुक्रमे, नीळ पिकविणाऱ्या रयतेच्या, दुष्काळ पडल्याने सारा देण्यास असमर्थ असलेल्या रयतेच्या, व कापडगिरण्यांतील मजुरांच्या लढ्यांचे नेतृत्व केले. १९१७ ते १९१९ च्या दरम्यान हे लढे झाले या तिन्ही लढ्यांची व्याप्ती—भौगोलिक दृष्ट्या, प्रश्नांच्या अंगाने व सहभागाच्या दृष्टीने—सीमित होती. सत्याग्रहाच्या मार्गाची परिणामकारकता तपासून घेण्यासाठी या लढ्यांचा प्रयोगवृत्तीने गांधींनी उपयोग करून घेतला. सत्याग्रहाची तत्त्वे व पद्धती कसोटीला उतरतात की नाही याचा पडताळा त्यांनी घेतला.

काँग्रेस व होमरूल लीग यांच्या विद्यमाने चालणाऱ्या चळवळींशी वा या संघटनांशी त्यांनी या लढ्यांचा कोणताही संबंध येऊ दिला नाही. ही गोष्ट त्यांनी जाणूनबुजून केली.

— ४ —

१९१८ साल उजाडले, पण महायुद्धाची तीव्रता कमी व्हायच्या ऐवजी वाढलीच. इंग्लंड टेकीला आले. इतके की, हिंदुस्थानकडून आणखी मदत—पैशाची, सैनिकांची—मिळविण्याची निकड उत्पन्न झाली. सैन्यभरतीसाठी झालेली दडपणूक, बोकांडी बसलेले नवनवे कर, भडकलेली महागाई यांमुळे देशभर असंतोष धुमसत होता. तुर्कस्तानचा सम्राट हा मुसलमानांच्या दृष्टीने धार्मिक दृष्टीने सर्वश्रेष्ठ

अधिकारी ('खलिफा'), व मक्का-मदिना ही पवित्र स्थळे त्याच्या अधिकारातली. तुर्कस्तान हे इंग्लंडच्या शत्रुपक्षात असल्याने मुसलमानांच्या दृष्टीने हे पहिले महायुद्ध त्यांच्या राजनिष्ठेवर (धर्मनिष्ठेमुळे) विलक्षण ताण निर्माण करणारे होते. युद्धविरोधी व म्हणून ब्रिटिश राजवटीस विरोधी प्रवाह मुसलमान समाजात प्रबळ होते. सशस्त्र क्रांतिकारक मंडळांनी युद्ध चालू असल्याचा फायदा उठविण्याचे प्रयत्न चालविले. ही सारी अस्थिर व स्फोटक परिस्थिती काबूत ठेवण्यासाठी कायद्यांमध्ये बदल करून जादा अधिकार हाती केंद्रित करण्याची गरज एकीकडे सरकारला वाटत होती. सरकारी दडपशाही वाढलीही होती. तर, दुसरीकडे युद्ध जिंकण्यासाठी आणखी साधनसंपत्ती व मनुष्यबळ उभे करायचे तर हिंदी पुढाऱ्यांचे सहकार्य मिळवायला हवे होते.

घटनात्मक सुधारणांचा हप्ता आपण देणार असल्याने दडपणुकीच्या उपाययोजना आपण रेटून नेऊ शकू अशी हिंदुस्थान सरकारची समजूत. राजकीय चळवळीत नेमस्त व जहाल अशी एक दुफळी निर्माण होईल, आणि सुधारणा राबविण्यास उत्सुक असलेल्या नेमस्त पक्षाचा पाठिंबा आपणास जहालांची व सशस्त्र दहशतवाद्यांची दडपणूक करण्यासाठी उपलब्ध होईल, असा युक्तिवाद या पाठीशी होता. सुरतेच्या बखेडयानंतर पूर्वी असे घडून आले होतेही.

कॅनडा, दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया या ब्रिटिश साम्राज्यातील गौरवर्णीय वसाहतींना जे 'वसाहतींचे स्वराज्य' (डोमिनियन स्टेटस) इंग्लंडने बहाल केले होते तसेच हिंदुस्थानासही युद्धसमाप्तीनंतर दिले जाईल असे सुस्पष्ट अभिवचन सरकार देत असेल तरच आपण साधनसंपत्ती व मनुष्यबळ यांची मदत उभी करण्याच्या विचारार्थ व्हाइसरॉयनी बोलाविलेल्या युद्धपरिषदेमध्ये सहभागी होण्यास तयार आहोत अशी शर्त टिळक, अॅनी बेझंट प्रभृती नेत्यांनी घातली. युद्धात ब्रिटनला बिनशर्त साहाय्य करण्याची गांधींची भूमिका असल्याने, सरकारी दडपशाहीमुळे मनाची द्विधा अवस्था असूनही ते व्हाइसरॉयांच्या युद्धपरिषदेस हजर राहिले. त्यांनी सैन्यभरतीच्या ठरावास, हिंदीमधून एका वाक्याचे भाषण करून, पूर्ण पाठिंबा दिला. त्याचवेळी टिळक, जीना, खापर्डे, अॅनी बेझंट या राष्ट्रीय पुढाऱ्यांना आमंत्रित न केल्याबद्दल निषेध व्यक्त केला, अलीबंधूंना डांबून ठेवण्याविरुद्ध आपले मत प्रदर्शित केले, व तत्काळ वसाहतीचे स्वराज्य दिल्याखेरीज हिंदी जनतेचे समाधान होणार नाही असेही बजावले. ज्या खेडा तालुक्यातील रयतेसाठी त्यांनी लढा दिला होता त्या खेडा तालुक्यातील शेतकऱ्यांमधूनही सैन्यात भरती होण्यासाठी गांधींनी काढलेल्या मोहिमेला जेव्हा प्रतिसाद मिळाला नाही तेव्हा अखिल भारतीय पातळीवरील राजकारणातील गांधींच्या या प्रवेशाचा एका अर्थी फजितवाडा झाला.

– ५ –

राजद्रोही कारवायांना पायबंद कसा घालावा याचा विचार करण्यासाठी, महायुद्ध चालू असताना, रौलट नावाच्या न्यायाधीशांच्या अध्यक्षतेखाली हिंदुस्थान सरकारने समिती नेमली होती. या समितीच्या शिफारशींनुसार, राजद्रोही चळवळी व सशस्त्र दहशतवादी कृत्ये निपटून काढण्यासाठी अस्मानीसुलतानी अधिकार हाती घेणारी विधेयके सरकारने केंद्रीय कायदेमंडळात मांडली. विधेयकात राजद्रोहाची व्याख्याही अतिव्याप्त करण्यात आली. मॉंटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणांचा आराखडा त्याच सुमारास प्रसिद्ध केला गेला. या आराखड्याने हिंदी सुशिक्षित मध्यमवर्गाची घोर निराशा झाली. १९१८च्या अखेरीस युद्ध संपलेले होते. युद्ध संपल्यावर वसाहतीच्या स्वराज्याचे अधिकार आपणास दिले जाणार अशी अपेक्षा असताना, तसे काही न घडता, उलट सर्व बाजूंनी मुस्कटदाबी करू पाहणारी, दहशत प्रस्थापित करू पाहणारी 'रौलट' विधेयके मांडली जावीत याने देशात संतापाची लाट निर्माण झाली. नेमस्त व जहाल, दोन्ही पक्षांच्या पुढाऱ्यांचा एकमुखी विरोध डावलून १९१९च्या मार्चमध्ये केंद्रीय कायदेमंडळात सरकारने घाईगर्दीने ती विधेयके संमत करून घेतली.

रौलट विधेयके प्रसिद्ध झाल्यानंतर, ही विधेयके सादर करून हिंदुस्थानसरकार बहुधा साऱ्या राष्ट्राला आव्हान देऊन त्याचा अवमान करीत आहे, तरी या विधेयकांचे रूपांतर कायद्यांमध्ये झाल्यास

ती गोष्ट सहन करता कामा नये; अशा निष्कर्षावर गांधी आले. गोखल्यांचे शिष्य, नेमस्तांचे पुढारी व केंद्रीय कायदेमंडळाचे सभासद श्रीनिवास शास्त्री यांना ९ फेब्रुवारी १९१९ रोजी गांधींनी लिहिले, 'या वेळी शरणागती पत्करली तर आपण षंढ ठरू.' महायुद्धाच्या काळात ब्रिटिश साम्राज्याला एकनिष्ठ राहून बिनशर्त पूर्ण पाठिंबा देण्याची भूमिका गांधींनी घेतली होती, म्हणूनच बहुधा रौलट विधेयकांना त्यांची अशी टोकाची प्रतिक्रिया झाली. राजकारणी डावपेच खेळणाऱ्या, यशापयशाचे हिशेब मांडणाऱ्या किंवा नेमस्त मध्यममार्गी भूमिकेतून समंजस राजकारण करणाऱ्या पुढाऱ्यांपेक्षा गांधींची प्रतिक्रियेची जातकुळी वेगळी होती, ही गोष्ट ध्यानात घेणे महत्त्वाचे आहे. दक्षिण आफ्रिकेतल्याप्रमाणेच, येथेही, त्यांच्या दृष्टीने यात भावनी अप्रतिष्ठेचा मुद्दा गुंतलेला होता. सत्याग्रहाच्या मार्गाने प्राणपणाने प्रतिकार करणे हे कर्तव्यच ठरत होते. रौलट विधेयके प्रसिद्ध झाली तेव्हा गांधी जिवावरच्या दुखण्यातून पूर्ण उठले नव्हते. तशा अशक्त अवस्थेतही ते सक्रिय झाले. फेब्रुवारी १९१९ मध्ये, विधेयकांविरुद्ध पुढील प्रतिज्ञापत्र भरून व्यक्तींनी आपली प्रतिकाराची तयारी प्रकट करावी असे त्यांनी सुचविले : 'In the event of these bills becoming law and until they are withdrawn we shall refuse civilly to obey these laws and such other laws as a committee to be hereafter appointed may think fit, and further affirm that in this struggle we shall faithfully follow truth and refrain from violence to life, person and property.' [ ही विधेयके कायदे बनले तर ते परत घेण्यात येईपर्यंत तर ते कायदे पाळण्याचे आम्ही सविनय नाकारू, तसेच पुढे नेमण्यात येणाऱ्या समितीला जे इतर कायदे आम्ही न पाळणे योग्य वाटेल ते कायदे पाळण्याचे आम्ही नाकारू आणि आम्ही अशी ग्वाही देतो की लढ्यामध्ये आम्ही सत्याचे निष्ठेने पालन करू आणि जीवन, देह आणि मालमत्ता ह्यांची हिंसा करण्यापासून परावृत्त राहू. ] 'सत्याग्रह सभे'ची स्थापना करण्यात आली. दक्षिण आफ्रिकेत अनुसरलेल्या रीतीप्रमाणे व सत्याग्रहशास्त्राप्रमाणे व्हाइसरॉयना पत्र लिहून आपल्या व आपल्या सहकाऱ्यांच्या सत्याग्रह करण्याच्या निर्धाराची त्यांनी कल्पना दिली. प्रतिज्ञापत्रे भरून घेण्यास सुरुवात झाली. तब्बेत बरी नसतानाही देशभर प्रवास करून वेगवेगळ्या शहरी गांधींनी सभा घेतल्या व लोकमत जागृत केले. रौलट कायदा मोडायचा कसा या प्रश्नाला, सरकारने बंदी केलेली पुस्तके छापून राजरोस विकावीत हे उत्तर सापडले. गांधींच्या 'हिंद स्वराज्य' व 'सर्वोदय' (जॉन रस्किन यांच्या 'अन टु धिस लास्ट'चा स्वैर अनुवाद) या पुस्तकांवर बंदी होती. ती पुस्तके छापून विकण्याचे ठरले. देशभर ६ एप्रिल रोजी लोकांनी हरताळ पाळावा, निषेध व्यक्त करण्यासाठी सर्व लौकिक व्यवहार बंद ठेवावेत, उपवास करावा व सायंकाळी सामुदायिकपणे प्रार्थना करावी असा कार्यक्रम गांधींनी दिला.

देशात अनेक प्रमुख शहरांमध्ये हरताळ पाळला गेला. मोठ्या सभा झाल्या. या प्रसंगी जनसमुदायांकडून कोठे कोठे हिंसक प्रकार घडले, तर सूडबुद्धीने सरकारकडून अधिकच मोठ्या प्रमाणावर हिंस्र दडपशाही करण्यात आली. गांधींना सरकारने पकडले आहे असे चुकीचे वृत्त पसरल्यावर नडियाद, अहमदाबाद व मुंबई येथे दंगली उसळल्या. निर्मलकुमार बोस यांनी म्हटल्याप्रमाणे, 'लोकसंघटनांच्या आदेशांचे व शिस्तीचे, तसेच कायद्यांचे, पालन स्वेच्छापूर्वक करण्याची कडवी शिस्त अंगी बाणवून घेऊन (सविनय कायदेभंग करण्यास लोकांनी) **स्वतःस पात्र बनविण्याआधीच** सविनय कायदेभंग करण्यास परवानगी देण्यात भयंकर चूक झाली होती' ही गोष्ट गांधींच्या ध्यानात आली. आपण 'हिमालयाएवढी घोडचूक' केल्याची जाहीर कबुली देऊन त्यांनी सत्याग्रहाची कृती परत घेतली.

रौलट सत्याग्रह काँग्रेसच्या विद्यमाने केला गेलेला नव्हता. मात्र त्यात जागोजागच्या काँग्रेस पुढाऱ्यांचा मोठा सहभाग होता. त्याहीपेक्षा, हरताळाच्या हाकेला देशभरातून जो अभूतपूर्व प्रतिसाद मिळाला त्यावरून लोकक्षोभाने शीग गाठलेली आहे, व लोकांना आवाहन करून कृती करण्यास प्रेरित करण्याची असामान्य क्षमता गांधींच्या ठायी आहे याचे

भारावून टाकणारे दर्शन लोकांना, सुशिक्षित वर्गातील तरुणांना, राजकीय पुढाऱ्यांना व राज्यकर्त्यांना, सर्वांनाच घडले.

१३ एप्रिल १९१९ रोजी, रौलट सत्याग्रहाच्या काळातच, अमृतसर येथे जालियनवाला बागेत हत्याकांड घडले. पंजाबमध्ये मार्शल लॉ पुकारलेला असल्याने, बातम्यांवर सेन्सारशिप लादल्याने तेथील घटनांची वार्ता बाहेर पोचायला काही वेळ लागला. पण जेव्हा सारी हकीकत बाहेर आली तेव्हा ब्रिटिश राजवटीचे सैतानी रूप लोकांना पहावयास मिळाले. 'सारा देश दुःख व क्रोध या भावनांनी ढवळून निघाला.' पंजाबमधील घटनांची चौकशी सरकारने नेमलेल्या हंटर कमिटीने, तसेच काँग्रेसने नेमलेल्या एका समितीने स्वतंत्रपणे केली. हत्याकांडास जबाबदार असलेल्या जनरल डायर या सैन्याधिकाऱ्यास निवृत्त करून इंग्लंडला परत धाडण्यात आले. पण तेथे हाऊस ऑफ लॉर्डस्‌मध्ये जनरल डायर यांची प्रशंसा करणारी भाषणे झाली, 'मॉर्निंग पोस्ट' या दैनिकाच्या पुढाकाराने ३०,००० पौंडांचा निधी त्यांना अर्पण करण्यात येऊन त्यांचा गौरव करण्यात आला. मार्शल लॉ अमलाशी संबंधित अधिकाऱ्यांवर हिंदुस्थान सरकारने कोणत्याही प्रकारे ठपका तर ठेवला नाहीच; उलट, येथील अँग्लो-इंडियन जमातीने त्यांना डोक्यावर घेतले. व्हाइसरॉयनीही झाल्या प्रकारचे खंडन केले नाही. हंटर कमिटीच्या अहवालानेही, गांधींच्या भाषेत, '(सनदी प्रशासनाच्या कृष्णकृत्यांची) रंगसफेदी करण्याचेच काम केले आहे ही गोष्ट लपून राहत नाही.'

वास्तविक, डिसेंबर १९१९ च्या काँग्रेसच्या अमृतसर येथे भरलेल्या अधिवेशनात, इतर ज्येष्ठ पुढाऱ्यांचे मत मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांच्या कायद्याचे मोकळ्या मनाने स्वागत करण्याच्या विरोधात होते. पंजाबमधील घटनांमुळे ही मने प्रक्षुब्ध होती. अधिवेशनावर गांधींची पकड एवढी होती की, त्यांच्या म्हणण्यास मान्यता देऊन मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांचे विधायकवृत्तीने स्वागत करण्यात आले, व त्या राबविण्याच्या कामात सरकारला पूर्ण सहकार्य देऊ केले गेले. इतकेच नाही तर, पंजाबमधील घटनांवरील ठरावात हिंदी जनतेकडून घडलेल्या हिंसेचेही खंडन करण्यात आले. पण अधिवेशन पार पाडल्यानंतरच्या काळात इंग्लंडमधील लोकांनी जनरल डायर यांची केलेली प्रशंसा व गौरव, हंटर कमिटीने लष्करी व मुलकी यंत्रणेचे केलेले उघड उघड पक्षपाती समर्थन आणि व्हाइसरॉय चेम्सफर्ड यांचीही निष्क्रियता या साऱ्याने ब्रिटिश साम्राज्याविषयीच्या गांधींच्या धारणेत परिवर्तन घडून आले. ब्रिटिश साम्राज्याच्या बुडाशी खरोखरीच एक नैतिक अधिष्ठान व प्रेरणा आहे; म्हणून, अनेक प्रसंगी व्यक्तिगत पातळीवर उच्च प्रशासक विपरीत वर्तन करीत असले तरी, ब्रिटिश साम्राज्य ही एक उद्धारक, प्रागतिक शक्ती आहे; ब्रिटिश साम्राज्याशी एकनिष्ठ राहणे हे आपल्या हिताचे असून, ते आपले कर्तव्य ठरते, या आपल्या धारणेच्या पूर्णपणे विपरीत असे हे 'सैतानी' राज्य आहे अशा निष्कर्षाला ते येऊन पोहोचले. प्रत्येक गोष्टीत नैतिक समर्थन शोधण्याच्या व नैतिक कसोटचांवर साऱ्या गोष्टींची पारख करण्याच्या त्यांच्या भूमिकेमुळे, ब्रिटिश राज्याविषयीच्या या नव्या निवाड्याचा परिणाम तेवढाच टोकाचा झाला. अशा सैतानी राज्याशी असहकार करण्यातच आपली आत्मप्रतिष्ठा आहे असे त्यांनी ठरविले.

तुर्कस्तान शत्रुपक्षात असले तरी, तुर्कस्तानच्या सम्राटाचे खलिफापद, त्याच्या पालकत्वाखाली पवित्र धार्मिक क्षेत्रांची व्यवस्था, इत्यादी मुद्द्यांवरून मुसलमान समाजाच्या मतांचा व धार्मिक भावनांचा आपण योग्य तो आदर करू असे वचन मुस्लिम पुढाऱ्यांना ब्रिटिश पंतप्रधानांनी युद्धकाळात दिले होते. खलिफाच्या देशाशी ब्रिटन युद्ध करीत आहे या घटनेमुळे हिंदुस्थानातील मुसलमान समाजामध्ये आधीच पुष्कळ क्षोभ होता, त्यात वचनभंगाच्या शक्यतेमुळे खूप भर पडून मुसलमान समाज जेहादची भाषा करण्यापर्यंत गेला. मुस्लिम पुढाऱ्यांशी गांधींचे संबंध होते. या प्रसंगी मुसलमान पुढाऱ्यांनी गांधींचे मार्गदर्शन मागितले. सरकारशी अहिंसक मार्गाने संपूर्ण असहकार पुकारण्याचा सल्ला त्यांनी दिला. हिंसेचा त्याग तत्त्वनिष्ठा म्हणून करण्याची गोष्ट मुस्लिम पुढाऱ्यांना फारशी पटली नाही, पण हिंसक मार्गाचा अवलंब अव्यवहार्य आहे हे उघड होते. १९२० साली तहाच्या शर्ती प्रसिद्ध झाल्या तेव्हा

अनुक्रमणिका

इस्लामच्या पवित्र क्षेत्रांवर खलिफाची राजकीय व धार्मिक सत्ता संपुष्टात आणल्याचे उघड झाले. इंग्रजी राज्याशी असहकार पुकारण्याची सूचना उचलून धरली गेली.

पंजाबमधील घटनांचे निर्लज्ज समर्थन व खिलाफतीच्या मामल्यावरूनचा वचनभंग यांमधून हिंदू व मुसलमान, दोन्ही समाजांमध्ये अपमानित झाल्याची, विटंबना केली गेल्याची तीव्र भावना उत्पन्न झाली होती, हिंदु-मुसलमानांना राष्ट्रीय चळवळीत एकत्र आणण्याची ही एक सुवर्णसंधीच आहे असे गांधींना वाटले. असहकाराचा मार्ग अवलंबण्याची त्यांनी काँग्रेस संघटनेलाही शिफारस केली. अखिल भारतीय खिलाफत कमिटीने असहकाराचा कार्यक्रम अंगिकारला. १ ऑगस्ट १९२० रोजी असहकाराची सुरुवात व्हावयाची होती. महिन्याची मुदत ठेवून गांधींनी व्हाइसरॉयना पत्र लिहिले. व्हाइसरॉयनी त्यांना मूर्खात काढले : ' the most foolish of all the foolish schemes ' अशा शब्दांत असहकाराच्या कार्यक्रमाची संभावना केली.

गांधींनी प्रसृत केलेल्या असहकाराच्या कार्यक्रमात पुढील मागण्यांचा समावेश होता : (१) किताब, सन्माननीय पदव्या वगैरेंचा त्याग; (२) सरकारी उत्सवादी कार्यक्रमांवर बहिष्कार; (३) सरकारी शाळा-कॉलेजांवर बहिष्कार; (४) कोर्ट-कचेऱ्यांवर क्रमशः बहिष्कार; (५) मेसोपोटेमियातील भारतीय सैनिकांनी व इतरांनी काम करण्यास नकार देणे; (६) कायदेमंडळांवर बहिष्कार; आणि (७) विदेशी मालावर बहिष्कार.

असहकाराच्या कार्यक्रमावर काँग्रेसने काही निर्णय घेण्यापूर्वीच, १ ऑगस्ट १९२० रोजी, असहकार आंदोलन सुरू झाले. सप्टेंबर १९२० मध्ये काँग्रेसचे खास अधिवेशन भरले. बव्हंशी सर्व पुढाऱ्यांचे मत प्रतिकूल असताही, जयकरांच्या शब्दांत, ' केवळ स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाच्या व प्रतिपादनाच्या सामर्थ्यावर गांधींनी या काँग्रेसमध्ये विजय मिळविला. लोकांमध्ये गांधींबद्दल जी वैयक्तिक निष्ठा होती तीमुळेच ते विजय मिळवू शकले.' पुढे डिसेंबर १९२० मध्ये काँग्रेसच्या नेहमीच्या अधिवेशनात त्यावर शिक्कामोर्तब केले गेले.

पुढील तीन वर्षे गांधी हिंदु-मुस्लिम, दोन्ही समाजांचे सर्वोच्च पुढारी बनले. काँग्रेस संघटनेची सूत्रेही त्यांच्या हाती पूर्णतः आली.

## गांधींच्या नेतृत्वाचा परमोत्कर्ष

– ६ –

वंगभंग चळवळीच्या वेळच्या चतुःसूत्रीचेच गांधींनी पुनरुज्जीवन केले होते. सैन्यात बंडाळी घडवून आणण्याचा किंवा साराबंदीचा वा कर भरण्यास नकार देण्याचा कार्यक्रम तूर्त हाती न घेण्याचे पथ्य पाळायचे गांधींनी ठरविले होते. आंदोलन अहिंसेच्या मार्गावर रहावे, आणि स्वार्थत्यागामधून लोकांची तयारी वाढावी या दृष्टीनेच आरंभीचे बहिष्काराचे कार्यक्रम सुचविलेले होते. त्यातही, सुशिक्षित उच्चवर्गीयांनीच आपल्या हितसंबंधांवर पाणी सोडण्याच्या गोष्टी करावयाच्या होत्या.

सरकारची दुहेरी पंचाईत झाली. निवडणुकांमध्ये भाग न घेणे, शाळा-कॉलेजांवर बहिष्कार घालणे, कोर्टात न जाता आपापसात भांडणे मिटविणे या साऱ्या गोष्टी शांततेच्या मार्गाने जोवर लोक करीत राहतील तोपर्यंत त्यांच्यावर कारवाई कशी व कोणती करावयाची ? स्वराज्य मिळविण्यासाठी गांधी सरळ-सरळ असहकाराचे आवाहन करीत होते म्हणून त्यांना अटक करावी तर त्यांच्या अटकेमुळे देशभर दंगल उसळण्याची शक्यता फार असल्यामुळे तिकडूनही सरकारचे हात बांधल्यासारखे झाले. सुशिक्षित वर्गाकडून फारसा प्रतिसाद न मिळाल्याने असहकाराच्या कार्यक्रमाचा फजितवाडा होईल, आणि गांधींवर काही कारवाई करण्याचा प्रश्नच येणार नाही अशी आशा सरकारने बाळगली.

असहकाराच्या वेगवेगळ्या बाबींखाली किती जणांनी भाग घेतला ही कसोटी लावून मोजमाप केले तर असहकाराच्या आंदोलनामध्ये लोकांचा फारसा सहभाग नव्हता अशा निष्कर्षाला आपण पोचतो. असहकाराच्या आवाहनाचा प्रभाव वेगळ्याच प्रकारे घडून आला. असहकार आंदोलनाच्या पहिल्या टप्प्यात १ कोटीचा टिळक स्वराज्यफंड उभारला गेला, काँग्रेस संघटना हिंदुस्थानच्या सर्व जिल्ह्यांमध्ये उभारली जाऊन तिचे चार आणे वर्गणी देणारे पाचपन्नास लाख सभासद नोंदले गेले,

अनुक्रमणिका

निवडणुकांच्या पद्धतीने खालपासून वरपर्यंत काँग्रेस-प्रतिनिधी निवडले गेले, काँग्रेस महासमिती व वर्किंग कमिटीच्या रूपाने एक स्वदेशी पार्लमेंट व मंत्रि-मंडळ, आणि देशभर पसरलेले कार्यकर्त्यांचे जाळे, अशी समांतर निमशासकीय यंत्रणा अस्तित्वात आली, आणि, सरकारने अटकसत्र जारी न केल्याने देशभर लहानमोठ्या गावांमधून लोकांपर्यंत गांधीबाबाचा संदेश पोचला, या स्वरूपात असहकार आंदोलनाच्या प्रभावाचे खरे मोजमाप होते. गांधींच्या ' दर्शना'-साठी देशभर वेळीअवेळी लोक गर्दी करून त्यांना त्रस्त करून टाकीत अशी वर्णने आपण वाचतो. त्याचा अर्थ असा की, काँग्रेसची चळवळ खेडूत जनते-पर्यंत पोचली आणि लोकांच्या मनात गोऱ्या माणसाची व त्याच्या राज्याची १८५७ च्या उठावा-नंतरच्या काळात बसलेली दहशत संपुष्टात आली. इंग्रजी राज्याचा भक्कमपणा व स्थिरता लोकांच्या मनातली दहशत आणि अगतिक लाचारीची भावना यांवरच अवलंबून होती. तो पायाच उखडला गेला.

कायदेभंगाची कोणतीही ठळक कृती वा कार्यक्रम पार पाडला जात नसतानाही देशातल्या वातावर-णाचे तपमान वाढत चालले आहे, अशांतता व अस्थैर्य निर्माण झाले आहे या गोष्टी सरकारच्या ध्यानात आल्या. हिंदू व मुसलमान समाजांमध्ये ताण वाढले आहेत, व वेगवेगळ्या कारणांमुळे दोन्ही समाजांमध्ये चळवळीबद्दल असमाधान आहे, हेही स्पष्ट झाले होते. आपण चळवळ दडपण्याची कृती न करताच जर गांधींच्या छावणीत फाटाफूट होऊन चळवळ संपुष्टात येईल तर सोन्याहून पिवळे, अशीही दृष्टी होती. नोव्हेंबर १९२१ मध्ये प्रिन्स ऑफ वेल्स यांची भारतभेट ठरली होती. ऑक्टोबर १९२१ मध्ये हिंदुस्थान सरकारने गांधींवर खटला भरण्यातले फायदे व धोके यांचा ताळेबंद मांडून पाहिला. 'धरले तर चावेल पण सोडून दिले तर मोकाट सुटेल ' अशा पेचात सरकार सापडल्याचे लक्षात येते.

प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या भेटीच्या वेळी जागोजाग जे हरताळ पाळले गेले त्यावरून असहकार आंदो-लनाचा प्रभाव किती सार्वत्रिक व खोलवर पोचला आहे, व लोकांवरची आपली पकड किती ढिली पडली आहे याची अनुभूती सरकारला झाली. मोठ्या प्रमाणावर सविनय कायदेभंगाचे पाऊल गांधींनी उचलावे यासाठी दबाव वाढत होता. काँग्रेसने प्रांतिक कमिट्यांना कायदेभंगाची चळवळ आपल्या भागात सुरू करण्याचे अधिकार दिलेले होते, पण गांधींनी त्यावर लगाम घातला होता. नोव्हेंबरअखेरीस सरकारने चळवळ दडपून टाकण्याचा निर्णय केला. डिसेंबर १९२१ व जानेवारी १९२२ मध्ये ३०,००० हून अधिक लोकांना तुरुंगात डांबण्यात आले. सभा, मिरवणुकांवर बंदी घालण्यात आली, काँग्रेस व खिलाफत कमिट्यांच्या कार्यालयांवर धाडी टाकल्या गेल्या, राजकीय कैद्यांचा छळ सुरू झाला. या दड-पणुकीचा प्रतिवाद समर्थपणे कसा करावा हे आव्हान गांधींपुढे होते.

आत्मानुशासन व विधायक कार्यक्रमांद्वारे नव-रचना यांच्या अभावी स्वतंत्रता ही चटकन बेबंद व हिंस्र वर्तनात रूपांतरित होते. आता राज्य आपलेच आहे या भावनेची धुंदी लोकांना चढली तेव्हा तीमधून जागोजाग हिंसक उद्रेक पण सुरू झाले. विशेषतः मुसलमान समाजाच्या पुढाऱ्यांच्या तोंडी धर्मयुद्धाची भाषा असल्याने, आणि अहिंसेच्या मार्गाने चालण्याविषयी पुढाऱ्यांचाच आग्रह नसल्याने, इंग्रज शासनाची दहशत मनातून दूर झाल्यावर, माले-गावचा हिंदू-मुसलमान दंगा, मलबारमधील मोप-ल्यांचे बंड, प्रिन्स ऑफ वेल्सच्या आगमनाच्या वेळी मुंबईत पारशी, ज्यू व युरोपियन लोकांवर झालेला हल्ला या प्रकारच्या घटना घडल्या. खिलाफत चळ-वळीचे पुढारीपण करणाऱ्या मुसलमान पुढाऱ्यां-प्रमाणेच, काँग्रेसच्या जागोजागच्या पुढाऱ्यांनाही अहिंसेचे, आत्मानुशासनाचे, विधायक नवरचनात्मक कार्यक्रमांचे ( राष्ट्रीय शाळा, न्यायपंचायती, स्वदेशीचा एक भाग म्हणून खादी, अस्पृश्यता निवारण, इत्यादी ) महत्त्व आकळलेले नव्हते. इंग्रजी राज्याच्या स्थानिक यंत्रणेला–पोलिस, प्रशासक–आव्हान देणाऱ्या सभा, मोर्चे, मिरवणुका यांचे आकर्षण होते; या प्रकारच्या चळवळीची उग्रता जितकी जास्त तितके स्वराज्य जवळ येणार अशी धारणा निर्माण होत गेली.

असहकार आंदोलनाच्या काळात अहिंसेची शिस्त पाळून चळवळी झाल्याच नाहीत असे नाही. मुळशी पेट्यातील सत्याग्रह, मिदनापूर जिल्ह्यात लोकल

बोर्डावर टाकलेला बहिष्कार, पंजाबमधील गुरु-द्वारांच्या व्यवस्थापनाच्या संदर्भातील चळवळीची सुरुवात, अशी उदाहरणे निर्मलकुमार बोसांनी दिली आहेत. पण सरकारच्या दडपशाहीत झालेल्या वाढी-बरोबर त्याचा हिंस्रपणे प्रतिवाद करण्याकडे कल वाढत चालल्याचे गांधींच्या लक्षात आले होते. हिंसक उद्रेकाचा परिणाम १८५७ च्या उठावाच्या वेळच्या घटनांची पुनरावृत्ती होण्यात, स्वराज्या-ऐवजी अराजक माजण्यात व ते चिरडले गेल्यास नंतर भयावह स्मशानशांतता निर्माण होण्यात होईल याची त्यांना पूर्ण जाणीव होती. जालियनवाला हत्याकांडाची घटना अगदी ताजी होती.

परिस्थिती आपल्या आटोक्यात राखून पुढचे पाऊल टाकण्याच्या दृष्टीने गांधींनी असे ठरविले की, देशात प्रथम गुजरातमधील बार्डोली तालुक्यात असहकाराच्या पुढचे सविनय कायदेभंगाचे पाऊल उचलावयाचे. देशात कोठेही हिंसेचा उद्रेक झाला तर बार्डोलीमध्ये 'स्वराज्या'चा प्रयोग आपण करू शकणार नाही असा इशारा त्यांनी दिलेला होता. मागे वळून पाहता असे दिसते की, चळवळीतील वाढत्या हिंसेमुळे गांधींच्या मनावरचा ताण खूप वाढलेला होता, आणि आंदोलनातील हिंसा निपटून काढण्याच्या दृष्टीने काय करावे याचा ते अतिशय गंभीरतेने व अस्वस्थ चित्ताने विचार करीत होते. बार्डोली तालुक्यातील लढा संपूर्णपणे आपल्या नियं-त्रणाखाली राहील, आणि अहिंसक असहकाराचे व प्रतिकाराचे उदाहरण लोकांसमोर राहिल्याने अहिं-सेची शिकवण लोकांमध्ये मुरविता येईल अशी त्यांना आशा वाटत असावी.

पण ५ फेब्रुवारी १९२२ रोजी उत्तर प्रदेशात चौरीचौरा या गावी आंदोलकांनी पोलिसांना चौकीत कोंडून जाळल्याची घटना घडली, आणि गांधींनी व्यापक व सार्वत्रिक असहकाराचे आंदोलन स्थगित करून ते व्यक्तिगत कायदेभंगापुरते सीमित केले. विधायक स्वरूपाचे कार्यक्रम चालू राहणार होते. गांधींच्या या निर्णयांवर काँग्रेसने शिक्कामोर्तब केले तरी, एकंदरीने त्यांच्या या निर्णयांबद्दल खिलाफत व काँग्रेसच्या पुढाऱ्यांना तीव्र असमाधान होते. चळ-वळीत ओढल्या गेलेल्या व उग्र मनःस्थितीत अस-लेल्या लोकांनाही चळवळ ऐन शिगेला पोचत असताना पाय मागे ओढल्यासारखे झाले.

गांधींना आता सरकारने अटक केली. त्यांना सहा वर्षांची तुरुंगवासाची शिक्षा झाली. गांधींना अटक केल्यावरही देशात या खेपेस दंगेधोपे झाले नाहीत. गांधींच्या नेतृत्वाविषयीचा भ्रमनिरास याला कारण होता असे तत्कालीन हिंदुस्थान सरकारला, तसेच अनेक इतरांनाही नंतरच्या काळात वाटत आले आहे. गांधी किती गांभीर्याने अहिंसेचा आग्रह बाळगतात व त्याविषयी ते किती पक्के आहेत याची अनुभूती धक्कादायक निर्णयांद्वारे लोकांपर्यंत प्रभावी-पणे पोचली, असाही दंगेधोपे न होण्याचा अन्वयार्थ लावता येईल. काँग्रेस संघटनेच्या अंतर्गत, नकारा-त्मक अर्थाने का होईना पण त्या मर्यादेत, अहिंसेची शिस्त या प्रसंगाने स्वीकृत झाली असे पुढील वीस वर्षांच्या इतिहासावरून दिसते.

— ७ —

असहकाराच्या कार्यक्रमांपैकी फक्त सामूहिक व सार्वत्रिक कायदेभंगाचा भाग स्थगित करण्यात आला होता. बहिष्काराचे कार्यक्रम चालू राहावेत, आणि जोडीला पर्यायी लोकाधिष्ठित नव्या विधा-यक कार्यांची व संस्थांची उभारणी व्हावी अशी वास्तविक कल्पना होती. पण १९२० साली जो शिक्षित बुद्धिजीवी पुढारी वर्ग आंदोलनात सामील झाला होता; त्याचे मानस संकुचित अर्थाने राज-कारणी होते : खिलाफत व पंजाबचे निमित्त करून चळवळ करीत असतानाही या वर्गाचे उद्दिष्ट प्रस्था-पित इंग्रजी राज्याच्या चौकटीत सतत अधिक वाटा मिळविण्याचेच राहिले. सर्वसामान्य जनतेच्या सह-भागामुळे असहकाराच्या चळवळीला व्यापकता व सामर्थ्य प्राप्त झाले होते. पण या जनतेच्या हिता-विषयी आस्था व बांधिलकी नव्हती. कायदेकौन्सि-लांवर, शाळा-कॉलेजांवर, कोर्टकचेऱ्यांवर बहिष्कार हा कार्यक्रम या वर्गाच्या स्वार्थी आर्थिक, सामाजिक व राजकीय हितसंबंधांच्या आड येणारा होता. सरकारवर दबाव आणण्यासाठीचा डावपेच म्हणूनच केवळ या वर्गाने त्याला आंदोलनापुरती मान्यता दिली होती. आंदोलन मागे घेतले म्हटल्याबरोबर नव्या कायद्यानुसार स्थापन झालेल्या कायदे-

कौन्सिलांमध्ये प्रवेश करून तेथे राजकारण करण्यासाठी हे पुढारी सज्ज झाले.

सापेक्षतः ही गोष्ट काँग्रेस संघटनेतील लहान-मोठ्या पुढाऱ्यांविषयी अधिक खरी होती. खिलाफतीच्या मुद्द्यांवरून जो मुल्ला-मौलवींचा वर्ग व साधारण मुसलमान समाज आंदोलनात उतरला होता त्यांची इंग्रजी राज्याविषयीची अप्रीती धार्मिक कारणाने असल्याने ती टोकाला गेलेली होती; ते धर्मयुद्धातच उतरले होते. चौरीचौऱ्याच्या घटनेनंतर आंदोलन स्थगित केल्याने ते गोंधळात पडले. विश्वास घात झाल्यासारखे त्यांना वाटले व ते बिथरले. काँग्रेसी हिंदू समाजाविषयी व पुढाऱ्यांविषयी त्यांच्या ठायी अविश्वास, व क्षोभ उत्पन्न झाला, व पुढील सर्व काळात टिकला असे दिसते. काँग्रेसमधील पुढारी वर्ग गांधींच्या निर्णयाने आरंभी स्तंभित झाला, संतापला. पण मग चटकन त्याने मोहरा वळवून कौन्सिलप्रवेशाच्या राजकारणाला हात घातला. गांधींच्या प्रभावाखाली आलेल्या कृपलानी, वल्लभभाई पटेल, राजेंद्रप्रसाद, जवाहरलाल नेहरू, राजगोपालाचारी प्रभृती नवीन पिढीला कायदेकौन्सिलांच्या राजकारणाचा तिटकारा होता, पण असहकाराच्या नकारात्मक कार्यक्रमाला सार्थ बनविणाऱ्या अनेकांगी विधायक पुनर्रचनेचे पुरेसे महत्त्व त्यांच्या सर्वांच्याच ध्यानी आले होते की नाही याची शंका आहे. गांधी तुरुंगात बंदिस्त असल्याने या ऐन मोक्याच्या काळात आवश्यक बहुमोल मार्गदर्शनाला ते मुकले.

१९२२ ते १९३० या आठ वर्षांमध्ये काँग्रेसने देशव्यापी आंदोलन उभारले नाही. इतकेच नाही तर, या काळात गांधींच्या राजकीय नेतृत्वाला अव्हेरून कायदेकौन्सिलाच्या राजकारणाला उठाव व महत्त्व देणारे राजकारण काँग्रेसने केले. १९२० ते १९४७ काँग्रेसवर गांधींचे अप्रतिहत वर्चस्व राहिले ही सामान्य प्रचलित समजूत खरी नाही. १९२२ ते १९२९, १९३७ ते १९४२, आणि १९४५ ते १९४७ या काळात गांधींना बव्हंशी बाजूस ठेवून स्वातंत्र्यप्राप्तीचे राजकारण काँग्रेसच्या त्या त्या वेळच्या नेत्यांनी केले. पण असे करीत असतानाही, सर्वसामान्य कार्यकर्त्यांच्या पातळीवर, तसेच जनमनसात गांधींना असलेले अलौकिक स्थान ध्यानात घ्यावे लागे; वेगळ्या वाटेने जायचे म्हटले तरी गांधींचा सक्रिय विरोध नाही याची खात्री लोकांना, व कार्यकर्त्यांना द्यावी लागे. मार्गाविषयी, भूमिकांवरून मतभिन्नता असली तरी काँग्रेसमधील ज्येष्ठ व कनिष्ठ पुढाऱ्यांचे गांधींशी वैयक्तिक संबंध नेहमीच स्नेहादराचे होते. यामुळे गांधींचा प्रभाव कायम राहूनही मधूनमधून वेगळ्या वाटेने जाण्यामध्ये अनुल्लंघनीय अडचणी क्वचितच उत्पन्न झाल्या.

चित्तरंजन दास, मोतीलाल नेहरू, विठ्ठलभाई पटेल प्रभृती नेत्यांनी कायदेकौन्सिलांचे राजकारण करण्यासाठी काँग्रेस संघटनेत बहुमत झाले नाही तेव्हा वेगळा 'स्वराज्य पक्ष' स्थापन केला. काँग्रेस पक्षात परत फूट पडण्याची वेळ आली होती. १९२३ सालच्या निवडणुकांमध्ये स्वराज्य पक्षाने ठळक विजय मिळविला. १९२४ मध्ये अनपेक्षितपणे गांधींची सुटका झाली. त्यांच्यात व स्वराज्य पक्षाच्या नेत्यांमध्ये पुढील दोन वर्षे एकप्रकारे वाटाघाटी व रस्सीखेच चालू राहिली. असहकाराचा नकारात्मक व विधायक कार्यक्रम, विशेषतः खादीचा कार्यक्रम राबविण्याबाबत काँग्रेसमधील बहुसंख्यांचा अनुत्साह पाहून, त्यांची त्यासंबंधीची अश्रद्धा पाहून गांधींनी १९२५ च्या मध्यापर्यंत पूर्ण माघार घेऊन काँग्रेस संघटना स्वराजिस्टांच्या हाती सुपूर्त केली, व फूट टाळली. आपल्या भूमिकेचे स्पष्टीकरण करताना त्यांनी लिहिले : 'तिहेरी रचनात्मक कार्यक्रमावर आपले लक्ष केंद्रित करून सुशिक्षित भारतीयांनी आपल्या जीवनात त्याला महत्त्वाचे स्थान दिले तर आपण स्वातंत्र्याच्या अधिक निकट जाऊ हे निश्चित. परंतु त्या वर्गात असा विश्वास निर्माण करण्यास मी असमर्थ ठरलो आहे हे मला कबूल केले पाहिजे ... मला अजूनही त्यांची मने वळवायची इच्छा आहे. पण हे कार्य मी काँग्रेसचे नेतृत्व करून करू इच्छित नाही .. .. त्यांच्या मार्गातून ( कायदेकौन्सिलच्या राजकारणाच्या ) दूर होऊन, काँग्रेसच्या मदतीने व तिच्या झेंड्याखाली माझ्या रचनात्मक कार्याला स्वतःस वाहून घेणे हाच त्यांच्या कार्याला साहाय्य करण्याचा उत्तम मार्ग मला दिसतो.' गांधींनी फूट टाळली इतकेच नाही तर, काँग्रेसचे महत्त्व कायम राखले. रचनात्मक कार्य काँग्रेसच्या झेंड्याखाली

अनुक्रमणिका

करीत राहून तिचे सामर्थ्यही आपल्या पद्धतीने वाढविले.

– ८ –

मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांनी भारतीय राजकारणामधील जातीयवादी प्रवृत्तींना फार मोठी चालना दिली. काँग्रेसची चळवळ राष्ट्रीय चळवळ नाही, ती एका हिंदू समाजाची तेवढी चळवळ आहे असे तिच्यासंबंधी आधीपासूनच म्हटले जात होते. त्या पाठीशी, ती राष्ट्रीय चळवळ बनू नये अशी इच्छा व प्रयत्नही होते. या भूमिकेतून कायदेकौन्सिलांमधील जागांचे वाटप ठरविताना, मतदानाचा हक्क कोणाला द्यावयाचा व मतदारसंघ कसे निश्चित करावयाचे ते ठरविताना हिंदुस्थानातील विविध जातिजमाती हे वेगवेगळे उप-राष्ट्रिक समूहच होत ( sub-nationalities ) याचा विचार करायला हवा; येथे इंग्लंडच्या धर्तीची प्रादेशिक मतदारसंघांच्या पायावर उभारणी केलेली लोकशाही व्यवस्था अनुचित होईल, असा युक्तिवाद राज्यकर्ते करीत होते. जे काही जागावाटप, लाभांचे वाटप नव्या सुधारणांमुळे होणार त्यात आपणास वाटा मिळवून सत्ता उपभोगता यावी या लालचेने भारतात विविध जातिजमातींच्या पुढाऱ्यांनी राज्यकर्त्यांची ही भूमिका अहमहमिकेने उचलून धरली. १९१७ नंतरच्या काळात जातिजमातीधिष्टित फुटीर हितसंबंधी राजकीय चळवळी वाढल्या. या चळवळींमुळे काँग्रेसच्या एकात्म राष्ट्रबांधणीच्या प्रयत्नांमध्ये अनेक अडथळे उत्पन्न झाले. मुस्लिम अलगवादामुळे आधीच एक दुबळेपण आलेले होते. आता ते शतगुणित झाले. विशेषतः कायदेकौन्सिलांचे राजकारण, शिष्टाईचे राजकारण करण्याच्या प्रसंगी काँग्रेस ही, राष्ट्रीय तर नाहीच, पण साऱ्या हिंदू समाजाचे प्रतिनिधित्व करणारी संघटनाही नाही असा मुद्दा उपस्थित करता येऊ लागला, व हा युक्तिवाद अगदीच निराधार नाही हे दाखवून देता येऊ लागले.

या वातावरणात व परिस्थितीमध्ये स्वराज्य पक्षाच्या राजकारणामधून स्वातंत्र्याची चळवळ भरीव स्वरूपात बळकट होणे वा पुढे जाणे अशक्यच होते. कायदेमंडळांमध्ये सरकारची अडवणूक करून, युक्तिप्रयुक्तीचे डावपेच खेळून मतमोजणीच्या प्रसंगी सरकारचा पराभव करून सरकारला कोंडीत पकडणे या स्वरूपाचेच राजकारण करणे तेवढे शक्य होते. सत्तेचा केवळ आभास असला तरी, त्यासोबत पदरात पडणारे लाभ व मिळणारा मानमरातब यांचे आकर्षण जबरदस्त होते. त्यामुळे काँग्रेसच्या तिकिटावर निवडणुका जिंकलेल्यांमध्येही एकजूट व शिस्त कायम राहणे अवघड होऊन बसले. सरकारला पराभूत करण्यासाठी कायदेकौन्सिलांमधील अठरापगड गटांना व सभासदांना एकत्र आणण्यासाठी तडजोडी व डावपेच करण्याच्या ओघात काँग्रेसच्या ध्येयधोरणांशीदेखील तडजोडी कराव्या लागत होत्या. आज मागे वळून पाहता, १९२३–२४ ते १९२८ या काळातील स्वराज्यपक्षीय काँग्रेसचे कायदेकौन्सिलातील राजकारण त्या वेळच्या मुख्य प्रश्नांवरून व आव्हानांवरून लक्ष विचलित करणारेच ठरले, असे म्हणणे भाग पडते. गोखल्यांच्या काळाशी तुलना करता कायदेकौन्सिलांमधील राजकारण हे या कालखंडात निरर्थक ठरले होते. या जंजाळात काँग्रेस अडकून पडली तर सरकारला हवेच होते. कारण अनेक जातिजमातीय पक्षोपपक्षांपैकी केवळ एक पक्ष ही भूमिका काँग्रेसला अनिवार्यपणे स्वीकारावी लागणार होती.

असहकार आंदोलनाच्या काळात हिंदु-मुस्लिम ऐक्याचे घडलेले दर्शन बरेचसे फसवे होते ही गोष्ट आंदोलन स्थगित झाल्यानंतरच्या काळात स्पष्ट झाली. खिलाफतीच्या चळवळीमुळे धार्मिक मुद्द्यावरून सर्वसामान्य मुसलमान समाजाचे राजकीय संघटन वाढले, प्रक्षोभही वाढला आणि लढाऊ वृत्ती उत्पन्न झाली. शासनाची दहशत कमी झाली. असे दिसते की, असहकार आंदोलनाच्या काळात उत्तर भारतातील हिंदू जनसामान्यांमध्येही ही प्रक्रिया घडली आणि ती घडविण्यात आर्यसमाजी पुढाऱ्यांची महत्त्वपूर्ण भूमिका राहिल्याने धार्मिक राजकीय अस्मितेचा आक्रमक आविष्कार होण्यास अनुकूल वातावरण निर्माण झाले. गोहत्या, मशिदीवरून वाद्ये वाजवीत मिरवणुका नेणे, धर्मांतरित मुसलमानांना शुद्ध करून परत हिंदुधर्मात घेणे, या प्रकारच्या मुद्द्यांवरून आधीपासून दोन जमातींमध्ये ताण होतेच. या काळात उग्र जातीय दंगलींच्या रूपात त्यांचा भडका उडत राहिला. या ताणतणावांचे निरसन करून, व्यापक राजकीय उद्दिष्टांसाठी एकजूट वाढविण्यासाठी मुद्दा

उपस्थित तर उरलेला नव्हताच; उलट, कायदेकौन्सिलांच्या निवडणुका, तेथील राजकारण, आणि घटनात्मक पुनर्रचनेच्या संदर्भातील नव्या मागण्या या साऱ्याच गोष्टी राजकीयदृष्टया जागृत व आकांक्षी हिंदु-मुसलमान मध्यमवर्गामधील अंतर, अविश्वास, वैमनस्य यांत भर घालणाऱ्या होत्या.

कायदेकौन्सिलांची फेररचना कशी करावी, वेगवेगळ्या समाजांना वा गटांना किती प्रमाणात प्रतिनिधित्व मिळावे, प्रशासनात नोकऱ्यांमध्ये कोण्या जमातीचे किती प्रमाण असावे, प्रांतिक स्वायत्तता व केंद्राचे अधिकार यांचा मेळ कसा बसवावा यांसारख्या घटनात्मक मुद्द्यांची आपापसांत वाटाघाट करून सर्वमान्य असा फॉर्म्यूला काढता येईल, व तसा तो काढता आला की सर्वांची एकजूट होऊन स्वराज्यसंपादनाचे नेमस्त राजकारण –म्हणजे ब्रिटिश पार्लमेंटवर दबाव आणण्याचे राजकारण–यशस्वीपणे करता येईल, हा मूलत: भ्रम आहे; वाटा मागण्याच्या राजकारणातून आकांक्षा फाजील वाढणार व बेजबाबदारपणे अव्वाच्या सव्वा मागण्या करण्याची प्रवृत्ती वाढून फुटीरतेच्या दिशेनेच पावले पडणार, ही गोष्ट काँग्रेसमधील सुशिक्षित वर्गाच्या लहानमोठ्या पुढाऱ्यांच्या ध्यानी यायला हवी होती. आपल्या हातातील सत्ता अबाधित राखण्यासाठी इंग्रज शास्ते वेगवेगळ्या जमातींच्या नेत्यांना आपल्यापुरते पाहून मागण्या करण्यास उत्तेजन देणार; आणि अशा परस्परविरोधी मागण्या पुढे आल्या की, हिंदुस्थानातील जमातींमध्ये एकवाक्यता होत नाही हे कारण पुढे करून स्वराज्य देण्याचे टाळत राहणार, ही नीती स्पष्ट लक्षात घेऊन आपली सर्व शक्ती कायदेकौन्सिले व घटनात्मक सुधारणांसाठीचे प्रयत्न याच्या पलीकडे, असहकाराच्या नकारात्मक व विधायक कार्यक्रमांच्या आधारे काँग्रेसचीच बांधणी पर्यायी सत्ता म्हणून करीत राहण्यावर केंद्रित करायला हवी होती.

१९२७ साली ब्रिटिश सरकारने सायमन कमिशनची नेमणूक केली. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांची कार्यवाही १९२० च्या नंतरच्या सातआठ वर्षांमध्ये कशी झाली याचा अभ्यास करून पुढच्या टप्प्यांविषयी सूचना करण्यासाठीच्या या कमिशनवर एकाही हिंदी सभासदाची नेमणूक न केल्यामुळे काँग्रेस, लीग, लिबरल सर्वच प्रमुख पक्षांनी कमिशनवर बहिष्कार घालण्याची भूमिका घेतली. या बहिष्काराच्या प्रसंगामुळे राजकीय वातावरण परत एकवार तापले. सर्व राष्ट्रांचा म्हणून घटनात्मक सुधारणांविषयीचा प्रस्ताव एकजुटीने सादर करण्याची ईर्षा बाळगून सर्वपक्षीय परिषद भरवली गेली. मोतीलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखाली एक समिती नेमून तिचा अहवाल प्रसिद्ध केला गेला; पण मुस्लिम समाजाच्या पुढाऱ्यांचा एकमुखी पाठिंबा मिळविण्यात अखेरीस अपयश आले.

या अपयशाने मुस्लिम समाजाच्या संदर्भातील आव्हान रेखीवपणे स्पष्ट झाले. गैरवाजवी मागण्या करण्यासाठी अनुकूल अशी पार्श्वभूमी १९०७–०८ सालापासूनच तयार होत आलेली होती. विभक्त मतदारसंघ, अल्पसंख्याक असलेल्या प्रांतांमध्ये कायदेकौन्सिलात लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षा जास्त वजन प्राप्त करून देईल इतक्या जागा, केंद्रीय कायदेकौन्सिलातही लोकनियुक्त जागांमध्ये $\frac{1}{3}$ प्रमाण, प्रांतिक स्वायत्तता व दुबळे केंद्र ही रचना आधीच स्वीकारली गेलेली होती. जसजसा काळ जात होता तसतशा एक ना एका मुस्लिम गटाकडून आणखी जास्त जास्त मागण्या पुढे येत राहिल्या. सतत चढतीच कमान राहणाऱ्या या प्रक्रियेला मुळातूनच छेद देणारी प्रक्रिया कोणती होऊ शकेल हे जाणणे, व तिचा अवलंब करणे हे आव्हान काँग्रेसपुढे होते.

बुद्धिजीवी सुशिक्षित वर्गाच्या आकांक्षा व मागण्या आणि त्यांचे जागा व लाभ यांच्यासाठी चाललेले राजकारण यांच्या पलीकडे असलेल्या रयतेचे, श्रमिकांचे धर्मजातविरहित समाजकारण, अर्थकारण व राजकारण करण्यामधून आणि त्यांची एक वेगळ्याच स्वरूपाची व्यापक चळवळ उभारण्यातूनच असा छेद देता येण्याची शक्यता होती. कायदेकौन्सिलांच्या राजकारणाकडे पाठ फिरवून देशव्यापी असहकार आंदोलन उभे करून वस्तुत: काँग्रेसने स्वराज्याचे राजकारण एका वेगळ्या पातळीवर नेऊन ठेवले होते. या पार्श्वभूमीवर 'स्वराज्य पक्षा'चे १९२३ ते १९२८ या काळातील राजकारण ही प्रतिगामी व घातक वाटचाल होती.

देशातील तरुणांमध्ये कायदेकौन्सिलांभोवती फिरणाऱ्या राजकारणाचा उबग वाढत होता. सोविएत रशियातील क्रांतिनंतरच्या दहा वर्षांच्या काळात साम्यवादी विचारांचे लोण भारतात येऊन पोचले नसते तरच नवल. तरुण पिढीत वर्गलढ्याचा, सशस्त्र क्रांतिवादाचा मार्गच अधिक फलदायी व अनिवार्य ही धारणा रुजत चालली. संपूर्ण स्वराज्याचीच मागणी काँग्रेसने करावी, आणि ती मागणीही लढाऊ मार्गाने पदरात पाडून घ्यावी यासाठी काँग्रेसमध्येच दबाव वाढला. जवाहरलाल नेहरू व सुभाषचंद्र बोस हे या तरुण पिढीचे नेतृत्व करीत होते. जुन्या पिढीला स्वतःच्या ताकदीने हा प्रश्न सोडविता येण्याची खात्री नव्हती. पुन्हा एकवार काँग्रेसचे नेते गांधींकडे वळले. एक तडजोड निघाली. १९२९ अखेर ब्रिटनने वसाहतीच्या स्वराज्याची मागणी मान्य केली नाही तर काँग्रेस संपूर्ण स्वराज्य हे आपले ध्येय म्हणून घोषित करील आणि त्यासाठी लढ्याचा मार्ग अनुसरण्यास ती मोकळी राहील, असा निर्वाणीचा खलिता सरकारला १९२८ च्या अधिवेशनात दिला गेला.

घटनात्मक सुधारणांचा खर्डा तयार करण्यात हिंदी प्रतिनिधींना सहभागी करून घेतल्याशिवाय नेमस्त पुढारीवर्गदेखील आपल्या बाजूस उभा राहणार नाही, व काँग्रेसचा संकल्पित लढा नेमस्त–जहाल, हिंदु-मुस्लिम व इतर जमाती, सर्वांचाच पाठिंबा मिळून आवरण्यापलीकडे तो बलवान ठरेल ही शक्यता व्हाइसरॉय आर्यविन यांच्या लक्षात आली असावी. हिंदी प्रतिनिधींचा सहभाग असलेली एक गोलमेज परिषद भरवावी व तेथे घटनात्मक सुधारणांविषयी सर्वसंमतीने एक मसुदा तयार केला जावा असा प्रस्ताव त्यांनी मांडला. वसाहतीचे स्वराज्य देण्याचे मान्य करून, वासाहतिक स्वराज्याची घटना तयार करण्यासाठी परिषद असेल, आणि परिषदेत काँग्रेसला तिच्या लोकांमधील स्थानानुसार अग्रस्थान मिळणार असेल तर काँग्रेस परिषदेत सहभागी होण्यास तयार होती. वसाहतीचे स्वराज्य हे दूरवरचे ध्येय असले तरी, सध्या त्या दिशेने आणखी काही पावले टाकण्याच्या मर्यादेतच ब्रिटिश सरकार विचार करण्यास तयार आहे ही गोष्ट स्पष्ट झाल्यावर, संपूर्ण स्वराज्याचे ध्येय घोषित करून लढ्याची तयारी करणे एवढा एकच पर्याय उरला. १९२९ च्या डिसेंबर ३१ च्या मध्यरात्री रावी नदीच्या तिरी लाहोर अधिवेशनात जवाहरलाल नेहरूंनी संपूर्ण स्वराज्याच्या ध्येयाची घोषणा केली व झेंडा फडकावला. लढ्याची सज्जता म्हणून केंद्रीय व प्रांतिक विधिमंडळांमधील काँग्रेसच्या सर्व सभासदांनी राजीनामे द्यावेत असा आदेश काँग्रेसने दिला.

– ९ –

मिठाचा व्यापार मक्तेदारीने प्रथम ईस्ट इंडिया कंपनीने व नंतर हिंदुस्थान सरकारने आपल्या हाती ठेवलेला होता. नैसर्गिकरीत्या समुद्रकाठी निर्माण होणारे मीठदेखील लोकांना घ्यायला बंदी होती. हिंदी लोकांच्या गुलामीची द्योतक असलेली ही गोष्ट गांधींनी सार्वत्रिक कायदेभंगाचा आरंभबिंदू म्हणून निवडावी यात औचित्य व कल्पकता होती. गरिबांतल्या गरीब माणसांवर कराचा बोजा टाकून उत्पन्न वाढविण्यासाठी सरकारने वेळोवेळी मिठावरील कर वाढविलेला होता, व त्याविरुद्ध काँग्रेसने ठराव केलेले होते. म्हणजे, मीठ ही मुद्द्याची गोष्ट करण्यासाठी सबळ कारणही परंपरेमध्ये होते.

निवडक सत्याग्रहींसोबत काही दिवसांच्या पदयात्रेने समुद्रकाठी जाऊन मीठ गोळा करण्याची कायदेभंगाची कृती त्यांच्या पूर्ण नियंत्रणाखाली प्रथमतः फक्त वेचक लोकच करतील असे गांधींनी जाहीर केले. सत्याग्रहींनी कसे वर्तन करावयाचे त्याचा वस्तुपाठ असा शिकल्यावरच सत्याग्रहाच्या लढ्यात इतरांनी उतरावयाचे हा निर्बंध शिस्तबद्धतेचे व अहिंसेचे महत्त्व ठरविण्याच्या दृष्टीने अत्यंत उपयोगी ठरला.

१९२०–२२ च्या तुलनेने या खेपेस काँग्रेसची संघटना देशभर नीटपणे काम करीत होती. विधायक कार्याच्या द्वारे गांधीविचार मानणारी अनुयायी कार्यकर्तेमंडळीही देशभर हाताशी होती.

१९२०–२२ च्या तुलनेने अनेक पटींनी अधिक सार्वत्रिक असा सत्याग्रहाचा लढा १९३० साली झाला. ब्रिटिश राजवटीचे अस्तित्व अमान्य करणे, स्वतंत्र आहोत या धारणेतूनच व्यवहार करणे हा लढ्याचा जाहीर उद्देशच होता. मुळात मीठ गोळा करण्यासारख्या फालतू गोष्टीमधून राज्य उखडून

टाकण्याची शक्ती कशी काय उत्पन्न होणार, अशी शंका मनात असल्याने सरकारने आरंभी काहीशी बघ्याची भूमिका घेतली. पण जेव्हा देशभर लोकांनी ब्रिटिश सत्ता झुगारून दिली असल्याचे दृश्य नजरेस पडले तेव्हा मग निर्दयतेने चळवळीवर प्रहार करण्यास नोकरशाही उद्युक्त झाली. दयामाया न दाखविता ती चिरडून टाकण्याचे शर्थीचे प्रयत्न हिंदुस्थान सरकारने केले. पण जागोजाग अनेकानेक मार्गांनी लोक लढा पुढे नेतच राहिले. पोलिसी अत्याचाराच्या व दडपशाहीच्या वार्ता व प्रत्यक्ष वर्णने जगभर प्रसृत झाली तेव्हा सरकारचा नैतिक पराभव झाला व काँग्रेसचा विजय झाला. काँग्रेसच्याशिवायच भरविलेल्या पहिल्या गोलमेज परिषदेत ब्रिटिश पंतप्रधान रॅम्से मॅकडोनल्ड यांना स्वतःहून, 'पुढच्या परिषदेत काँग्रेसचा पण सहभाग असेल अशी आम्ही आशा बाळगून आहोत,' असे विधान करणे भाग पडले. काँग्रेसने आपला लढा मागे घेतलेला नसतानाही, व्हाइसरॉय आर्यविन यांनी काँग्रेसच्या नेत्यांची जानेवारी १९३० मध्ये बिनशर्त सुटका केली, व फेब्रुवारीमध्ये गांधींना प्रतिपक्षीय प्रतिनिधी या नात्याने सन्मानपूर्वक आमंत्रण देऊन बोलणी सुरू केली. सरकार व काँग्रेस यांच्यात तह झाला, आणि मगच गोलमेज परिषदेत भाग घेण्यास काँग्रेसने संमती दिली.

काँग्रेसने पुढे ठेवलेल्या मागण्या मंजूर झाल्या नव्हत्या तरीही गांधींनी करार केला यावरून गांधींवर कठोर टीकाटिप्पणी झाली. शहीद भगतसिंगांची फाशी रद्द करवून न घेतल्यामुळे जहाल तरुणांचा गांधींवर मोठा रोष झाला. काँग्रेसच्या मागे व्यापक प्रमाणावर जनतेची शक्ती उभी आहे, व स्वातंत्र्यसंपादनासाठी उच्च कोटीचा त्याग करण्याची, विलक्षण क्लेश सहन करण्याची लाखो लोकांची तयारी आहे याचे प्रत्यंतर काँग्रेसने ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना घडविले; राज्याविषयीची अप्रीती खेडूत जनतेपर्यंतही प्रभावी स्वरूपात पोचलेली आहे ही गोष्टही लक्षात आणून दिली; आणि बरोबरीच्या नात्याने बोलणी करण्यास ब्रिटिश सत्ता तयार झाली, यात मुद्द्याची गोष्ट साधली गेली हे गांधींचे स्पष्टीकरण व समर्थन होते.

प्रतिपक्षीयाने तयारी दाखविल्यावर सत्याग्रहाने संवादासाठी नेहमीच पुढे आले पाहिजे असे गांधींचे म्हणणे होते. दोन्ही पक्षांचे उन्नयन व मुक्ती हे सत्याग्रहाचे उद्दिष्ट असते. एकाची दुसऱ्यावर मात हे उद्दिष्ट असू शकत नाही. सत्याग्रहाच्या लढ्यास प्रारंभ करण्यापूर्वी व्हाइसरॉय यांना धाडलेल्या पत्रामध्ये गांधींनी लिहिले होते : 'Conversion of a nation that has consciously or unconsciously preyed upon another far more numerous, far more ancient and no less caltured than itself, is worth any amount of risk. I have deliberately used the word conversion. For my ambition is no less than to convert the British people through non-violence. I want to serve them even as I want to serve my own.' [ आपल्याहून कितीतरी अधिक संख्येच्या, कितीतरी अधिक प्राचीन आणि तितक्याच सुसंस्कृत राष्ट्राचे जाणूनबुजून किंवा अजाणता भक्षण करणाऱ्या राष्ट्राचे चित्तपरिवर्तन करण्यासाठी कितीही मोठा धोका पत्करण्याची किंमत देणे योग्य ठरेल. चित्तपरिवर्तन हा शब्द मी जाणीवपूर्वक वापरला आहे. अहिंसेच्या द्वारे ब्रिटिश जनतेचे हृदयपरिवर्तन घडवून आणण्याची माझी महत्त्वाकांक्षा आहे; याहून ती कमी नाही... माझ्या लोकांची मला सेवा करायची आहे तशी ब्रिटिशांचीही करायची आहे. ]

मागे वळून पाहता लक्षात येते की, व्हाइसरॉय आर्यविन यांचा प्रतिसाद हा ब्रिटिश समाजातील एका अल्पसंख्य गटाचा प्रतिसाद होता. ब्रिटनमध्ये (व येथील नोकरशाहीमध्ये) मोठा विभाग असा होता की, जो गांधींच्या लढ्याने उपस्थित केलेल्या नैतिक आव्हानाला आपण पुरे पडलो नाही या जाणिवेने अधिकच क्रूर व पाशवी सूडबुद्धीने पेटून उठला. या मंडळींना आर्यविन यांच्याविषयी केवळ तिरस्कारच वाटला. चर्चिल हे अशा ब्रिटिश मनोवृत्तीचे उत्तम उदाहरण म्हणता येईल. काँग्रेसजनांच्या बाजूने विचार केला तर, त्यांनाही गांधींच्या उच्चतर विशाल ध्येयदृष्टीची जाण नव्हती, व ते ध्येय गाठण्यात (म्हणजे ब्रिटिश लोकांच्या हृदयपरिवर्तनात) रसही नव्हता. काँग्रेसच्या लहानमोठ्या पुढाऱ्यांना व कार्यकर्त्यांना मागण्या पदरात पाडून घेण्यात

व राजकीय स्वातंत्र्य मिळविण्यात, थोडक्यात सत्ता हस्तगत करण्यात रस होता. लढ्याचा ऐन प्रकार्य होत असताना गांधींनी, काँग्रेसच्या मागण्या पदरात न पडताही, करार करून शरणागती पत्करली असेच त्यांना वाटले, व त्यांची मनेही कडवट बनली.

ब्रिटिश व हिंदी, दोन्ही देशांतील राजकारणी वरिष्ठ वर्गांशी गांधींचे नाते खऱ्या अर्थाने कधी जुळायचे नव्हतेच. त्यांच्या लढ्यांचा व कार्यांचा खरा परिणाम पहावयाचा तर या वर्गांपलीकडे जाऊन, सर्वसामान्य जनतेच्या पातळीवर घडून येणारे बदल बघण्याची गरज आहे. जेफ्री ॲश यांनी गांधींचे मोठे मार्मिक चरित्र लिहिले आहे. दुसऱ्या गोलमेज परिषदेस गांधी गेले त्या प्रसंगाला उद्देशून त्यांनी लिहिले आहे, 'He left a country for which he had accomplished nothing and everything. Purna Swaraj was nowhere in sight. What he had done was to liberate Indians' minds and teach them not to be afraid. No amount of pressure would push them down to where they had been before.' [ त्यांनी देश सोडला. देशासाठी त्यांनी काहीच साधले नव्हते आणि सर्व काही साधले होते. 'पूर्ण स्वराज्य' कुठेच दृष्टिपथात नव्हते. पण त्यांनी जे घडवून आणले होते ते हे की त्यांनी भारतीयांची मने विमुक्त केली होती आणि त्यांना भीती न बाळगायला शिकविले होते. आता त्यांच्यावर कितीही मोठे दडपण आणले तरी ते पूर्वी होते तितक्या खाली त्यांना ढकलणे शक्य नव्हते. ]

— १० —

दुसऱ्या गोलमेज परिषदेचे कामकाज अल्पसंख्याकांच्या प्रतिनिधित्वाच्या प्रश्नावर अडखळून राहिले. प्रांतांना स्वायत्तता दिली जावी, या मुद्द्यापलीकडे जाऊन संघराज्याच्या रचनेच्या अधिकारांच्या संदर्भात जो तो गट आपल्या स्वार्थी हितसंबंधांच्या जपणुकीपुरताच मागण्या पुढे ठेवत होता. मुळात गोलमेज परिषद भरवितानाच, हे असेच घडेल व घडावे अशी कल्पना स्वातंत्र्य देण्याच्या विरोधी असणाऱ्या नोकरशाही व राजकारणी यांची असावी असे म्हणता येते. ॲश लिहितात, 'All the British emphasis lay on India's divisions. The Conference was hubbub of noisy sectional interests, and stage managed as such... The Government maintained that all minorities–Muslims, Sikhs, Untouchables, Christians, Parsees, Europeans–must be protected and satisfied before self–rule could be granted, and that any federal scheme must have a place for the princes... the Conference was packed with carefully chosen minority figures, invited by Delhi and eager to oppose him ( Gandhi ).' [ ब्रिटिशांचा सारा भर भारतीयांमध्ये जे विभेद होते त्यांच्यावर होता. परिषदेमध्ये आपापले विभागीय हितसंबंध बोलभांडपणे रेटणाऱ्यांचा केवळ गोंगाट होता आणि तिच्यामागच्या सूत्रचालकांनी घडवून आणलेला तो खेळ होता. स्वराज्याचा अधिकार देण्यापूर्वी सर्व अल्पसंख्याकांच्या–मुसलमान, शीख, अस्पृश्य, ख्रिश्चन, पारसी, युरोपिअन्स ह्या साऱ्यांच्या– संरक्षणाची तजवीज केली पाहिजे आणि त्यांचे समाधान केले पाहिजे, आणि कोणत्याही संघराज्याच्या योजनेमध्ये संस्थानिकांना स्थान असले पाहिजे ही भूमिका सरकारने धारण केली होती... अल्पसंख्याकांमधून काळजीपूर्वक निवडलेल्या आणि ( गांधीजींना ) विरोध करायला उत्सुक असलेल्या व्यक्तींना दिल्लीकडून आमंत्रित करून त्यांचा परिषदेत भरणा करण्यात आला होता... ] काँग्रेस हा अनेक पक्षोपपक्षांपैकी एक आहे; तोही अधिककरून हिंदू समाजाचेच त्यातल्या-त्यात प्रतिनिधित्व करतो; पण त्यातही खरे तर सर्व हिंदूंचेही प्रतिनिधित्व करीत नाही, हे दाखवून देण्यावर ब्रिटिश राज्यकर्त्यांचा भर होता. हे दाखवून देण्यात औपचारिक पातळीवर सरकारला यश येणार ही गोष्ट उघड होती. देशव्यापी लढा देऊन जनतेचे प्रतिनिधित्व करण्याचा अधिकार प्राप्त केलेली काँग्रेस ही एकमेव राष्ट्रीय जनसंघटना आहे ही गोष्ट गांधींनी दर प्रसंगी ठासून सांगितली. काँग्रेसची भूमिका न सोडता सन्माननीय तडजोड काही निघते का यासाठी प्रयत्नही केले. पण अपयश अटळ होते.

अनुक्रमणिका

दुसऱ्या आघाडीवर मात्र गांधींना फार मोठे यश आले. ब्रिटिश समाजातील विविध घटकांशी संवाद साधण्याच्या आघाडीवर त्यांच्या संभाषणांचा व जीवनाचा फार खोलवर ठसा उमटला. अॅश लिहितात, 'The real conference, for him, was a gramroots dialogue with the people of England. [ "त्यांच्या दृष्टीने तळच्या ब्रिटिश जनतेशी केलेला संवाद हीच खरी परिषद होती. " ] रॉबर्ट पेन या गांधींच्या चरित्रकारांनी लिहिले आहे, 'In his person were represented the Indian masses. He was touching hearts wherever he went, for there were few who could resist him ... By his mere presence Gandhi had changed the attitude of the English people to India.' [ "आपल्या व्यक्तित्वाद्वारा ते भारतातील गोरगरीब जनतेचे प्रतिनिधित्व करीत होते. ते जातील तेथे लोकांच्या हृदयाला स्पर्श करीत होते. त्यांच्यापासून स्वतःला आवरणे फारच थोड्यांना जमत होते. आपल्या केवळ उपस्थितीने गांधींनी ब्रिटिश जनतेच्या भारताविषयीच्या वृत्तीत बदल घडवून आणला." ]

– ११ –

१९३० च्या सत्याग्रहलढ्यात गांधींच्या नेतृत्वाखाली काँग्रेसने जे यश मिळविले, आणि लॉर्ड आर्यविन यांनी बरोबरीच्या नात्याने तहनामा करून त्यावर जी राजमुद्रा उमटविली यामुळे संतप्त झालेल्या, व स्वातंत्र्याची आकांक्षा बाळगण्याचे धाष्टर्य करणाऱ्या हिंदी जनतेला, विशेषतः काँग्रेसच्या अनुयायांना, त्यांची जागा दाखविण्यास उत्सुक असलेल्या आक्रमक वृत्तीच्या राजकारणी मंडळींच्या हाती १९३२ साली इंग्लंडमध्ये व, व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांच्या रूपाने हिंदुस्थानात सत्तेची सूत्रे आलेली होती. त्यामुळे सनदी नोकरशाही अतिशय आत्मसंतुष्ट बनली; तिला गुर्मी चढली. गांधी इंग्लंडमध्ये असतानाच हिंदुस्थानात दडपशाहीला आरंभ झाला होता. इंग्लंडहून परतल्यावर व्हाइसरॉयांशी बोलणी करण्याचा प्रयत्न अयशस्वी ठरल्यावर गांधींनी सत्याग्रहलढ्याचे पुनरुज्जीवन केले. देशात काँग्रेसचे नामनिशाण राहू नये हा उद्देश मनात बाळगून सरकारने दडपशाहीचा वरवंटा फिरविण्यास आरंभ केला. वृत्तपत्रांची मुस्कटदाबी करण्यात आली. याचा अपेक्षित तो परिणाम लौकरच दिसूनही आला. चळवळ झपाट्याने ओसरल्याचे दृश्य वरकरणी दिसू लागले. १९३२ सालच्या सप्टेंबरपर्यंत नऊ महिन्यांमध्ये ६१,५५१ व्यक्ती तुरुंगात गेल्या, आणि हा आकडा १९३०–३१ साली तुरुंगवास भोगलेल्या व्यक्तींपेक्षा मोठा होता ही गोष्ट ध्यानात घेतली तर सरकारच्या निर्दय दडपशाहीचा सामना करूनही काँग्रेसने प्रभावी स्वरूपात चळवळ चालविली ही गोष्ट स्पष्ट होते.

गांधी तुरुंगात असताना ब्रिटिश पंतप्रधान मॅकडोनल यांनी सुप्रसिद्ध 'जातीय निवाडा' घोषित केला. या निवाड्यानुसार अस्पृश्यांना विभक्त मतदारसंघ बहाल करण्यात आले होते. दुसऱ्या गोलमेज परिषदेचे कामकाज चालू असतानाच, अस्पृश्यांना विभक्त मतदारसंघ दिल्यास आपण प्राणांतिक उपोषणाने अशा निवाड्याचा प्रतिकार करू असे गांधींनी घोषित केले होते. त्यांनी तुरुंगातच उपोषणास आरंभ केला. सरकारी दडपशाहीपुढे एकप्रकारे निश्चेष्ट पडलेल्या समाजात या उपोषणाने अभूतपूर्व चैतन्याचा संचार झाला. हिंदू समाजाने आपापसात एकमताने कोणतीही तडजोड केल्यास ती आपण मंजूर करू अशी भूमिका ब्रिटिश सरकारने घेतल्यामुळे गांधींचे उपोषण हे मुख्यत्वेकरून हिंदू समाजाला, व त्यातही सवर्ण हिंदू समाजाला मोठे आव्हान ठरले. अ-राजकीय सामाजिक स्वरूपाच्या बाबीवरून देशभर उत्पन्न झालेल्या या जागृतीला व तिच्या सार्वजनिक अभिव्यक्तीला सरकार दडपू शकत नव्हते.

१९३२ नंतरच्या वर्षात गांधींच्या नेतृत्वाला आव्हान देणारा 'डाव्या' विचारसरणीकडे झुकलेला एक मोठा वर्ग काँग्रेसमध्येही उत्पन्न झालेला होता. गांधींच्या अहिंसेचा मार्ग या वर्गाला पसंत नव्हता. सरकारच्या दडपशाहीवर मात करण्याच्या उद्देशाने साध्यसाधनविवेक न करता, साधनशुचितेचा आग्रह बाजूस ठेवून लढा देत राहण्याचा प्रयत्न काँग्रेसच्या अनुयायांनी चालविल्याची हकीकत गांधींच्या कानावर पडल्याशिवाय राहिली नाही. असे वर्तन केवळ डाव्या, जहाल तरुण मंडळींकडूनच

घडले होते असे मात्र नव्हते. गुप्त डावपेचांना, प्रतिपक्षीयांवर कसेही करून मात करण्यास सत्याग्रहशास्त्रात जागा नव्हती. सत्याग्रहलढ्याचा उद्देश प्रतिपक्षीयाचेही परिवर्तन घडवून आणणे हा असतो, व म्हणून ऐन लढ्याचे वेळीही भूमिका उघड कृतींद्वारा संवाद करीत राहण्याचीच असावी लागते. १९३३-३४ साली गांधींना तीव्रपणे जाणवले की, स्वराज्याचा आशय व स्वराज्यप्राप्तीचा मार्ग या दोन्ही मुद्द्यांवरून आपल्या सहकाऱ्यांशी आपले मतभेद खोलवर जाऊन पोचणारे आहेत.

या सुमारास काँग्रेसची चळवळ व गांधींचे नेतृत्व यांविषयी सरकारी वर्तुळात कोणते मत व्यक्त केले जात होते तेही पाहण्यासारखे आहे. ब्रिटिश नोकरशाही व वरिष्ठ अंमलदार स्वतःच्या कामगिरीवर खूष होते. गोलमेज परिषदांच्या कामकाजामधून आकारास येत असलेल्या नव्या घटनात्मक सुधारणांच्या कायद्यानुसार जी राजवट प्रस्थापित होईल तीमध्ये काँग्रेसला काही स्थान नसावे, ब्रिटिशांशी जुळवून घेणाऱ्या नेमस्त गटांचा/पक्षांचा वरचष्मा प्रस्थापित व्हावा अशी त्यांची इच्छा होती. यात यश येईल अशी त्यांना आशा वाटत होती. म्हणून काँग्रेसच्या पुढाऱ्यांशी वाटाघाटी करण्यास त्यांचा विरोध होता. गांधी व काँग्रेसचे नेतृत्व तुरुंगात कुजत पडले तर ते त्यांना हवेच होते. १९३३ च्या आरंभी व्हाइसरॉय भारतमंत्र्यांना लिहितात, 'The Congress is in a definitely less favourable position than in 1930, and has lost hold on the public.' [ "१९३० मध्ये होती त्यापेक्षा आता काँग्रेसची स्थिती निश्चितपणे कमी अनुकूल आहे, आणि जनमानसावरील तिची पकड ढिली आहे. ] जुलै १९३३ मध्ये व्हाइसरॉय लिहितात, 'The leadership of Gandhi is being openly attacked both from the left and from the right, as having led Congress after fourteen years of constant struggle to a position perilously near failure. There are profound differences in Congress ranks as to the policy to be pursued and a general sense of despondency.' [ "गांधींच्या नेतृत्वावर डाव्या आणि उजव्या ह्या दोन्ही बाजूंकडून उघड हल्ला करण्यात येत आहे. चवदा वर्षे सतत चाललेल्या लढ्यात काँग्रेसचे नेतृत्व करून तिला अपयशाच्या अगदी समीप नेऊन ठेवल्याचा आरोप त्यांच्यावर करण्यात येत आहे. काँग्रेसच्या अनुयायांत कोणते धोरण स्वीकारावे ह्याविषयी खोल मतभेद उद्भवले आहेत आणि सर्वसाधारण वातावरण निराशाग्रस्त आहे. ] पूर्ण स्वातंत्र्य संपादन करणे हे काँग्रेसचे ध्येय असून, काँग्रेसच्या हाती सत्ता गेल्यास ब्रिटिश हितसंबंधांना धोका उत्पन्न होईल; तेव्हा, काँग्रेसची ताकद वाढेल, लोकमानसात तिला प्रतिष्ठेचे स्थान प्राप्त होईल असे पाऊल न उचलण्याचा कटाक्ष बाळगला पाहिजे, याविषयी व्हाइसरॉय आग्रह धरीत असल्याचे आढळते.

'येरवडा करारा'नंतर तुरुंगात राहूनच अस्पृश्यतेच्या उच्चाटनार्थ देशव्यापी कार्याची उभारणी करण्याचे काम त्यांनी हाती घेतले. हे समाजसुधारणेचे कार्य करण्यासाठी आवश्यक त्या सोयीसवलती सरकारकडून मिळविण्यासाठीही गांधींना संघर्ष करावा लागला. अखेरीस सरकारने त्यांची मुदतपूर्व सुटका केली. अस्पृश्यतानिवारणाच्या कार्यास अडथळे उत्पन्न करण्यावरून चाललेल्या संघर्षामुळे सुटका झाली असल्याने गांधींना अद्यापिही औपचारिकतः चालू असलेल्या सत्याग्रहलढ्याविषयी काही निर्णय करणे प्राप्त होते. हरिजनसेवेचे कार्य करण्यासाठी त्यांनी आपण शिक्षेची मुदत संपेपर्यंत सविनय कायदेभंगाची कृती करणार नाही असे जाहीर केले. या आधीच काही महिने त्यांनी सार्वत्रिक व सामूहिक कायदेभंगाची चळवळ मागे घेऊन वेचक व्यक्तींपुरतीच चळवळ मर्यादित केली होती. त्यांच्या या निर्णयाने सविनय कायदेभंगाची चळवळ व्यवहारात तरी संपुष्टात आल्यातच जमा झाली. एप्रिल १९३४ मध्ये ती अधिकृतपणे मागे घेण्यात आली.

अस्पृश्यांना विभक्त मतदारसंघ देण्यावरून केलेल्या उपोषणापासून गांधींचे लक्ष एकप्रकारे निरुंद आशयाच्या राजकीय चळवळींवरून उडाल्यासारखे झाले होते. अस्पृश्यतेच्या उच्चाटनाचे कार्य हे गांधींच्या अर्थाने स्वराज्यसंपादनाचेच कार्य होते. किंबहुना, स्वराज्य खऱ्या अर्थाने प्राप्त होण्यासाठी

या प्रकारच्या विधायक कार्यांचेच त्यांच्या दृष्टीने खरे महत्त्व होते. पण त्यांचे हे म्हणणे काँग्रेस-मधील त्यांच्या बहुसंख्य सहकाऱ्यांना विक्षिप्तपणाचे द्योतकच वाटे. १८३१–३४ या काळातील गांधींच्या वेगवेगळ्या निर्णयांमुळे काँग्रेसमधील तरुण, जहाल पिढीलाच नव्हे तर त्यांच्या १५–२० वर्षांच्या जुन्या सहकाऱ्यांनाही त्यांच्या नेतृत्वाविषयी शंका उपस्थित झालेली आढळून येते. सुभाषचंद्र बोस व विठ्ठलभाई पटेल यांनी या सुमारास असे जाहीर केले की, ' एका नव्या तत्त्वाच्या व कार्यपद्धतीच्या आधारे काँग्रेस संघटनेची आमूलाग्र पुनर्घटना करण्यासाठी नव्या नेत्याची नितांत आवश्यकता आहे. ' १९३४ साली गांधींनी सविनय कायदे-भंगाचा लढा परत घेतल्यामुळे गांधींवरील इतक्या वर्षांची निष्ठा भंग पावल्याची अनुभूती आपणास झाली असे नेहरूंनी लिहिले. काँग्रेस व गांधी यांच्या-मध्ये परत एकदा दुरावा निर्माण झाला होता.

## काँग्रेसमधील अंतर्विरोध आणि गांधींची माघार

– १२ –

काँग्रेसमध्ये आता दोन प्रवाह मुख्य होते. एका गटाला १९३५ च्या कायद्याचा फायदा घेऊन प्रांतां-मध्ये सत्ता हस्तगत करण्यात रस होता. कारण, प्रांतांमधील द्विदल पद्धती रद्द करण्यात आली होती; प्रांतांमध्ये लोकनियुक्त प्रतिनिधींच्या हाती खऱ्या अर्थाने सत्ता असणार होती. दुसऱ्या गटाला पूर्ण स्वातंत्र्य हस्तगत होईतो लढा चालूच ठेवावयाचा होता. किंबहुना, अहिंसक मार्गाने व गांधींच्या पद्ध-तीने लढा चालविण्याने पडणारे निर्बंध झुगारून उग्र व प्रसंगी हिंसक, लढा देण्याकडे त्यांचा कल होता. १९३४ नंतरच्या काळात काँग्रेसच्या पोटात काँग्रेस समाजवादी पक्षाची स्थापना झाली, तसेच सुभाषचंद्र बोस यांचे जहाल नेतृत्व मान्य करणारा गट प्रभावी बनला. १९२९ साली लाहोर अधि-वेशनात केलेल्या घोषणेशी शंभर टक्के सुसंगत राहावयाचे तर, १९३५ च्या कायद्यानुसार अधि-कारग्रहण करण्याचा, किंबहुना निवडणुका लढ-विण्याचादेखील, विचार करणे योग्य ठरत नव्हते. पण वेगवेगळ्या क्षेत्रांमध्ये नवी रचनात्मक बांधणी करून गांधींच्या कल्पनेतील ' स्वराज्या'ची निर्मिती करण्यात फारच थोड्या काँग्रेसजनांना रस होता. १९२३ साली स्थापन झालेल्या स्वराज्य पक्षाच्या विचारसरणीचे काँग्रेसजन जास्त करून अनुयायी होते. येत्या निवडणुकांमध्ये काँग्रेसने आपल्या ताक-दीचे प्रदर्शन करावे, व विधिमंडळांमध्ये ब्रिटिश सत्ते-बरोबरचा आपला लढा चालू ठेवावा हा युक्तिवाद प्रभावी ठरला. १९२३ सालच्या घडामोडींची आठ-वण ठेवून गांधींनी कायदेकौन्सिल प्रवेशासंबंधीचा ठराव स्वतःच मांडला व या गटाचे समर्थनही केले.

वर्गसंघर्षवादी कम्युनिस्ट/मार्क्सिस्ट विचारप्रणा-लीच्या प्रभावाखाली आलेल्या तरुणवर्गाच्या मनात कौन्सिलांमध्ये प्रवेश करून अडवणुकीचे वा सत्ता-ग्रहणाचे राजकारण करू इच्छिणाऱ्यांविषयी तिर-स्काराची भावना उत्पन्न झाली असल्यास नवल नाही. देशातल्या किसानांना व शहरांमधील औद्यो-गिक वर्गांना संघटित करून, त्यांचे लढे उभे करून राजकीय स्वातंत्र्याच्या लढ्यालाच आर्थिक-सामा-जिक क्रांतीचेही परिमाण प्राप्त करून देण्यास हे तरुण उत्सुक होते. कायदेकौन्सिलांच्या राजकारणाला गांधींनी आपले आशीर्वाद दिल्यामुळे त्यांचा गांधींच्या नेतृत्वाविषयी भ्रमनिरास झाला. तरीपण काँग्रेस सोडून आपली वेगळी चळवळ वा पक्ष उभारण्याचे पाऊल न उचलण्याइतकी त्यांच्यापैकी अनेकांची काँग्रेसवरील व व्यक्तिशः गांधींवरील निष्ठा टिकून राहिली. काँग्रेस संघटनेवर आपले प्रभुत्व प्रस्थापित करावे यासाठी मात्र ते १९३५ ते १९३९ या काळात संघटनांतर्गत राजकारण करीत असल्याचे आढळते. गांधींची इच्छा नसतानाही दुसऱ्यांदा सुभाषचंद्र बोसांना अध्यक्ष म्हणून निवडून आणण्यामागे हाच उद्देश होता. याच काळात, हिंसा-अहिंसेचा विवेक करण्याचे बंधन झुगारून देऊन, शक्य झाल्यास सशस्त्र उठावाच्या मार्गानेदेखील यापुढील काळात स्वातंत्र्यलढा चालविण्याचा विचार प्रबळ होत होता. सुभाषचंद्र बोस यांची विचारप्रणाली ही मार्क्सवादी अर्थाने डावी असण्यापेक्षा हिंसक मार्गा-सही अनुकूल या अर्थाने उग्र व जहाल अधिक होती.

एका अर्थाने, काँग्रेसच्या इतिहासातील गांधी-पर्व हे १९३४ नंतर ओसरणीला लागले असे म्हणणे

चुकीचे होणार नाही. काँग्रेस संघटनेवर व काँग्रेसच्या नव्या–जुन्या नेत्यांवर गांधींचा वैयक्तिक प्रभाव टिकून राहिला. काँग्रेसचे ते सल्लागार व, काही प्रमाणात, सूत्रधार पण राहिले. तरीदेखील यापुढच्या काळात गांधींच्या सत्याग्रह विचारापासून काँग्रेसमधील दोन्ही प्रवाह दुरावलेलेच राहिले असे आढळते.

– १३ –

१९३६ च्या कायद्यानुसार झालेल्या निवडणुकांमध्ये सहा प्रांतांमध्ये काँग्रेसला बहुमत मिळाले. आसाम व वायव्य सरहद्द प्रांतात काँग्रेस सर्वांत मोठा पक्ष होता. निवडणुकांमधील या प्रचंड यशामुळे अधिकारग्रहण करण्याकडे काँग्रेसच्या पुढाऱ्यांचा कल झाला. असेही म्हणता येईल की, मतदारांनी इतक्या निःसंदिग्ध स्वरूपात आपला कौल दिल्यानंतर सत्ता ग्रहण करून घटनात्मक सुधारणांचा पुरेपूर लाभ लोकांच्या पदरात टाकण्याची जबाबदारी काँग्रेसवर येऊन पडत होती. गांधींनी 'हरिजन' मध्ये लिहिले, 'हिंदुस्थानला स्वराज्य मिळण्याच्या दृष्टीने गव्हर्नमेंट ऑफ इंडिया अॅक्ट (१९३५) पूर्णपणे असमाधानकारक आहे ही गोष्ट अगदी सर्वमान्य आहे. परंतु, एक अत्यंत मर्यादित व क्षीण का होईना, दंडुकेशाहीच्या जागी लोकमताचे राज्य स्थापन करण्याचा प्रयत्न म्हणूनही त्याच्याकडे पाहता येणे शक्य आहे. तीन कोटी स्त्री-पुरुष मतदार निर्माण करून त्यांच्या हाती व्यापक सत्ता देण्याच्या या क्रियेला त्याशिवाय दुसरे नाव देता येणार नाही...' निवडणुका लढविताना घेतलेल्या पावित्र्याशी जुळणारा हा युक्तिवाद नव्हता; निवडणुकीतील यशामुळे निर्माण झालेल्या नव्या परिस्थितीला सामोरे जाताना घेतलेली ही भूमिका होती.

काँग्रेस सत्ताग्रहण करणार आहेच तर काँग्रेसप्रणीत स्वराज्याच्या दिशेने वाटचाल घडवून आणण्यासाठी सत्तेचा उपयोग करण्यावर काँग्रेस मंत्रिमंडळांनी भर द्यावा, हाती आलेल्या सत्तेचा वापर करावा असा सल्ला गांधींनी दिला. गांधींच्या मते त्यांनी पुरस्कार केलेल्या अठरा कलमी रचनात्मक कार्यक्रमाची अमलबजावणी केल्यास हे उद्दिष्ट साध्य होणार होते. अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या ठरावात काँग्रेसजनांना आदेश देण्यात आला की, 'एकीकडे या नव्या घटनात्मक सुधारणांचा पोकळपणा उघड करून त्यांचा प्रतिवाद करण्याचे व दुसरीकडे रचनात्मक कार्यक्रमाची अमलबजावणी करण्याचे काँग्रेसचे दुहेरी धोरण त्यांनी पुढे चालविले पाहिजे.'

१९३५चा कायदा प्रांतांमध्ये लोकनियुक्त प्रतिनिधींच्या हाती बऱ्याच मोठ्या प्रमाणात सत्ता देणारा असला तरी ज्या अखिल भारतीय चौकटीत प्रांतांना ही सत्ता देण्यात आली होती ती चौकट हिंदू व मुसलमान समाजांचे पृथक् राष्ट्रीयत्व आणि संस्थानिकांचे फुटीरपण मान्य करणारी व जोपासणारी होती. हिंदुस्थानवरील आपली पकड घट्ट टिकून राहण्याच्या दृष्टीने, आणि काँग्रेसला शह देण्याच्या हेतूने जातीयवाद व फुटीरपणा यांना बुद्ध्याच उठाव देणारा कायदा केला गेला होता. या कालखंडाचे अभ्यासक आर. जे. मूर. यांनी त्यांच्या 'एस्केप फ्रॉम एम्पायर' या ग्रंथात म्हटले आहे, "It is certain, however, that in their attempt to attract collaborators who would offset Gandhi's non–cooperators, the artificers of the 1935 constitution introduced devices that inhibited central responsibility and fostered disunity. ...the Muslims and the princes were each guaranteed a third of the seats in the lower house of the legislature. By lending such constitutional authority to the Muslims as a separate community and the princes as a separate estate, the Act discouraged the emergence of unity based on a sense of common nationality. The 1935 Act gave the Muslims the best of both worlds– the minorities retained weightage, while in Bengal (where the European community held 10 per cent of the seats) the Muslims received 48·6 per cent and in the Punjab a virtual statutory majority of 51·4 per cent. The Muslim's predominance

in north-western and eastern India was thus emphasized, while in other provinces they were given an importance disproportionate to their numbers. There was inducement for Muslims to organise on communal lines for political ends." [ "गांधीजींच्या असहकारवादी अनुयायांना शह देतील असे साथीदार मिळवण्याच्या प्रयत्नांत, १९३५ ची घटना बनविणाऱ्यांनी, केंद्रीय जबाबदारीला प्रतिबंध करतील आणि बेबनाव वृद्धिंगत करतील अशा क्लृप्त्या तिच्यात प्रविष्ट केल्या होत्या हे निश्चित आहे. खालच्या कायदेमंडळात मुसलमान आणि संस्थानिक ह्या प्रत्येकाला एकतृतीयांश जागांची हमी देण्यात आली होती... मुसलमानांना वेगळी जमात म्हणून हा घटनात्मक अधिकार देण्याने आणि संस्थानिकांना एक वेगळा घटनात्मक दर्जा (इस्टेट) देण्याने समान राष्ट्रीयत्वाच्या जाणिवेवर आधारलेल्या ऐक्यभावनेचा उद्‌भव होण्यात ह्या कायद्याने अडथळा निर्माण केला होता... १९३५ च्या कायद्याने मुसलमानांचा दुहेरी लाभ करून दिला–अल्पसंख्याकांना पूर्वी देण्यात आलेल्या, संख्येच्या प्रमाणाहून अधिक असलेल्या जागा कायम राखण्यात आल्या, तर बंगालमध्ये (जेथे युरोपियन जमातीला १० टक्के जागा होत्या ) मुसलमानांना ४८·६ टक्के जागा देण्यात आल्या आणि पंजाबमध्ये ५१·४ टक्के जागा देऊन त्यांची बहुसंख्या राहील अशी घटनात्मक हमी त्यांना देण्यात आली. अशा रीतीने भारताच्या वायव्येकडील व पूर्वेकडील भागांत मुसलमानांचे वर्चस्व राहील ह्यावर भर देण्यात आला होता तर इतर प्रांतांत त्यांच्या संख्येच्या प्रमाणापलीकडे त्यांना महत्त्व देण्यात आले होते. राजकीय उद्दिष्टांसाठी जातीय पायावर संघटित होण्याला मुसलमानांना अशा रीतीने प्रलोभन देण्यात आले होते.]

१९३७ ते १९३९ या काळात काँग्रेसने आठ प्रांतांमध्ये केलेल्या सत्ताग्रहणाचा जीनांनी अतिशय कुशलतेने व पद्धतशीरपणे नकारात्मक वापर करून मुस्लिम लीगचे प्रभुत्व अखिल भारतीय राजकारणाच्या पातळीवर प्रस्थापित केले. यामध्ये त्यांना १९३५ च्या कायद्याचा आणि ब्रिटिश सनदी नोकरशाहीच्या काँग्रेसविरोधी पूर्वग्रहांचा पुष्कळ उपयोग झाला. निर्मलकुमार बोसांनी लिहिले आहे, 'मुसलमानांचे हितसंबंध वेगळे आहेत आणि त्यांची जपणूक करण्यासाठी त्यांना विशेष संरक्षण देण्याची गरज आहे यावर अनेक मुस्लिम पुढाऱ्यांनी व संघटनांनी भर दिला होता तरी देशातील इतर पक्षांशी व जमातींशी समझोता करण्याची गरज आजपर्यंत सर्वांनीच मानली होती... त्यांपैकी कोणीही मुसलमानांचे एक वेगळे राष्ट्र संघटित करावे असे म्हटले नव्हते. काँग्रेसने सत्ताग्रहण केल्यावर ही नवीच मागणी पुढे आली. १९३७–३९ या काळातील काँग्रेस राजवटीच्या विरोधातून मुस्लिम राष्ट्रवादाचा उदय झाला असे म्हणणे अतिसरळ वाटले तरी त्यात बरेच तथ्य आहे.' काँग्रेसची मंत्रिमंडळे सामाजिक व आर्थिक सुधारणेच्या व पुनर्रचनेच्या दृष्टीने ज्या ज्या गोष्टी करीत होती त्या सर्वांना 'हिंदू राज्य' असे संबोधून मुसलमानांमध्ये भविष्याविषयी भयगंड उत्पन्न करणे, मुसलमानांचा छळ होत आहे असा पद्धतशीरपणे प्रचार करणे, या स्वरूपाचे डावपेच जीनांनी वापरले.

मुस्लिम समाज व संस्थानिक यांच्या रूपाने ब्रिटिशांनी स्वातंत्र्यसंपादनाच्या मार्गात मोठा अडसर उत्पन्न करून ठेवला आहे असे काँग्रेसच्या पुढाऱ्यांच्या ध्यानात आले. संस्थानांमधील प्रजेच्या संघटना उभारून संस्थानांतर्गत लोकप्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धतीचा अंगिकार करण्याच्या दिशेने दबाव निर्माण करण्याची नीती काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी अवलंबिली. संस्थानांमधून जनतेचे प्रतिनिधी जर केंद्रीय विधिमंडळावर निवडून आले तर समर्थ एकराष्ट्रीयत्वाच्या निर्मितीत त्यांचे सहकार्य मिळेल अशी त्यांना खात्री वाटत होती. संस्थानिकांना निष्प्रभ करण्याचा तो एक परिणामकारक मार्ग होता. मुस्लिम समाजाशी समझोता ही मात्र अवघड बाब होती. १९१६ च्या करारामुळे मुसलमान समाजाचे वेगळेपण, त्याला विशेष स्थान व वागणूक देण्याची गरज, विभक्त मतदारसंघ या गोष्टी स्वीकारल्या गेल्या होत्या; इतकेच नाही तर, अखिल भारतीय पातळीवर मुस्लिम लीग ही मुसलमान समाजाचे प्रतिनिधित्व करणारी संघटना असल्याची मान्यताही काँग्रेसने दिलेली होती. या पूर्वेतिहासा-

मुळे काँग्रेसची पंचाईत झाली व जीनांचा फायदा झाला.

काँग्रेस मंत्रिमंडळांना काँग्रेसमधीलच डाव्या व उग्र जहाल गटांनी उभारलेल्या किसान व कामगार लढ्यांना तोंड द्यावे लागले. ज्या मागण्या घेऊन हे लढे वा संप झाले त्या मागण्या न्याय्य असल्या तरी अहिंसेच्या मार्गाने लढा चालविण्यास बांधील नसलेल्या या लढ्यांमधून उपस्थित होणाऱ्या 'कायदा व सुव्यवस्थे'च्या प्रश्नाला सरकारांना तोंड द्यावे लागले. पोलीस व लष्कर यांच्या आधारेच काँग्रेस शासनांनी अनेक ठिकाणी हा प्रश्न सोडविल्याने राष्ट्रीय चळवळीत फुटीरपणा व दुबळेपणा उत्पन्न झाला. काँग्रेसमध्ये वेगवेगळ्या वर्गांचे, जातिजमातींचे लोक एका मर्यादित स्वरूपाच्या राजकीय उद्दिष्टासाठी एकत्र आलेले होते. वर्गकलहात्मक मुद्दे घेऊन आमूलाग्र परिवर्तनवादी भूमिका राबविणे काँग्रेस मंत्रिमंडळांना शक्य झाले नसल्यास नवल नाही. राजकीय स्वातंत्र्याचा लढा समर्थपणे देता येण्यासाठी समाजातील वरिष्ठवर्गीयांसह एकसंध संघटना टिकवून धरण्याची आवश्यकता संपलेली नव्हती. पण काँग्रेसचे व तिच्या नेत्यांचे प्रतिगामी स्वरूप उघड करून, ती आपल्या वर्चस्वाखाली आणणे या गोष्टीला जहाल व डाव्या मंडळींच्या दृष्टीने अग्रक्रम होता. काँग्रेसवरील गांधींचे प्रभुत्वही या गटास उखडून टाकावयाचे होते. काँग्रेस संघटना पूर्वीसारखी एकसंध राहिलेली नाही, असे उद्‌गार गांधींनी काढले. गांधींचा विरोध असतानाही १९३९ साली त्रिपुरा काँग्रेसच्या अध्यक्षपदी सुभाषचंद्र बोस यांची फेरनिवड झाल्याने काँग्रेसच्या अंतर्गत असलेले ताणतणाव शिगेला जाऊन पोचले. काँग्रेसचे नेतृत्व ब्रिटिशधार्जिणे बनले असल्याचा जाहीर आरोप सुभाषबाबूंनी केला होता. अशा परिस्थितीत गांधींना मानणाऱ्या काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी वर्किंग कमिटीवर बोस यांच्याबरोबर काम करावयाचे नाकारावे ही गोष्ट नवल नव्हती. सुभाषबाबूंनी स्वतःच्या विश्वासातील व स्वतःप्रमाणेच विचार असलेल्या सहकाऱ्यांना घेऊन एकसंध वर्किंग कमिटी बनवावी अशी भूमिका गांधींनी घेतली. काँग्रेसच्या अध्यक्षपदाची निवडणूक जिंकणे शक्य असले तरी गांधींना धाब्यावर बसवून देशव्यापी संघटना चालविणे अशक्य असल्याचे भान सुभाषबाबूंनाही होते. अखेरीस त्यांनी राजीनामा दिला, व काँग्रेसअंतर्गत फॉरवर्ड ब्लॉकची स्थापना केली.

काँग्रेसने सत्ताग्रहण केल्याचा आणखी एक मोठा अनिष्ट परिणाम झाला. मंत्रिपदांसाठी, पदांसाठी, स्पर्धा सुरू झाली. नोकऱ्याचाकऱ्यांसाठी वशिलेबाजी सुरू झाली. काँग्रेसमधील अंतर्गत निवडणुकांमध्येही खोटेपणा, भ्रष्टाचार शिरला. बोगस सभासदांची नोंदणी हा डोकेदुखीचा मुद्दा झाला. काँग्रेसजनांचे खरे काम खेड्यांमध्ये जाऊन वेगवेगळ्या क्षेत्रांत रचनात्मक कार्यांची उभारणी करण्याचे आहे हें विसरले गेले. गटबाजी, सत्तास्पर्धा आणि दबावाचे राजकारण यांना ऊत आलेला पाहून गांधींनी लिहिले, 'I would go the length of giving the whole Congress organisation a decent burial rather than put up with the corruption that is rampant.' ["आज जो भ्रष्टाचार बोकाळला आहे तो सहन करण्यापेक्षा सबंध काँग्रेस संघटणेला विधियुक्त मूठमाती द्यायला मी कमी करणार नाही."]

बाकी, राज्यकारभार करण्याइतकी परिपक्वता व कार्यक्षमता काँग्रेस मंत्रिमंडळांनी जरूर दाखविली, असे म्हणावयास हरकत नाही. सत्तावीस महिन्यांची त्यांची कारकीर्द ब्रिटिश राज्यकर्त्यांना सतत अडचणीत आणणारी ठरली नाही. प्रा. कूपलंड यांचा अभिप्राय असा की, 'Taken as a whole the record of its ministers was one in which the Congress could take reasonable pride. Its leaders had shown that they could out as well as talk, administer as well as agitate.' [ "एकंदरीत पाहता काँग्रेसच्या मंत्र्यांच्या कारकीर्दीविषयी काँग्रेसने रास्त अभिमान बाळगावा अशी ती होती. आपण बोलू शकतो त्याप्रमाणे करू शकतो, चळवळ करतो त्याप्रमाणे कारभारही करू शकतो हे तिच्या नेत्यांनी दाखवून दिले होते." ] या संदर्भात बलराम नंदा यांचे मतही विचारात घेण्यासारखे आहे. ते म्हणतात, 'In the spring of 1939, however, a rupture between the Congress

and the Government appeared by no means inevitable.' [" १९३९ च्या प्रारंभी काँग्रेस आणि सरकार ह्यांच्यामधील बेबनाव आविर्भूत झाला. हा अपरिहार्य होता असे नाही."] धोका असलाच तर, काँग्रेसमधील एका गटाला सत्तेचा त्याग करणे कठीण वाटेल हा होता.

– १४ –

दुसरे महायुद्ध सप्टेंबर १९३९ मध्ये सुरू झाले. व्हाइसरॉय लिनलिथगौ यांनी स्वत.च्या अधिकारात हिंदुस्थान युद्धात ब्रिटनच्या बाजूने सहभागी होत असल्याचे जाहीर केले. प्रांतिक मंत्रिमंडळे वा देशातील राजकीय पक्ष, जमाती यांचा कौल घेण्याची त्यांना गरज वाटलो नाही. काँग्रेस वर्किंग कमिटीने १४ सप्टेंबर १९३९ रोजी एका ठरावान्वयें, ब्रिटिश सरकारने युद्ध करण्यामागचे, साम्राज्यवाद व लोकशाही यांच्या संदर्भातले हेतू नि:संदिग्ध शब्दांत जाहीर करून हिंदुस्थानात ते सद्य:परिस्थितीत कसे लागू केले जातील हे स्पष्ट करावे, अशी मागणी केली. नाझी जर्मनीच्या आक्रमणाचा प्रतिकार करणाऱ्या शक्तींना आपला पाठिंबा काँग्रेसने जाहीर केला व युद्धकार्यात 'बरोबरी'च्या नात्याने वागविले जाण्याच्या शर्तीवर सहकार्य देऊ केले. बरोबरीच्या नात्याने वागविले जाईल असे ठाम आश्वासन सरकारकडून न मिळाल्याने काँग्रेसच्या सर्व मंत्रिमंडळांनी राजीनामे द्यावेत असा आदेश वर्किंग कमिटीने दिला.

स्वातंत्र्यसंपादनासाठी अहिंसेच्या मार्गाचा अवलंब करण्यास काँग्रेस बांधलेली होती. परचक्रापासून संरक्षण करण्याच्या बाबतीतही काँग्रेसने अहिंसेच्या मार्गावरच आपली दृढ निष्ठा ठेवावी असे गांधींचे काँग्रेसला सांगणे होते. हिटलरच्या जर्मनीने उपस्थित केलेल्या आव्हानाचा सामना अहिंसक मार्गांनी करण्याची शिफारस गांधी या काळात वेळोवेळी करीत होते. काँग्रेसमधील अन्य ज्येष्ठ पुढाऱ्यांची मात्र ही भूमिका नव्हती. १९४० साली ब्रिटनची स्थिती फार नाजूक झाली होती. एकाकीपणे लढत देण्याचा प्रसंग उभा राहिला होता, व हार होण्याची दाट शक्यता होती. काँग्रेसने एका ठरावान्वये ब्रिटनला युद्धकार्यात पूर्ण सहकार्य देऊ केले. युद्धसमाप्तीनंतर हिंदुस्थानला पूर्ण स्वातंत्र्य देण्याचे वचन जर ब्रिटिश सरकार देत असेल आणि केंद्रात हंगामी राष्ट्रीय सरकारची स्थापना करीत असेल तर काँग्रेस (हिंसक मार्गांचा अवलंब करूनही) देशाच्या संरक्षणात सहकार्य देण्यास तयार होती. येथे गांधी व काँग्रेस यांचे मार्ग वेगवेगळे झाले.

गांधींपासूनचे आपले अंतर स्पष्ट करताना काँग्रेसच्या नेतृत्वाने म्हटले की, काँग्रेस हा एक राजकीय पक्ष आहे. जगात अहिंसा रुजविणे वा अहिंसेच्या मार्गानेच शांतता प्रस्थापित करणे वा युद्धाचा प्रतिकार करणे हे तिचे जीवितकार्य नाही. राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करणे हा तिचा उद्देश आहे. कोणत्याही परिस्थितीत अहिंसेची कास आपण सोडणार नाही अशी बांधिलकी काँग्रेस पत्करू शकत नाही. हिंसेचा अवलंब करून मिळविलेले स्वराज्य हे खरे स्वराज्य असणार नाही, असा मुद्दा गांधींनी उपस्थित केला. पण तो काँग्रेसच्या नेत्यांना मान्य झाला नाही. ब्रिटिश सरकार हिंदी जनतेला वसाहतीच्या स्वराज्याचे अधिकार तावडतोब द्यायला तयार नाही म्हणून त्याच्याशी असहकार, ते अधिकार जर मिळत असतील तर दोस्त राष्ट्रांच्या बाजूने महायुद्धात उतरण्याची काँग्रेसची पूर्ण तयारी, हीच काँग्रेसने भूमिका घेतली. वर्किंग कमिटीने आपल्या ठरावात म्हटले, 'the committee... have come to the conclusion that they are unable to go to the full length with Gandhiji but they recognise that he should be free to pursue his great ideal.' [" (ह्या बाबतीत) समितीचे गांधीजींशी मतैक्य नाही. परंतु आपल्या महान ध्येयाचा पाठपुरावा करण्याचे स्वातंत्र्य त्यांना असले पाहिजे हे ती मान्य करते."]

व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाचा विस्तार करून त्यावर काही हिंदी व्यक्तींची नेमणूक करणे, एक 'युद्ध सल्लागार मंडळ' प्रस्थापित करणे यांसारख्या मामुली गोष्टी केल्या गेल्या. काँग्रेस ही राष्ट्राचे प्रतिनिधित्व करणारी संघटना/चळवळ नाही हा आपला निवाडा पुन्हा एकवार ठसविण्याच्या दृष्टीने व्हाइसरॉयांनी आपल्या ८ ऑगस्ट १९४० च्या निवेदनात खास अशी घोषणा केली की, '(the British Government) could not

अनुक्रमणिका

contemptate transfer of their present responsibilities for the peace and welfare of India to any system of government whose authority is directly denied by large and powerful elements in India's national life. Nor could they be parties to the coercion of such elements to such a government.' [" भारताच्या शांतता आणि कल्याणाच्या दृष्टीने पाहता, जिचा अधिकार भारताच्या राष्ट्रीय जीवनातील मोठे आणि बलिष्ठ घटक साक्षात् अमान्य करतील अशा कोणत्याही शासनव्यवस्थेकडे आपल्या सध्याच्या जबाबदाऱ्या संक्रांत करणे (ब्रिटिश सरकारला) शक्य नाही. आणि बळजबरीने अशा घटकांना अशी शासनव्यवस्था स्वीकारायला भाग पाडण्यातही ते प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीत्या साथ देणार नाहीत."] एका अर्थी, कोणत्याही परिस्थितीत काँग्रेसच्या हाती आपण सत्ता सोपविणार नाही असेच ब्रिटिश सरकार जाहीर करीत होते.

नाझी जर्मनीने इतक्या थोडया अवधीत सारा युरोप पादाक्रांत केला की इंग्लंडचीही तीच वाट लागेल अशी दाट शक्यता निर्माण झाली. या परिस्थितीचा फायदा उठवून सार्वत्रिक उठाव घडवून आणावा आणि स्वातंत्र्य हस्तगत करण्याचा प्रयत्न करावा असे काँग्रेसमधील डाव्या व जहाल गटाचे म्हणणे होते. सुभाषचंद्र बोस यात पुढे होते. काँग्रेस लढा पुकारील ही शक्यता ध्यानात घेऊन सरकारने आपल्या हाती अनेक प्रकारचे जादा अधिकार घेणारे वटहुकूम जारी केले. भाषणस्वातंत्र्य, वृत्तपत्रस्वातंत्र्य यांचा संकोच करण्यात आला. काँग्रेसने कायदेभंगाची चळवळ सुरू केलीच तर ती चिरडून टाकण्याची जय्यत तयारी करण्यात आली. पण या महायुद्धात इंग्लंडची बाजू नैतिक आहे, नाझी जर्मनीचाच पराजय झाला पाहिजे असे मानणारा काँग्रेसमध्ये मोठा पक्ष होता. गांधी व नेहरू या पक्षातच होते. ब्रिटिश राजवटीने, बरोबरीच्या नात्याने सहभागी करून घेण्यास नकार देऊन हिंदी जनतेचा जो अधिक्षेप केला होता त्याचा निषेध करण्याचीही निकड काँग्रेसच्या पुढाऱ्यांना भासत होती. यातून मार्ग काढण्याचे काम काँग्रेसने गांधींवर सोपवले.

भाषणस्वातंत्र्यावरील बंदीहुकूम मोडून व्यक्तिगत रीत्या कायदेभंग करून हा निषेध नोंदवावा व लोकांमध्ये चैतन्य निर्माण करावे असा पर्याय गांधींनी काढला. सार्वत्रिक व सामूहिक कायदेभंगाची चळवळ हाती न घेण्याची आणखीही काही कारणे गांधींनी स्पष्ट केलेली आढळतात. अहिंसेवर काँग्रेसजनांची निष्ठा पक्की नाही हे त्यांच्या लक्षात आलेले होते. अशा परिस्थितीत चळवळ ही चटकन हिंसक वळण घेण्याची शक्यता होती. हिंदु-मुस्लिम ऐक्य आणखीच दुरावले होते. काँग्रेसची भूमिका राष्ट्रीय बाण्याची असली तरी, स्थूलमानाने, मुसलमान समाज काँग्रेसबाहेर होता, आणि या समाजात फुटीर राष्ट्रवाद रुजत चालला होता, ही वस्तुस्थिती त्यांना दिसत होती. तिसरी गोष्ट, सत्याग्रहशास्त्राप्रमाणे, प्रतिपक्षीय अडचणीत सापडला असता तो कोंडीत सापडल्याचा फायदा न घेण्याचे पथ्य सत्याग्रहीने सांभाळायचे होते. गांधींनी म्हटले, 'There is neither warrant nor atmosphere for mass action. That would be naked embarrassment and a betrayal of non-violence. What is more, it can never lead to independence. Mass action without communal unity is an invitation to civil war.' [" जनलढा (मास-ॲक्शन) सुरू करायला समर्थक कारण नाही किंवा अनुकूल वातावरण नाही. त्यामुळे (सरकारला) उघडपणे पेचात आणल्यासारखे होईल आणि तो अहिंसेचा द्रोह ठरेल. याहून पुढचे असे की त्यामुळे कधीही स्वातंत्र्य मिळणार नाही. जातीय ऐक्याशिवाय जनलढा सुरू करणे म्हणजे यादवी युद्धाला आमंत्रण देणे होय."] युद्धकार्यात अडथळा आणण्याचा उद्देश मनात बाळगून सत्याग्रह चालविलेला नाही अशीही स्पष्टता गांधींनी केली.

ही वेळ सविनय कायदेभंगाच्या सार्वत्रिक लढ्याची नसून काँग्रेसजनांची (अठरा-कलमी) रचनात्मक कार्यक्रमाला वाहून घेण्याची, स्वराज्याची बांधणी करण्याची आहे, यावर गांधींनी भर दिला. पण काँग्रेसच्या पुढाऱ्यांचे लक्ष युद्धपरिस्थितीचा फायदा

अनुक्रमणिका

घेऊन सत्तेत सहभाग मिळविण्यावर, राजकीय स्वातंत्र्याच्या दिशेने एकदोन ठोस पावले पुढे टाकण्यावरच केंद्रित झालेले होते.

– १५ –

डिसेंबर १९४१ मध्ये जपानने पर्ल हार्बरवर हल्ला करून दुसऱ्या महायुद्धात नाझी जर्मनीच्या बाजूनें पदार्पण केले आणि पाहता पाहता युद्ध भारताच्या उंबरठ्यावर येऊन ठेपले. सिंगापूरचा पाडाव झाला, ब्रह्मदेश जपान्यांनी घेतला. हिंदी जनतेचे मनःपूर्वक सहकार्य नसेल तर जपानी आक्रमणापुढे हिंदुस्थानचा बचाव करणे कठीण जाईल ही गोष्ट ब्रिटिशांच्या ध्यानात आली. हिंदी सैन्य किती एकनिष्ठ राहील याविषयीही शंका उपस्थित झाली असणार. त्यामुळे तातडीने काही हालचाल केली पाहिजे हे जाणून ब्रिटिश मंत्रिमंडळाने क्रिप्स यांना वाटाघाटींसाठी भारतात पाठविले. त्यांनी सोबत आणलेल्या प्रस्तावास क्रिप्स योजना म्हणून ओळखले जाते. हिंदी जनतेचा स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य करीत असतानाच या प्रस्तावात अशा बाबी सामील केलेल्या होत्या की ज्यांमुळे मुस्लिम समाज व संस्थानिक यांना एकात्म भारताचे घटक म्हणून न राहण्याची मोकळीक मिळणार होती. किंबहुना, काँग्रेस, मुस्लिम लीग व संस्थाने यांच्यात देशाचे वाटप करून देण्याचीच ही योजना होती. आपापसांत स्पर्धा व संघर्ष असलेल्या या तीन तुकड्यांच्या 'भारतीय संघराज्या'वर ब्रिटिश राष्ट्राला आपले प्रभुत्व कायम टिकविता येईल व आपले स्वार्थी हितसंबंध राखता येतील असा मतलबी ब्रिटिश राजकारणी मंडळीचा होरा होता. युद्ध संपल्यावर कोणत्या रीतीचा अंगिकार करून हिंदुस्थानला स्वातंत्र्य दिले जावे याविषयीचे मतभेदाचे मुद्दे बाजूला ठेवून, युद्धकाळात ताबडतोबीने सहकार्य देता येण्याच्या दृष्टीने व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाची फेररचना करून त्याला 'राष्ट्रीय सरकारा'चे स्वरूप द्यावे व मंत्रिमंडळाला सामान्यतः असतात ते अधिकार असावेत अशी काँग्रेसची मागणी होती. युद्ध संपेतोवर कोणत्याही प्रकारचा घटनात्मक बदल करण्यास ब्रिटिश सरकारची तयारी नव्हती. क्रिप्स यांची शिष्टाई असफल ठरण्याचे खरे कारण हे होते. आर. जे. मूर लिहितात, 'His (Cripps's) problem was to persuade Congress to accept a share of executive responsibility for the defence of India without a commensurate transfer of real power. Much depended upon the cooperativeness of the Viceroy, and Linlithgow insisted with excessive literalness upon his supremacy over his Council.' ["त्यांची (क्रिप्स यांची) समस्या अशी होती : भारताच्या संरक्षणासाठी काँग्रेसने शासकीय जबाबदारीतील आपला हिस्सा उचलायला त्यांना काँग्रेसचे मन वळवायचे होते; पण ते, त्या प्रमाणात खरीखुरी सत्ता संक्रांत न करता. व्हाइसरॉयच्या सहकार्यावर बरेच काही अवलंबून होते; पण आपल्या कार्यकारी मंडळावर आपले वर्चस्व असले पाहिजे (ह्या १९३५ च्या कायद्याच्या तरतुदीचा) शब्दशः अर्थ लावला पाहिजे असा अतिरेकी आग्रह लिन्लिथगो ह्यांनी धरला."] पंतप्रधान चर्चिल यांचा व्हाइसरॉयना पाठिंबा होता. मूर यांचा निवाडा असा की, 'Cripps was undermined by colleagues who did not want to bring the raj to an early end.' ["क्रिप्स यांच्या ज्या सहकाऱ्यांना ब्रिटिश राजवट लवकर संपुष्टात आणायची नव्हती त्यांनी क्रिप्स यांना चाट दिली."]

जपानचे आक्रमण झाले तर त्या आक्रमणाचा प्रतिकार प्राणपणाने ब्रिटन करीलच याची खात्री नव्हती. युद्धनीतीचा भाग म्हणून भारताच्या काही भागामधून सैन्य काढून घेण्याच्या, प्रदेश बेचिराख करून शत्रूच्या मार्गात अडथळे उत्पन्न करण्याच्या, आणि त्या प्रदेशामधील लोकांना वाऱ्यावर सोडून देण्याच्या योजना सरकारने तयार ठेवल्या असल्याची वार्ता गांधींपर्यंत येऊन पोचली होती. ब्रिटनला आपल्या साम्राज्याची, स्वतःच्या अस्तित्वाची फिकिर होती; सर्वसामान्य जनतेचा बचाव करण्याची फिकिर नव्हती. क्रिप्सशिष्टाई असफल झाल्याने गांधी अतिशय चिंतित झाले. जपानी आक्रमणाचा म्हणावा असा कोणताही प्रतिकार आग्नेय आशियातील परतंत्र जनतेने केला नव्हता. याची पुनरावृत्ती भारतात व्हावयाची नसेल तर विनाविलंब लोकांनी मनोमन स्वतंत्रता अनुभवली पाहिजे

तरच त्यांच्यात प्रतिकारक्षमता उत्पन्न होईल अशा निष्कर्षावर गांधी आले. प्रजेचे संरक्षण करण्याची क्षमता व तयारी नाही तर लोकांच्या हाती राज्याची सूत्रे देऊन इंग्रजांनी भारतामधून पद्धतशीरपणे पाय काढून घ्यावा, जपानी आक्रमणाचा मुकाबला करण्याचे काम भारतीयांना करू द्यावे अशी मागणी त्यांनी केली. हिंदू-मुस्लिम ऐक्याची गरज गांधींना माहीत होती, पण त्यांना असेही दिसत होते की ब्रिटिशांच्या पाठिंब्यामुळे हिंदु-मुसलमानांमधले अंतर कमी होण्याऐवजी वाढतच चालले होते. हा बागुलबोवा पुढे करून आपली सत्ता टिकविण्याचा खेळ ब्रिटिश खेळत आहेत, ही गोष्ट त्यांच्या ध्यानात आली. समकालीन कागदपत्रांच्या अभ्यासावरून या निष्कर्षास अनेक प्रकारे पुष्टी मिळते हे आज आपणास माहीत आहे. दुसऱ्या महायुद्धात दोस्त राष्ट्रांचा कैवार गांधींनी १९३९ ते १९४२ या कालखंडात घेतला होता. पण ब्रिटिशांचा नादानपणा ध्यानात आल्यामुळे त्यांचा विचार बदलला. असे असले तरी, युद्ध प्रयत्नांमध्ये कोणतीही खीळ पडू नये यासाठी स्वतंत्र भारत आवश्यक तो करार दोस्त राष्ट्रांशी प्रथमतः करील ही गोष्टही त्यांनी स्पष्ट केली. १४ जुलै १९४२ रोजी वर्किंग कमिटीने केलेला ठराव गांधींच्या मनातील ही सारी घालमेल चांगल्या प्रकारे व्यक्त करतो. वर्किंग कमिटीचा हा ठराव युद्धप्रयत्नांच्या विरोधात नसून, स्वतंत्रतेच्या भूमिकेमधून या प्रयत्नांमध्ये स्वतःची शक्ती लावण्याची काँग्रेसची तयारी व इच्छा प्रकट करणारा होता.

पण क्रिप्स शिष्टाईच्या अपयशाचे खापर ब्रिटिश राजकारणी मंडळींनी काँग्रेसच्या माथी फोडले होते. आर. जे. मूर यांनी म्हटल्याप्रमाणे, 'The mission's failure left Congress without a friend among British statesmen.' [मिशनच्या अपयशानंतर ब्रिटिश राजकारण्यांत काँग्रेसला मित्र कुणी उरला नाही.] काँग्रेसच्या ठरावाची सरकारने दखल घेतली नाही. काँग्रेसचे सहकार्य नसले तरी हिंदुस्थानातील इतर अनेक गटांचे, पक्षांचे व जमातींचे सहकार्य सरकारला मिळालेले होते. काँग्रेसचे सहकार्य घ्यावे यासाठी प्रयत्नशील असलेली मजूरपक्षीय नेतेमंडळीही (क्रिप्स, अॅटली, इ.) काँग्रेसद्वेष्टी बनल्यामुळे ब्रिटिश सनदी नोकरशाही व कॉन्झर्व्हेटिव्ह राजकारणी यांचे हात बळकट झाले. काँग्रेस चळवळ करणार असे नक्की झाल्याबरोबर काँग्रेसविरूद्ध युद्ध पुकारून तिचा निःपात करण्याची जय्यत तयारी हिंदुस्थान सरकारने १९४० सालीच केली होती.

९ ऑगस्ट १९४२ रोजी देशभर काँग्रेसच्या नेत्यांची धरपकड झाल्यावर जागोजाग लोकांनी उठाव केला. अहिंसेवर निष्ठा नसलेला एक प्रवाह काँग्रेसमध्ये या वेळी पुरेसा बलिष्ठ होता हे लक्षात घेतले तर 'भारत छोडो' चळवळीने भूमिगत सशस्त्र बंडखोरीचे वळण चटकन घेतले या गोष्टीचे नवल वाटत नाही. गांधी चळवळ करणार असल्याचे स्पष्ट झाल्यावर समाजवादी व क्रांतिवादी गटांनी भूमिगत चळवळीची काही पूर्वतयारीही केली असली पाहिजे हे उघड आहे. 'भारत छोडो' चळवळ काँग्रेसजनांनी गांधींच्या तसेच वरिष्ठ काँग्रेस नेतृत्वाच्या अभावी व त्यांच्या अपरोक्ष आपल्या कुवतीप्रमाणे व कलानुसार चालविली. ती चिरडून टाकताना सरकारने कोणतीही दयामाया वा सौजन्य दाखविले नाही. ही वस्तुस्थिती लक्षात घेतली तर काही महिन्यांच्या अवधीत सरकारने या चळवळीला आटोक्यात आणले, हे आव्हान पचविले यात आश्चर्य वाटण्याजोगे काही नाही. हिंसेचा अवलंब करून चालविलेल्या या चळवळीतही १९१९ पासून गांधींनी दिलेली शिकवणूक लाखोंनी आत्मसात केल्याच्या काही खुणा मिळतात. १९४२ च्या उठावामध्ये गोऱ्या मंडळींचे खून पडल्याच्या घटना झाल्या नाहीत. चौरीचौऱ्यासारख्या, जमावाने निःशस्त्र व असहाय्य अवस्थेतील पोलिसांना जाळण्याच्या घटनाही घडल्या नाहीत. स्थूलमानाने 'जनतेची हिंसा केवळ सरकारी मालमत्तेची मोडतोड करण्याइतकीच मर्यादित होती.' 'छोडो भारत' चळवळीचे मूल्यांकन करताना निर्मलकुमार बोसांनी लिहिले आहे, 'आंदोलन सुरू होण्यापूर्वी लोकांच्या मनात असलेली असहायता किंवा जपानच्या विजयाबद्दल वाटणारी छुपी आदराची भावना समूळ नष्ट झाली. लौकिक अर्थाने ही चळवळ अयशस्वी झाली हे खरे असेलही, पण लोकांचे नीतिधैर्य परत आले. इतकेच नव्हे तर ते वाढलेही.'

अनुक्रमणिका

तुरुंगातून सुटल्यावर १९४४ साली गांधींनी चळवळीविषयी आपला अभिप्राय दिला. त्या आधी तुरुंगातून त्यांनी व्हाइसरॉयांशी पत्रव्यवहार केला होता. सरकारच्या निर्घृण हिंसाचाराचे खंडन केले होते, व सरकारने कॉंग्रेसच्या नेत्यांवर केलेले आरोपही परतवून लावले होते. बलराम नंदांनी गांधींचा अभिप्राय पुढील शब्दांत व्यक्त केला आहे 'There was, he said, something to be said for the fact that the people had not remained supine under the blows of the Government, but it distressed him to find that those who professed to follow him should have forgotten his fundamental principle of non-violence.' [ते म्हणाले की, सरकारने केलेल्या आघातांनंतरही लोक सुस्त राहिले नाहीत ह्या गोष्टीलाही काही महत्त्व आहे; पण जे स्वतःला माझे अनुयायी मानतात त्यांना माझ्या अहिंसेच्या मूलभूत तत्त्वाचा विसर पडला हे पाहून मला दुःख झाले.] १९४२ च्या आंदोलनात जी हिंसक कृत्ये केली गेली त्यांची मीमांसाही उद्बोधक आहे. त्यांनी लिहिले, 'People committed the mistake of thinking that all that did not involve killing was non-violence. Sometimes killing is the cleanest part of violence. If you kill the mischief maker outright there is an end of it so far as he is concerned. But harassment is worse. It did not put out mischief. On the contrary it brought mischief on our heads. The authorities became vindictive. Perhaps you will say that they would have been vindictive anyhow; but that is not what we should desire or aim at. It does not pay us to let them go into panic. In August 1942, the authorities became panicky. We gave them that excuse.' [ "ज्या ज्या कृत्यामुळे कुणाला ठार मारले जात नाही असे कोणतेही कृत्य अहिंसेत बसते असे मानण्याची चूक लोकांनी केली. कधीकधी ठार मारण्याचे कृत्य हा हिंसेचा सर्वात स्वच्छ भाग असतो. उपद्रवी माणसाला तुम्ही सरळ ठार मारले तर त्याच्या दृष्टीने पाहता त्या प्रकरणाचा समूळ अंतच झालेला असतो. पण एखाद्या माणसाला सतावत राहणे हे त्याहून वाईट असते. त्याने आपल्याला होणारा उपद्रव संपुष्टात येत नाही. उलट, त्यायोगे आपण आपल्यावर उपद्रव ओढवून घेतला. अधिकारीवर्गाला सूड घेण्याची इच्छा झाली. तुम्ही कदाचित असे म्हणाल की, कोणत्याही परिस्थितीत ते सूड उगवायला प्रवृत्त झालेच असते. पण आपली तशी इच्छा असता कामा नये किंवा ते आपले साध्य असता कामा नये. ते भीतीने हवालदिल झाले तर त्यात आपला काही फायदा नाही. १९४२ साली अधिकारीवर्ग हवालदिल झाला होता. आपण त्यांना सबब पुरविली." ]

तुरुंगातून गांधींची सुटका झाल्यावेळी महायुद्धाचा रागरंग पार बदललेला होता. दोस्त राष्ट्रांनी जर्मनी-जपान-इटली या राष्ट्रांची आक्रमक चढाई थोपवून धरण्यात यश मिळविले होते. चढाई करून युद्धात जय संपादन करण्याची त्यांची पूर्वतयारी झालेली होती. 'छोडो भारत' आंदोलन दडपून टाकलेल्या हिंदुस्थान सरकारला व ब्रिटिश मंत्रिमंडळाला कॉंग्रेसशी नव्याने बोलणी करण्याची कोणतीच गरज वाटत नव्हती. वाटाघाटी पुन्हा सुरू करण्याच्या दृष्टीने गांधींनी व्हाइसरॉयना लिहिलेल्या पत्राची दखल घेतली न जाणे स्वाभाविकच होते.

पण कॉंग्रेसने पुढाकार घेतला नसता, किंवा कॉंग्रेसच्या प्रयत्नांना प्रतिसाद द्यायचा नाही म्हटले असते तरी युद्धसमाप्तीनंतर राज्यघटना बनविण्याचा व स्वतंत्र होण्याचा हक्क हिंदी लोकांना दिला जाईल या अभिवचनाची उपेक्षा ब्रिटिश राजकारण्यांना करता आली नसती. हिंदुस्थानवर पूर्वीप्रमाणे आपण राज्य करू शकणार नाही; त्यासाठी लागणारे मनुष्य व साधनबळही आपणापाशी नाही व आवश्यक तो मनाचा घट्टपणाही राहिलेला नाही, याची जाणीव ब्रिटिश राज्यकर्त्यांना होती. महायुद्धाच्या काळात ब्रिटिश मंत्रिमंडळात मजूर पक्ष सहभागी होता. मजूर पक्षातील पुढाऱ्यांना हिंदी स्वातंत्र्यलढ्याविषयी अधिक सहानुभूती होती;



अनुक्रमणिका

आणि हिंदी जनतेला स्वयंनिर्णयाचा हक्क नाकारणे योग्य नाही असे त्यांचे मत होते. १९४५ सालच्या निवडणुकांमध्ये मजूर पक्षाला घसघशीत बहुमत मिळाले. त्यामुळे स्वराज्यसंपादनाच्या बाबतीत अनुकूल अशी परिस्थिती निर्माण झाली, ही गोष्ट नाकारण्याचे काही कारण नाही. त्याचवेळी, ब्रिटिश पार्लमेंटमध्ये वादंग उपस्थित करून, कॉंझर्व्हेटिव्ह पक्षाचा सरळ सरळ विरोध पत्करून हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याची गोष्ट मजूर पक्षाला करावयाची नव्हती. ब्रिटिश आर्थिक व व्यापारी हितसंबंध, आंतरराष्ट्रीय राजकीय व्यवस्थेतील ब्रिटनचे स्थान व हितसंबंध यांविषयी मजूरपक्षीय नेत्यांची भूमिका समाजवादी असण्यापेक्षा जास्त राष्ट्रवादी होती, हेदेखील ध्यानात ठेवले पाहिजे. यामुळे, युद्धाची विजयी अखेर दृष्टीच्या टप्प्यात आल्यावर, हिंदुस्थानवरील राज्य हिंदी राजकीय पक्षांना कसे हस्तांतरित करावयाचे याची चिंता ते करू लागले. साम्राज्यवादी प्रभुत्व सोडत असतानाच, मध्य आशिया ते आग्नेय आशिया या भौगोलिक क्षेत्रातील ब्रिटिश राजकीय, व्यापारी, आर्थिक व इतर हितसंबंध राखण्याच्या दृष्टीने, स्वतंत्र हिंदुस्थानवर आपले वर्चस्व वा अंकुश कायम ठेवता येईल असा तोडगा ब्रिटिश राजकारणी शोधू लागले.

– १६ –

## सत्तांतराच्या वाटाघाटी : गांधींच्या नेतृत्वाचा शेवट

काँग्रेसविषयी मनात उबग असला तरी काँग्रेस ही हिंदुस्थानातील सर्वांत प्रबळ अशी राजकीय संघटना आहे या वस्तुस्थितीशी त्यांना जुळवून घेणे भागच होते. एकट्या काँग्रेसच्या हाती हिंदुस्थानचे राज्य जाऊ नये; स्वातंत्र्य देत असतानाच काँग्रेसच्या प्रभावाला व शक्तीला खीळ बसावी याविषयी मुस्लिम लीगप्रमाणेच ब्रिटिशांचाही कटाक्ष होता. मुस्लिम लीग (व एकंदरीतच फुटीर मुस्लिम राष्ट्रवादी शक्ती ) आणि संस्थानिक यांचा खोडा काँग्रेसच्या पायात अडकवून मगच भारताचे अखंडत्व टिकवून धरावे व स्वातंत्र्य पदरी टाकावे याविषयी ते पक्के होते. मुस्लिम बहुसंख्येचे प्रांत, संस्थाने व काँग्रेसचे प्रभुत्व असलेले प्रांत यांच्यातील ताणतणाव व समतोलासाठीचे डावपेच यांचा फायदा उठवून स्वातंत्र्य दिल्यानंतरही अंतिमतः सूत्रे आपल्या हाती राखू शकू अशी त्यांना आशा होती, व तसा त्यांचा प्रयत्न होता.

काँग्रेसला शह देण्यासाठी फुटीर जातीयवादी राजकारणाला आणि मुस्लिम लीग व तिचे नेते जीना यांना जोपासण्याची किंमत चुकविण्याची वेळ आता आलेली होती. भारत अखंड ठेवावयाचा असेल तर सिंध, बलुचिस्तान, वायव्य सरहद्द प्रांत, पंजाब, बंगाल, आसाम हे सर्व प्रांत कायमचे मुस्लिम लीगच्या राजवटीखाली राहतील अशी रचना असली पाहिजे, केंद्रात 'हिंदू भारता'बरोबर सत्तेचा समतोल प्रस्थापित करता आला पाहिजे, मुस्लिम अल्पसंख्य असलेल्या प्रांतांत मुसलमानांना पुरेसे वजन प्राप्त होण्याइतक्या आधिक्याने जागा दिल्या गेल्या पाहिजेत, अशी जीनांची मागणी होती. ही स्थिती उत्पन्न होण्याची खरी जबाबदारी ब्रिटिशांची होती. हे मूर यांनी दाखवून दिले आहे. ते लिहितात, 'it was the British policies during the war that enabled Jinnah's League to become the voice of an incipient nation at the Simla Conference of June 1945.' [ "युद्धकाळातील ब्रिटिश धोरणांमुळेच केवळ जून १९४५ च्या सिमला परिषदेत जिनांच्या मुस्लिम लीगला एका नव्याने उदयाला येऊ पाहणाऱ्या राष्ट्राचे उद्गाते हे स्वरूप प्राप्त करून घेता आले."]

सत्तांतराच्या उद्देशाने १९४५ ते १९४७ या काळात ज्या प्रदीर्घ व गुंतागुंतीच्या वाटाघाटी झाल्या, त्यांचा इतिहास मनात विषाद उत्पन्न करणारा आहे. वेळोवेळी बहाल केलेल्या 'घटनात्मक सुधारणां'च्या हप्त्यांचा अटळ परिणाम असा झाला होता की, 'हिंदू समाजाची राजकीय संघटना' ही भूमिका काँग्रेसवर लादली गेली होती. विशेषतः कायदेकौन्सिलांच्या राजकारणात आणि घटनात्मक सुधारणांविषयक वाटाघाटींमध्ये आपला राष्ट्रीय बाणा तिने जपला असला तरी भारतातील सर्व जातिजमातींच्या आकांक्षांचे आपण प्रतिनिधित्व करतो असे तिला म्हणता येत नव्हते. औपचारिकतः भारत अखंड राहिला तरी प्रत्यक्षात



अनुक्रमणिका

मुस्लिम बहुसंख्येचे प्रांत हे जातीय राज्याखाली (व व्यवहारात मुस्लिम लीगच्या वर्चस्वाखाली) राहतील यास स्वीकृती देण्याखेरीज काँग्रेसला पर्याय उरला नव्हता. अखंड भारताचा आग्रह राखावयाचा तर, वाटाघाटींचा मार्ग सोडून देऊन जीनांच्या (व इतरही मुस्लिम व बिगर-मुस्लिम नेत्यांच्या) राजकारणांवर मात करून, सर्व जातिजमातींमधील जनसामान्यांपर्यंत परिणामकारक रीत्या पोचून त्यांना काँग्रेसच्या चळवळीत एकत्र आणण्याचे आव्हान पत्करावयास हवे होते. कायदेकौन्सिलांचे राजकारण सोडून देऊन काँग्रेसने गांधीप्रणीत रचनात्मक कार्यक्रम हाती घेतला असता तर कधी ना कधी ही गोष्ट साध्य करता येण्याची शक्यता होती. किंवा, वाटाघाटींकडे पाठ फिरवून, त्यांना ज्यांच्या हाती सत्ता द्यावयाची असेल त्यांच्या हाती सत्ता देऊन ब्रिटिशांनी येथून चालते व्हावे; मग आम्ही जातिधर्मातीत पायावर अखंड भारताची निर्मिती कशी करावयाची ते पाहून घेऊ, असे म्हणण्याचे अंतःसामर्थ्य प्रकट करावयास हवे होते. येथेही एक गोष्ट लक्षात येते. ती ही की, अहिंसेची कास न सोडता दीर्घकाळ संघर्ष करण्याची तयारी असती तरच ही भूमिका घेण्यासाठी लागणारे अंतःसामर्थ्य काँग्रेसच्या ठायी निर्माण झाले असते. काँग्रेस नेत्यांनी गांधीप्रणीत रचनात्मक कार्यक्रम मनःपूर्वक कधीच स्वीकारला नाही आणि त्यांची अहिंसाही तात्कालिक सोय म्हणूनच पत्करलेली होती या दोन्ही गोष्टी उघड झालेल्या होत्या. काँग्रेस संघटना व तिचे नेते, अशा रीतीने, दुबळे असल्याने त्यांना वाटाघाटींच्या चक्रव्यूहात शिरण्यावाचून गत्यंतर नव्हते.

वाटाघाटींना बसणे म्हणजेच मुस्लिम लीगबरोबर काँग्रेसने देशाचे राज्य वाटून घेण्यास मान्यता देणे असा अर्थ होता. १९४० च्या ऑगस्टमध्ये ब्रिटिश सरकारच्या वतीने व्हाइसरॉयांनी जी घोषणा केली होती, व क्रिप्स योजनेमध्ये प्रांतांना फुटून वेगळे होण्याची जी मोकळीक दिली होती त्याची ही अपरिहार्य परिणती होती. 'हिंदी समाजातील मोठ्या व प्रबळ अशा घटकांची मान्यता नसलेल्या कोणत्याही राज्यशासनाच्या हाती ब्रिटिश सरकार कधीही सत्तांतर करणार नाही' या व्हाइसरॉयच्या घोषणेबद्दल मूर यांनी लिहिले आहे, 'The Muslims had now something of a Veto' [ "मुसलमानांना आता नकाराधिकारासारखे काही अधिकार प्राप्त झाले होते." ] क्रिप्स योजनेला उद्देशून ते लिहितात, 'The Cripps affer gave Jinnah Pakistan in principal.' [ "क्रिप्स यांनी मांडलेल्या योजनेने जीनांना पाकिस्तान तत्त्वतः दिले होते." ] हिंदुस्थानातील मोठ्या लोकसंख्येने असलेल्या मुस्लिम समाजावर आपण अखंड भारतात राहण्याची सक्ती करण्याची कल्पना करू शकत नाही, अशा आशयाचा ठराव करून काँग्रेसनेही आपले हात बांधून घेतले होते. जीना व मुस्लिम लीग यांनी आडमुठेपणाची, नकाराधिकार बजावण्याचीच भूमिका घेतल्यानंतर तिच्यावर मात करून भारताची अखंडता टिकविण्यासाठी पर्यायी व प्रभावी मार्गांनी मुस्लिम समाजाला आपल्या मागे येण्यासाठी प्रवृत्त करणारा कोणताच कार्यक्रम काँग्रेस राबवू न शकल्याने या पुढच्या काळात काँग्रेस असहाय बनलेली दिसते. पाकिस्तानच्या मागणीतील विघातकता स्पष्ट करून जीनांचे मन पालटविण्यासाठी गांधींनी १९४४ साली 'राजाजी योजने' च्या आधारे त्यांच्याशी बोलणी करण्याने परिस्थिती अधिकच बिघडली होती. या सगळ्याचे तात्पर्य असे की, १९४५ साली व्हाइसरॉय वेव्हेल यांचे निमंत्रण स्वीकारून काँग्रेसचे पुढारी जेव्हा वाटाघाटींसाठी तयार झाले तेव्हा त्यांनी लीगच्या नेत्यांबरोबर हिंदुस्थानवरील सत्ता वाटून घेण्याच्या प्रस्तावास एकप्रकारे संमती दिलेलीच होती. किंबहुना, लीगबरोबर एक ना एका व्यवस्थेखाली सत्ता वाटून घेऊनच हिंदुस्थानचे स्वातंत्र्य पदरात पाडून घेता येणार आहे या निष्कर्षावर काँग्रेसचे नेते येऊन पोचले होते, आणि या मार्गाने स्वातंत्र्य पदरात पाडून घेऊन सत्ता हस्तगत करण्यास ते उत्सुकही होते.

काँग्रेस ही सर्व जातिजमातींच्या हिताचा विचार करणारी प्रातिनिधिक राष्ट्रीय संघटना नाही; काँग्रेसची राजवट म्हणजे हिंदू राजवट, अशी पक्की समजूत ब्रिटिश सनदी नोकरशाही व राजकारणी यांनी करून घेतलेली असल्याने काँग्रेसकडून येणाऱ्या प्रश्नांकडे सदैव संशयाने पाहिले गेले असे आढळते. मुस्लिम समाज (म्हणजे व्यवहारात, मुस्लिम लीग)

व संस्थाने यांच्या हितसंबंधांचे रक्षण करण्यासाठी त्यांना झुकते माप देण्याचे धोरण चालूच राहिले. मुस्लिम लीगचे, म्हणजेच जीनांचे, समाधान करणारी एक ना एक योजना काँग्रेसच्या गळी उतरविण्याचे प्रयत्न असा प्रकार या काळात दृष्टोत्पत्तीस पडतो. ब्रिटिशांशी वाटाघाटी करून स्वातंत्र्य पदरात पाडून घ्यायचे तर मुस्लिम लीगला राज्य करण्यासाठी काही भाग वेगळा करून द्यावा लागणार याची स्पष्टता झाल्यावर व त्याची तयारी एकदा दाखविल्यावर, काँग्रेसच्या नेत्यांनी आपण किती व कसे द्यावयास तयार आहोत याची स्वतःच एक योजना तयार करून व तीसंबंधी ठाम राहून वाटाघाटी करण्यास पुढे पाऊल टाकावयास हवे होते. तसे न केल्याने खेळी दीर्घकाळ मुस्लिम लीगच्या हाती व शेवटच्या काही महिन्यांमध्ये लॉर्ड माऊंटबॅटन यांच्या हाती राहिली.

– १७ –

या कालखंडात काँग्रेसची सूत्रे गांधींच्या हाती नव्हती; त्यांचा सल्ला सतत घेतला जात राहिला तरी, त्यांच्या भूमिकेवर ठाम राहून काँग्रेसचे नेते वाटाघाटी करण्यास तयार नव्हते, या दोन्ही गोष्टी ध्यानात ठेवणे महत्त्वाचे आहे. ब्रिटिशांनी प्रथम स्वातंत्र्य द्यावे, हातातली सत्ता खरीखुरी सोडून द्यावी; मग आम्ही आमच्यात काय वाटणी करावयाची ती करून घेऊ, ही गांधींची भूमिका होती. आर. जे. मूर यांनी गांधींच्या भूमिकेसंबंधी म्हटले आहे : 'Gandhi was exercised over the question of how the British " promise " of independence would be redeemed " during the considerable interim period " when the constitution making body was setting. He looked for an " absolutely national " government, even if that meant asking Jinnah to form it. The essence of his long movement for freedom ( lay in asking for an) award of indepence to a national government pending constitution-making. It is doubtful whether Cripps was sufficiently impressed by his constancy on this point, which stemmed from a conviction that while Britain ruled, the divided elements of India's political life, Congress, Muslim League, and princely states, could not be brought together. As long as the Raj supervised, arrangements for sharing of power, in government or in constitution-making, it would be divisive. '

[ " घटना बनविणाऱ्या मंडळाचे काम चालू असतानाच्या काहीशा दीर्घ अंतरिम कालखंडात ब्रिटिशांनी दिलेले स्वातंत्र्याचे अभिवचन ते कसे काय सिद्धीस नेणार हा प्रश्न गांधीजींना सतावत होता. त्यांना " पूर्णपणे राष्ट्रीय " असलेले सरकार पाहिजे होते. (असे सरकार साधायचे तर ) ते बनवायला जीनांना सांगावे लागेल असे दिसून आले तरी त्याची त्यांना फिकीर नव्हती. घटना बनविण्यात येईपर्यंत राष्ट्रीय सरकारकडे स्वातंत्र्य सुपूर्द केले जावे (ह्या मागणीत) त्यांनी स्वातंत्र्यासाठी चालविलेल्या दीर्घ चळवळीचे सार होते. हा मुद्दा त्यांनी ज्या सातत्याने मांडला त्याची पुरेशी छाप क्रिप्स यांच्या मनावर पडली होती की नाही हे संशयास्पद आहे. जोपर्यंत ब्रिटिश सत्ता होती तोपर्यंत भारताच्या राजकीय जीवनातील विभक्त घटकांना– काँग्रेस, मुस्लिम लीग आणि संस्थाने ह्यांना– एकत्र आणता येणार नाही ही खात्री ह्या मुद्द्याच्या मुळाशी होती. सरकारमध्ये किंवा घटनासमितीमध्ये सत्तेची भागीदारी कशी करावी ह्याविषयीच्या व्यवस्थेवर ब्रिटिश राजवटीची देखरेख राहणार होती तोपर्यंत ती फाटाफुटीला उत्तेजन देणार होती." ] गांधींची राजकीय जाण अतिशय मर्मभेदक व शंभर टक्के खरी होती. पाकिस्तान पदरात पडावयाचे असेल तर ते ब्रिटिशांच्या हातूनच पदरात पाडून घ्यावयास हवे, ही गोष्ट जीनांनी पुरती ओळखली होती. वाटाघाटींच्या साऱ्या घटपटात आधी पाकिस्तान द्यायचे कबूल करा, काँग्रेसकडून लेखी कबूल करवून घ्या, मग इतर गोष्टींचे बोलू, ही भूमिका जीनांनी अखेरपावेतो लावून धरली. दुर्दैव असे की, काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी गांधींची कास सोडून दिली.

१९४६ साली इंग्रजांसमोर दुहेरी पेच होता. काँग्रेस व लीग या दोन मुख्य राजकीय शक्तींना मान्य असलेली योजना शोधून काढावयाची होती. ज्या योजनेस कोणत्याही एका पक्षाची संमती नसेल ती योजना विरोध पत्करून राबविणे ब्रिटिश प्रशासन यंत्रणेच्या आवाक्याबाहेरचे होते. पेचाचा दुसरा पदर असा होता की, ब्रिटनचे आर्थिक व राजकीय हितसंबंध ज्यामुळे राखता येतील, आणि जागतिक राजकारणातले ब्रिटनचे स्थान व महत्त्व टिकून राहील असा तोडगा तो असायला हवा होता. स्वातंत्र्य देऊनही ब्रिटनचा प्रभाव टिकून राहील, काही क्षेत्रांत सूत्रे ब्रिटनच्या हाती राहतील अशा व्यवस्थेखाली स्वातंत्र्य बहाल करता यायला हवे होते. स्वतंत्र झाल्यावरही साम्राज्यवादी कालखंडात मध्य आशिया ते आग्नेय आशिया या विस्तीर्ण भूभागाच्या संदर्भात हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्यासाठी बजावीत आलेली लष्करी/संरक्षणात्मक भूमिका स्वतंत्र हिंदुस्थानकडूनही पार पडणे यासाठी फार गरजेचे होते.

मूर यांचा शेरा मार्मिक आहे. ते लिहितात, 'whereas division assisted imperialism, after independence, within or without Commonwealth, a United India would be in Britain's best interests. A strong Indian ally could be a financial, commercial and strategic asset; a weak Pakistan, or weak Pakistans in the north–west and the east, might be a financial and military liability... Here was no merely internal communal problem, but a recidual imperial problem, the solution of which most affect Britain's place in the world.' [ " साम्राज्यशाहीला फाटाफुटीची मदत होत होती; पण स्वातंत्र्यानंतर एकसंध भारत, मग तो (ब्रिटिश) राष्ट्रसमूहात राहो अगर बाहेर पडो, ब्रिटिश हितसंबंधांना सर्वांत अधिक साहाय्यभूत ठरणार होता. बलिष्ठ भारत दोस्तराष्ट्र म्हणून असणे ही आर्थिक, व्यापारी आणि लष्करी दृष्ट्या फायदेशीर गोष्ट झाली असती. दुबळे पाकिस्तान किंवा वायव्येचे आणि पूर्वेचे अशी दुबळी पाकिस्ताने ही आर्थिक आणि लष्करी दृष्टया जिम्मेदारी ठरणार होती... आता केवळ एक अंतर्गत जातीय विवादाचा प्रश्न समोर नव्हता, साम्राज्याच्या अंतानंतरचा एक अवशिष्ट प्रश्न समोर होता आणि तो कसा सोडविला जातो ह्याचा ब्रिटनच्या जगातील स्थानावर परिणाम होणार होता." ]

जीना मागत होते ते बृहद् पाकिस्तान देण्यास काँग्रेसची मान्यता मिळणे केवळ अशक्य होते. तेव्हा मग हिंदुस्थान एक ठेवून त्याच्या पोटात जीनांना हवा तसा कायम मुस्लिम राजवटीखालील एक वेगळा भाग निर्माण करावा व केंद्रातही मुस्लिम लीगला बरोबरीचे स्थान द्यावे हा पर्याय पुढे आला. संस्थानेही या हिंदुस्थानचा असाच वेगळा, तिसरा घटक–भाग राहावीत अशी योजना कल्पिता येत होती. तसे झाले तर काँग्रेसला वेसण घालणे अधिकच सोपे ठरणार होते. ब्रिटनचे प्रभुत्व कायम राहण्यासाठीं काँग्रेसला वेसण घालण्याची निकड ब्रिटिश मुत्सद्दी जाणत होते.

ब्रिटिश मंत्रिमंडळातील तीन सदस्यांच्या प्रतिनिधिमंडळाने या दिशेने वाटाघाटी करून अखेरीस १६ मे १९४६ रोजी जी योजना पुढे ठेवली तिने औपचारिकतः भारताचे अखंडत्व कायम राहत होते, पण व्यवहारात तीन वा अधिक उपराष्ट्रांचे एक दुबळे संघराज्य अस्तित्वात येणार होते. त्रिमंत्री योजनेनुसार प्रांतांचे जे गट केलेले होते त्या गटांमध्ये गटांच्या घटना तयार करण्याच्या दृष्टीने सहभागी व्हावयाचे की नाही हे ठरविण्याची मोकळीक १६ मेच्या योजनेनुसार प्रांतांना आहे, की गटाचे सभासदत्व बंधनकारक आहे, यावरून बराच काळ वाद होत राहिला. सभासदत्व बंधनकारक आहे असे ठरले तर जीनांना त्यांच्या कल्पनेतले पाकिस्तान साकार करता येणार होते, व बंधनकारक नसले तर पाकिस्तानची कल्पना हाणून पाडण्याचा काँग्रेसचा मार्ग मोकळा होत होता. त्रिमंत्री योजनेचाच एक भाग म्हणून हंगामी केंद्रीय सरकार अस्तित्वात यावयाचे होते. १६ मेची योजना राबवायला तयार असणाऱ्या पक्षांनाच सरकारात सामील होता येणार होते. ब्रिटिशांची योजना काहीही असो, एकदा घटनासमिती अस्तित्वात आली, की स्वतंत्र

भारताची घटनासमिती म्हणून काम करण्याची भूमिका काँग्रेसने तेथे घ्यावी असे गांधींचे मत. पण काँग्रेस ही नीती अवलंबिणार असेल तर सरकार घटनासमिती बोलावणार नाही ही गोष्टही उघड होती. योजनेतील तरतुदींचा नेमका अर्थ काय यावरील उलटसुलट चर्चांमधून जेव्हा, प्रांतांना गट–सभासदत्व बंधनकारक आहे असा अर्थ सरकार करते, हे स्पष्ट झाले तेव्हा जीनांनी या योजनेचा स्वीकार केला, तर काँग्रेसने या अन्वयार्थाला आपण बांधून न घेता १६ मेच्या योजनेतील घटनासमितीत भाग घेणार असल्याचे जाहीर केले. लीगच्या ठरावात म्हटले होते की, '...in as much as the basis and the foundation of Pakistan are inherent in Mission's plan by virtue of the compulsory grouping of the six provinces in Section B and C, [it] is willing to cooperate with the constitution–making machinery... in the hope that it would ultimately result in the establishment of complete sovereign Pakistan.' [" ...मिशनच्या योजनेतील सहा प्रांतांचे B आणि C ह्या विभागांत सक्तीने गट करण्याच्या तरतुदीमध्ये पाकिस्तानचा पाया आणि अधिष्ठान अंतर्भूत असल्यामुळे (लीग) घटना निर्मितीच्या यंत्रणेशी सहकार्य करायला, ह्यातून अखेरीस पूर्णपणे सार्वभौम अशा पाकिस्तानची स्थापना होईल ह्या आशेने, तयार आहे." ] परस्परविरूद्ध टोकाचे हेतू साध्य करण्यासाठी काँग्रेस व लीग त्रिमंत्री योजनेचा स्वीकार करण्यास निघाले होते.

व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाचे रूपांतर केंद्रीय मंत्रिमंडळसदृश सरकारात करावे अशी कल्पना महायुद्ध चालू असतानाच पुढे आली होती. त्या वेळी ती नाकारली गेली होती. वेव्हेल यांनी १९४५ च्या जूनमध्ये त्या दिशेने केलेला प्रयत्न असफल ठरला होता. घटनासमितीच्या स्थापनेबरोबरच रीतसर स्वातंत्र्य दिले जाईतोवर एक हंगामी सरकार स्थापन करण्याची बाब त्रिमंत्री योजनेत समाविष्ट होती. अशा मंत्रिमंडळात काँग्रेसी व लीगी मंत्र्यांची संख्या समान असावी, मुस्लिम मंत्री फक्त लीगने निवडलेले असावेत, काँग्रेसने नेमलेल्या मंत्र्यांमध्येच एका पूर्वास्पृश्याचा समावेश असावा अशा जीनांच्या अटी होत्या. वेव्हेल यांनी या अटी स्वीकारल्या होत्या. काँग्रेस या अटींवर सरकार बनविण्यास तयार नव्हती. सवर्ण हिंदू (काँग्रेस) ५, मुसलमान (लीग) ५, शीख, पारशी, ख्रिश्चन आणि पूर्वास्पृश्य (काँग्रेस) असे चौदा जणांचे हंगामी सरकार बनवीत असल्याचे सरकारी निवेदन १६ जून १९४६ रोजी प्रसृत करण्यात आले. काँग्रेसने या निमंत्रणाचा स्वीकार करावयाचे ठरविले होते असे नेहरूंनी लिहून ठेवलेल्या उत्तराच्या मसुद्यावरून दिसते. काँग्रेसच्या कोटयांमधून राष्ट्रीय काँग्रेसी मुसलमानाची नेमणूक करण्याचा काँग्रेसचा अधिकार नाकारला जाणे आणि अल्पसंख्यांमधून कोणाची नेमणूक करावी याविषयी काँग्रेसचा सल्ला घेतला न जाणे याबद्दल असमाधान व्यक्त करून नेहरूंनी म्हटले की, एरवी या दोन बाबींवरून अनुल्लंघनीय अडचण उपस्थित झाली असती, पण पुष्कळ विचार केल्यावर 'we have felt that for this temporary arrangement we should not raise any further difficulty as we are anxious to get to the work of constitution–making and the establishment of Indian independence in law and fact.' [" घटनानिर्मितीचे काम हाती घ्यायला आणि भारतीय स्वातंत्र्याची कायद्याने आणि प्रत्यक्ष वस्तुस्थितीत स्थापना करायला आतुर असल्यामुळे ह्या तात्पुरत्या व्यवस्थेबाबत आणखी कोणती अडचण आपण उपस्थित करू नये असे आम्हाला वाटते." ]

वस्तुस्थिती अशी होती की, सत्ता हस्तगत करण्याच्या आकर्षणापोटी आझाद-पटेल-नेहरू प्रभृती काँग्रेस पुढारीमंडळी एक प्रकारच्या घाईला आली होती.

स्वातंत्र्याचे मुख्य सूत्र घट्ट पकडून ठेवून त्रिमंत्री योजनेचा मर्मभेद करीत राहण्यात गांधींनी या वेळी फार मोठी कामगिरी बजावली हे आर. जे. मूर यांच्या 'एस्केप फ्रॉम एम्पायर' या पुस्तकावरून चांगल्या प्रकारे स्पष्ट होते. गांधींचा साधाच पण मूलभूत महत्त्वाचा मुद्दा होता. ब्रिटिशांनी आमची व्यवस्था लावू नये; ती आमची आम्ही लावून घेऊ.

अनुक्रमणिका

ब्रिटिशांनी ताबडतोब वैधानिक स्वातंत्र्य नाही दिले तरी चालेल पण व्यवहारात मात्र स्वातंत्र्य दिले पाहिजे ( ‘ independence in fact ’ ). घटनासमिती प्रस्थापित करावी, ती लोकनियुक्त प्रतिनिधींची असावी याचा आग्रह धरावा, पण इतर कोणते निर्बंध त्यांनी घालण्याचे कारण नाही. मुसलमानांवर आम्ही त्यांच्या इच्छेविरूद्ध काही लादणार नाही, पण त्यांना काय द्यावे ते ब्रिटिशांनी ठरवून देण्याचे कारण नाही. संस्थानांशी आम्ही कोणते संबंध ठेवावेत ते आम्ही व ते मिळून ठरवू. ब्रिटनचे समाधान होईल अशी व्यवस्था झाली तरच आम्ही सत्ता सोडू, वा हाती सत्ता आहे तिचा धाक घालून एक व्यवस्था मान्य करायला लावू, ही गोष्ट काँग्रेस मान्य करू शकत नाही. घटनासमितीच्या संदर्भात गांधींनी काँग्रेस वर्किंग कमिटीला २३ जून १९४६ च्या बैठकीत सल्ला दिला की, ( Congress should ) ...go into the constituent Assembly as it was purely as elective body whose representative character was admitted even by the British Government ... The Viceroy could not interfere with its working... If the worst came to the worst, it could be turned into a rebel body... In the alternative, he saw no possibility of giving a fight, as the requisite atmosphere of non-violence was not forthcoming. ’

[ “ घटनासमिती हे केवळ लोकांनी निवडून दिलेले मंडळ असल्यामुळे आणि त्याचे प्रातिनिधिक स्वरूप ब्रिटिश सरकारसुद्धा मान्य करीत असल्यामुळे काँग्रेसने घटनासमितीत जावे. व्हाइसरॉय त्याच्या कामकाजात हस्तक्षेप करू शकणार नाही. वाईटात वाईट काय होऊ शकेल तर समितीचे बंडखोर मंडळात परिवर्तन करण्याची पाळी येईल. ...ह्याला पर्याय म्हणजे लढा सुरू करणे. त्याची शक्यता त्यांना दिसत नव्हती कारण त्यासाठी आवश्यक असलेले अहिंसेचे वातावरण तयार होत नव्हते.” ]

गांधींचा सल्ला मानल्यास ब्रिटिशांचा डाव उधळला जातो अशी स्थिती होती. १६ मेच्या त्रिमंत्री योजनेतील तरतुदींचा विशिष्ट अर्थ स्वीकारूनच लोकप्रतिनिधींना घटनासमितीचे सभासद होता येणार ही गोष्ट पुढे स्पष्ट झाल्यावर गांधींनी घटनासमितीत सहभागी न होण्याचा सल्ला दिला.

हंगामी सरकारच्या संदर्भातही गांधींचा मुद्दा साधासरळ पण मूलभूत व निर्णायक महत्त्वाचा होता. काँग्रेस ही राष्ट्रीय बाण्याची संघटना आहे; ब्रिटिशांची सोय व मर्जी म्हणून तिला हिंदू ( व तीही सवर्ण हिंदू ) संघटना म्हणून वागविण्याची बाब काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी खपवून घेता कामा नये. राष्ट्रीय संघटना या नात्याने हंगामी सरकारातील मंत्रिपदांसाठी मुसलमान व्यक्तींचे नाव सुचविण्याचा आणि अल्पसंख्य जमातींचे प्रतिनिधी म्हणून कोणाची निवड करावी याविषयी सल्ला देण्याचा काँग्रेसचा अधिकार आहे असे गांधींचे म्हणणे. हंगामी सरकारच्या जडणघडणीविषयी गांधींनी घेतलेल्या भूमिकेविषयी मूर लिहितात, ‘ He ( Gandhi ) looked for a procedure and a composition that would establish “independence in fact.” ’ [ “ ज्यायोगे ‘स्वातंत्र्य प्रत्यक्षात प्रस्थापित ’ होईल अशी कार्यपद्धती आणि रचना त्यांना (गांधीजींना) अभिप्रेत होती.” ] मंत्रिमंडळ व्हाइसरॉयने बनवायचे नाही; ते आम्ही बनवायला हवे, असे त्यांचे म्हणणे. काँग्रेस व लीग यांनी आपापसांत मिळून ते बनवावे. ते अशक्य असेल तर वेव्हेल यांनी काँग्रेस वा लीग, कोणाही एका पक्षास पाचारण करावे. पण मंत्रिमंडळात कोण कोण असेल, आणि कोणास किती जागा मिळतील ही गोष्ट व्हाइसरॉयनी आमच्यावर लादावी यात साम्राज्यवादी भूमिकेचाच पुनरुच्चार आहे. गांधींनी म्हटले, ‘ the Viceroy could not be allowed to act imperiously at the very threshold. ’

[ “ अगदी प्रारंभीच जालीमपणे वागायला मुभा देणे शक्य नव्हते.” ]

काँग्रेस व लीग यांच्या उद्दिष्टांमध्ये जमीनअस्मानाचे अंतर होते; ती अहिनकुलवत् होती. हे स्पष्ट होऊनही त्यांना बळेच एका ठिकाणी आणून युक्तिप्रयुक्तीने एका उपाययोजनेस होकार द्यायला लावावा असा आटापिटा ब्रिटिश मंत्रिमंडळ का करीत होते ? काँग्रेस-लीग समझोत्याशिवायच

हिंदुस्थानवरील सत्ता सोडण्याने ब्रिटनची नाचक्की होणार होती एवढेच नाही तर, ब्रिटिश हितसंबंधांची राखरांगोळी झाली असती, आणि ते त्यांना परवडणारे नव्हते. जीना जसे आपल्या मागणीला ठाम चिकटून राहिले तसे काँग्रेसचे पुढारी जर आपल्या तत्त्वांना व भूमिकांना प्रामाणिक राहून त्याबाबतीत खंबीर राहिले असते तर ब्रिटिश राज्यकर्त्यांना, व अंतिमत: जीना यांनाही, काँग्रेसच्या राष्ट्रीय भूमिकेशी जुळवून घ्यावे लागले असते. काँग्रेसला धाब्यावर बसवून हातातल्या सत्तेच्या जोरावर पाकिस्तानची निर्मिती एक वेळ ब्रिटिश करू शकले असते, पण ते टिकविण्यासाठी आवश्यक तो भार वर्षानुवर्षे उचलण्याच्या परिस्थितीत ते नव्हते. देशात अराजक माजेल, दंगेधोपे आपणांस आवरता येणार नाहीत याचे काँग्रेसच्या पुढाऱ्यांना भय पडले की समोर दिसत असलेल्या सत्तेचे आकर्षण बलवत्तर ठरले ? ते काहीही असो, त्यांचे मानसिक दुबळेपण नडले, ही गोष्ट खरी. 'प्रत्यक्षात स्वातंत्र्य' ही गोष्ट स्पष्टपणे नाकारल्यावरही काँग्रेसने हंगामी सरकारमध्ये प्रवेश केला.

वेव्हेल यांनी दबाव आणून हंगामी सरकारात लीगच्या ५ मंत्र्यांना घेण्यास भाग पाडले. 'हट्टाची अडवणूक' करण्याच्या उद्देशाने उघड उघड मंत्रिपदाचा स्वीकार लीग करीत असूनही काँग्रेसने पेचप्रसंग निर्माण केला नाही. १६ ऑगस्टच्या 'प्रत्यक्ष कृती'च्या घोषणेनंतरच्या भीषण दंगली एव्हाना होऊन चुकल्या होत्या. देशातले वातावरण पेटवले जात होते असे असताही काँग्रेसने हंगामी सरकारात मुस्लिम लीगला प्रवेश नाकारला नाही. पुढे वेव्हेल यांनी १६ मेच्या त्रिमंत्री योजनेतील तरतुदींचा अर्थ काँग्रेसच्या अन्वयार्थाच्या विपरीत लावला. तेव्हाही आझाद व नेहरूंनी तो अर्थ स्वीकारून घटनासमितीत भाग घेण्याचे आवाहन आसाम, वायव्य सरहद्द प्रांत यांमधील काँग्रेस नेते व शीख जमात यांना केले. तसा दबाव पण आणण्याचा प्रयत्न केला. इथे पुन्हा गांधींनी मोडता घातला, व प्रसंगी काँग्रेसमधून बाहेर पडून आपला स्वयंनिर्णयाचा हक्क बजावण्याचा, सत्याग्रह करण्याचा सल्ला लोकांना दिला. गांधींच्या प्रभावाखाली काँग्रेसच्या महासमितीने, ब्रिटिश सरकारने दिलेला निवाडा स्वीकारीत असतानाच, ज्या प्रांतांना या शर्तीवर प्रांतिक गटात सामील होऊन गटवार विधिमंडळांमध्ये घटना बनवायच्या नसतील त्यांच्यावर ही रीत बंधनकारक असण्याचे कारण नाही अशी भूमिका घेतली. तेव्हा लीगने घटनासमितीच्या कामकाजावर बहिष्कार टाकण्याचा निर्णय जाहीर केला. या निर्णयानंतर लीगच्या मंत्र्यांनी राजीनामे द्यावे असा आग्रह काँग्रेस राखू शकली असती. तसेच, घटनासमिती व हंगामी सरकार दोन्ही बरखास्त करण्याचा निर्णय ब्रिटिश सरकार घेऊ शकले असते. यांपैकी काहीच घडले नाही. सगळाच मामला घोळात पडला होता. खेदाची गोष्ट अशी होती की, हंगामी सरकारच्या रूपाने ब्रिटिशांनी टाकलेल्या जाळ्यात काँग्रेस अडकली होती. विचार व कृती यांचे, दूरवर नजर ठेवून रणनीती आखण्याचे स्वातंत्र्य तिने गमावले होते.

डिसेंबर १९४६ मध्ये ब्रिटिश पंतप्रधान अॅटलींनी मंत्रिमंडळापुढे एकंदर परिस्थितीचा आढावा सादर करताना म्हटले की, 'it was impossible to be confident that the main political parties in India had any real will to reach agreement between themselves.' [ "भारतातील प्रमुख राजकीय पक्षांना परस्परात समझोता घडवून आणण्याची खरीखुरी इच्छा आहे अशी खात्री बाळगणे अशक्य होते."] यातून मार्ग काय, या प्रश्नाचे त्यांच्या मनात आकार घेत असलेले उत्तर पुढीलप्रमाणे होते : 'Two things are necessary : One was to make the Indians feel their responsibility by announcing that we were clearing out within a definite period, the other was to find the man to put this through.' [ "दोन गोष्टी आवश्यक आहेत : एका निश्चित कालावधीनंतर आम्ही बाहेर पडणार असे जाहीर करून भारतीयांना त्यांच्या जबाबदारीची जाणीव करून देणे ही पहिली गोष्ट; दुसरी गोष्ट म्हणजे जो हे सगळे निभावून नेईल असा माणूस शोधून काढणे."] २० फेब्रुवारी १९४७ रोजी अॅटलींनी वेव्हेल यांच्या जागी लॉर्ड माऊंटबॅटन यांची

अनुक्रमणिका

व्हाइसरॉय म्हणून नेमणूक करीत असल्याची घोषणा केली. त्याचवेळी, जून १९४८ पर्यंत हिंदुस्थानातील राजकीय पक्षांमध्ये समझोता झाला नाही तर, भारतीयांच्या हिताच्या दृष्टीने सत्ता कोणाच्या हाती सुपूर्द करून हिंदुस्थान सोडावयाचा ते ब्रिटिश सरकार ठरवील असे जाहीर केले. ही 'शॉक ट्रीटमेंट' होती.

भारतात हिंदू व मुस्लिम अशी दोन राष्ट्रे आहेत, व त्यांच्यात सत्तेचे विभाजन करून सत्तांतर केले पाहिजे, ही भूमिका त्रिमंत्री योजनेच्या गाभ्याशी होती. भारताचे अखंडत्व औपचारिक राजकीयदृष्टचा राखण्याच्या दृष्टीने आराखडा त्या योजनेत बनविलेला असला तरी, वास्तविक पाहता, काँग्रेसच्या ध्येयधोरणाशी सुसंवादी असे ते अखंडत्व नव्हते. माऊंटबॅटन यांनी व्हाइसरॉयपद स्वीकारले तेव्हा त्यांच्यासमोरचे तिहेरी आव्हान होते : (१) द्विराष्ट्रवादी भूमिका पत्करून, देशाचे विभाजन करून सत्ता स्वीकारण्यास काँग्रेसला तयार करावयाचे; (२) पाकिस्तान मिळेल पण ते जीनांच्या स्वप्नातले बृहद् पाकिस्तान असणार नाही तर 'विकलांग' (moth-eaten / truncated) पाकिस्तान असेल, यास मुस्लिम लीग व जीना यांची संमती मिळवावयाची; आणि (३) सुरळीतपणे सत्तांतर घडवून आणीत असता ब्रिटिश प्रभुत्व कायम राहील अशी व्यवस्था स्वीकारण्यास– म्हणजे राष्ट्रकुलात राहण्यास– उभय पक्षांचे मन वळवावयाचे. अंगाशी आलेल्या एका अत्यंत स्फोटक, नव्हे पेटत्या, भडकत्या परिस्थितीतून, ब्रिटिश हितसंबंध सुरक्षित राखून, हुशारीने सहीसलामत बाहेर पडण्याचा मार्ग माऊंटबॅटन व त्यांचे सल्लागार शोधत होते.

– १८ –

जून १९४८ पावेतो ब्रिटिश येथून जाणार या घोषणेचा उपयोग करून काँग्रेसने आपले कृतिस्वातंत्र्य पुनरपि हस्तगत करावे यासाठी गांधींनी प्रयत्न केला. जे काही घडावयाचे, घडवावयाचे असेल ते ब्रिटिशांच्या मध्यस्थीने घडावयास वा घडवून आणावयास नको; लीगशी सरळसरळ सामना करून ते आपण घडवूया, या भूमिकेवर काँग्रेसला आणण्याचा त्यांनी प्रयत्न केला. ८ मे १९४७ रोजी गांधींनी माऊंटबॅटनना लिहिलेल्या पत्रातही त्यांनी म्हटले की, 'फाळणी व्हायचीच असेल तर ती ब्रिटिश निघून गेल्यावर उभय पक्षांत जी तडजोड होईल तीमुळे किंवा हिंदुमुसलमानातील सशस्त्र लढ्याचा ... परिणाम म्हणून होऊ दे.' ब्रिटनने सत्ता लगेचच हस्तांतरित करावी, व हवे तर ती लीगच्या हाती द्यावी असेही त्यांनी आधीच सांगितले होते. [ He (Gandhi) remained opposed to the partition of India and appealed for an immediate transfer of power to either a Congress or a League government on a Dominion status basis, with Mountbatten remaining as Governor-General until June 1948. ] [ "गांधीजी फाळणीच्या विरोधी होते आणि सत्तेचे काँग्रेस सरकारकडे किंवा लीग सरकारकडे वसाहतीचे स्वराज्य म्हणून, ताबडतोब हस्तांतर करावे व माउंटबॅटन ह्यांनी जून १९४८ पर्यंत गव्हर्नर-जनरल म्हणून रहावे असे आवाहन त्यांनी केले." ] पत्रात त्यांनी ही मागणी पुन्हा करीत लिहिले, 'परस्परांच्या सहकार्याच्या व सांघिक भावनेअभावी आज दुहेरी नियंत्रण अस्तित्वात आले आहे व ते देशाला अत्यंत घातक आहे. दोन्ही पक्ष आपापल्या जागा टिकविण्याचा प्रयत्न करण्यात व तुम्हाला राजी राखण्यात आपली सर्व शक्ती खर्च करीत आहेत. सरकारमध्ये संघभावना नसल्यामुळे त्याचे नीतिधैर्य खचत जाते आणि कार्यक्षम व चोख शासनासाठी प्रशासनयंत्रणा निःपक्षपाती व सचोटीची लागते तशी ती राहू शकत नाही.'

हंगामी सरकारातून बाहेर पडून सत्ता मुस्लिम लीगच्या मंत्र्यांच्या हाती जाऊ देण्यास काँग्रेसचे पुढारी जिथे तयार नव्हते, तिथे गांधींची भूमिका ते उचलून धरतील ही शक्यता नव्हती. अॅटली यांच्या घोषणेच्या पार्श्वभूमीवर, हंगामी सरकारच्या हाती ताबडतोब सत्ता देऊन वासाहतिक स्वराज्य द्यावे अशी काँग्रेसने भूमिका घेतली. पण, लीग व काँग्रेस यांच्यातील परस्परअविश्वास व कलह यांवर बोट ठेवून, आधी समझोता करा मग सत्तांतर करू, अशी भूमिका ब्रिटिशांनी स्वाभाविकपणे घेतली.

अनुक्रमणिका

हिंदू काँग्रेसच्या हाती सारे राज्य देण्याची स्वार्थी कावेबाज मागणी काँग्रेस करीत आहे असे म्हणण्यास त्यांना व इतरांनाही जागा होती. वासाहतिक स्वराज्याखालील मंत्रिमंडळाला असतात ते अधिकार लगेच द्या, व हवे तर मुस्लिम लीगच्या हाती हंगामी सरकारची सूत्रे द्या, ही भूमिका काँग्रेसने घेतली असती तर वरील आरोप करता आला नसता.

लीग व काँग्रेस, दोन्ही पक्ष ब्रिटिश मध्यस्थाकरवी आपले हितसंबंध साधून घेऊ पाहत होते ही स्थिती माऊंटबॅटन यांच्या पथ्यावर पडणारीच होती. माऊंटबॅटन हे मोठे चाणाक्ष गृहस्थ होते. ते लबाड वा अप्रामाणिक नव्हते, पण ब्रिटिश हितसंबंध साधण्यास त्यांची प्रथम बांधिलकी होती, आणि त्यांचे सारे डावपेच यासाठी रचलेले होते. मूर यांच्या पुस्तकातील विवेचनातून दोन गोष्टी स्पष्ट होतात : भारतीय लोकांच्या दूरगामी हिताच्या दृष्टीने काय घडणे योग्य आहे हा प्रश्न त्यांनी कधीच उपस्थित केला नाही, तसेच काँग्रेस ही हिंदूंची राजकीय संघटना आहे व तिच्या आक्रमक आकांक्षांपासून अल्पसंख्य जमातींच्या ( विशेषतः मुसलमानांच्या ) हिताचे रक्षण केले पाहिजे या ब्रिटिशांच्या पूर्वग्रहाची शहानिशा करून त्यांनी काँग्रेस ही संघटना नसून राष्ट्रीय संघटना आहे असा निवाडा केला नाही. दुसरी गोष्ट अशी की, स्वतः सुचवीत असलेली योजना मान्य करवून घेण्यासाठी त्यांनी आमिष दाखवायला, भीती घालायला मागेपुढे पाहिले नाही, एक ना एक व्यवहार्य योजना गळी उतरवून सुरळीतपणे बाहेर पडणे यालाच त्यांनी सर्व महत्त्व दिले. उचित काय, न्याय्य काय, हितकारक काय, याचा विचार अप्रस्तुत मानला. तिसरी गोष्ट अशीही दिसते की, खऱ्या अर्थाने त्यांनी कोणालाच विश्वासात घेतले नाही– बरोबर आणलेल्या एकदोन सहकाऱ्यांचाच याला अपवाद होता.

१९४६ पासूनच देशात दंगेधोपे वाढलेले होते. प्रशासनयंत्रणेत जातीय भावना पसरली होती. या सर्व गोष्टी राज्य करणे अवघड झाले होते. या सर्व गोष्टी खऱ्या. पण ब्रिटिश गव्हर्नर, सनदी प्रशासक, सैन्य व केंद्रीय व स्थानिक मंत्रिमंडळे यांना जरब देऊन सुव्यवस्थेचा प्रश्न सोडविण्यासाठी माऊंटबॅटन यांनी स्वतःला पणाला लावले नाही; उलट, घाईगर्दी करून लीग व काँग्रेसला होकार द्यायला लावण्यासाठी या बिघडत चाललेल्या परिस्थितीचा फायदा उठविला, असेच दिसून येते. ज्या गोष्टीची वास्तविक शरम वाटावयास हवी होती असा हा बेजबाबदारपणा होता. राज्यकर्ते असूनही राज्य करण्याची जबाबदारी झटकून टाकण्यातला हा प्रकार होता. लगाम मात्र आपल्या हाती ठेवलेले होते. यावरही गांधींनी नेमके बोट ठेवलेले आढळते. माऊंटबॅटनना लिहिलेल्या (८ मे १९४७) पत्रात त्यांनी स्पष्टपणे म्हटले की, 'ब्रिटिश हिंदुस्थानात असेपर्यंत देशात शांतता राखण्याची जबाबदारी मुख्यतः त्यांची आहे असेच मानले पाहिजे.' ब्रिटिशांचे बेजबाबदार वर्तन पाहूनच गांधींनी रायटरच्या वार्ताहरापाशी ५ मे १९४७ रोजी उद्‌गार काढले की, 'it would be a good thing if the British were to go today– thirteen months means mischief to India.' [ "ब्रिटिश आज निघून गेले तर ती चांगली गोष्ट होईल– तेरा महिन्यांचा काळ भारताला फार नुकसानकारक ठरेल." ]

ब्रिटिशांच्या उपस्थितीत व मदतीने सत्तांतर सुरळीत कसे पार पडेल, हिंदुस्थानचे अनेक तुकडे न पडता (मुस्लिम वरचष्म्याखालील भाग वगळता) हिंदुस्थानात एकच केंद्रीय सत्ता कशी अस्तित्वात येईल, आणि देशाचे नियंत्रण करण्यासाठी देशव्यापी घटनात्मक चौकट, प्रशासनयंत्रणा, आणि सैन्य यांचा वारसा आपणाकडे कसा चालून येईल, या चिंतेने ग्रासलेल्या काँग्रेसच्या पुढाऱ्यांकडून फाळणीच्या योजनेस मान्यता मिळवून घेण्यास माऊंटबॅटन यांना त्रास पडला नाही; त्यांच्या चिंताग्रस्ततेचा उलट उपयोगच झाला. काँग्रेसने आपली योजना स्वीकारलीय, तेव्हा लीगने जर ती स्वीकारली नाही तर जून १९४८ मध्ये ब्रिटिश जातील तेव्हा वारशाने लीगच्या हाती कोणत्याच यंत्रणा येणार नाहीत; काँग्रेसच्या हिंदुस्थानात सामील न होऊ इच्छिणारे प्रदेश वाऱ्यावर सोडल्यासारखे होतील, असा धाक घातल्यावर जीनाही नरम आले. ब्रिटिशांच्या मदतीखेरीज व हमीशिवाय पाकिस्तान– विकलांग स्वरूपातदेखील–आपण मिळवू शकू अशी जीनांना अजिबात खात्री नव्हती. तेलही गेले, तूपही

गेले, हाती धुपाटणे राहिले, अशी स्थिती होण्याची पाळी आली म्हटल्यावर जीनांनीही विकलांग पाकिस्तानच्या स्वरूपात फाळणीची योजना पत्करली. बलुचिस्तान, वायव्य सरहद्द प्रांत, सिंध, पंजाब, बंगाल व आसाम यांवर मुसलमानी राजवट अधिक साऱ्या हिंदुस्थानवरील राज्यात बरोबरीने भागीदारी व नकाराधिकारातून येणारे प्रभुत्व ही जीनांची आकांक्षा होती. त्या जागी विकलांग पाकिस्तान त्यांना पत्करावे लागले. ब्रिटिशांनी काँग्रेस व लीग या दोन्ही राजकीय शक्तींचा अशा रीतीने, दारूण पराभव करून आपली मात्र प्रतिष्ठा राखून सोडवणूक करून घेतली.

विकलांग स्वरूपातच सार्वभौम पाकिस्तानचा स्वीकार जीना व मुस्लिम लीग यांना करणे भाग पडले, उर्वरित हिंदुस्थानचे राज्य सरळपणे आपल्या हाती मिळाले, आणि संस्थानिकांपैकी बव्हंशी सर्वांना सामावून घेण्याचे धोरण ब्रिटिशांच्या मदतीने राबवून घेता आले, या त्यातल्यात्यात काही जमेच्या बाजू काँग्रेस पुढाऱ्यांच्या बाजूने सांगता येतील. जीनांच्या आडमुठेपणामुळे वाटाघाटींच्या अगदी अखेरच्या दिवसांत माऊंटबॅटन यांना नेहरू व पटेल यांच्याविषयी अधिक सहानुभूती व आत्मीयता वाटत गेली. आणि त्यांच्या प्रतिपादनातील अनेक मुद्द्यांचा वाजवीपणा पटवून घेण्यासाठी त्यांचे मत अनुकूल राहिले. संस्थानांच्या समस्येची नीटपणे सोडवणूक झाली, संस्थाने स्वतंत्र होऊन गुंतागुंत अधिक वाढली नाही याचे बरेचसे श्रेय या वाढलेल्या जवळिकीस द्यायला लागेल. पण जीनांनी धर्माधिष्ठित द्विराष्ट्रवादी भूमिका स्वीकारण्यास व त्याच सूत्रानुसार फाळणीची मागणी करावयास अखेरीस काँग्रेसला भाग पाडले, ही वस्तुस्थिती उरतेच.

– १९ –

अखिल भारतीय काँग्रेस महासमिती फाळणीच्या प्रस्तावावर शिक्कामोर्तब करील की नाही, गांधी काँग्रेस-पुढाऱ्यांविरुद्ध बंडखोरी करतील का, या प्रकारची अनिश्चितता काही काळ राहिली. एकराष्ट्रीयत्वाच्या भूमिकेतून पूर्ण स्वातंत्र्यासाठी काम करीत राहण्यासाठी, स्वतःच्या संघटित सामर्थ्याच्या जोरावर अराजक, गोंधळ व दंगेधोपे यांना सामोरे जाऊन त्यांवर मात करण्यासाठी मनाची जी उभारी व आत्मबळ लागते ते काँग्रेसच्या पुढाऱ्यांपाशी नाही; काँग्रेसचे प्रस्थापित नेतृत्व सोडल्यास जे इतर प्रवाह काँग्रेसमध्ये होते व ज्यांचा फाळणीला विरोध होता त्यांची अहिंसेवर व रचनात्मक कार्यक्रमावर निष्ठा नाही, व शिस्त म्हणूनही या गोष्टींचा स्वीकार करावयास १९४२ च्या आंदोलनात ते तयार झाले नाहीत, याचे भान गांधींना होते. फाळणीच्या ठरावास विरोध करून, तो ठराव आपल्या प्रभावामुळे फेटाळला जाईल हे कदाचित गांधींना बघता आलेही असते. पण यामधून काँग्रेस संघटना दुभंगून खिळखिळी व निष्प्रभ झाली असती. तीस-तीस वर्षांच्या सहकाऱ्यांना वाऱ्यावर सोडून देण्यासारखे, त्यांची नाचक्की होऊ दिल्यासारखे झाले असते, हे वेगळेच. फाळणीविरुद्ध काँग्रेसमधील ज्या गटांना चळवळ उभारावयाची होती त्यांनी त्या दिशेने १९४५ ते १९४७ या दोनेक वर्षांच्या काळात पक्षामध्ये पर्यायी बांधणी काहीच केलेली नव्हती. त्यांच्या पाठीशी सर्वसामान्य जनता उभी होती अशातलाही भाग नव्हता. अशा रीतीने, अखंड हिंदुस्थानचे पूर्ण स्वातंत्र्य स्वसामर्थ्याच्या जोरावर मिळविण्याची शक्यता नव्हती. इतकेच नाही तर, ब्रिटिश जाण्याच्या अगोदर त्यांच्या मदतीनेच व्यवस्था लावून घ्यायला हवी इतपत काँग्रेस दुबळी व धास्तावलेली होती. फाळणी मान्य करण्यावाचून त्या क्षणी तरी अन्य पर्याय नव्हता. कारण लीगच्या पदरात पाकिस्तान टाकूनच मग जायचे हे ब्रिटिशांचे पक्के ठरले होते. फाळणीचा ठराव मंजूर करण्याची विनंती गांधींनी महासमितीच्या सभासदांना केली.

गांधींच्या मनात विषाद भरलेला होता. माऊंटबॅटन यांना त्यांनी दोष दिला नाही, पण त्यांनी जे साध्य केले त्याविषयी 'you and your magic tricks' असे उद्गार त्यांच्यापाशी काढले. माऊंटबॅटन यांच्या कुशलतेची जशी पावती त्यांनी दिली तशी सौम्य भाषेत कानउघाडणीही केली. तुमच्यावर मी मात केलीय; काँग्रेसचे पुढारी आज तुमच्यापेक्षा माझ्या जास्त कह्यात आहेत असे गांधींना म्हणण्याचे धाष्टर्य माऊंटबॅटन यांनी मेच्या आरंभी केल्याचे निर्मलकुमार बोस यांनी नमूद केले आहे. या त्यांच्या घमेंडीत तथ्य होते याचेही भान गांधींना होते. बोसांनी यावेळची एक आठवण

सांगितली आहे. १५ ऑगस्टच्या स्वातंत्र्यदिनप्रसंगी प्रक्षेपित करण्यासाठी गांधींनी एक संदेश द्यावा अशी विनंती करण्यासाठी बी. बी. सी. चा प्रतिनिधी नोआखलीत गांधींच्या मुक्कामी पोचला. त्याच्या विनंतीवर गांधीजी उद्‌गारले, 'हे लोक माझ्याकडे का येत आहेत? त्यांना म्हणावे जवाहरलाल नेहरूंकडे जा.' काँग्रेसचे नेते व गांधी यांच्यात निर्माण झालेले अंतरच या उद्‌गारांमधून सूचित होत होते. काँग्रेसच्या नेत्यांना आपण स्वातंत्र्य संपादन केले होते असे वाटत होते तर, देशाचे तुकडे करून हातात मिळालेली सत्ता हे कसले पूर्ण स्वातंत्र्य, असा गांधींचा प्रश्न होता.

सत्तांतराच्या वेळी भारतमंत्री असलेल्या लॉर्ड लिस्टोवेल यांनी १९७९ मध्ये म्हटले, 'Instead of granting the self-government which had been promised since 1917, or insisting on Federation, we clung to power under the cloak of respectability lent by protection for the minorities, until we were forced to part with it by our own reduced circumstances after four years of war. In the context of history the transfer of power in 1947 was no more than a mitigation of the failure of British policy to part with it earlier, and to a united India.'

[ "१९१७ पासून अभिवचन दिल्याप्रमाणे भारताला स्वातंत्र्य देण्याऐवजी किंवा संघराज्याचा आग्रह धरण्याऐवजी अल्पसंख्याकांच्या संरक्षणाच्या प्रतिष्ठित सोंगाखाली आम्ही सत्तेला चिकटून राहिलो. चार वर्षांच्या युद्धानंतरच्या आमच्या क्षीण अवस्थेमुळे सत्ता सोडणे आम्हाला भाग पडेपर्यंत आम्ही असे केले. इतिहासाच्या संदर्भात पाहता १९४७ साली जे सत्तांतर झाले ते सत्ता अगोदर सोडून देण्यात आणि एकसंध भारताकडे ती सुपूर्द करण्यात ब्रिटिश धोरणाला जे अपयश आले त्याचे उपशमनच होय."]

काँग्रेस व गांधी यांचे मार्ग या ठिकाणी पूर्णपणे वेगळे झाले. 'पदरी पडले पवित्र झाले' अशा भूमिकेतून काँग्रेसने अखंड भारताचा म्हणजेच हिंदुस्थान-पाकिस्तानातील हिंदू-मुसलमान ऐक्याचा विषय डोक्यातून काढून टाकला. उर्वरित देशालाच भारत हे नाव देऊन, त्याच्या 'विकासा'साठी प्रस्ताव ठेवले. गांधी काँग्रेसच्या संस्थापकांच्या मूळ ध्येयधोरणाशी व स्वप्नाशी एकनिष्ठ राहिले; ते त्यांचेही ध्येय व स्वप्न होते. हिंदुस्थानवरची सत्ता सोडून ब्रिटिश निघून गेले होते, पण जाताना त्यांनी हिंदी जनतेसाठी मोठे काम काढून ठेवले होते. हे काय नवेच काम त्यांनी निर्माण केले याची स्पष्टता गांधींच्या पुढील उद्‌गारांवरून येते. 'राजकीय व आर्थिक कारणांनी यापुढे हिंदुस्थानला दास्यात ठेवणे चुकीचे ठरणार आहे याचा त्यांना शोध लागला म्हणून ब्रिटिश येथून जात आहेत. त्यांचे जाणे म्हणूनच प्रामाणिक आहे. माणूस प्रामाणिक राहूनही आत्मवंचना करू शकतो हे मान्य व्हावे. आपण सोडून गेल्यानंतर भारताच्या लेखी अराजक वाढून ठेवलेले असेल तर अराजकाचा धोका ठेवून आपण भारत सोडू शकत नाही या त्यांच्या समजुतीत आत्मवंचना आहे. **दोन संघटित सैन्यांच्या लढाईचे हिंदुस्थान हे रणक्षेत्र बनवून जायला मात्र त्यांना कोणतीच खंत वाटत नाही. एका जमातीच्या लोकांना दुसऱ्या जमातीच्या लोकांविरुद्ध लढविण्याच्या धोरणावर शिक्कामोर्तब करून मग इंग्रज परत चालला आहे.**' (जाड ठसा प्रस्तुत लेखकाचा.) या खोड्यातून देशाच्या दोन्ही विभागांची व जमातींची मुक्तता करून हिंदुस्थानचे–भारत व पाकिस्तान यांचे–उच्चतर पातळीवर पुनरपि ऐक्य घडवून आणण्याचे कार्य नव्याने वाढून ठेवलेले होते.

निर्मलकुमार बोस १९४६–४७ या काळात काही काळ (नोआखलीमध्ये) गांधींचे सहायक/दुभाष्ये म्हणून सोबत होते. गांधींचे मानस त्यांनी जे जाणले त्यावरून हे स्पष्ट होते की, भारत व पाकिस्तान या दोन स्वतंत्र राज्यसत्ता असल्याचे स्वीकारीत असतानाच अजूनही हा एकच देश आहे ही गांधींची धारणा कायम होती. हिंदू व मुसलमान पुढारीवर्गांना कर्तृत्व प्रकट करण्यासाठी स्वायत्त भूप्रदेश व सत्ता प्राप्त झाली होती. या मर्यादेत दीर्घकालीन संघर्षाचे मोठे कारण दूर झाले होते. एकमेकांविषयीची मने निर्मळ, प्रेममय होऊन दोन

समाजांमध्ये जीवनाच्या इतर अंगांच्या संदर्भात बंधुभाव व सहकार्य प्रस्थापित होण्यास, एका अर्थी, परिस्थिती अनुकूल होती. फाळणीवरून झालेल्या दंगली, लूटमार, कत्तली यांमुळे उत्पन्न झालेला द्वेष, हिंस्रता, परस्परअविश्वास व भय यांचा निरास करणे मात्र सोपे नव्हते. नोआखलीत गांधींनी हे काम सुरू केले होते. हेच काम पुढे चालू ठेवण्यासाठी पंजाबमध्ये जाण्याची त्यांची योजना होती. पाकिस्तानातही त्यांना जावयाचे होते. या कार्यामधून राज्यसत्तांच्या पातळीवरील द्वैताच्या अतीत जाऊन पोचणारी अखंडता प्रस्थापित करता येईल, नव्हे करायलाच हवी; कारण तशी ती प्रस्थापित करण्यात यश मिळेल त्या दिवशीच पूर्ण स्वातंत्र्य मिळाले असे म्हणता येईल, अशी त्यांची भूमिका होती.

राज्यसत्ता दुभंगली तरी देश एकच आहे; कल्पनातीत हिंसाचार घडला असला तरी हिंदू व मुसलमान हे भाई-भाईच आहेत, या त्यांना प्रतीत झालेल्या सत्याला साक्षी राहण्याचे, या सत्याची शिकवण सतत देत राहण्याचे कार्य पार पाडीत असतानाच त्यांचा बळी गेला.

काँग्रेसच्या आयुष्यातील गांधीपर्वाची अखेर झाली.

**संदर्भ ग्रंथ**


१. जेफ्री अॅश, गांधी– ए स्टडी इन रेव्होल्यूशन, एशिया पब्लिशिंग हाऊस, मुंबई, १९६८.
२. बी. आर. नंदा, महात्मा गांधी, ए बायॉग्रफी, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, दिल्ली, १९८२.
३. निर्मलकुमार बोस, गांधी : कार्य व विचारप्रणाली, म. रा. साहित्य व संस्कृति मंडळ, मुंबई, १९७३.
४. रॉबर्ट पेन, द लाइफ अँड डेथ ऑफ महात्मा गांधी, द बॉडली हेड, लंडन, १९६९.
५. आर. जे. मूर, एस्केप फ्रॉम एम्पायर, क्लॅरेंडन प्रेस : ऑक्सफर्ड, १९८३.


⊙ ⊙ ⊙

# काँग्रेस आणि क्रांतिकारक

ग. प्र. प्रधान

१८१८ मध्ये पेशवाईचा अंत झाला आणि ब्रिटिशांची सार्वभौम सत्ता भारतात प्रस्थापित झाली. भारतात एक देशव्यापी राज्य नसल्यामुळे आपला देश परतंत्र झाला आहे ही जाणीव बहुसंख्य लोकांना नव्हती. मात्र ज्यांच्या हातातून सत्ता गेली त्या सत्ताधाऱ्यांना आणि ज्यांना ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या आधिपत्त्याखाली नोकरी करावी लागली त्या सैन्यातील शिपायांना परकीय राजवटीची झळ तीव्रतेने आणि ताबडतोब लागू लागली. स्वाभाविकपणेच त्यांच्यात असंतोष धुमसू लागला आणि त्याचाच उद्रेक १८५७ साली झाला. हा उठाव देशव्यापी नसल्यामुळे, तसेच ब्रिटिशांचे लष्करी सामर्थ्य प्रभावी आणि संघटित असल्यामुळे, ब्रिटिशांना तो मोडून काढता आला.

## दोन भिन्न प्रवाह

स्वातंत्र्यप्राप्तीसाठी झालेला हा पहिला मोठा प्रयत्न फसल्यानंतर भारतात दोन प्रवाह निर्माण झाले. सुशिक्षितांच्या नव्या पिढीतील विचारवंतांना पाश्चात्त्यांनी ज्ञान-विज्ञानाच्या क्षेत्रात केलेल्या प्रगतीचे महत्त्व समजून आले आणि भारताची प्रगती व्हावयाची असेल तर आधुनिक ज्ञान संपादन करून, समाजाचे प्रबोधन केले पाहिजे आणि त्यासाठी नव्या संस्था निर्माण केल्या पाहिजेत ही जाणीव त्यांना झाली. या विचारप्रवाहातूनच पुढे १८८५ मध्ये काँग्रेसचा जन्म झाला. दुसऱ्या प्रवाहाचे स्वरूप यापेक्षा अगदी भिन्न होते. भारतीय समाजात स्वदेश आणि स्वधर्म यांच्याबद्दल अभिमान निर्माण करून सामर्थ्यशाली संघटना उभारण्यासाठी काही व्यक्तींनी ऐहिक सुखाकडे पाठ फिरवून संन्यस्तवृत्तीने काम केले पाहिजे अशी ही विचारधारा होती. बंकिमचंद्र चतर्जींच्या 'आनंदमठ' कादंबरीत या मार्गाने काम करणाऱ्या देशभक्तांचे चित्रण आहे. सशस्त्र उठाव करून स्वातंत्र्य प्राप्त करून घेणे हे उद्दिष्ट समोर ठेवून, देशासाठी आत्मसमर्पण करणे हा क्रांतिकारकांचा मार्ग होता. यावरून हे स्पष्ट होते की, भारताची सर्व बाजूंनी अवनती झाली आहे ही जाणीव झाल्यावर, ही परिस्थिती बदलली पाहिजे आणि देशाची सर्वांगीण प्रगती झाली पाहिजे याबद्दल एकमत होते; परंतु प्रगतीचा मार्ग कोणता याबद्दल मात्र मूलभूत मतभेद होते. साध्य एकच होते परंतु साधनांबाबतचे दृष्टिकोन दोन टोकांचे होते.

न्या. रानडे हे सर्वांगीण सुधारणेचे समर्थक होते. आपल्या समाजजीवनातील दोषांची त्यांना जाणीव होती आणि हे दोष दूर केले पाहिजेत असे त्यांना वाटत होते. 'सार्वजनिक सभे'ची त्यांनी स्थापना केली आणि त्या संस्थेद्वारा लोकांना स्वदेशीची शिकवण देणे, त्यांच्या गाऱ्हाण्यांना वाचा फोडणे आदी कामे त्यांनी सुरू केली. दादाभाई नौरोजी यांनी मुंबईत आणि सुरेन्द्रनाथ बानर्जी यांनी कलकत्त्यामध्ये या दिशेनेच कार्य सुरू केले होते. या सर्व नेत्यांच्या मनावर ब्रिटिश उदारमतवादी तत्वज्ञानाचा प्रभाव होता. सार्वजनिक काम करताना राजकीय कार्यही तितकेच किंबहुना अधिक महत्त्वाचे आहे हे या नेत्यांना वाटू लागले. काँग्रेसची स्थापना हे या जाणिवेला आलेले फळ होते. ह्यूमसारख्या उदारमतवादी ब्रिटिश मुत्सद्द्याला हा प्रवाह स्वागतार्ह वाटत होता. लोकांची राजकीय आकांक्षा ही दडपून टाकता येत नाही याची जाण असलेल्या ह्यूम यांना, या आकांक्षेचा आविष्कार सनदशीर मार्गाने होणे महत्त्वाचे वाटत होते. न्या. रानडे, दादाभाई नौरोजी, सुरेन्द्रनाथ बानर्जी आदींच्या प्रयत्नांतून जी नवी शक्ती निर्माण झाली, तिला आकार देण्याच्या प्रयत्नांस ह्यूम व वेडरबर्न यांनी साह्य केले. मात्र त्यांनी काँग्रेस स्थापन केली हे विधान चुकीचे आहे. काँग्रेसच्या स्थापनेस त्यांचे प्रयत्न पोषक ठरले हे मात्र खरे.

अनुक्रमणिका

वासुदेव बळवंत फडके हे पुण्यात असताना सार्वजनिक सभेतर्फे होणाऱ्या व्याख्यानांना जात असत. त्या व्याख्यानांचा त्यांच्या मनावर प्रभाव पडला. परंतु या मार्गाने स्वराज्य मिळू शकणार नाही, स्वराज्यप्राप्तीसाठी सशस्त्र उठाव केला पाहिजे असे त्यांना तीव्रतेने वाटू लागले. या सशस्त्र बंडाचा त्यांनी केलेला प्रयत्न अयशस्वी झाला. परंतु क्रांतिकारक राजकारणातील ते एक महत्त्वाचे पाऊल होते हे विसरून चालणार नाही.

## काँग्रेस : देशव्यापी व्यासपीठ

स्वातंत्र्य मिळेपर्यंत काँग्रेस हे देशव्यापी व्यासपीठ होते, एका विशिष्ट विचारसरणीचा पुरस्कार करणारा तो पक्ष नव्हता, हे लक्षात ठेवले पाहिजे. सुरुवातीच्या काळात नेमस्त विचारांचा प्रभावच काँग्रेसवर होता. उच्च मध्यमवर्गातील सुशिक्षित पुढारी वर्षातून एकदा जमत, देशाच्या परिस्थितीची चर्चा करीत आणि आपल्या मागण्या ब्रिटिश सरकारसमोर ठरावरूपाने मांडीत. ठरावांची भाषाही मवाळ असे. तरुण क्रांतिकारकांना हे राजकारण दुबळेपणाचे वाटे. अर्जविनंत्या करून स्वराज्य मिळणार नाही, ब्रिटिशांना शस्त्राची भाषाच समजू शकेल असे त्यांना वाटत होते. ही तरुण क्रांतिकारक मंडळी तालमी व आखाडे चालवीत. बलोपासना करणे, शस्त्र चालवावयास शिकणे हे कार्यक्रम गुप्तपणे चालत. पुण्यात महर्षी अण्णासाहेब पटवर्धनांचा या प्रयत्नांना पाठिंबा व आशीर्वाद असे. चाफेकर बंधूंसारख्या क्रांतिकारकांचा ना. गोखल्यांसारख्या नेमस्त पुढाऱ्यांवर फार राग होता. नेमस्त हे सरकारचे हस्तक आहेत असेच त्यांना वाटे. ब्रिटिश लोक सत्तेच्या व शस्त्राच्या जोरावर लोकांमध्ये दहशत कशी निर्माण करतात हे पुण्यातील प्लेगच्या वेळी पाहिल्यावर, ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या मनामध्ये दहशत निर्माण करण्यासाठी चाफेकर बंधूंनी रँडचा खून केला. या वेळी लो. टिळकांनी रँडच्या खुनाचा निषेध करताना, सरकारी दडपशाहीचाही तीव्र निषेध केला आणि सरकारच्या जुलमी कृत्यांमुळेच काही तरुणांचा संताप अनावर होऊन त्यांनी हा अविवेकी मार्ग स्वीकारला असे स्पष्टपणे लिहिले. लो. टिळक हेही काँग्रेसचे एक नेते होते. त्यांचे मत हे केवळ वैयक्तिक नव्हते. लोकमान्यांनी ही मते मांडल्याबद्दल त्यांना दीड वर्षाची शिक्षा झाली. येरवडा तुरुंगात असताना लोकमान्यांनी दामोदर चाफेकरांचे मानसिक धैर्य अविचल रहावे म्हणून त्यांना भगवद्गीतेची प्रत पाठविली. तसेच चाफेकर बंधूंना फाशी दिल्यानंतर त्यांच्या उत्तरक्रियेचीही त्यांनी व्यवस्था केली. लो. टिळक सर्व देशभक्तांना कुटुंबीय मानीत असत याचेच हे द्योतक होते.

## लो. टिळकयुग

सुरुवातीस अन्य काँग्रेसपुढाऱ्यांप्रमाणेच उदारमतवादाच्या प्रभावाखाली असलेले लो. टिळक १८९० पासून प्रखर राष्ट्रवादी झाले आणि भारतीय राजकारणात जहाल मतांचा पुरस्कार करू लागले. काँग्रेस हे देशव्यापी व्यासपीठ असल्यामुळे ना. गोखल्यांसारख्या पुढाऱ्यांचे नेमस्त राजकारण आणि लो. टिळकांचे जहाल राजकारण हे दोनही प्रवाह काँग्रेसमध्ये एकाच वेळी नांदत होते. क्रांतिकारकांना जहालांचे राजकारण जवळचे वाटे, आणि त्यामुळेच १८९६ ते १९०८ या कालखंडात अनेक क्रांतिकारक हे काँग्रेसच्या जवळ आले होते.

'साधनानामनेकता' हे लो. टिळकांच्या राजकारणाचे सूत्र होते. ना. गोखले यांच्यासारख्या पुढाऱ्यांच्या संसदीय राजकारणाचे महत्त्व ते जाणत होते हे केसरीतील अनेक अग्रलेखांवरून दिसून येईल. परंतु गोखल्यांप्रमाणे ब्रिटिशांच्या न्यायबुद्धीवर त्यांचा विश्वास नव्हता. स्वराज्याच्या मागणीमागे जनतेची ताकद उभी केली पाहिजे ही लोकमान्यांची भूमिका होती. बंगालच्या फाळणीच्या वेळी झालेल्या आंदोलनाला लो. टिळकांनी आणलेली धार आणि त्या वेळी 'स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य' या चतुःसूत्रीचा त्यांनी केलेला पुरस्कार, यामधून त्यांच्या जहाल राजकारणाचे स्वरूप देशाला समजून आले.

लो. टिळकांचा क्रांतीच्या तयारीला पाठिंबा होता. ते स्वतः जनआंदोलनांचे नेतृत्व करीत असल्यामुळे क्रांतिकारकांच्या प्रयत्नांत कधी प्रत्यक्ष सहभागी झाले नाहीत. परंतु क्रांतिकारकांच्या प्रयत्नांना त्यांनी सतत पाठिंबा दिला. लो. टिळकांच्या पाठिंब्यामुळेच काकासाहेब खाडीलकर पिस्तुलाचा कारखाना काढण्याच्या प्रयत्नात नेपाळला गेले होते.

## क्रांतिकारकांच्या कार्याची व्याप्ती

भारताच्या स्वातंत्र्यलढ्यासाठी भारताबाहेरही प्रयत्न केले पाहिजेत, भारतातील ब्रिटिश राजवटीचे जुलमी स्वरूप जगासमोर मांडून भारताच्या स्वातंत्र्याच्या मागणीस अनेक देशांतून पाठिंबा मिळविला पाहिजे, असे काही क्रांतिकारकांना वाटत होते. श्यामजी कृष्ण वर्मा हे या प्रयत्नांचे सूत्रधार होते. लो. टिळकांचा या प्रयत्नांना पूर्ण पाठिंबा होता. डॉ. खानखोजे हे लोकमान्यांच्या प्रेरणेनेच अमेरिकेत गेले. श्यामजी कृष्ण वर्मा यांनी परदेशात येणाऱ्या भारतीय विद्यार्थ्यांसाठी शिष्यवृत्ती ठेवली होती. ही शिष्यवृत्ती घेणाऱ्या विद्यार्थ्यांनी उच्च ज्ञान संपादन करून देशसेवा करावी अशी अपेक्षा असे. या शिष्यवृत्तीसाठी लोकमान्यांनी श्यामजी कृष्ण वर्मांच्याकडे सावरकरांच्या नावाची शिफारस केली होती. ना. गोखले जेव्हा इंग्लंडला गेले होते त्या वेळी स्वा. सावरकरांनी त्यांना एका सभेत बोलण्यासाठी निमंत्रण दिले होते, परंतु गोखले यांनी ते नाकारले. श्यामजी कृष्ण वर्मा, मॅडम कामा आदी मंडळींचे कार्य गोखले यांना संमत नव्हते. म्हणजे काँग्रेसमधील जहाल गटाचा क्रांतिकारकांना पाठिंबा आणि नेमस्तांचा विरोध अशी परिस्थिती होती. काँग्रेसच्या व्यासपीठावरून या प्रश्नाबाबत अधिकृत भूमिका घेतली नसली तरी काँग्रेसच्या ठरावातून सनदशीर मार्गाने स्वराज्य मिळविण्यासाठी प्रयत्न केले जातील अशीच भूमिका असे.

अरविंद घोष हे क्रांतिकारक चळवळीचे स्फूर्तिदाते. अरविंदबाबूंनी जे लेखन केले त्यामुळे बंगालमधील व अन्य प्रांतांतील अनेक तरुणांना प्रेरणा मिळाली. क्रांतिकारकांची सशस्त्र संघटना उभारून ब्रिटिशांच्या विरुद्ध सशस्त्र बंड करणे हे उद्दिष्ट डोळ्यांसमोर ठेवून अरविंदबाबू आणि त्यांचे सहकारी यांचे कार्य सुरू होते. अरविंदबाबू काँग्रेसमधील मवाळांवर अतिशय कडक टीका करीत. ना. गोखल्यांसारख्या मवाळांमुळे क्रांतीची धार बोथट होते असे त्यांचे मत होते. १९०२ साली अहमदाबाद येथील काँग्रेसच्या अधिवेशनात लो. टिळक व अरविंदबाबू यांची गाठ पडल्यावर ते दोघेही मंडपाबाहेर गेले व मैदानात एका बाजूला जाऊन बसले. अरविंदबाबूंना काँग्रेसच्या अधिवेशनातील चर्चा व ठराव निरर्थक वाटत. अरविंदांचे स्फूर्तिदायी व्यक्तिमत्त्व आणि तरुणांच्या अंतःकरणात देशभक्तीची ज्वाला भडकविण्याचे त्यांचे सामर्थ्य याबद्दल लो. टिळकांना मोठे आकर्षण वाटे. जुन्या नेमस्त पुढाऱ्यांच्या सौम्य, मवाळ भाषणांपेक्षा अरविंदबाबूंच्या तेजस्वी शब्दांमध्ये कितीतरी अधिक सामर्थ्य होते, आणि या सामर्थ्याचा स्वातंत्र्यचळवळीला धार आणण्यासाठी उपयोग केला पाहिजे असे लोकमान्यांचे मत होते. या कालखंडात क्रांतिकारक व काँग्रेसमधील जहाल पुढारी अधिकाधिक एकत्र आले, आणि या देशातील क्रांतिकारक कार्याचे एकसूत्रीकरण करण्यासाठी ऑल इंडिया कौन्सिल गुप्तपणे स्थापन करण्यात आले. लो. टिळक, लाला लजपतराय आणि अरविंद घोष हे या कौन्सिलचे तीन सभासद होते, असे अरविंदबाबूंचे सहकारी चारूचंद्र दत्त यांनी लिहिले आहे.

मात्र टिळक व अरविंद घोष यांच्या भूमिकेत एक मूलभूत महत्त्वाचा फरक होता. लो. टिळकांचा क्रांतीच्या तयारीस पाठिंबा होता; परंतु दहशतवादी, अतिरेकी कृतीस विरोध होता. लो. टिळक १९०७ साली नाशिकला गेले असताना स्वा. सावरकर यांनी स्थापलेल्या अभिनव भारत गटातील क्रांतिकारकांची व त्यांची भेट झाली; त्याबाबतची आठवण डॉ. वि. म. भट या अभिनव भारत संघटनेतील क्रांतिकारकांनी लिहिली आहे. ती पुढीलप्रमाणे : "लोकमान्य आले. त्यांनी आमचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले व सरळ रोकडा प्रश्न विचारला, की तुमच्या तत्त्वमंडनात काही कसूर नाही, पण तयारी मात्र किती आहे ते सांगा. "किरकोळ तयारीने काही होणार नाही...... जो मार्ग तुम्ही चोखाळू पाहता त्याची अद्याप वेळ आली नाही. म्हणून देश तयार होईपर्यंत तुम्ही धीर धरा व सावधपणे चाला," असे त्यांनी आम्हांस कळवळून सांगितले." यावरून व अन्य अनेक पुराव्यांवरून हे स्पष्ट होते की, लो. टिळकांचा क्रांतीच्या तयारीस पाठिंबा होता, परंतु देशव्यापी तयारी नसताना शस्त्राच्या साह्याने कृती करण्यास विरोध होता.

१९०८ साली सुरत येथे काँग्रेसचे जे अधिवेशन भरले त्यातील अध्यक्षपदावरून जहाल व मवाळांत

तीव्र मतभेद झाले व अधिवेशन उधळले गेले. या वेळी काँग्रेसमध्ये फूट पडू नये असे टिळकांचे मत होते आणि म्हणून नेमस्तांच्या 'मॉडरेट कन्व्हेनशन्' मध्ये सर्वांनी जावे अशी भूमिका त्यांनी अरविंदबाबूंच्या समोर मांडली. अरविंदबाबूंचा नेमस्तांबरोबर कोणतेही सहकार्य करण्यास विरोध होता. लो. टिळक त्यांचे मत अरविंदबाबूंना व अन्य क्रांतिकारकांना पटवून देऊ शकले नाहीत. त्या वेळी लोकमान्यांनी त्यांना इशारा दिला की काँग्रेसमध्ये फूट पडली तर जहाल चळवळीस अलग पाडून ब्रिटिश सरकार त्या चळवळीवर आघात करील आणि तो आघात सोसण्याचे सामर्थ्य जहाल चळवळीत नाही. हे सांगितल्यावरही जेव्हा अरविंदबाबूंनी त्यांची भूमिका बदलण्याचे नाकारले, तेव्हा काँग्रेसमध्ये फूट पडू नये अशी भूमिका असूनही लो. टिळकांनी अरविंदांच्याबरोबर, मॉडरेट् कन्व्हेन्शनच्या बाहेर राहण्याचे ठरविले. सरकार जो आघात क्रांतिकारक चळवळीवर करील तो प्रथम स्वतः सोसायचा असा लो. टिळकांचा निर्धार होता.

या अधिवेशनानंतर थोड्याच दिवसांत अरविंदबाबूंचे क्रांतिकारक सहकारी खुदिराम बोस यांनी पहिला बॉम्ब उडवला आणि सरकारचे जबरदस्त दमनचक्र सुरू झाले. या वेळी लो. टिळक निर्भयपणे क्रांतिकारकांच्या बाजूला उभे राहिले आणि त्यामुळे राजद्रोहाचा खटला होऊन त्यांना ६ वर्षांची शिक्षा झाली. पहिला आघात त्यांनी सोसला. सरकारने दडपशाहीचा वरवंटा फिरवून क्रांतिकारक चळवळ दडपून टाकली. येथून जवळजवळ पुढील बारा वर्षे क्रांतिकारकांचा व काँग्रेसचा काही संबंध राहिला नाही.

लो. टिळक १९१४ साली सुटून आले व पहिले महायुद्ध सुरू झाले. काही क्रांतिकारकांनी, "इंग्लंडची अडचण ती भारताची संधी" हे सूत्र धरून सशस्त्र बंड करण्याचे प्रयत्न केले आणि ते फसले. या प्रयत्नांतच पिंगळे हे क्रांतिकारक फाशी गेले. सशस्त्र उठावाच्या बाबतीत चिदंबरम पिल्ले हे क्रांतिकारक लोकमान्यांना भेटले असताना लोकमान्यांनी 'परिस्थिती सशस्त्र उठावास अनुकूल नाही. या वेळी सरकारवर दडपण आणून काही अधिकार पदरात पाडून घेतले पाहिजेत,' अशी स्पष्ट भूमिका मांडली.

## म. गांधीयुग

१९२० नंतर म. गांधींकडे काँग्रेसचे नेतृत्व गेले. म. गांधींनी अहिंसक मार्गानेच चळवळ चालविण्याचे ठरविले. अहिंसा ही त्यांची जीवननिष्ठा होती. शूराच्या अहिंसेचे त्यांनी समर्थपणे प्रतिपादन केले आणि प्रत्येक भारतीयाने त्याग केल्याशिवाय स्वराज्य मिळणार नाही हे स्पष्टपणे सांगितले. क्रांतिकारकांची भूमिका "काही निवडक ध्येयवादी व्यक्तींनी बलिदान करून देशाला स्वातंत्र्यासाठी प्रेरणा दिली पाहिजे" अशी होती. याचे इंग्रजीत वर्णन– "Maximum sacrifice by minimum persons" असे केले जात असे. गांधीजींची भूमिका "At least minimum sacrifice by maximum persons" अशी होती. मूठभर देशभक्तांनी बलिदान करावयाचे आणि बाकीच्यांनी त्यांचे पोवाडे गायचे हे म. गांधींना मान्य नव्हते. ब्रिटिश साम्राज्याच्या प्रचंड शस्त्रास्त्रांसमोर लक्षावधी भारतीय निर्भयपणे उभे राहतील आणि बलिदान करण्याचे धैर्य दाखवतील तेव्हाच ब्रिटिश साम्राज्याची चौकट मोडून पडेल अशी म. गांधींची भूमिका होती. लो. टिळक व म. गांधी हे दोघेही नेते जनआंदोलनाचे पुरस्कर्ते होते. परंतु क्रांतिकारकांच्या बाबत दोघांची भूमिका मूलतः भिन्न होती. लो. टिळकांनी क्रांतिकारकांना उघड पाठिंबा दिला आणि त्यांच्या त्यागाचा गौरव केला. म. गांधींना क्रांतिकारकांच्या देशभक्तीबद्दल संदेह नव्हता; परंतु क्रांतिकारकांचा मार्ग त्यांना चुकीचा वाटे. ते क्रांतिकारकांना 'चुकीच्या मार्गाने जाणारे देशभक्त' म्हणत.

सशस्त्र क्रांतीवर विश्वास असलेले अनेकजण १९२० च्या चळवळीत सामील झाले. स्वा. सावरकरांचे सहकारी असलेले अभिनव भारत चळवळीतील क्रांतिकारक अय्यर हे त्यांपैकी एक होत. व्ही. व्ही. गिरी यांचाही, सशस्त्र क्रांतीच्या मार्गानेच स्वराज्य मिळेल, असा विश्वास होता. परंतु तेही सत्याग्रहात सामील झाले. चौरिचोरा येथील दंगलीनंतर म. गांधींनी चळवळ मागे घेतली तेव्हा नेत्यांचा व कार्यकर्त्यांचा फार मोठा अपेक्षाभंग झाला. यानंतर

अनुक्रमणिका

चंद्रशेखर आझाद– ज्यांनी सत्याग्रहचळवळीत फटक्यांची शिक्षा भोगली होती, क्रांतिकारक बनले, आणि सशस्त्र संघटना उभारण्यास त्यांनी प्रारंभ केला.

## क्रांतिकारकांची नवी दिशा

१९१७ साली रशियन राज्यक्रांती झाली आणि तिचा फार मोठा परिणाम भारतातील क्रांतिकारकांवर झाला. ब्रिटिश साम्राज्य–विरोधी सशस्त्र क्रांती करून समाजवादी भारत निर्माण करावयाचा हे या क्रांतिकारकांचे ध्येय होते. भगतसिंग, चंद्रशेखर आझाद यांच्या क्रांतिकारक संघटनेचे नाव 'हिंदुस्थान सोशलिस्ट रिपब्लिकन् असोसिएशन' हे होते. या क्रांतिकारकांचा काँग्रेसशी प्रत्यक्ष संबंध नसला तरी देशातील राजकीय घडामोडीबद्दल ते अतिशय जागरूक होते. नागरी स्वातंत्र्याची गळचेपी करणाऱ्या पब्लिक सेफ्टी बिलाविरुद्ध देशभर असंतोष निर्माण व्हावा यासाठी भगतसिंग व बटुकेश्वर दत्त यांनी दिल्लीला सेंट्रल असेंब्लीत बॉम्ब टाकला. म. गांधींनी या कृत्याचा निषेध केल्यामुळे क्रांतिकारक अतिशय नाराज झाले. परंतु म. गांधींची भूमिका व काँग्रेसची भूमिका यांत मूलभूत फरक होता. काँग्रेसने अहिंसा हे तत्त्व म्हणून कधीही स्वीकारले नव्हते. मात्र शांततेच्या मार्गाने चळवळ चालविली जाईल असे काँग्रेसचे धोरण होते. राजकीय चळवळ प्रभावी करण्याचा मार्ग म्हणून फक्त अहिंसा स्वीकारणे ही काँग्रेसची भूमिका अहिंसा हे तत्त्वज्ञान व जीवननिष्ठा मानणाऱ्या गांधीजींच्या भूमिकेपेक्षा भिन्न होती. पं. जवाहरलाल नेहरूंनी त्यांच्या आत्मचरित्रात याचे स्पष्टीकरण अतिशय मार्मिकपणे केले असून म. गांधींबरोबर त्यांचा तात्त्विक मतभेद होता हे निःसंदिग्धपणे मांडले आहे.

## काँग्रेस व गांधीजी : भिन्न भूमिका

गांधी–आर्यविन कराराच्यावेळी भगतसिंग, राजगुरू, सुखदेव यांची फाशी रद्द व्हावी, अशी अट गांधीजींनी घालावी अशी अनेकांची अपेक्षा होती. परंतु गांधीजींनी हे स्पष्टपणे नाकारले. कराची काँग्रेस अधिवेशन सुरू होण्याच्या वेळेस ज्या वेळी भगतसिंग आदींना फाशी दिल्याची बातमी आली त्या वेळी अनेक तरुण कार्यकर्त्यांनी सरकारचा तीव्र निषेध केला व गांधीजींच्या विरोधीही घोषणा दिल्या. त्या वेळी गांधीजींचे काही एकनिष्ठ अहिंसावादी अनुयायी सोडले तर, सर्व काँग्रेस क्रांतिकारकांच्या बलिदानाने क्षुब्ध झाली होती. पंडित नेहरूंनी ब्रिटिश साम्राज्य व भारतीय जनता यांच्यामध्ये हुतात्म्यांची प्रेते आहेत आणि ब्रिटिशांचे हे दुष्ट कृत्य भारतीय जनता कधीही विसरणार नाही, अशा आशयाचे उद्‌गार काढले. क्रांतिकारकांच्या त्यागापुढे काँग्रेस नतमस्तक झाली होती याचेच हे उद्‌गार द्योतक होते.

१९२५ सालानंतर सुभाषचंद्र बोस यांचा भारताच्या राजकीय क्षितिजावर उदय झाला. सुभाषबाबू हे पं. नेहरूंप्रमाणेच तरुणांचे लाडके नेते होते. काँग्रेसचे ते एक अत्यंत लोकप्रिय नेते होते. त्यांचा क्रांतिकारक मार्गावर विश्वास होता आणि देशातील अनेक तरुण त्यांच्यापासून स्फूर्ती घेऊन क्रान्तीची तयारी करीत होते. सुभाषबाबूंचा, बंगालमधील व भारतातील अनेक क्रान्तिकारक गटांशी संबंध होता.

१९३४ साली काँग्रेस समाजवादी पक्षाची स्थापना झाली. या पक्षाची ज्याप्रमाणे समाजवादी मूल्यांवर निष्ठा होती त्याचप्रमाणे स्वातंत्र्य चळवळीच्या मुख्य प्रवाहात राहून त्या चळवळीस क्रान्तिकारक रूप देणे हेही या पक्षातील नेत्यांचे उद्दिष्ट होते. १९३९ मध्ये दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर देशव्यापी चळवळ व्हावी अशी या पक्षाची भूमिका होती. १९४० मध्ये म. गांधींनी वैयक्तिक सत्याग्रह सुरू केला त्या वेळी अशा सत्याग्रहामुळे लढ्याला धार येणार नाही असे देशातील सर्व जहालांना वाटले. काँग्रेस समाजवादी नेते जयप्रकाश नारायण हे १९४१ मध्ये देवळी येथील तुरुंगात असताना गुप्त चळवळ कशी चालवावी याच्या तपशीलवार सूचना देणारे पत्र त्यांनी बाहेर पाठविण्याचा प्रयत्न केला, परंतु तो प्रयत्न यशस्वी न होता ते पत्रक पोलिसांच्या हाती पडले. सरकारने या पत्रकास खूप प्रसिद्धी दिली. जयप्रकाश नारायण हे हिंसक मार्गाने स्वातंत्र्यलढा चालवावा असे सांगत असल्यामुळे गांधीजी त्यांचा निषेध करतील अशी सरकारची अपेक्षा होती. परंतु गांधीजींनी प्रसिद्ध केलेल्या पत्र-

कात म्हटले की, जयप्रकाश यांचा निषेध करण्याचा ब्रिटिश सरकारला अधिकार नाही. गांधीजींनी, जयप्रकाश जर हिंसेचा पुरस्कार करीत असतील, तर ते बरोबर नाही असे म्हणतानाच ब्रिटिश साम्राज्य हे हिंसेवर आधारलेले असल्यामुळे त्या साम्राज्याविरुद्ध लढताना जगात अनुसरली जाणारी पद्धत स्वीकारावी असे अनेकांप्रमाणे जयप्रकाशांना वाटले व ते स्वाभाविकही आहे, असेही म्हटले. काँग्रेसमधील अनेक जहाल कार्यकर्त्यांना जयप्रकाशजींच्या पत्रकामुळे, पुढील लढ्याचे स्वरूप काय असेल याची कल्पना आली.

## चलेजाव आंदोलन

१९४२ च्या लढ्यापूर्वी समाजवादी नेत्यांनी काही ठिकाणी कार्यकर्त्यांची शिबिरे घेतली व त्या शिबिरांतून भूमिगत चळवळीचा कार्यक्रम सांगितला. ९ ऑगस्ट १९४२ ला म. गांधी व वर्किंग कमिटीचे सदस्य पकडले गेल्यावर अनेक समाजवादी नेत्यांबरोबरच सुचेता कृपलानी, रंगराव दिवाकर आदी नेतेही भूमिगत झाले. तारा तोडणे, रूळ उखडणे, टेलिग्राफचे खांब पाडणे आदी विध्वंसक कार्यक्रम अनेक क्रान्तिकारक तरुणांनी देशभर सुरू केला आणि कुमारप्पांसारख्या अनेक गांधीवादी नेत्यांनीही त्याचे समर्थन केले. मुजफ्फरपूर, बालिआ, मिदनापूर व सातारा या ठिकाणी लोकांनी प्रतिसरकार स्थापन केले. या क्रांतिकारी प्रयत्नात बहुसंख्य काँग्रेसजनच होते. समाजवादी पक्ष हा काँग्रेस–समाजवादी पक्ष होता. याचाच अर्थ १९४२ च्या चळवळीत म. गांधींच्या अटकेनंतर बाहेर राहिलेल्या काँग्रेसजनांनी सशस्त्र प्रतिकार व विध्वंसक कार्य हे मार्ग अनुसरून ब्रिटिश साम्राज्यविरोधी प्रतिकाराचा लढा दीर्घकाल चालविला. लढ्याचा जोर ओसरल्यावर काही काळ हिंसा-अहिंसेबाबत वादविवाद झाले. परंतु पंडित नेहरू सुटून आल्यावर त्यांनी जाहीरपणे निवेदन केले की, '१९४२ च्या चळवळीत झालेल्या सर्व प्रकारांची जबाबदारी स्वीकारण्यास मी तयार आहे, कारण ज्या ब्रिटिशविरोधी वातावरणात हे प्रकार घडले, ते निर्माण करणाऱ्यांमध्ये मी होतो.' पं. नेहरूंच्या या निवेदनामुळे हिंसा-अहिंसेच्या वादावर पडदा पडला आणि काँग्रेस व क्रांतिकारक यांच्यात दुजाभाव नव्हता हे प्रस्थापित झाले.

## सुभाषबाबू व आझाद हिंद सेना

१९४० मध्ये सुभाषबाबूंना सरकारने कलकत्त्यात घरीच स्थानबद्ध करून ठेवले असताना ते तेथून गुप्तपणे देशाबाहेर गेले. त्या वेळी म. गांधींनी ताबडतोब त्यांच्याबाबत शरद बोस यांच्याकडे चौकशी केली. सुभाषबाबू प्रथम जर्मनीस गेले, नंतर पाणबुडीतून जपानला जाऊन त्यांनी आझाद हिंद सरकारची स्थापना केली; तसेच जपान्यांनी कैद केलेल्या भारतीय सैनिकांतून व अधिकाऱ्यांतून त्यांनी आझाद हिंद फौज उभारली हा रोमहर्षक इतिहास प्रत्येक भारतीयास ठाऊक आहेच. पुढे युद्धाचे पारडे फिरल्यावर आझाद हिंद सेनेस शरण जावे लागले. या सेनेतील काही अधिकाऱ्यांवर लष्करी कोर्टात खटला भरण्याचे ब्रिटिशांनी ठरविले. १९४५ साली काँग्रेस वर्किंग कमिटीच्या सदस्यांची सुटका झाल्यावर वर्किंग कमिटीने ठराव करून आझाद हिंद सेनेतील अधिकाऱ्यांचा खटला लढविण्याचे ठरविले आणि आरोपींचे प्रमुख वकील भुलाभाई देसाई यांचे मदतनीस म्हणून पंडित नेहरूंनीही वकिलाचा काळा डगला चढविला. भुलाभाई देसाईंनी खटला लढविताना, स्वातंत्र्यासाठी सैनिकांना बंड करण्याचा अधिकार आहे असाच युक्तिवाद केला. आझाद हिंद सरकार आंतरराष्ट्रीय कायद्यानुसार अस्तित्वात होते व त्यांच्यातर्फे लढणारे सैनिक त्यांचे देशाबाबतचे कर्तव्य करीत होते, असे भुलाभाईंनी सडेतोडपणे सांगितले. या काळात पंडितजी एका जाहीर भाषणात म्हणाले, "जे राष्ट्र स्वातंत्र्याकरिता बंड करीत नाही ते मृत राष्ट्रच मानावे लागेल." या सर्व घटनांवरून सुभाषबाबूंच्या क्रांतिकारी प्रयत्नांस काँग्रेसने अधिकृतरीत्या मान्यता दिली हे सिद्ध होते. सुभाषबाबूंनीही सायगांव येथे झेंडावंदनाच्या वेळी भाषण करताना आझाद हिंद फौजेच्या मुक्तिसंग्रामास महात्माजींचे आशीर्वाद मागितले होते. काँग्रेस व क्रांतिकारक अशा तऱ्हेने स्वातंत्र्यसंग्रामात एकरूप होऊन गेले.

## नाविक बंड

१९४६ साली मुंबई, कराची, कलकत्ता आदी ठिकाणी जे नाविकांचे बंड झाले त्याला सर्व जनतेने

उत्स्फूर्त पाठिंबा दिला. नाविकांचे बंड हा आझाद हिंद सेनेचाच पुढला अध्याय होता. सरदार वल्लभ-भाई पटेल यांनी जरी नाविकांना लढा मागे घेण्यास सांगितले, तरी नाविकांच्या न्याय्य मागण्या मान्य होतील असे स्पष्ट आश्वासन दिले. भारताला स्वातंत्र्य मिळण्यासाठी येथील जनतेने उठाव करणे आणि सैनिकांनी बंड करणे हे एकाच वेळी होणे आवश्यक आहे ही क्रांतिकारकांची भूमिका होती आणि काँग्रेसच्या नेत्यांनी स्वातंत्र्यलढ्याच्या अखेरच्या पर्वात ती स्वीकारली. नाविक बंडाला जनतेचा मिळालेला प्रतिसाद पाहून यापुढे ब्रिटिश साम्राज्य भारतात टिकू शकणार नाही हे ब्रिटि-शांनी ओळखले व पंतप्रधान अ‍ॅटली यांनी कॅबिनेट् मिशन पाठविण्याची घोषणा केली. लढ्याचे पर्व संपले व वाटाघाटींचे पर्व सुरू झाले. या पर्वात क्रांतिकारक बाजूला फेकले गेले आणि जुन्या काँग्रेस नेत्यांनी वाटाघाटींची सूत्रे हाती घेतली. पुढे स्वातंत्र्य आले त्याचबरोबर भारताची फाळणी झाली.

**महाभारतातील विविध पर्वे**

स्वातंत्र्यलढा हे एक महाभारतच होते. विविध पर्वांत विविध घटना घडल्या. काँग्रेस व क्रांतिकारक ही सुरुवातीस दोन टोके होती. नंतर टिळकयुगात जहाल व क्रांतिकारक जवळ आले. गांधीयुगात म. गांधींनी अहिंसेचा तत्त्वज्ञान म्हणून स्वीकार केला तरी काँग्रेसने ती भूमिका कधीच घेतली नाही. त्यामुळे अनेक काँग्रेसजनांचे क्रांतिकारकांबरोबर निकटचे संबंध होते. संसदीय कामास जेव्हा प्राधान्य मिळे तेव्हा क्रांतिकारक व काँग्रेस यांच्यात दुरावा निर्माण होत असे. लढ्याच्या काळात काँग्रेस व क्रांतिकारक जवळ येत असत. स्वातंत्र्यलढ्याच्या अखेरच्या पर्वात काँग्रेस व क्रांतिकारक यांचा उज्ज्वल त्याग आणि भव्य पराक्रम यांचे एकत्रित दर्शन घडले आणि त्यामुळेच भारताची ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या मगरमिठीतून मुक्तता झाली.

⊙ ⊙ ⊙

# काँग्रेस आणि समाजवादी चळवळ ( १९२१–१९४७ )

प्र. म. बांदिवडेकर

## १. प्रास्ताविक

काँग्रेसच्या नेतृत्वाखाली झालेल्या भारतीय स्वातंत्र्य-आंदोलनावर १९२१ ते १९४७ या काल-खंडामध्ये समाजवादी विचारसरणी आणि चळवळ यांचा जो प्रभाव पडला त्यामुळे भारतीय राष्ट्र-वादाला वैशिष्ट्यपूर्ण सामाजिक आणि राजकीय आशय प्राप्त झाला. या कालखंडापूर्वीदेखील काँग्रे-सने सामान्यजनांच्या हक्कांसाठी आणि कल्याणा-साठी वेळोवेळी लढे उभारले यात शंका नाही. तरी-सुद्धा राष्ट्रीय चळवळीवर प्रभुत्व होते ते उच्च-शिक्षित मध्यम व वरिष्ठवर्गीय नेत्यांचे. या नेतृ-त्वाला जनकल्याणाची तळमळ असली तरी कोण-त्याही अर्थाने ते समाजवादी विचारांनी प्रभावित झाले होते असे म्हणता येणार नाही.

समाजवादी विचारांचा भारतामध्ये शिरकाव झाला तो पहिल्या महायुद्धानंतरच. तोपर्यंत भारतीय नेतृत्वावर बेंथॅम व जॉन स्टुअर्ट मिल यांसारख्या विचारवंतांच्या उपयुक्ततावादी आणि उदारमतवादी विचारप्रणालीची छाप होती. समाजवादी विचार-प्रणालीचे आकर्षण राष्ट्रीय धुरिणांना न वाटणे ही तशी फारशी आश्चर्याची गोष्ट मानावयास नको. एक तर सर्व राष्ट्रीय नेत्यांची वाढ झाली ती उदार-मतवादी शिक्षणाच्या प्रभावाखाली. दुसरी, महत्त्वाची गोष्ट म्हणजे ब्रिटिशांच्या कठोर नियंत्रणामुळे समाजवादी साहित्याचा प्रसार भारतामध्ये तोपर्यंत होऊ शकला नव्हता. या नेत्यांचा समाजवादी विचा-रांशी जो काही परिचय झाला तो तत्कालीन उदार-मतवादी विचारवंतांच्या समाजवादी विचारप्रणाली-वरील टीकेमधूनच. परंतु तिसरे आणि सर्वांत मह-त्त्वाचे कारण असे होते की, स्वराज्यप्राप्तीच्या निकटच्या परंतु अत्यंत बिकट अशा उद्दिष्टापुढे त्यांना समाजवादासारखे एखादे दूरगामी ध्येय मृग-जळासारखे वाटणे स्वाभाविकच होते. शिवाय अशा प्रकारचे भारतीय समाजामध्ये आमूलाग्र परिवर्तन घडवून आणणारे ध्येय स्वीकारल्याने काँग्रेसमधील विविध हितसंबंधी वर्ग व गटांना उघड आव्हान देऊन काँग्रेसच्या विघटनाच्या प्रक्रियेला चालना दिल्यासारखेच झाले असते.

तसे पाहिले तर दादाभाई नौरोजी, गोखले, लोकमान्य टिळक व अन्य अनेक राष्ट्रीय नेते ब्रिटन-मधील समाजवादी विचारप्रणाली व कामगारचळ-वळ यांच्याशी संबंधित अशा नेत्यांच्या संपर्कात आले होते. तरीही आपले तत्कालीन नेते समाज-वादी विचारप्रणालीने फारसे आकृष्ट झाल्यासारखे दिसत नाहीत.

बोल्शेव्हिक क्रांतीनंतर मात्र हळूहळू मार्क्स व एंगेल्स यांच्या विचारांचा प्रभाव भारतीय तरुणांवर वाढू लागणे अटळ होते. झारच्या अनियंत्रित आणि जुलमी राजवटीप्रमाणेच एक दिवस ब्रिटिशांच्या भारतावरील साम्राज्यसत्तेचा अंत होणे शक्य आहे असा आशावाद भारतीय तरुणांमध्ये निर्माण झाला. परंतु ब्रिटिश वृत्तपत्रांमधून बोल्शेव्हिक क्रांतिसंबं-धीची जी वर्णने येत, त्यांमध्ये या क्रांतीतील रक्त-रंजितपणा आणि अमानुष हत्या यांवर भर अस-ल्याने काँग्रेसच्या नेत्यांच्या तत्संबंधीच्या प्रतिक्रिया सावधपणाच्या होत्या. एक मात्र निश्चित की रशि-यन क्रांती, १९२१–२२ च्या असहकार आंदोलनाचे अपयश व अन्य अनेक कारणांनी काँग्रेसचे नेते आणि कार्यकर्ते यांच्यामध्ये एका विचारमंथनाला सुरुवात झाली.

एव्हाना काँग्रेसचे रूपांतर सामान्यजनांचे पाठबळ असलेल्या सामर्थ्यवान संघटनेमध्ये करण्याची आव-श्यकता नेतृत्वाला वाटू लागली होती. जनसामा-न्यांना आकृष्ट करायचे तर काँग्रेसने व्यापक पायावर आधारित अशा सामाजिक, आर्थिक कार्याला वचनबद्ध व्हायला हवे हेही स्पष्ट होते. स्वराज्यप्राप्तीचे ध्येय



अनुक्रमणिका

कितीही महत्त्वाचे असले तरी त्याला सामाजिक आणि आर्थिक विचारांचे अधिष्ठान नसेल तर ते सामान्य-जनांना आकृष्ट करू शकणार नाही अशी जाणीव काँग्रेस नेत्यांना होऊ लागली. ब्रिटिशांच्या साम्राज्य-वादी धोरणामुळे एका बाजूने या देशातील स्वयंपूर्ण ग्रामीण अर्थव्यवस्था मोडकळीस आली तर दुसऱ्या बाजूने आर्थिक विकासाच्या मार्गामध्ये अनेक अड-थळे उपस्थित झाले. जमीनदार, जागीरदार यांच्या-सारख्या शोषक घटकांची समाजामध्ये निर्मिती झाली. दारिद्र्य, उपासमार, दुष्काळ, शेतीवरील वाढता भार, औद्योगीकरणाचा अभाव, नवीन चलनव्यवस्था व बाजारव्यवस्था या सर्व कारणांनी भारतीय अर्थव्यवस्थेचा कणाच मोडला आणि बहु-संख्य भारतीय जनतेच्या हालअपेष्टांना पारावार राहिला नाही. काँग्रेसचे रूपांतर एका व्यापक आणि गतिमान संघटनेमध्ये झाल्याखेरीज ब्रिटिशांच्या साम्राज्यवादी सत्तेशी झुंज घेता येणार नाही असा विचार म्हणूनच नेते आणि कार्यकर्ते यांच्या मना-मध्ये रुजू लागला.

या सर्व परिस्थितीच्या संदर्भात स्वातंत्र्यपूर्व काळात समाजवादी विचारप्रणालीकडे काँग्रेसची वाटचाल घडवून आणण्यामध्ये अनेक व्यक्ती, राज-कीय गट व संघटना कारणीभूत झाल्या. त्यांमध्ये प्रामुख्याने पं. जवाहरलाल नेहरू, काँग्रेस समाज-वादी पक्ष, मानवेंद्रनाथ रॉय आणि साम्यवादी पक्ष यांचा विशेषत्वाने उल्लेख करावयास हवा.

१८८० च्या सुमारास कामगारवर्गाच्या कल्या-णाच्या आणि संघटनेच्या दृष्टीने प्रयत्न होऊ लागले होते. कामगारसंघटनेच्या उभारणीचा पहिला प्रयत्न १८८४ मध्ये मुंबईमध्ये लोखंडे यांनी केला असला तरी १९१८ मध्ये बी. पी. वाडिया यांनी मद्रास येथे मजूरसंघटना स्थापन करून भारतातील मजूरचळवळीस गती दिली असे म्हणावयास हरकत नाही. परिणामी १९२० मध्ये लाला लजपतराय यांच्या अध्यक्षतेखाली आयटकची स्थापना झाली. सुरुवातीपासूनच आयटक आणि काँग्रेसचे घनिष्ट संबंध होते. सप्टेंबर १९२० मध्ये कलकत्ता येथे भरलेल्या काँग्रेसच्या खास अधि-वेशनामध्ये असहकारासंबंधीचा ठराव मंजूर झाला. काँग्रेसच्या या अधिवेशनाचे तसेच मुंबई येथे ऑक्टोबर १९२० मध्ये भरलेल्या आयटकच्या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्ष लाला लजपतराय असणे हे काँग्रेसच्या बदलत्या स्वरूपाचे तसेच समाजवादी विचारप्रणालीकडील वाटचालीचे महत्त्वाचे निदर्शक मानता येईल. १९२१ मध्ये काँग्रेसने आयटकच्या स्थापनेचे स्वागत केले आणि मजूरसंघटना हा राष्ट्रीय चळवळीचा एक अविभाज्य भाग बनला.

## २. काँग्रेस, एम्. एन्. रॉय व साम्यवादी

रशियातील बोल्शेव्हिक क्रांतीने भारावून गेलेल्या अनेक युवकांनी मार्क्सवादी विचारप्रणालीचा स्वीकार केला व त्यातूनच पुढे साम्यवादी पक्षाचा उदय झाला. ताश्कंद मिलीटरी स्कूल येथे १९२० च्या शेवटी भारतीय साम्यवादी पक्षाची स्थापना होऊन १९२१ मध्ये कम्युनिस्ट इंटरनॅशनलला तो संलग्न झाला अशी साम्यवादी पक्षाच्या अधिकृत प्रका-शनामध्ये नोंद असून मुझफ्फर अहमद यांनीही त्याला पुष्टी दिली आहे. परंतु भारतामध्ये साम्य-वादी कार्यकर्त्यांना एकत्र आणण्यामध्ये भाई डांगे यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली. १९२१ मध्ये 'गांधी आणि लेनिन' या आपल्या लहानशा पुस्तिकेमध्ये त्यांनी मार्क्सवादी विचारप्रणालीचे महत्त्व व्यक्त केले आहे. साम्यवादी विचारप्रणा-लीचा स्वीकार आणि प्रसार करण्यामध्ये प्रारंभीच्या काळात मानवेंद्रनाथ रॉय आघाडीवर होते. ते स्वतः मेक्सिको येथील साम्यवादी पक्षाचे संस्थापक होते आणि त्याचे प्रतिनिधी म्हणून ते १९१० च्या कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या दुसऱ्या मेळाव्याला उप-स्थित होते. याच प्रसंगी त्यांनी राष्ट्रीय स्वातंत्र्य-आंदोलनांबाबत साम्यवाद्यांनी कोणती भूमिका स्वीकारावी याबद्दलचा लेनिनच्या मतांहून भिन्न असा आपला प्रबंध सादर केला.

काँग्रेसच्या नेतृत्वाखाली संघटित झालेल्या भार-तीय राष्ट्रीय आंदोलनांबाबत रॉय आणि लेनिन यांनी स्वीकारलेल्या परस्परविरोधी दृष्टिकोनांचा प्रभाव भारतातील साम्यवादी चळवळीवर दीर्घकाळ-पर्यंत राहिला. किंबहुना स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातं-त्र्योत्तर काळातील साम्यवादी चळवळीच्या यशाप-यशाची मीमांसा या दृष्टिकोनांच्या संदर्भात अधिक नेटकेपणाने करता येईल. काँग्रेसचे नेतृत्व प्रामुख्याने मध्यमवर्गीय होते व त्याविषयी रॉय यांना यत्किंचि-

तही विश्वास वाटत नव्हता. काँग्रेसचे मध्यमवर्गीय नेतृत्व आणि ब्रिटिश साम्राज्यवादी यांच्यात साटेलोटे असून काँग्रेसचे हे नेतृत्व मध्यमवर्गाला काही सवलती उपटण्यापुरते समाधान मानत राहील व ते ब्रिटिश साम्राज्यवादाशी खऱ्या अर्थाने झुंज घेईल असे रॉय यांना वाटत नव्हते. विशेषत: गांधींचे नेतृत्व हे मध्ययुगीन प्रतिगामी स्वरूपाचे असल्याची रॉय यांची ठाम भावना होती. साहजिकच साम्यवाद्यांनी काँग्रेसशी सहकार्य करण्यास रॉय यांचा प्रखर विरोध होता. याउलट, वासाहतिक आणि अर्ध-वासाहतिक देशांतील राष्ट्रीय स्वातंत्र्य-आंदोलनांमध्ये प्रारंभीच्या काळात साम्यवाद्यांनी स्वातंत्र्यसंपादनासाठी लढे उभारणाऱ्या मध्यमवर्गाशी सहकार्य करावे अशी लेनिनची व्यवहार्य भूमिका होती. त्याचप्रमाणे भारतातील विशिष्ट परिस्थितीच्या संदर्भात गांधी पुरोगामी भूमिका बजावीत आहेत असेही लेनिनचे मत होते. रॉय आणि लेनिन या दोघांच्या प्रबंधामध्ये मूलभूत फरक असतानादेखील स्वत: लेनिनने पुढाकार घेतल्याने हे दोन्ही प्रबंध या दुसऱ्या मेळाव्यामध्ये मान्य करण्यात आले.

कॉमिटर्नने रॉय यांची भारतातील साम्यवादी चळवळ संघटित करण्याच्या कामी नियुक्ती केली आणि लवकरच त्यांनी भारतामधील श्रीपाद अमृत डांगे व अन्य साम्यवादी विचारसरणीच्या कार्यकर्त्यांशी संपर्क साधला व साम्यवादी प्रचारसाहित्याचा प्रसार करण्याचा बर्लिनहून जोरदार प्रयत्न केला. १९२२ मध्ये रॉयनी 'संक्रमणावस्थेतील भारत' आणि 'भारताची समस्या व त्यावरील उपाय' अशी दोन पुस्तके लिहिली. पहिल्या पुस्तकात रॉयनी काँग्रेसमधील मवाळ व जहाल या दोहोंवर टीका केली आणि मार्क्सवादी विचारप्रणालीचा अंगीकार हाच भारताला योग्य असलेला मार्ग आहे असे बजाविले. दुसऱ्या पुस्तकात रॉयनी १९२१ मध्ये अहमदाबाद येथे झालेल्या काँग्रेसच्या अधिवेशनातील चर्चेवर कडाडून हल्ला चढविला आणि काँग्रेसचे मध्यमवर्गीय नेतृत्व भारतातील क्रांतिकारी शक्तिप्रवाहांना अडथळा निर्माण करीत असल्याचे मत व्यक्त केले.

काँग्रेसमधील चित्तरंजनदास, संपूर्णानंद आणि सिंगारावेलू चेट्टियार हे नेते काँग्रेसच्या धोरणाला अधिक जहाल वळण लावू शकतील अशी रॉय यांची धारणा होती. विशेषत: चित्तरंजनदास यांना सामान्यजनांबद्दल अनुकंपा असल्याने आणि क्रांती तसेच सामान्यजनांसाठी स्वराज्याची आवश्यकता हे विषय त्यांच्या भाषणामध्ये वेळोवेळी आल्याने चित्तरंजनदास यांच्याबाबत रॉय यांना अधिक अपेक्षा होत्या. गया येथे १९२२ मध्ये भरलेल्या काँग्रेस अधिवेशनाचे चित्तरंजनबाबू अध्यक्ष होते. कॉमिटर्नने या प्रसंगी पाठविलेल्या संदेशामध्ये ब्रिटिशांची भारतामधील राजवट बळाने स्थापन झालेली असून ती हिंसक क्रांतीनेच उलथून पाडता येणे शक्य आहे असे म्हटले होते. १९२२ मध्ये असहकाराची चळवळ ऐन बहरामध्ये असता चौरीचौरा या ठिकाणी झालेल्या हिंसाचारामुळे म. गांधींनी ती मागे घेतली. रॉय यांच्या मते क्रांतिकारी चळवळीचा हा फार मोठा विश्वासघात होता व गांधीवादाच्या प्रभावाने काँग्रेसने हा आत्मघात करून घेतला होता. चित्तरंजनदास राजकारणात मुरलेले होते आणि महात्मा गांधींच्या जनतेवरील प्रभावाची त्यांना पूर्ण कल्पना होती. त्यामुळे रॉय यांच्या काँग्रेसला नवे क्रांतिकारी वळण देण्याच्या प्रयत्नांना ते भुलले नाहीत. उलट, आपल्या अध्यक्षीय भाषणात त्यांनी अहिंसेच्या तत्त्वावर आपली अविचल श्रद्धा असल्याची ग्वाही देऊन हिंसक क्रांतीचे वैयर्थत्व स्पष्ट केले. अप्रत्यक्ष रीतीने ही बोल्शेव्हिक क्रांतीवरील टीकाच होती. परंतु या अपयशाने नाउमेद न होता काँग्रेसला साम्यवादी विचारसरणीकडे नेण्याचे प्रयत्न रॉय यांनी चालूच ठेवले. तथापि भारतामध्ये साम्यवादी पक्षाची उभारणी केल्याखेरीज काँग्रेसला हे नवीन वळण देणे दुरापास्त आहे याची खात्री पटल्याने यापुढे त्यांनी आपले सर्व लक्ष तिकडे केंद्रित केले. या सर्व काळामध्ये भारतामध्ये वृद्धिंगत होणाऱ्या साम्यवादी चळवळीकडे व कॉमिटर्न आणि तिचे गुप्त प्रचारक यांच्या हालचालींकडे ब्रिटिश भारतीय सरकारची बारीक नजर होतीच. परिणामी साम्यवादी विचारांचा प्रसार रोखण्यासाठी १९२४ मध्ये भारत सरकारने कानपूर राजद्रोहाचा खटला उभारून त्यामध्ये अनेक साम्यवादी कार्यकर्त्यांना

गुंतवून टाकले. तरीही मुंबई, कलकत्ता, कानपूर, लाहोर या व अन्य ठिकाणच्या अनेक निष्ठावंत साम्यवाद्यांना एकत्र आणण्यात रॉय यांना मर्यादित यश मिळाले. अर्थातच या सर्व कार्यकर्त्यांना उघड रीतीने शर्थ करणे अशक्यप्राय होते.

१९२४ मध्ये सत्यभक्त यांनी कायदेशीर रीतीने कम्युनिस्ट पक्षाची स्थापना करण्याचा प्रयत्न केला. काँग्रेसचे एक प्रमुख नेते व मुस्लिम लीगचे अध्यक्ष मौलाना हसरत मोहानी यांना असा पक्ष स्थापन करण्यासाठी बोलाविलेल्या परिषदेच्या स्वागतसमितीचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती करण्यात आली. एवढेच नव्हे तर काँग्रेसचे वार्षिक अधिवेशन ज्या मंडपामध्ये होणार होते तेथेच ही परिषद भरविण्याची योजना होती. परंतु यासंबंधीची परवानगी नाकारण्यात आल्याने परिषदेसाठी दुसरे स्थान निवडण्यात आले. हा नवीन पक्ष संपूर्णपणे भारतीय असून त्याचा कम्युनिस्ट इंटरनॅशनलशी कोणताही संबंध नसल्याचे परिषदेच्या संघटकांनी स्पष्ट केले. सिंगारवेलू चेट्टियार यांनी भारतीय साम्यवाद म्हणजे बोल्शेव्हिकवाद नव्हे, कारण बोल्शेव्हिकवाद हा साम्यवादाचा रशियन प्रकार आहे असे मत व्यक्त केले. अशा रीतीने भारतीय साम्यवादी कार्यकर्त्यांमध्ये सुरुवातीपासूनच भारतातील साम्यवादी चळवळीला भारतीय वळण देऊ इच्छिणारा व काँग्रेसशी संबंध ठेऊन कार्य करू पाहणारा एक गट होता हे स्पष्ट होते. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीमध्ये वाढलेल्या रॉय यांच्यासारख्या नेत्याला अर्थातच भारतीय साम्यवादी चळवळीचा असा सवतासुभा रुचणे शक्यच नव्हते. किंबहुना अशा तऱ्हेने आंतरराष्ट्रीय कामगार चळवळीपासून स्वतंत्ररीत्या कार्य करणारे हे खरे साम्यवादीच नाहीत व ते भारतीय कामगारवर्गाचे शत्रू आहेत अशी टीका रॉय यांनी या संदर्भात केली. परिणामी डिसेंबर १९२५ मध्ये कम्युनिस्ट पक्षाच्या प्रत्यक्षात झालेल्या परिषदेमध्ये व स्थापनेमध्ये सत्यभक्त यांनी जरी महत्त्वाचा भाग घेतला असला तरी लवकरच त्यांनी वेगळा राष्ट्रीय साम्यवादी पक्ष स्थापन केला.

## ३. पं. नेहरू आणि समाजवादी चळवळ

रॉय आणि इतर साम्यवादी कार्यकर्ते यांनी भारतामध्ये समाजवादी विचारप्रणाली रुजविण्यामध्ये महत्त्वपूर्ण भूमिका बजावली असली तरी काँग्रेसला समाजवादी विचाराप्रत नेण्याच्या बाबतीत त्यांना अपयशच आले असे म्हणता येईल. काँग्रेसमध्ये समाजवादी विचार जोपासण्याची ऐतिहासिक कामगिरी पार पाडली ती पंडित जवाहरलाल नेहरूंनी. इंग्लंडमध्ये असताना विद्यार्थिदशेत जवाहरलालजींची फेबियन समाजवादी विचारसरणीशी तोंडओळख झाली होती. परंतु मोतीलालजी व महात्मा गांधी यांच्या सहवासाने आणि भारतामध्ये सुरू झालेल्या होमरूल चळवळीमुळे त्यांच्यावर प्रथम परिणाम झाला तो राष्ट्रवादी विचारसरणीचा. जून १९२० मध्ये योगायोगाने पंडितजींनी अयोध्येच्या ग्रामीण भागाला भेट दिली व भारतीय जनतेच्या विराट दारिद्र्याचे त्यांना प्रथमच दर्शन झाले. पं. नेहरूंच्या संवेदनाशील मनावर याचा फार मोठा परिणाम झाला असल्यास नवल नाही. १९२२–२३ मधील तुरुंगवासामध्ये त्यांनी रशियन राज्यक्रांतीच्या इतिहासाचे परिशीलन केले. १९२६–२७ मध्ये पत्नीच्या आजारीपणाच्या निमित्ताने यूरपला भेट दिली असता आशिया, आफ्रिका, यूरप आणि अमेरिका येथील वसाहतवाद आणि भांडवलशाहीविरुद्ध संघर्ष करणाऱ्या अनेक कार्यकर्त्यांच्या संपर्कात ते आले. १९२७ मध्ये ब्रुसेल्स येथे भरलेल्या पीडित राष्ट्रांच्या महासभेला (Congress of the Oppressed Nations) ते उपस्थित राहिले व त्यामुळे यूरपमधील समाजवादी आणि साम्यवादी नेत्यांशी त्यांचा घनिष्ट परिचय झाला. मार्क्सवादाने प्रभावित झाल्याने ते साम्राज्यवादाविरुद्धच्या संघाचे (League against Imperialism) सभासदही झाले. नोव्हेंबर १९२७ मध्ये रशियन राज्यक्रांतीच्या दहाव्या वर्धापनदिनानिमित्त झालेल्या सोहोळ्यास पंडितजी उपस्थित राहिले. रशियाला दिलेल्या या पहिल्या धावत्या भेटीने जवाहरलालजी खूप प्रभावित झाले. शिक्षण, स्त्रीमुक्ती आणि सर्वसामान्य शेतकरीवर्गाची परिस्थिती याबाबतीत सोव्हिएत संघाने केलेल्या भरीव प्रगतीचा नेहरूंच्या मनावर खोल परिणाम झाला. साहजिकच या भेटीनंतर १९२८ मध्ये लिहिलेल्या 'सोव्हिएत रशिया' या ग्रंथात त्यांनी रशियातील साम्यवादी प्रयोग भारतीयांच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असल्याचे मत व्यक्त केले.

अनुक्रमणिका

रशिया व भारत हे दोन्ही शेतीप्रधान देश. दोन्ही देशांत औद्योगिक विकासाची नुकतीच सुरुवात झालेली. दारिद्र्य आणि निरक्षरता या दोन्ही देशांपुढील समान समस्या होत्या. शिवाय सोव्हिएत रशिया साम्राज्यवादी विचारप्रणालीविरुद्धचा कट्टर पुरस्कर्ता असल्याची रशिया-भेटीनंतर पं. नेहरूंची खात्री झालेली असल्याने ब्रिटिश साम्राज्यवादाला आव्हान देण्याबाबत भारत व रशिया यांचे हितसंबंध समान असल्याचे त्यांचे ठाम मत बनले असल्यास नवल नाही. काँग्रेस आणि भारतसरकार यांच्यात नंतर दिल्ली समझोता झाल्यामुळे व त्यामध्ये पंडितजींनी घेतलेल्या सहभागामुळे साम्राज्यवादा-विरोधी संघातून त्यांची मागाहून हकालपट्टी करण्यात आली हे जाता जाता नमूद करणे आवश्यक आहे.

मार्क्सवादी विचाराने व रशियन क्रांतीने प्रभावित झालेल्या पं. नेहरूंनी आपल्या रशिया-भेटीनंतर लगेच पार पडलेल्या १९२७ मधील मद्रास येथील काँग्रेसच्या अधिवेशनामध्ये साम्राज्यवादाविरोधी आणि समाजवादी विचारप्रणालीला अनुकूल असे अनेक ठराव मोठ्या आवेशाने आणि उत्साहाने मांडले. यापुढील काळात स्वराज्य आणि समाजवाद ही दोन ध्येये काँग्रेसने स्वीकारावीत म्हणून पंडित-जींनी जे सातत्याने प्रयत्न केले त्यांची ही नांदी होती. सरंजामशाहीच्या दोषांवर आणि जुनाट मुद्द्यांवर त्यांनी चौफेर हल्ला चढविला. राष्ट्रीय पातळीवर सहकाराधिष्ठित संघराज्य आणि आंतर-राष्ट्रीय पातळीवर समाजवादी राज्यांचे जागतिक महासंघराज्य ही दोन ध्येये त्यांनी प्रमाणभूत मानली. शेतकरी आणि कामगारांच्या मुक्तीखेरीज भारताला खरेखुरे स्वातंत्र्य लाभणार नाही असा विचार पं. नेहरूंनी काँग्रेसपुढे ठेवला.

तथापि काँग्रेसवर अद्यापि पारंपरिक विचारांचा पाठपुरावा करणाऱ्या नेत्यांचे वर्चस्व असल्याने पंडितजी अल्पमतामध्येच होते. एवढेच नव्हे तर पंडितजींच्या नवीन विचारांच्या बाबतीत महात्मा गांधीही प्रारंभी नाराज होते. नेहरू व गांधी यांचे काँग्रेसच्या धोरणासंबंधीचे हे मतभेद मद्रास अधि-वेशनाच्या प्रसंगीच उघड झाले होते. गांधींच्या मते पुरेसे लोकमत जागृत झालेले नसता केलेली राजकीय कृती केवळ निष्फळ ठरेल. एवढेच नाही तर अशी राजकीय कृती काँग्रेस संघटनेच्या मुळावर येईल. काँग्रेसचे रूपांतर एखाद्या शाळकरी मुलांच्या चर्चा-मंडनमध्ये होऊ पाहत आहे अशी टीका महात्माजींनी पं. नेहरूंवर अधिवेशनप्रसंगी केली. परंतु तरीही वास्तवाचे यथार्थ भान असलेल्या मुत्सद्दी महात्माजींनी पं. नेहरूंना जेवढे समजून घेतले तेवढे अन्य कोणत्याही काँग्रेस नेत्याला जमले नाही. दुसऱ्या बाजूने कितीही आक्रमक भूमिका घेतली तरी पं. नेहरूंची महात्मा-जींवरील निष्ठा अविचल होती. महात्माजींची जन-मानसावरील पकड, कोणत्याही कठिण प्रसंगामध्ये अचूक निर्णय घेण्याची त्यांची क्षमता आणि मुख्य म्हणजे सर्वसामान्य गोरगरीब माणसांबद्दल त्यांना असलेला कळवळा यांविषयी नेहरूंच्या मनामध्ये तिळमात्र शंका नव्हती. म्हणूनच पं. नेहरू आणि महात्माजी यांच्यामधील मतभेद एका विशिष्ट मर्यादेपलीकडे केव्हाच ताणले गेले नाहीत. काँग्रेस-मधील अधिकाधिक कार्यकर्त्यांना समाजवादी धोर-णाच्या दिशेने आपल्या बाजूला वळविण्यात यामुळे पंडितजींना यश प्राप्त होऊ शकले.

काँग्रेसच्या ध्येयधोरणाला अधिक जहाल आणि समाजवादी आशय प्राप्त होण्याच्या दृष्टीने १९२८ हे वर्ष महत्त्वाचे ठरले. समाजवादी चळवळीच्या दृष्टीने या वर्षी दोन महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. एक म्हणजे समाजवादाची भाषा बोलणाऱ्या डाव्या राष्ट्रवादी तरुणांचा काँग्रेसवरील प्रभाव वाढू लागला. दुसरी गोष्ट म्हणजे संपूर्ण स्वराज्य हे तातडीचे राजकीय ध्येय ठरवून जनसामान्यांना आकर्षित करू शकणारा समाजवादी आर्थिक कार्य-क्रम काँग्रेसने स्वीकारण्यासाठी संघटनेवर मोठ्या प्रमाणावर दबाव येऊ लागला.

१९२९ च्या २४–२५ मे रोजी अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या बैठकीमध्ये एक ठराव मंजूर करण्यात आला– "भारतीय जनतेचे दारिद्र्य आणि हलाखीची स्थिती केवळ परकीय शोषणामुळे नसून समाजाची आर्थिक संरचनाही त्यास कारणीभूत आहे. तसेच आर्थिक शोषणास कारणीभूत ठरणाऱ्या या समाजरचनेस परकीय सत्तेचाही पाठिंबा आहे. भारतातील दैन्य आणि दारिद्र्य यांचे उच्चाटन करून भारतीय जनसामान्यांची स्थिती सुधारण्या-

अनुक्रमणिका

साठी सध्याच्या समाजातील मोठ्या प्रमाणावरील विषमता दूर करून सामाजिक आणि आर्थिक रचनेत क्रांतिकारक बदल करण्याची आवश्यकता आहे" अशा तऱ्हेच्या या ठरावाने काँग्रेसच्या कार्यक्रमामध्ये अधिकृतरीत्या प्रथमच समाजवादी कार्यक्रमाची बीजे पेरली गेली.

१९२९ मध्ये लाहोर येथे झालेल्या अधिवेशनाने काँग्रेसच्या इतिहासातील एका नवीन पर्वाला प्रारंभ होतो. स्वत:च्या कार्यकारिणीमध्ये अल्पमतामध्ये असलेल्या समाजवादी डाव्या विचारांच्या पंडित जवाहरलाल नेहरूंची गांधीजींच्या आग्रहास्तव काँग्रेसच्या अध्यक्षपदासाठी निवड झाली. काँग्रेस अध्यक्षपदाच्या स्थानावरून पहिल्याप्रथमच अधिकृतरीत्या समाजवादाचा पुरस्कार करण्याची ही संधी जवाहरलालजींनी अर्थातच व्यर्थ दवडली नाही. अशा रीतीने समाजवादी विचारांना काँग्रेसची द्वारे खुली झाली. चाळीस वर्षांच्या समाजवादाची जहाल भाषा बोलणाऱ्या एका तरुणाला पारंपरिक भाषा बोलणाऱ्या महात्माजींनी ही संधी का द्यावी याविषयी अनेक मते मांडण्यात आली आहेत. महात्माजींना मानवी स्वभावाची उत्तम जाण होती. पं. नेहरूंसारखा चिरतरुण नेता मिठाच्या सत्याग्रहाला आवश्यक असणारी वातावरणनिर्मिती करू शकेल आणि जहाल सामाजिक आर्थिक बदलाच्या आपल्या आग्रहामुळे जनसामान्यांमध्ये चैतन्य निर्माण करू शकेल असे त्यांना या वेळी वाटले असल्यास नवल नाही.

नेहरूंच्या पुढाकारामुळे संपूर्ण स्वराज्य हे ध्येय काँग्रेसने लाहोरच्या अधिवेशनात मान्य केले. आपल्या अध्यक्षीय भाषणात नेहरूंनी एकाचवेळी ब्रिटिश साम्राज्यवाद, भारतीय सरंजामशाही आणि भांडवलशाही यांवर टीकेचे कठोर आसूड ओढले. "मी समाजवादी आणि गणराज्यवादी आहे आणि माझा राजांवर किंवा संस्थानिकांवर आणि औद्योगिक क्षेत्रामध्ये आधुनिक राजे निर्माण करणाऱ्या व्यवस्थेवर सुतराम विश्वास नाही" असे उद्‌गार काढून पं. नेहरूंनी आपल्या समाजवादावरील निष्ठेचा पुनरुच्चार केला.

पं. नेहरूंनी लाहोर काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून केलेले भाषण म्हणजे फुकाच्या वल्गना नव्हत्या हे लवकरच दिसून आले. पंधरा महिन्यांनंतर १९३१ मधील कराची येथील काँग्रेसच्या अधिवेशनामध्ये निश्चित समाजवादी कार्यक्रमाचा स्वीकार करणारा ठराव मंजूर होण्यासाठी त्यांनी आपली सर्व शक्ती पणाला लावली. स्वातंत्र्योत्तर काळात आवडी येथील काँग्रेसच्या अधिवेशनात काँग्रेसच्या समाजवादी समाजरचनेचे ध्येय नि:संदिग्धपणे स्वीकारले त्याची ही मुहूर्तमेढच होती असे म्हणता येईल.

कराची-ठराव मंजूर होण्याची थोडीशी पार्श्वभूमीही लक्षात घेतली पाहिजे. ५ मार्च १९३० ला गांधी-आर्यावन करार झाला. हा करार नेहरूंना तसेच अनेक जहाल विचाराच्या काँग्रेसजनांना मंजूर नव्हता. एकंदरीत गोलमेज परिषदेची योजना अनेकांना नापसंतच होती. त्यामुळे सर्वसामान्य जनतेला आकर्षून घेईल असा कार्यक्रम काँग्रेसने स्वीकारणे ही काळाची गरज होती. उपासमार होणाऱ्या लक्षावधी जनतेला राजकीय स्वातंत्र्याबरोबर आर्थिक स्वातंत्र्याचीही गरज आहे असे या ठरावात स्पष्टपणे नमूद करण्यात आले. मूलभूत हक्क आणि राहणीमानाला योग्य असे वेतन, मृत व्यक्तींच्या संपत्तीवरील कर, मूळ पायाभूत उद्योगधंद्यांचे नियंत्रण किंवा त्यांचे राष्ट्रीयीकरण अशांसारखी आर्थिक तत्वे इत्यादींचा समावेश या कराची-ठरावातील कार्यक्रमात केलेला होता. आजच्या काळात हा कार्यक्रम सौम्य समाजवादी स्वरूपाचा वाटत असला तरी त्या काळाचा विचार करताना तो निश्चितच क्रांतिकारी स्वरूपाचा वाटणे यात आश्चर्य नाही.

कराची-ठराव जरी पं. नेहरूंच्या लेखणीतून उतरला असला तरी त्यावरील म. गांधींचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो. नेहरूंची समाजवादी भाषा आणि म. गांधींची विचारसरणी आणि तंत्रे यांचा मिलाफ या ठरावात झालेला आहे. साहजिकच हा ठराव वाचून पाहणारास त्यामध्ये काँग्रेसच्या आतापर्यंतच्या ध्येयधोरणाशी विसंगत असे काही आढळून येणार नाही. महत्वाच्या उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयीकरण किंवा नियंत्रण यासंबंधीचा ठरावातील भाग हाच काय तो निश्चितपणे समाजवादी कार्यक्रमाचा निदर्शक मानता येईल. सुभाषचंद्र बोस आणि अन्य जहाल विचारसरणीच्या नेत्यांचा या ठरावाने भ्रमनिरास झाला. खासगी मालमत्ता आणि प्रस्थापित

हितसंबंध यांच्या उच्चाटनासंबंधी टरावात कोणताच उल्लेख नसल्याने सुभाषबाबू नाराज होते. कराची ठराव म्हणजे काँग्रेसमधील समाजवादी विचारांच्या तरुणांचे थातुरमातुर समाधान करण्याची एक मखलाशी होती असेच बहुसंख्य डाव्या समाजवादी कार्यकर्त्यांचे मत झाले. ही सर्व टीका लक्षात घेऊनदेखील काँग्रेसच्या समाजवादाकडील वाटचालीमधील कराची-ठराव हा एक महत्त्वपूर्ण टप्पा होता हे नाकारता येणार नाही. विशेषतः म. गांधींनी या ठरावाला दिलेल्या सक्रीय आणि नैतिक पाठिंब्यामुळे त्याचे महत्त्व आणि औचित्य अधिकच वाढले असेच म्हणता येईल.

एव्हाना समाजवादाविषयी पं. नेहरूंची स्वतःची संकल्पना स्पष्ट होऊ लागली होती. १९३३ मध्ये लिहिलेल्या Whither India या पुस्तकात नेहरूंनी आपल्या या समाजवादी सिद्धांताची अधिक सुस्पष्ट मांडणी केलेली आहे. त्यामधून पं. नेहरूंचा समाजवादविषयक विचार साम्यवादी विचारप्रणालीहून कसा भिन्न होता ते समजण्यास मदत होते. वर्गविग्रहाचा सिद्धान्त आणि त्याला पूरक असा कामगारवर्गाच्या हुकूमशाहीचा सिद्धांत हे साम्यवादी तत्त्वविचारामध्ये केंद्रीभूत असलेले दोन्ही सिद्धान्त पं. नेहरुंनी त्याज्य मानले. उलटपक्षी, काँग्रेसच्या व्यापक नेतृत्वाखाली चाललेल्या राष्ट्रवादी स्वातंत्र्याच्या चळवळीचा आणि समाजवादी सिद्धान्ताचा मिलाफ घडवून आणण्याचा त्यांचा प्रयत्न होता. भारतीय जनतेचे शोषण थांबविणे हेच भारताचे प्रथम उद्दिष्ट असले पाहिजे. राजकीय दृष्टीने त्यासाठी साम्राज्यवादाचे जोखड झुगारून देऊन स्वातंत्र्यसंपादन प्राप्त करणे आणि आर्थिक व सामाजिक दृष्टीने सर्व प्रकारचे वर्गीय विशेषाधिकार आणि हितसंबंध यांचे उच्चाटन करणे या गोष्टी आवश्यक होत्या. भारतीय स्वातंत्र्याचा हा लढा एका व्यापक जागतिक लढ्याचाच भाग असल्याचीही पं. नेहरूंची धारणा होती. तथापि ही सर्व उद्दिष्टे काँग्रेसच्या प्रभावी संघटनेमार्फतच साध्य होऊ शकतात अशी व्यावहारिक जाण पं. नेहरूंना होती. "काँग्रेसची संघटना इतकी महान आहे की मला अभिप्रेत असलेले सर्वंच बदल या संघटनेने जरी स्वीकारले नाहीत तरीसुद्धा या संघटनेमधूनच कार्य करीत राहणे हेच मला आवडेल" असे उद्गार या संदर्भात पं. नेहरूंनी काढले आहेत. नेहरूंच्या 'व्हिदर इंडिया' ने अशा रीतीने काँग्रेसमधील समाजवादी विचारास एक नवीन दिशा व चैतन्य प्राप्त करून दिले यात शंका नाही.

## ४. काँग्रेस समाजवादी पक्ष

काँग्रेसला समाजवादी धोरणांपर्यंत वाटचाल करण्यात भाग पाडण्यामध्ये पं. जवाहरलाल नेहरूंइतकाच महत्त्वाचा वाटा १९३४ मध्ये स्थापन झालेल्या व काँग्रेसमध्येच राहून कार्य करणाऱ्या काँग्रेस समाजवादी पक्षाने पार पाडलेला आहे. १९३२ च्या दुसऱ्या सविनय कायदेभंग चळवळीमध्ये अटक झालेल्या तरुणांचा एक गट नाशिक येथील तुरुंगात होता. त्यामध्ये जयप्रकाश नारायण, अशोक मेहता, अच्युतराव पटवर्धन, युसुफ मेहेरअल्ली नानासाहेब गोरे, एस. एम्. जोशी इत्यादी समाजवादी विचाराने भारावून गेलेले तरुण होते. या तरुणांना पं. नेहरूंच्या नेतृत्वाचे आकर्षण असले तरी महात्माजींच्या विचारांबद्दल व नेतृत्वाबद्दल तितकेसे समाधान नव्हते. तुरुंगामध्ये होणाऱ्या चर्चेमधूनच कालांतराने काँग्रेस समाजवादी पक्षाच्या स्थापनेचा विचार निश्चित झाला. मे १९३४ मध्ये जयप्रकाश नारायण यांनी पाटणा येथे पहिली अखिल भारतीय समाजवादी परिषद बोलाविली व तेथेच काँग्रेस समाजवादी पक्षाची अधिकृत स्थापना झाली.

काँग्रेस पक्षाच्या अंतर्गत राहून काँग्रेसला समाजवादी ध्येयधोरण आणि कार्यक्रम स्वीकारण्यास भाग पाडणे हे काँग्रेस समाजवादी पक्षाने आपले कर्तव्य मानले आणि स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत चोखपणाने पार पाडले. या पक्षामध्ये स्थूलमानाने कट्टर मार्क्सवादी, लोकशाही समाजवादी आणि गांधीवादी या तीन प्रकारच्या प्रेरणांनी प्रेरित झालेल्या व्यक्ती असल्याने तीन प्रकारच्या वैचारिक गटांचे प्रारंभापासून अस्तित्व होते. जयप्रकाश नारायण, आचार्य नरेंद्र देव हे नेते कट्टर मार्क्सवादी विचारपद्धतीचे आग्रही होते. मिनू मसानी व अशोक मेहता यांच्यासारखे नेते फेबियन समाजवाद आणि ब्रिटिश मजूर पक्षाच्या समाजवादी विचारसरणीने प्रभावित झालेले होते, तर डॉ. राम मनोहर लोहिया व अच्युतराव पटवर्धन यांच्यासारखे नेते विकेंद्रिकरण आणि

अहिंसात्मक कायदेभंग या गांधीवादी संकल्पनांनी आकर्षित झालेले होते.

काँग्रेस समाजवादी पक्षाच्या या स्वरूपामुळे तो पक्ष कम्युनिस्ट इंटरनॅशनलला संलग्न होणे शक्यच नव्हते. मार्क्सवादी विचारप्रणालीचा स्वीकार केला तरी कामगारवर्गाच्या हुकूमशाहीची संकल्पना तिच्या नेत्यांना संपणारी नव्हती. मुख्य म्हणजे वरील तिन्ही प्रकारच्या प्रेरणांमधून त्यांचा समाजवादी विचार संस्कारित झालेला असला तरी सर्वांचा पिंड राष्ट्रवादी विचारप्रणालीनेच पुष्ट झालेला होता. भारतातील सर्व डाव्या विचारसरणीच्या कार्यकर्त्यांमध्ये एकजूट घडवून आणून १९३१ चा कराची काँग्रेसमधील ठराव व काँग्रेसचा प्रत्यक्षातील कार्यक्रम यांच्यातील तफावत दूर करण्याचे त्यांचे ध्येय होते. काँग्रेस समाजवादी पक्षाच्या या प्रयत्नांना यथावकाश दृश्य फळे येऊ लागली. जमीनसुधारणा, प्रमुख उद्योगधंद्यांचे राष्ट्रीयीकरण, कामगार कायदे, काँग्रेससंघटनेमध्ये डाव्यांना अधिकाधिक प्रतिनिधित्व आणि जनसंपर्कावर भर इत्यादी बाबतीत काँग्रेसचे धोरण अधिकाधिक समाजवादाच्या दिशेने मार्गक्रमण करू लागले.

१९३४ मध्ये पाटणा येथे भरलेल्या काँग्रेस समाजवादी पक्षाच्या पहिल्या अधिवेशनाच्या वेळी अध्यक्षपदावरून बोलताना आचार्य नरेंद्र देव यांनी काँग्रेस ही एक क्रांतिकारक शक्ती असल्याचे सांगून या संघटनेमध्ये जरी अनेक दोष असले तरी तिच्या मार्फतच समाजवाद्यांनी कार्य केले पाहिजे असे प्रतिपादन केले. भारताच्या विशिष्ट परिस्थितीमध्ये राष्ट्रीय आंदोलन आणि समाजवादी आंदोलन यांचा समन्वय साधण्याची आवश्यकता त्यांनी विशेषत्वाने स्पष्ट केली.

देशातील कामगारवर्गामध्ये नव्या जाणीवा जागृत झालेल्या दिसून येत होत्या. त्यामुळे काँग्रेसला अधिक व्यापक सामाजिक पाया प्राप्त करून देण्याची आवश्यकता समाजवाद्यांना वाटत होती. यासाठीच काँग्रेसने शेतकरी आणि मजूर संघटनांना पक्षाचे सामूहिक सभासदत्व द्यावे असा त्यांचा आग्रह होता. समाजवादी नेत्यांची ही आक्रमक डावी भाषा अर्थातच काँग्रेसमधील जुन्या आणि उजव्या मतप्रणालीच्या नेत्यांना भयावह वाटत होती. खुद्द महात्माजींनादेखील तरुण समाजवाद्यांची वर्गयुद्ध क्रांती आणि खाजगी मालमत्तेच्या उच्चाटनाची भाषा नापसंत होती. काँग्रेस समाजवाद्यांना काँग्रेसमध्ये वर्चस्व मिळाल्यास मला काँग्रेसमध्ये राहता येणार नाही असे एका प्रसंगी त्यांनी उद्गारही काढले. परंतु गांधीजींच्या नेतृत्वाचा हा एक विशेष म्हणता येईल, की त्यांनी तरुण समाजवादी नेत्यांना समजून घेण्याचा प्रयत्न केला एवढेच नव्हे तर संघटनेमध्ये ज्येष्ठ नेतृत्वाकडून त्यांची मुस्कटदाबी होऊ दिली नाही. त्याही पुढे जाऊन काँग्रेसच्या निवडणुकांमध्ये प्रमाणशीर प्रतिनिधित्वाच्या पद्धतीच्या स्वीकारासाठी पुढाकार घेऊन त्यांनी अखिल भारतीय काँग्रेस समितीत समाजवाद्यांना अधिक प्रमाणात प्रतिनिधित्व मिळणे शक्य करून दिले. खरे म्हणजे म. गांधी आणि तरुण समाजवादी यांच्यातील मतभेद वरवर पाहता वाटत होते तितक्या तीव्र स्वरूपाचे नव्हते. म. गांधींची अहिंसा, विश्वस्तसंकल्पना ही तत्त्वे आणि राजकारणाकडे पाहण्याचा त्यांचा धार्मिक आणि नैतिक दृष्टिकोन तरुण समाजवाद्यांच्या आधुनिक पाश्चात्य विचारांपासून सर्वस्वी भिन्न होते. तरीही राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि जनसामान्यांच्या कल्याणाबद्दलची तळमळ यांबाबतीत त्यांच्या विचारांचा धागा समान होता. स्वातंत्र्याचा व्यापक लढा उभारताना काँग्रेसच्या बलाढ्य संघटनेला मतभेदांनी तडे जाऊ नयेत अशी महात्माजींची दृष्टी होती. आणि म्हणूनच प्रारंभीच्या काळामध्ये समाजवादी तरुणांच्या बंडखोरीच्या भाषेने महात्माजींनी त्यांच्याकडे जरा साशंकवृत्तीनेच पाहिले. नंतरच्या काळात मात्र समाजवादी आणि महात्माजी यांच्यातील अंतर कमी झाले एवढेच नव्हे तर भावनिक दृष्टीनेदेखील समाजवादी नेते महात्माजींच्या अधिक जवळ आल्याचे दिसते.

वैचारिकदृष्टीने फक्त पं. जवाहरलालजीच काय ते समाजवादी नेत्यांना सर्वार्थाने जवळचे होते. काँग्रेस समाजवादी पक्षाची स्थापना झाली तेव्हा पंडितजी तुरुंगामध्ये होते. ते स्वतः काँग्रेस समाजवादी पक्षाचे सभासद झाले नाहीत. तरीदेखील त्यांचा समाजवादी तरुणांना नैतिक आणि कृतिशील पाठिंबा होता. समाजवादी नेत्यांपैकी जयप्रकाश

नारायण, आचार्य नरेंद्र देव आणि अच्युतराव पटवर्धन यांच्याशी पंडितजींचे विशेष जिव्हाळ्याचे संबंध होते, तरीदेखील समाजवादी नेत्यांच्या उजव्या विचारसरणीच्या काँग्रेस नेत्यांवरील टीकेला जसजशी धार येऊ लागली तेव्हा पंडितजींना त्यांच्या सर्वच टीकेचे काँग्रेस कार्यकारिणीत नेहमीच समर्थन करणे अशक्य होऊ लागले.

पं. नेहरूंच्या मनामध्ये समाजवादासंबंधी प्रामुख्याने दोन प्रश्न होते. एक म्हणजे भारतीय परिस्थितीच्या संदर्भामध्ये समाजवादी कार्यक्रम प्रत्यक्षात कसा आणायचा आणि दुसरा प्रश्न म्हणजे भारतीय जनतेच्या भाषेमध्ये समाजवादी संकल्पना कशा व्यक्त करावयाच्या ? समाजवादासंबंधी विचार करीत असताना पंडितजींनी अल्पकालीन आणि दीर्घकालीन कार्यक्रमांची योजना मांडली. राष्ट्रीय आंदोलनामध्ये जनतेला जागृत करण्यासाठी काँग्रेसने हाती घ्यावयाचा कार्यक्रम हा अल्पकालीन कार्यक्रम होता, तर प्रत्यक्ष स्वातंत्र्यप्राप्तीनंतर समाजवादी विचारांवर आधारित अमलात आणण्याचा कार्यक्रम हा दीर्घकालीन कार्यक्रम होता. १९३६ मध्ये लखनौ काँग्रेस अधिवेशनात पंडितजींची पुन: एकदा काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवड झाली. विशेष म्हणजे त्यांना जयप्रकाश नारायण, आचार्य नरेंद्र देव आणि अच्युतराव पटवर्धन या काँग्रेस समाजवादी पक्षाच्या तीन तरुण नेत्यांना काँग्रेस कार्यकारिणीमध्ये घेण्यासदेखील अडचण आली नाही. पंडितजींचे अध्यक्षीय भाषण अनेकांना साम्यवादाकडे झुकलेले वाटले. लखनौ अधिवेशनाने पहिल्याप्रथमच काँग्रेसला आंतरराष्ट्रीय प्रश्नांच्या बाबतीत अभिमुख केले. अलिप्ततावाद आणि जागतिक शांततेवर आधारलेल्या भारताच्या समाजवादी परराष्ट्रीय धोरणाचा पाया या अधिवेशनात घातला गेला असे म्हटले तरी चालेल. सर्व प्रदेश काँग्रेस समित्यांना राज्यातील जमिनविषयक प्रश्नांचा सखोल अभ्यास करून प्रतिवृत्ते सादर करण्यासंबंधीचे आदेशही देण्यात आले. सर्व जागतिक तसेच भारताचे प्रश्न सोडविण्याची एकमेव गुरुकिल्ली म्हणजे समाजवाद होय असे जाहीरपणे पंडितजींनी आपल्या भाषणात सांगून उजव्या विचारप्रणालीच्या नेत्यांना जोरदार धक्का दिला. काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून अधिकृतरीतीने समाजवादाचा उल्लेख होण्याची ही पहिलीच वेळ. आणि म्हणूनच नेहरूंच्या या भाषणाला ऐतिहासिक महत्त्व आहे. "काँग्रेसने समाजवादी संघटना बनून नवीन संस्कृतीच्या निर्मितीसाठी प्रयत्न करणाऱ्या जागतिक शक्तींना मदत करावी असे माझे मत आहे. समाजवाद या शब्दाचा वापर मी संदिग्ध मानवतावादी अर्थाने करीत नसून शास्त्रीय आणि आर्थिक दृष्टिकोनातून करीत आहे. समाजवाद म्हणजे खासगी मालमत्तेचे उच्चाटन आणि सध्याच्या नफ्यावर आधारित असलेल्या पद्धतीच्याऐवजी सहकार्यावर आधारलेली नवीन व्यवस्था निर्माण करणे होय. थोडक्यात म्हणजे ही नवीन संस्कृती भांडवलशाही व्यवस्थेच्यापेक्षा सर्वस्वी भिन्न आहे." असे उद्‌गार पंडितजींनी आपल्या भाषणात काढून समाजवादाचा अर्थ स्पष्ट केला.

पंडितजींच्या या उघड प्रतिपादनामुळे काँग्रेसमधील उजव्या मतप्रणालीच्या नेत्यांना जबरदस्त आव्हान मिळाले. उलटपक्षी, पं. नेहरूंचे भाषण म्हणजे तरुण समाजवादी नेत्यांना स्वतःचा नैतिक व राजकीय विजयच वाटला आणि ते उजव्या नेतृत्वाविषयी अधिकाधिक टीकात्मक आणि आक्रमक भाषा वापरू लागले. समाजवादी नेत्यांना पंडितजींचे संरक्षण आहे असा वाढता ग्रह झाल्याने काँग्रेस कार्यकारिणीतील ज्येष्ठ काँग्रेसनेते अधिकाधिक क्रुद्ध आणि संशयी बनले. पं. नेहरू आणि हे नेते यांच्यातील मतभेद अखेरीस इतके विकोपाला गेले, की राजेंद्रप्रसाद, वल्लभभाई पटेल, सी. राजगोपालाचारी, जे. बी. कृपलानी व इतर तीन अशा काँग्रेस कार्यकारिणीच्या एकूण सात सभासदांनी कार्यकारिणीचे राजीनामे जून १९३६ मध्ये दिले. २९ जून १९३६ रोजी या सात सभासदांनी पंडितजींना एक पत्र लिहून आपले विचार स्पष्ट केले. "काँग्रेसने समाजवादाचे ध्येय अधिकृतरीतीने स्वीकारलेले नसताना काँग्रेसच्या अध्यक्षांनी (पं. नेहरूंनी) आणि काँग्रेस कार्यकारिणीच्या इतर समाजवादी सभासदांनी समाजवादी विचारांचा पुन:पुन्हा घोष करणे हे व्यापक देशहितास बाधक असून राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीच्या यशामध्ये अडचणी निर्माण करणारे आहे" असे मत व्यक्त करून या सभासदांनी आपले

राजीनामे पं. नेहरूंकडे सुपूर्द केले. अखेरीस, महात्मा गांधींच्या मध्यस्थीने हा वाद मिटला व सातही सभासदांनी आपले राजीनामे मागे घेतले. तरीसुद्धा काँग्रेसमधील ज्येष्ठ नेत्यांच्या या पवित्र्यामुळे काँग्रेसला समाजवादाच्या ध्येयाकडे नेणे वरवर पाहता जेवढे सहजशक्य वाटते तेवढे ते नाही असे या घटनेमुळे पंडितजींच्या चाणाक्ष नजरेला आले. या घटनेनंतर पंडित नेहरूंनी इतर ज्येष्ठ काँग्रेस-नेत्यांशी वागत असताना तसेच समाजवादी विचार व्यक्त करीत असताना नेहमीच एकप्रकारची सावध आणि व्यवहारी दृष्टी अंगिकारलेली दिसून येते. पंडितजींच्या राजकीय डावपेचात झालेला हा लक्षणीय बदल स्वातंत्र्योत्तर काळात काँग्रेसचे नेतृत्व करीत असतानाही टिकून राहिला असे दिसून येते. समाजवादी विचाराच्या दृष्टीने पं. नेहरूंचे लखनौ येथील काँग्रेसच्या अध्यक्षीय पदावरून केलेले भाषण हा त्यांच्या समाजवादी श्रद्धेचा एक उच्चांक होता. पुनः फिरून पंडितजी आपल्या समाजवादाच्या आग्रहाबाबत इतके स्पष्टपणाने कधीही बोलले नाहीत. काँग्रेस समाजवादी नेत्यांच्या दृष्टीने मात्र ही प्रतिकूल गोष्ट होती. पुढील काळामध्ये तरुण समाजवादी नेत्यांना आपला प्रवास एकाकी रीतीनेच करावयाचा होता. पं. नेहरू आणि समाजवादी नेते यांच्या वाटा या काळापासून भिन्न झाल्या, त्या पुनः कधी एकत्र आल्याच नाहीत.

१९३६ मध्ये अखिल भारतीय किसानसभेची स्थापना झाली आणि काँग्रेसच्या लखनौ अधिवेशना-बरोबरच किसानसभेचे पहिले अधिवेशन पार पडले. किसानसभेचे उत्साही नेते प्रा. रंगा यांनी किसान-सभेला काँग्रेसचे सामूहिक सभासदत्व मिळण्याची मागणी केली. या मागणीला पाठिंबा मिळावा म्हणून काँग्रेसचे नियोजित अध्यक्ष या नात्याने पं. जवाहर-लाल नेहरूंनी स्वतः प्रयत्न केले. परंतु काँग्रेसमधील उजव्या गटाने हा प्रयत्न यशस्वी होऊ दिला नाही. तरीदेखील किसानसभेचे कार्य वाढू लागले होते आणि त्याची दखल महात्माजींनाही घ्यावी लागली. महात्माजींच्या प्रयत्नांमुळेच किसानांची परिस्थिती सुधारण्यासाठी सूचना करण्यासाठी म्हणून काँग्रेस कार्यकारिणीची एक खास समिती नेमण्यात आली. अशा रीतीने काँग्रेसमधील समाजवादी शक्तींची वाढ होत होती.

१९३७ मध्ये पं. नेहरूंच्या अध्यक्षतेखाली फैजपूर येथे काँग्रेसचे अधिवेशन पार पडले. अधिवेशनापूर्वी काँग्रेसमधील उजव्या आणि डाव्या विचारसरणीचा पुरस्कार करणाऱ्या नेत्यांमधील मतभेद अधिक तीव्रपणाने प्रकट झाले होते. अध्यक्ष म्हणून आपली निवड करण्यापूर्वी आपल्या समाजवादी निष्ठा काँग्रेसजनांनी लक्षात घ्यावी असे मत स्वतः पंडित-जींनी व्यक्त केले. अध्यक्षपदासाठी सरदार पटेलांचे नाव देखील सुचविण्यात आले होते; परंतु त्यांनी त्याला नकार दिला. परंतु आपली माघार म्हणजे पं. नेहरूंच्या समाजवादी विचारांना पाठिंबा नव्हे हेही त्यांनी स्पष्ट केले. भांडवलशाहीमधील घृणा-स्पद दोष नाहीसे करणे अशक्य नाही असे मतही त्यांनी या प्रसंगी केले.

१९३७ च्या फैजपूर अधिवेशनामध्ये प्रदेश काँग्रेस समित्यांनी सादर केलेल्या शेतीविषयक अहवालांचा विचार करण्यात आला आणि शेतीकार्यक्रमाबाबत एक सर्वसमावेशक ठराव मंजूर करण्यात आला. पुरुषोत्तमदास टंडन आणि लालबहादूर शास्त्री यांनी उत्तरप्रदेशच्या बाबतीत एक विस्तृत अहवाल सादर केला. त्याच्या आधाराने लोककल्याणकारी आणि समाजवादी कल्पनांशी सुसंगत असा एक जमीन-धारणेसंबंधीचा व्यापक कार्यक्रम सर्व देशासाठी सुच-विण्यात आला. पुढे काँग्रेसने स्वीकारलेल्या सहकारी शेतीविषयक कार्यक्रमाच्या दिशेने हे पहिले पाऊल होते असे म्हणता येईल. फैजपूरला जो शेतीविषयक कार्यक्रम काँग्रेसने मान्य केला त्यामध्ये अखिल भारतीय किसानसभेच्या बऱ्याच मागण्यांचा समावेश करण्यात आला होता. जमीनदारीच्या उच्चाटनासंबंधी पुढे काँग्रेससरकारने उचललेल्या पावलांची ही पहिली खूण होती असे म्हणता येईल. काँग्रेसमधील उजव्या विचारसरणीचे नेते आणि कार्यकर्ते मात्र या कार्यक्रमाबद्दल साशंक होते. काँग्रेसच्या या नवीन कार्यक्रमाला अनुसरून जेव्हा अनेक समाजवादी कार्यकर्त्यांनी किसान आणि कामगार चळवळी सुरू केल्या तेव्हा मद्रास-मध्ये सी. राजगोपालाचारी आणि मुंबईमध्ये कन्हय्यालाल मुन्शी यांनी त्या चळवळी दडपून

टाकण्याचा प्रयत्न केला. कलकत्ता येथील अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या सभेत तर श्री. बा. गं. खरे यांनी आपण पं. नेहरूंना मुंबईमध्ये कामगारतंटे निर्माण करण्यापासून परावृत्त केल्यावाचून राहणार नाही असा निर्वाणीचा इशारा दिला. या सर्व घटनांमुळे १९३७ च्या निवडणुकांत जरी किसानसभेने काँग्रेसला पाठिंबा दिला असला, तरी काँग्रेस आणि किसानसभा यांच्यातील संबंध हळूहळू दुरावत गेले आणि अखेर किसानसभा आणि काँग्रेस यांचे संबंध पूर्णपणे तुटले. परंतु तरीही अशा परिस्थितीमध्येदेखील १९३७ मध्ये काँग्रेसची प्रांतिक सरकारे ज्या ज्या ठिकाणी अधिकारावर आली त्या त्या ठिकाणी अनेक कूळकायदे, कर्जमाफीचे कायदे करण्यात येऊन निश्चित स्वरूपाचा पुरोगामी कार्यक्रम पुढे रेटण्यात आला हे विसरून चालणार नाही.

फैजपूर काँग्रेस अधिवेशनात मंजूर झालेल्या शेती कार्यक्रमाची अमलबजावणी करण्याबाबत किसानसभेने धरलेला आग्रह आणि उजव्या विचारसरणीच्या काँग्रेस नेत्यांचा किसानसभेला असलेला विरोध यांमधून अखेरीस किसानसभा साम्यवादी पक्षाच्या नेतृत्वाखाली गेली. उजव्या नेतृत्वाला डाव्यांचा विरोध हळूहळू संघटित होऊ लागला. अखेरीस १९३८मध्ये हरिपुरा येथे होणाऱ्या काँग्रेसच्या अध्यक्षपदावर समाजवादी विचारांना पाठिंबा असणाऱ्या सुभाषचंद्र बोस यांची निवड झाली. यामुळे उजवे नेतृत्व आणि डावे समाजवादी यांच्यातील दरी अधिकच रुंदावली. शेवटी १९३९ मध्ये त्रिपुरा काँग्रेस अधिवेशनासाठी होणाऱ्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीच्या निमित्ताने महात्माजींनी आपले बळ अजमावून पाहण्याचा निश्चय केला. महात्माजींच्या पाठिंब्याने काँग्रेस कार्यकारिणीने पट्टाभिसीतारामय्या यांच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीसाठी सर्व तयारी केली. परंतु काँग्रेस समाजवादी पक्षाच्या पाठिंब्याने सुभाषचंद्र बोस पुनः एकदा अध्यक्षपदावर निवडून आले. श्री. पट्टाभिसीतारामय्या यांचा पराभव हा आपला स्वतःचा पराभव आहे असे महात्माजींनी जाहीर केल्यावर काँग्रेस कार्यकारिणीच्या पंधरा सभासदांपैकी बारा सभासदांनी आपले राजीनामे सुभाषचंद्रांकडे सादर केले. काँग्रेस कार्यकारिणीतील सभासदांची निवड करताना सुभाषबाबूंनी महात्माजींशी विचारविनिमय करावा अशी अटही या कार्यकारिणीच्या ज्येष्ठ सभासदांनी घातली. या सर्व पेचप्रसंगांमुळे मे १९३९ मध्ये सुभाषबाबूंनी काँग्रेसच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. सुभाषबाबूंच्या जागी डॉ. राजेंद्रप्रसाद यांची अध्यक्ष म्हणून अखिल भारतीय काँग्रेससमितीने नेमणूक केली.

या सर्व नाट्यपूर्ण प्रकरणामध्ये पं. जवाहरलाल नेहरूंनी सुभाषचंद्रांना आपली सहानुभूती दिली असली तरी ते त्यांच्यामागे प्रत्यक्ष रीत्या उभे राहिले नाहीत. काँग्रेस समाजवादी नेत्यांनीदेखील घूमजाव करून तटस्थ राहण्याचे धोरण स्वीकारले. काँग्रेस-नेतृत्वाच्या बाबतीत कडक धोरण स्वीकारण्याला अनुकूल समय अद्यापि प्राप्त झालेला नसल्याचे मत समाजवादी नेत्यांनी या प्रसंगी व्यक्त केले. अशा रीतीने काँग्रेसच्या अंतरंगामध्ये बदल घडवून आणण्याची आकांक्षा धरणाऱ्या आणि काँग्रेसला जहाल डावे वळण देऊ इच्छिणाऱ्या समाजवाद्यांनी काँग्रेसमधील उजव्या नेतृत्वाशी सामना करण्याची आलेली निर्णायक संधी गमावली.

एकंदरीत १९२९ ते १९३९ या दहा वर्षांच्या काळात जवाहरलाल नेहरू, सुभाषबाबू यांच्यासारखे समाजवादी नेते अनेक वेळा काँग्रेसच्या अध्यक्षपदावर विराजमान झाले. अनेक डाव्या विचारसरणीचे नेते काँग्रेसच्या कार्यकारिणीवर सभासद म्हणून नेमले गेले. तरीही काँग्रेसवर प्रामुख्याने वर्चस्व राहिले ते उजव्या विचारसरणीच्या नेत्यांचेच.

१९३९ मध्ये दुसऱ्या महायुद्धाला प्रारंभ झाल्यानंतर भारताच्या स्वातंत्र्यलढ्यातील एका वेगळ्या पर्वाला प्रारंभ झाला. १९४२ च्या सुप्रसिद्ध भारत छोडो ठरावावर काही प्रमाणात समाजवादी राजकीय कार्यक्रमाची छाप दिसते. तसेच १९४६ मधील काँग्रेसपक्षाच्या निवडणूक जाहीरनाम्यात सौम्य स्वरूपाचा समाजवादी आर्थिक कार्यक्रम ग्रथित केलेला आहे. परंतु या सर्वांमध्ये कुठेही संपूर्ण व्यापक समाजवादी कार्यक्रमाचे दर्शन घडत नाही. स्वातंत्र्याचे वारे वाहू लागले होते आणि अशा वेळेला काँग्रेसनेत्यांकडून अशा तऱ्हेच्या सर्वसमावेशक समाजवादी कार्यक्रमाची घोषणा अपेक्षितही नव्हती.

१९४६ मध्ये मीरत येथे भरलेल्या अधिवेशनामध्ये एखाद्या समाजवादी नेत्याची काँग्रेसचा सरचिटणीस म्हणून निवड करण्यासंबंधी अनौपचारिक चर्चा झाली. या सुमारास म. गांधींच्या विचारांमध्ये बरेच परिवर्तन घडून आले होते. आर्थिक बाबतीतील सामाजीकरणाच्या तत्त्वाला ते आता मान्यता देऊ लागले होते आणि त्यांच्यामध्ये आणि समाजवाद्यां-मध्ये नाजूक भावसंबंध निर्माण झाले होते. इतर ज्येष्ठ उजव्या नेत्यांमध्येही लक्षणीय बदल झाला होता आणि ते आता पूर्वीइतके आग्रही राहिले नव्हते. आचार्य नरेंद्र देव किंवा जयप्रकाश नारायण काँग्रेसच्या अध्यक्षपदावर येण्याबाबतचा विचार महात्माजींनी बोलूनही दाखविला होता. अशोक मेहता, जयप्रकाश नारायण, राममनोहर लोहिया या सर्वच समाजवादी नेत्यांना भारतीय परिस्थितीच्या संदर्भात अधिक व्यवहारवादी विचार करून नवीन लोकशाही समाजवादाचे तत्त्वज्ञान मांडण्याची आवश्यकता भासू लागली होती. म. गांधींचे सत्याग्रही तत्त्वज्ञान आणि मार्क्स-वाद यांची सांगड घालणे शक्य आणि औचित्यपूर्ण आहे असेही त्यांना वाटू लागले होते. काँग्रेसमध्ये समाजवादी नेत्यांना पुन: एकदा अनुकूल परिस्थिती निर्माण होण्याची शक्यता झाली असताना प्रत्यक्षात काही वेगळेच घडावे असे विधिलिखित असावे.

स्वातंत्र्यापूर्वी घटनापरिषदेच्या निवडणुका झाल्या असता या निवडणुकांमध्ये भाग घेऊन घटना-परिषदेला समाजवादी विचाराचे वळण लावण्यात पुढाकार घ्यावा का असा समाजवादी नेत्यां-पुढे प्रश्न होता. परंतु ज्या कॅबिनेट मिशन योजने-प्रमाणे या निवडणुका घेण्यात आल्या त्या योजनेलाच समाजवाद्यांचा विरोध होता. त्यामुळे समाजवाद्यांनी घटनापरिषदेच्या निवडणुकांवरही बहिष्कार टाकला. परंतु जुलै १९४७ च्या सुमारास समाजवाद्यांनी आपल्या या भूमिकेचा फेरविचार केला आणि जय-प्रकाश नारायणांनी पं. नेहरूंना पत्र लिहून घटना-परिषदेमध्ये समाजवाद्यांनी सहभाग घेण्याची शक्यता कळविली. परंतु मे १९४८ च्या सुमारास काँग्रेस समाजवादी पक्षाच्या बहुसंख्य नेत्यांना घटना-परिषदेशी सहकार्य करण्याची कल्पना पसंत न पडल्याने घटनापरिषदेमध्ये समाजवादी नेते जाऊ शकले नाहीत. काँग्रेस समाजवादी पक्षाने एका ठरावान्वये प्रौढमताधिकारावर आधारित अशा रीतीने घटना परिषदेच्या निवडणुका घेऊन परिषदेची पुनर्रचना करण्याचा आग्रह धरला.

वास्तविक नोव्हेंबर १९४७ मध्ये जेव्हा अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचे नवी दिल्ली येथे अधिवे-शन पार पडले त्या वेळी आर्थिक स्वातंत्र्याच्या प्रश्नाला महत्त्व देणारा ठराव मंजूर करण्यात आला होता. स्वातंत्र्यानंतर काँग्रेसची उद्दिष्टे स्पष्ट कर-णारा हा पहिलाच ठराव असल्याने त्याला ऐतिहा-सिक महत्त्व आहे. राजकीय स्वातंत्र्याचे उद्दिष्ट सफल झाल्यामुळे आता सामाजिक न्याय आणि समता यांवर आधारलेल्या समाजाची रचना करून खरीखुरी लोकशाही प्रस्थापित करणे याकडे काँग्रे-सने आपले लक्ष केंद्रित करणे आवश्यक आहे असे या ठरावामध्ये स्पष्टपणे म्हटले होते. याच्यापुढेही जाऊन या ठरावामध्ये नमूद करण्यात आले की, "आधुनिक युगात केंद्राकडून नियोजित मार्गदर्शन आणि त्याचबरोबर राजकीय आणि आर्थिक सत्तेचे विकेंद्रीकरण यांची गरज लोकशाहीला आहे... मोठ्या प्रमाणावरील आणि केंद्रीकरण झालेल्या उद्योगधंद्यांची रचना अशा रीतीने करण्यात यावी की ज्यामुळे कामगारांना केवळ नफ्यामध्ये योग्य तो वाटा मिळेल एवढेच नव्हे, तर उद्योगधंद्यांच्या व्यवस्थापनामध्ये आणि प्रशासनामध्ये वाढता सह-भाग मिळेल. भूमी तसेच उत्पादन आणि वितरण यांची इतर साधने यांवर समाजाची मालकी असली पाहिजे आणि त्यांचा समाजहितासाठीच वापर झाला पाहिजे."

या ठरावात पुढे म्हटले आहे की, "अशा तऱ्हेची आर्थिक रचना उभारण्याचे काँग्रेसचे ध्येय असले पाहिजे की जेथे खाजगी मक्तेदारी आणि संपत्तीचे केंद्रीकरण नसतानादेखील अधिकाधिक उत्पादन-वाढ होईल आणि जेथे नागरी आणि ग्रामीण अर्थव्यवस्थांमध्ये योग्य ते संतुलन राखले जाईल. अशा तऱ्हेच्या सामाजिक रचनेमुळेच त्या बाजूला नफ्यावर आधारलेली अर्थव्यवस्था आणि खाजगी भांडवलशाही आणि दुसऱ्या बाजूला सर्वंकष राज्य-व्यवस्थेतील हुकूमशाही चाकोरी यापासून भिन्न असा मार्ग उपलब्ध होऊ शकेल."

अखिल भारतीय काँग्रेस कमिटीचा हा ठराव खरोखरीच सुस्पष्ट होता आणि काँग्रेसला समाजवादाकडे नेण्याच्या मार्गातील ते एक महत्त्वाचे पाऊल होते, तरीही काँग्रेसमधील सरदार पटेल आणि इतर उजव्या विचारसरणीच्या नेत्यांचा मानसिक पिंड, त्यांची सावध व व्यवहारी दृष्टी आणि काँग्रेस समाजवादी पक्षातील तरुण नेत्यांची बंडखोर युयुत्सू प्रवृत्ती यांचे जमणे कठीणच होते. काँग्रेसमधील तथाकथित उजव्या मतप्रणालीचे नेते समाजवादाचा एक मतप्रणाली म्हणून स्वीकार करावयास नाखूष असले तरी सामाजिक, आर्थिक व राजकीय न्यायावर आधारलेल्या समाजरचनेस त्यांनी आपला पाठिंबा दिलेला होता हे नाकारता येणार नाही. पं. नेहरू आणि सरदार पटेल इ. नेते यांच्यामध्येही मतभेद होतेच. परंतु देशामध्ये समाजवादी परिवर्तन घडवून आणण्याची किमया काँग्रेसच्या संघटनेमार्फतच करता येईल अशी पं. नेहरूंची श्रद्धा होती. कदाचित पं. नेहरूंनी या बाबतीत व्यवहारवादी दृष्टिकोन स्वीकारला असेही म्हणता येईल. समाजवादी नेत्यांचा मात्र काँग्रेसच्या या सामर्थ्यावर विश्वास नव्हता.

फेब्रुवारी १९४८ मध्ये म. गांधींच्या हत्येनंतर काँग्रेसमधील समाजवाद्यांचा राहिलेला आधारही गेला. महात्मा गांधींच्या निधनामुळे सरदार पटेलांना काँग्रेसच्या घटनेमध्ये हवा असलेला बदल करणे शक्य झाले. काँग्रेसच्या घटनेतील या महत्त्वपूर्ण बदलाने कोणत्याही काँग्रेस सदस्याने दुसऱ्या कोणत्याही राजकीय पक्षाचे सदस्यत्व स्वीकारण्यावर बंदी घालण्यात आली. या बदलामुळे समाजवाद्यांना काँग्रेसमध्ये राहून कार्य करणे अवघड झाले व १९४८ मध्ये त्यांनी काँग्रेसचा त्याग करून समाजवादी पक्षाची स्थापना केली.

## ५. समालोचन

१९२१ ते १९४७ या कालखंडातील काँग्रेस आणि समाजवादी चळवळ यांच्या संबंधांबाबतचा धावता आढावा आतापर्यंत घेतला. पंतप्रधान नेहरू आणि इंदिरा गांधी यांच्या अधिकारकाळामध्ये काँग्रेस आणि समाजवादी चळवळ यांचा काय संबंध राहिला हा स्वतंत्र लेखाचा विषय आहे. समाजवादी विचारप्रणालीचा आता आपल्या राज्यघटनेने ४२ व्या घटनादुरुस्तीनुसार अधिकृत रीत्या स्वीकार केलेला आहे. तरीही ज्या समाजवादाच्या विचारप्रणालीने या देशातील तरुणवर्गाला स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर काळात झपाटून टाकले त्याची ओढ आता कमी झालेली दिसते. भांडवलशाही राष्ट्रांनी स्वीकारलेली लोककल्याणकारी राज्याची संकल्पना व आर्थिक नियंत्रणांचे धोरण, साम्यवादी देशांनी आपल्या अर्थव्यवस्थेमध्ये स्वयंप्रेरणेच्या तत्त्वाला दिलेली काही प्रमाणातील मान्यता, झपाट्याने बदलणारे तंत्रज्ञान, तिसऱ्या महायुद्धाचे सावट, आंतरराष्ट्रीय संबंधांमध्ये बदललेले संदर्भ या व इतर अनेक कारणांमुळे सर्व जगभर राजकारणामध्ये व्यवहारवादाची लाट आल्यासारखी दिसत आहे. पं. नेहरूंच्या पुढाकाराने भारताने मिश्र अर्थव्यवस्थेचे धोरण स्वीकारले. त्यामुळेदेखील काँग्रेस पक्ष आणि कम्युनिस्टांखेरीज इतर डावे पक्ष हे खाजगी संपत्ती आणि राष्ट्रीयीकरण या बाबतीतील आपल्या पूर्वीच्या समाजवादी मतांबाबत तितकेसे आग्रही राहिल्यासारखे दिसत नाहीत. पंतप्रधान राजीव गांधी आणि केंद्रीय अर्थमंत्री विश्वनाथ प्रतापसिंग यांनी सध्या भारतीय अर्थव्यवस्थेमध्ये काही व्यवहारवादी बदल करण्याचे धोरण स्वीकारलेले आहे. पंतप्रधान राजीव गांधी समाजवादाची भाषा कटाक्षाने टाळत आहेत ही गोष्टदेखील मोठी सूचक आहे. इंदिरा गांधींच्या कारकीर्दीत एका वेळी प्रभावी झालेले डाव्या समाजवादी विचारसरणीचे काँग्रेस नेते आज एक तर राजकारणातून बाहेर फेकले गेले आहेत किंवा हतप्रभ झालेले आहेत. भविष्यकाळामध्ये राजीव गांधी यांचा हा शुद्ध व्यवहारवादी दृष्टिकोन आणि एकंदरीत त्यांचे नेतृत्व हेच टिकेल का यांबाबत कोणत्याही प्रकारचे निश्चित मत व्यक्त करणे कठिण आहे. परंतु भारतातील समाजवादी शक्ती विघटित झालेल्या असून त्यांची पीछेहाट होत आहे हे नाकारता येणार नाही. बहुसंख्य समाजवादी नेते वृद्धापकाळाकडे झुकले असल्याने आणि तरुण पिढीला कोणत्याही राजकीय विचारप्रणालीचे आकर्षण राहिले नसल्याने समाजवादी ध्येये आणि आंदोलन यांच्या बाबतीत फार आशावादी दृष्टिकोन स्वीकारणे आत्मवंचना करण्यासारखे ठरेल.

या सर्व बदललेल्या संदर्भात १९२१ ते १९४७
या कालखंडातील काँग्रेस आणि समाजवादी चळवळी
याबाबत काही निश्चित निष्कर्ष काढणे कठिण
असून त्याला केवळ एक ऐतिहासिक महत्त्व राहील.
काँग्रेस आणि समाजवादी चळवळ यांच्याकडे मागे
वळून पाहिले तर असे दिसते की, रॉय आणि
साम्यवादी पक्ष यांनी समाजवादाचा विचार भारता-
मध्ये रुजविण्यामध्ये प्रारंभीच्या काळामध्ये महत्त्वाची
कामगिरी बजावली असली तरी काँग्रेसला समाज-
वादी विचारापर्यंत नेण्यामध्ये त्यांचा फारसा वाटा
होता असे म्हणता येणार नाही. कम्युनिस्ट इंटर-
नॅशनलच्या धोरणाप्रमाणे येथील कम्युनिस्टांचा
काँग्रेसबाबतचा दृष्टिकोन सतत दोलायमान राहिला
आणि अखेरीस १९४२ च्या भारत छोडो चळवळी-
मध्ये तर ते काँग्रेस पक्ष आणि एकंदर राष्ट्रीय चळ-
वळीचा मुख्य प्रकार यांच्यापासून बाजूला फेकले गेले.

१९२८-२९ च्या सुमारास एम. एन. रॉय यांचा
काँग्रेसकडे पाहण्याचा दृष्टिकोन काही अंशी बदलला.
राष्ट्रीय चळवळीचे व्यापक स्वरूप आणि महात्मा
गांधींची जनमानसावरील पकड यांची कल्पना
रॉय यांना या वेळेपर्यंत आली होती. परंतु त्या
सुमारास चीनमधील कोमिनटांगच्या अनुभवानंतर
सोवियत संघ आणि कम्युनिस्ट इंटरनॅशनल यांचा
मध्यमवर्गीय नेतृत्वाखालील राष्ट्रीय चळवळींवर
विश्वास राहिला नाही. त्यामुळे भारतामध्ये काँग्रेस
पक्षाशी सहकार्य न करता स्वतंत्र रीतीने साम्यवादी
चळवळ उभारण्याचा निर्णय कॉमिटर्नच्या मार्ग-
दर्शनाने भारतीय कम्युनिस्ट पक्षाने घेतला.
गमतीची गोष्ट अशी की, राष्ट्रीय चळवळींबाबत
कॉमिटर्नने आता स्वीकारलेला दृष्टिकोन १९२०
मध्ये रॉय यांनीच प्रथम मांडला होता. परंतु
त्या वेळी कॉमिटर्नने लेनिनच्या नेतृत्वाखाली वेगळी
भूमिका स्वीकारली होती याचा उल्लेख वर आले-
लाच आहे. आता प्रत्यक्ष भारतीय राजकारणाच्या
जवळून घेतलेल्या अनुभवाने रॉय काहीसे लेनिनच्या
भूमिकेपर्यंत आले होते; परंतु कॉमिटर्नच्या विचारांचा
काटा रॉय यांच्या मूळ प्रबंधाकडे झुकला होता.
कॉमिटर्नला विरोध केल्याने अखेरीस रॉय यांची
कॉमिटर्नमधून व साम्यवादी पक्षातून १९२९ मध्ये
हकालपट्टी झाली. परिणामी कम्युनिस्ट राष्ट्रीय
चळवळीपासून दूर गेले आणि रॉयही काँग्रेसवर
आपल्या विचारांचा ठसा उमटवू शकले नाहीत.



१९३१ मध्ये रॉय यांना ब्रिटिश सरकारने तुरुंगात
डांबले व ते १९३६ मध्ये तुरुंगवासातून सुटले.
सुटकेनंतर त्यांनी काँग्रेस पक्षात प्रवेश केला. परंतु
काँग्रेसच्या विचारसरणीशी रॉय समरस होणे कठीणच
होते. १९३७ मध्ये Independent India
(स्वतंत्र भारत) या प्रसिद्ध केलेल्या ग्रंथामध्ये त्यांनी
गांधीवाद व गांधीवादी अर्थशास्त्र यांवर कडाडून
हल्ला चढविला. विशेषतः धर्म आणि राजकारण
यांची सांगड घालण्याच्या महात्माजींच्या प्रयत्नावर
त्यांनी कडाडून हल्ला चढविला. तथापि महात्माजींची
देशातील लोकप्रियता इतकी मोठी होती की रॉय
यांचा आधुनिक पुरोगामी व बुद्धिनिष्ट दृष्टिकोन बहु-
संख्य काँग्रेसजनांना रूचणे एकंदरीत कठीणच होते.
जून १९३९ मध्ये रॉय यांनी जहाल काँग्रेसजनांचा
संघ (League of Radical Congressmen)
स्थापिला व काँग्रेसअंतर्गत कार्य करून काँग्रेसला
आपल्या विचारसरणीपर्यंत नेण्याचा प्रयत्न केला.
१९४० मध्ये त्यांनी मौलाना अबुल कलम आझाद
यांच्या अधिकृत उमेदवारीविरुद्ध काँग्रेसच्या अध्यक्ष-
पदासाठी निवडणूक लढविली व त्यात त्यांचा
केविलवाणा पराभव झाला. दुसरे महायुद्ध सुरू
झाल्यानंतर फॅसिस्ट शक्तींच्या पराभवासाठी लोक-
शाहीवादी शक्तींना मदत करणे आवश्यक आहे
अशी त्यांनी भूमिका घेतली. साहजिकच काँग्रेसने
सुरू केलेल्या छोडो भारत चळवळीला त्यांचा पाठिंबा
राहिला नाही व कम्युनिस्टांप्रमाणे तेही काँग्रेस
आणि राष्ट्रीय चळवळ यांच्यापासून दूर फेकले
गेले. एव्हाना स्वतः रॉय यांच्या विचारांमध्ये
मूलगामी फरक घडून येत होता. साम्यवादी
विचारांकडून नवमानवतावादाकडे त्यांचा प्रवास
सुरू झाला होता. साहजिकच काँग्रेस पक्षामध्ये ते
रमले नाहीत वा काँग्रेसवर समाजवादी विचारांचा
प्रभाव पाडू शकले नाहीत.

काँग्रेसला समाजवादी विचारांकडे नेण्याचे खरे
श्रेय त्यामुळे काँग्रेस समाजवादी आणि पं. जवाहर-
लाल नेहरू यांनाच द्यावे लागते. या दोहोंमध्ये
अधिक श्रेय कोणाला द्यावे असा प्रश्न विचारला तर
मात्र त्याच्याबद्दल निश्चित उत्तर देणे कठीण जाईल.
किंबहुना समाजवादी नेते आणि पं. नेहरू यांचे
काँग्रेसला समाजवादी वळण लावण्याबाबतचे कार्य
स्वातंत्र्यपूर्व काळातच नव्हे तर स्वातंत्र्योत्तर काळा-
तही परस्परपूरक ठरले असाच कदाचित इतिहासाचा

अनुक्रमणिका

निर्वाळा राहिल. काँग्रेस समाजवादी नेत्यांचा त्याग मोठा होता. त्यांनी देशामध्ये समाजवादाची हवा निर्माण केली व विशेषत: तरुणवर्गाला समाजवादी विचारसरणीकडे आकृष्ट केले यात काहीच शंका नाही. परंतु त्याचबरोबर समाजातील सर्व स्तरांपर्यंत जाऊन दलितवर्ग व शेतकरी यांना संघटित करण्यामध्ये त्यांना महत्त्वपूर्ण कामगिरी काँग्रेस अंतर्गत राहून काम करीत असताना (व नंतरही) बजावता आली नाही ही वस्तुस्थिती आहे. सुरुवातीच्या काळात किसानसभांमार्फत कार्य करण्याचा प्रयत्न समाजवादी नेत्यांनी विशेषत: उत्तर भारतात केला. परंतु त्यात त्यांना फारसे यश आले नाही. मजूर संघटना उभारण्यात त्यांना माफक यश मिळाले. परंतु ग्रामीण भागातील बहुसंख्य जनतेपर्यंत मध्यमवर्गीय समाजवादी नेतृत्वाला कधीच पोहोचता आले नाही.

पं. जवाहरलाल नेहरूंना त्यामानाने काँग्रेस पक्षाच्या ग्रामीण भागामध्ये असलेल्या सामर्थ्याची यथार्थ जाण होती. वास्तवतेचे भान आणि व्यवहारवादी धोरण यामुळे पं. नेहरूंनी काँग्रेस समाजवादी पक्ष व स्वत:बाबत एक लक्ष्मणरेषा आखून घेतली होती. विशिष्ट मर्यादेपलीकडे जाऊन त्यांनी काँग्रेस समाजवादी पक्षाच्या नेत्यांना पाठिंबा दिला नाही किंवा काँग्रेसबाहेर राहून आपल्याला भारतामध्ये समाजवाद आणण्यासाठी काही नेत्रदीपक कामगिरी बजावता येईल अशा भ्रामक समजुतीखालीही ते कधी वावरले नाहीत. सुभाषचंद्र बोस यांच्यासारख्या तडफदार व्यक्तिमत्त्वाच्या नेत्यालाही अफाट लोकप्रियता असतानादेखील काँग्रेसबाहेर राहून दुसरी प्रभावी पक्षयंत्रणा उभारणे कठीण गेले. आकर्षक व्यक्तिमत्त्व, उमदे नेतृत्व आणि बादशाही लोकप्रियता या सर्वांचा संगम पं. नेहरूंमध्ये झाला होता. तरीही काँग्रेससंघटनेबाहेर राहून त्यांना समाजवादी चळवळ उभारता आली असती की नाही याबद्दल जबरदस्त शंका आहे. आणि याची कल्पना इतर कोणाहीपेक्षा पंडितजींना अधिक होती. भारतातील एकंदर परिस्थिती, काँग्रेससंघटनेचे जनमानसातील स्थान याचे योग्य आकलन झाल्यामुळे पंडितजी काँग्रेसमध्ये राहूनच समाजवादी धोरणापर्यंत काँग्रेस व देश यांना नेण्यासाठी प्रयत्न करत राहिले व त्यात ते यशस्वी झाले यात काही शंका नाही. आपल्या या कार्यात काँग्रेस समाजवादी पक्षाच्या नेत्यांचा त्यांनी मोठ्या चतुराईने वापर करून घेतला. पुढे इंदिरा गांधींनी धूर्तपणाने समाजवादी विचारांच्या तरुण तुर्कांचा वापर करून घेतला. परंतु त्यामध्ये भारतामध्ये समाजवादी कार्यक्रम अमलात आणण्याच्या विचारापेक्षा काँग्रेसमध्ये स्वत:चे नेतृत्व भक्कम करणे हाच खरा हेतू होता असे त्यांच्या नंतरच्या राजकारणावरून म्हणता येईल. पं. नेहरूंवर अशा तऱ्हेचा कोणताही आरोप करणे अनुदारपणाचे ठरेल. पं. नेहरूंच्या समाजवादी विचारप्रणालीबाबत जो स्वत:चा दृष्टिकोन होता तसा इंदिराजींकडे नव्हता. इतिहास आणि राजकारण यांचा पंडितजींप्रमाणे इंदिराजींचा खास अभ्यासही नव्हता. कोणताही महत्त्वाकांक्षी राजकारणी आपल्या पक्षामध्ये आपले नेतृत्व उभारण्याचा आणि ते कायम राखण्याचा सातत्याने प्रयत्न करीत असतोच. त्याला अर्थातच पंडितजींचाही अपवाद नव्हता. परंतु त्याच्या जोडीला व्यापक राष्ट्रहिताची जाणीव आणि समाजवादी समाजरचनेसंबंधीची तळमळ हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि विचाराचा स्थायी आणि अविभाज्य भाग होता. त्यामुळे काँग्रेस समाजवादी पक्षाच्या तरुण नेत्यांचा समाजवादी विचाराच्या प्रसारासाठी आणि काँग्रेसने समाजवाद स्वीकारावा यासाठी पं. नेहरूंनी जो उपयोग करून घेतला ते त्यांच्या राजकीय मुत्सद्देगिरीचे निदर्शक आहे असे नि:संशयपणे म्हणता येईल.

काँग्रेस समाजवादी पक्षाच्या नेत्यांनी १९४८ मध्ये काँग्रेसचा त्याग केला व स्वतंत्र समाजवादी पक्षाची स्थापना केली. समाजवादी नेत्यांनी अशा तऱ्हेचे पाऊल उचलण्याऐवजी काँग्रेसमध्येच राहून पंडितजींना साथ दिली असती तर काँग्रेसला अधिक लवकरच्या काळात समाजवादी धोरणाचा स्पष्टपणे अंगीकार करता आला असता व त्याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे या धोरणाची प्रत्यक्षात अमलबजावणी करण्यात काँग्रेसला यश प्राप्त झाले असते असे एक मत व्यक्त केले जाते. ऐतिहासिक विकासामध्ये एखादी घटना घडली असती किंवा नसती तर त्याच्या भविष्यकाळावर काय परिणाम झाला असता या चर्चेला तसे फारसे महत्त्व देता येणार नाही. तसेच राजकीय घटनांचे स्वरूप अनेकदा इतके गुंतागुंतीचे असते की, केवळ एखाद्या विशिष्ट राजकीय घटनेला वा राजकीय घटकाला ऐतिहासिक

आणि राजकीय विकासात निर्णायक महत्त्वाचे स्थान देणे योग्य होणार नाही. समाजवादी नेते काँग्रेस-मध्ये राहिले असते तर ते प्रभावी राजकारण करून काँग्रेसला समाजवादी कार्यक्रम अमलात आणण्या-साठी भाग पाडूच शकले असते याची खात्री देता येत नाही. अशोक मेहतांसारखे नेते अशा प्रकारच्या भ्रामक समजुतीने काँग्रेसमध्ये शिरले. त्यांना नंतर एक तर वैफल्य आले किंवा ते स्वत: तथाकथित काँग्रेससंस्कृतीचाच एक भाग बनून गेले. एकदा काँग्रेसमध्ये प्रवेश केल्यानंतर या सर्व नेत्यांना निवडणुका जिंकणे, समाजवादी कार्यक्रम अमलात आणण्यासाठी सातत्याने सत्तेवर राहण्याचा प्रयत्न करणे या घातक चक्रामध्ये गुंतून राहणे अटळ झाले असते. याउलट, समाजवादी नेत्यांनी (तसेच साम्यवाद्यांनीही ) काँग्रेसबाहेर राहून काँग्रेसला समाजवादी धोरणाचा प्रत्यक्ष स्वीकार करण्यास भाग पाडले ही त्यांची ऐतिहासिक कामगिरी होय असे म्हणता येईल. कालांतराने १९५५ मध्ये मद्रास येथील आवडीच्या अधिवेशनात पं. नेहरूंच्या नेतृत्वाखाली भारतामध्ये समाजवादी समाजरचना प्रस्थापित करण्यासंबंधी ठरावाद्वारे निर्धार व्यक्त केला. एका दृष्टीने समाजवादी नेत्यांनी काँग्रेस-बाहेर राहून सातत्याने काँग्रेसवर दडपण आणले व त्यामुळेच पं. नेहरूंना काँग्रेस पक्षाला समाजवादी धोरणाकडे अभिमुख करण्यात यश आले असेही म्हणता येईल.

काँग्रेसला समाजवादी वळण लावत असतानाच आणखी दोन बाबतीत पं. जवाहरलाल नेहरू यांनी ऐतिहासिक महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. त्याचे स्मरण भारतातील सर्व समाजवाद्यांनी ठेवणे जरूर आहे. सुभाषचंद्र बोस हे पं. नेहरूंइतके तरुणांमध्ये लोकप्रिय होते. विचाराने ते समाजवादी होते व १९३१ मध्येच भारताचे रूपांतर समाजवादी प्रजासत्ताकामध्ये झाले पाहिजे असा विचारही त्यांनी मांडला होता. परंतु सुभाषबाबूंच्या समाजवादी विचारामध्ये फॅसिस्ट विचार आणि साम्यवादी विचार यांचे एक चमत्कारिक मिश्रण आढळते. फॅसिझमचा खरा धोका पं. जवाहरलाल नेहरूंनी ओळखला व त्यावर त्यांनी वारंवार कडक टीकाही केली. काँग्रेसने स्वीकारलेल्या समाजवादी विचारा-वर फॅसिस्ट आणि साम्यवादी विचारसरणीचा प्रभाव राहू न देण्यामध्ये पं. नेहरूंनी अत्यंत महत्त्वाची कामगिरी बजावली आहे असे म्हणता येईल. पं. नेहरूंची दुसरी महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्यांनी भारतातील समाजवादाला आर्थिक क्षेत्रात मिश्र अर्थव्यवस्थेचा एक नवीन नमुना प्राप्त करून दिला. १९२१ ते १९४७ या कालखंडामधील प्रदीर्घ चिंतनानेच पं. जवाहरलाल नेहरूंचे मिश्र अर्थ-व्यवस्थेबद्दलचे विचार निश्चित झाले होते. स्वातंत्र्य-पूर्व काळात काँग्रेसच्या आर्थिक समितीवर कार्य करीत असतानाच याबाबत त्यांनी एक खूणगाठ मनाशी बांधली होती व त्याप्रमाणे भांडवलशाही आणि साम्यवादी या दोन्ही अर्थव्यवस्थांपेक्षा एक नवीन नमुना निर्माण करण्याचा विचार केला होता. स्वातंत्र्यानंतर पंतप्रधान झाल्यावर पंडितजींनी मिश्र अर्थव्यवस्था व नियोजन यांबाबतीतील आपल्या कल्पना साकारण्याचा प्रयत्न केला. त्यामध्ये त्यांना किती यशापयश आले हा स्वतंत्र विवेचनाचा भाग झाला. परंतु काँग्रेसला त्यांनी एक नवीन समाजवादी विचार प्राप्त करून दिला याबाबत शंका नसावी.

**संदर्भ ग्रंथ :**

1. Sankar Ghose– Socialism and Communism in India. Allied Publishes, 1971.
2. B. R. Nanda (Ed)– Socialism in India. Vikas Publications, 1972.
3. Roop Lekha Borgohain– The Indian National Congress, Intellectual Publishing House, 1982.
4. B. R. Tomlinson– The Indian National Congress and the Raj, 1929–1942 –MacMillan, 1976.
5. Sohail Jawaid– Growth of Socialism in India. Associated Publishing House, 1980.

○ ○ ○

अनुक्रमणिका

# स्वातंत्र्यपूर्व काळातील काँग्रेसची आर्थिक धोरणे

रत्नाकर हातेकर

स्वातंत्र्यपूर्व काळातील काँग्रेसच्या आर्थिक धोरणांचा विचार हा साधारणपणे काँग्रेसच्या स्थापनेपासून ते गांधीयुगापर्यंतचा भारतीय आर्थिक राष्ट्रवादाच्या उभारणीचा कालखंड व गांधीयुगातील १९२० नंतरचा आर्थिक राष्ट्रवादाला राजकीय स्वातंत्र्याचा पेहराव देण्याच्या व्यापक जनाधारित चळवळीचा दुसरा कालखंड असा पृथकपणे केला जात असला, तरी सुरुवातीच्या काँग्रेसमधील अग्रणींची मुख्य आर्थिक धोरणे हीच काँग्रेसच्या मुख्य विचारप्रवाहात स्वातंत्र्यप्राप्तीच्या काळापर्यंत प्रतिबिंबित होत राहिली असे लक्षात येते.

काँग्रेसच्या स्थापनेच्या वेळी दादाभाई नवरोजी, गोपाळ कृष्ण गोखले, सुरेंद्रनाथ बॅनर्जी, दिनशॉ वाच्छा, रमेशचंद्र दत्त, लोकमान्य टिळक, सुब्रह्मण्यम अय्यर आदी पुढाऱ्यांच्या मनात ब्रिटिश साम्राज्याकडून काही निश्चित अशा अपेक्षा होत्या. तत्कालीन जगातील सर्वांत पुढारलेला देश म्हणून ते इंग्लंडकडे बघत होते व ब्रिटिशांच्या भारतातील राजवटीचा जो अनुकूल परिणाम दृष्टोत्पत्तीस आलेला होता त्याच्या योगाने ते प्रभावित झालेले होते. ब्रिटिश राजवटीने अठराव्या शतकात व एकोणिसाव्या शतकारंभी असणारे भारतातील राजकीय अराजक संपुष्टात आणून त्या जागी कायद्याचे राज्य व सुव्यवस्था आणली होती, आधुनिक शिक्षणाद्वारे लोकशाही कल्पनांवर आधारित सामाजिक प्रबोधनाचा प्रसार होऊ लागला होता, समान राष्ट्रीयत्वाची भावना निर्माण होण्यास अनुकूल परिस्थिती होती, ब्रिटिश राजवटीमुळे भारताचा औद्योगिक विकास वेगाने घडून येईल; पाश्चात्त्य विज्ञान–तंत्रज्ञान, संघटनप्रकार व युरोपीयन उद्यमशीलता ह्यांच्या योगे आर्थिक मागासपणाच्या कुंठितावस्थेत असलेल्या भारताचा कायापालट घडून येऊ शकेल अशी आशा त्यांना वाटत होती. रेल्वे, रस्ते, कालवे, भरभराटीला आलेल्या जागतिक बाजारपेठांशी संपर्क व परकीय व्यापारी आणि औद्योगिक उपक्रमांची भारतात चालू असलेली यशस्वी वाटचाल, ह्या सर्वांच्या परिणामी घडू शकणारी भारतीय औद्योगिक क्रांती त्यांना साद घालत होती हे दादाभाई नवरोजी व न्या. महादेव गोविंद रानडे ह्यांच्या निबंधांतून दिसून येत होते. इंग्रजी राज्य हे त्यांना ईश्वरी वरदान वाटत होते यात नवल नाही.

आरंभीच्या काळात ब्रिटिश राजवटीच्या उपकारक बाजूची काँग्रेसच्या नेतृत्वाच्या ठिकाणी दिसून येणारी ही जाणीव, ब्रिटिश अमलाखाली आर्थिक प्रगती अपेक्षेनुसार होत नसल्याचे लक्षात आल्यानंतर उत्तरोत्तर क्षीण होत गेल्याचेही दिसते.

ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या आर्थिक धोरणांची सखोल चिकित्सा करीत असतानाच काँग्रेसच्या आरंभीच्या नेतृत्वाचा त्या राजवटीबाबतचा दृष्टिकोन बदलत गेला व तदनुसार त्यांची निरनिराळ्या आर्थिक प्रश्नांबाबतची भूमिका तयार होत गेली; त्याबरोबरच ब्रिटिश राजवट ही भारतीय आर्थिक हितसंबंधांना बाधक आहे अशी त्यांची धारणा बनत गेली. भारताच्या दारिद्र्याला ब्रिटिश राज्यकर्त्यांची धोरणे जबाबदार आहेत, महसूल अधिकाऱ्यांकडून शेतकऱ्यांची पिळवणूक होते, एतद्देशीय उद्योगांचा नाश करण्याचे व आधुनिक उद्योगाच्या वाढीला उत्तेजन न देण्याचे किंबहुना त्यांना हतोत्साहित करण्याचे धोरण ब्रिटिश राजवटीचे आहे, देशात दुर्भिक्ष असताना धान्याची निर्यात केली जाते, इंग्रजांचे चलनविषयक धोरण हे भारतीय शेती व उद्योगांच्या हिताला मारक ठरले आहे, ब्रिटिश मालकीच्या मळ्यांमध्ये काम करणाऱ्या भारतीय मजुरांना गुलामाप्रमाणे वागविले जाते, भारतात रेल्वेमार्गांचा विकास भारतीय उत्पन्न वाढण्याच्या किंवा शेतीच्या प्रगतीच्या दृष्टीने न होता भारतीय कच्च्या

मालाची ब्रिटनला निर्यात करण्याच्या दृष्टीने झाला, जनतेवर सरकारने लादलेल्या कराचा बोझा असह्य झालेला आहे, सरकारी खर्च हा येथील रयतेच्या कल्याणासाठी न होता भारतीयेतर हितांची जोपासना करण्यासाठी अथवा ब्रिटिशांच्या साम्राज्यविस्तारासाठी चाललेल्या युद्धापायी केला जातो, आणि मुख्य म्हणजे भारताचे दारिद्र्य हे इंग्लंडकडून होणाऱ्या आर्थिक शोषणामुळे आहे इत्यादी मुद्द्यांबाबतचे प्रतिपादन हे राष्ट्रवादी जाणिवेचे प्रमुख अंग होत गेले.

१९०१ साली लंडनमध्ये प्रसिद्ध झालेले विल्यम डिग्बी ह्यांचे "प्रॉस्परस इंडिया" हे पुस्तक जणू राष्ट्रवाद्यांचे पाठ्यपुस्तकच झाले होते ! भारतीय दारिद्र्याचा प्रश्न हा वितरणाचा प्रश्न नसून उत्पादनाशी निगडित असलेला आहे असे त्यांना वाटत असे. काँग्रेसच्या राष्ट्रवादी पुढाऱ्यांना विविध आर्थिक प्रश्नांच्या मुळाशी भारतीय दारिद्र्याचे वास्तव तीव्रपणे जाणवत होते. त्यामुळे दारिद्र्याचा प्रश्न हा तत्कालीन भारतातील सर्व वर्गांना जोडणारा ठरला, तो एक राष्ट्रीय प्रश्न बनला. आणि दैवदुर्विलास असा की साम्राज्यवादी ब्रिटिशांना मात्र जमीनदार, सावकार व वकीलवर्ग हा येथील जनतेचे शोषण करणारा वर्ग आहे असे प्रतिपादन करून वर्गीय भूमिका घ्यावी लागली.

भारताचे दारिद्र्य नाकारण्याची प्रवृत्ती तत्कालीन ब्रिटिश राज्यकर्त्यांमध्ये सुरुवातीला आढळते. १८८७ मध्ये लॉर्ड डफरीनने "भारतातील निम्नस्तरातील लोकसंख्येच्या परिस्थितीची चौकशी" करण्यासाठी एक गुप्त परंतु अधिकृत समिती नेमली; तथापि तिचा अहवाल कधीच प्रकाशात आला नाही. 'हिंदी लोकांची भौतिक परिस्थिती' (१८८१ ते १८९१) हा सरकारी अहवाल १८९३ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यांत भारतीय लोक "समृद्धीच्या स्थितीत" असल्याचे म्हटले होते.

भारताचे दरडोई उत्पन्न २० रु. असल्याचे दादाभाईंचे म्हणणे होते. सापेक्ष दारिद्र्याचे आकडे देऊन काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी इंग्रज राज्यकर्त्यांना असेही दाखवून दिले की, भारतात इंग्रजांचे कायद्याचे राज्य व सुव्यवस्था असूनही भारतातील लोकांचे दरडोई उत्पन्न २ पौंड तर तुर्कस्थानमध्ये अंधाधुंदीचे राज्य असूनही तेथील दरडोई उत्पन्न ४ पौंड आहे, सबब इंग्रजी राजवटीच्या भलेपणाचे गोडवे गाण्यात काय हशील आहे ?

भारतातील दारिद्र्य कमी होत आहे की, वाढत आहे हा प्रश्नही त्या काळी महत्त्वाचा बनला. ब्रिटिश राजवटीत दारिद्र्य वाढत असल्याचे स्पष्ट झाल्यास ब्रिटिश अमदानीचा नैतिक पायाच नष्ट होणार होता. १६ ऑगस्ट १९०१ ला तत्कालीन भारतमंत्री लॉर्ड हॅमिल्टन ह्यांनी तर जाहीर केले की, "I admit at once that if it could be shown that India has retrograted in material prosperity under our rule we stand self-condemned and we aught no longer to be trusted with the control of the country." यावर गोपाल कृष्ण गोखले ह्यांनी १९०२ च्या अंदाजपत्रकावरील भाषणात भारतातील दारिद्र्यात सतत वाढ होत असल्याचे व ही बाब जगाच्या इतिहासातील सर्वांत दुःखकारक गोष्ट असल्याचे प्रतिपादन केले. १८८६ च्या काँग्रेसच्या ठरावात "भारतातील लोकसंख्येच्या मोठ्या विभागाचे वाढते दारिद्र्य" याचा उल्लेख आहे. ह्याउलट, लॉर्ड कर्झनने भारताचे दरडोई उत्पन्न सतत वाढत असल्याचे दाखवून १९०४ च्या अंदाजपत्रकावरील चर्चेच्या वेळी विरुद्ध प्रतिपादन करणाऱ्यांची थट्टा करीत म्हटले की, "प्रत्यक्षात उघडीप असताना जोरदार पावसाची हाकाटी करून डोक्यावर छत्री उघडणाऱ्या विक्षिप्त व्यक्तींप्रमाणे त्यांची स्थिती आहे." भारतात वारंवार पडणाऱ्या दुष्काळाकडे भारताचे दारिद्र्य वाढत असल्याचा पुरावा म्हणून राष्ट्रीय नेते बोट दाखवीत असत; शिवाय शेतकऱ्यांच्या जमिनी अधिकाधिक प्रमाणात सावकारांच्या ताब्यात जात होत्या हाही त्यांना वाढत्या दारिद्र्याचा पुरावा वाटत असे. करांपासून सरकारला मिळणाऱ्या उत्पन्नात होत असलेली वाढ हे येथील लोकांच्या भरभराटीचे लक्षण आहे असा दावा ब्रिटिशांनी केल्यावर १९०२ व १९०३ च्या अंदाजपत्रकावरील चर्चेत गो. कृ. गोखले ह्यांनी असे दाखविले की, सरकारने केलेली करवाढ हे भारताच्या दारिद्र्याचे एक कारण होय. सरकारचे जकातींपासूनचे उत्पन्न वाढले हे जरी खरे असले

तरी त्यावरून भारताचा व्यापार वाढला असे फार तर म्हणता येईल; दारिद्र्य कमी झाले असे म्हणता यावयाचे नाही. मध्यमवर्गाच्या उत्पन्नावरील करापासून होणारी मिळकत ही अनेक वर्षांपासून वाढत नसल्याचे व मिठावरील करांपासूनची मिळकत हीदेखील लोकसंख्येच्या वाढीच्या प्रमाणात वाढत नसल्याचे गोखल्यांनी दाखवून दिले.

भारतात त्या काळी वाढत असणारे किंमतीचे मान हे भारतीय शेतकऱ्यांच्या भरभराटीला कारणीभूत असून भारतीय जनतेच्या वाढत्या क्रयशक्तीचे निदर्शक आहे असा दावा ब्रिटिश राज्यकर्ते करीत. त्याचाही प्रतिवाद समर्थपणे राष्ट्रवादी पुढाऱ्यांनी केला.

भारतीय दारिद्र्याच्या प्रश्नाची सर्वांगीण चौकशी करण्यासाठी सरकारने समिती नेमावी अशी मागणी सातत्याने राष्ट्रीय पुढाऱ्यांनी केलेली आहे. दादाभाई नवरोजींनी ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्समध्ये, काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून बोलताना वेल्बी कमिशनसमोर साक्ष देताना ह्या मागणीचा पाठपुरावा हिरीरीने केल्याचे दिसते. १९०० साली काँग्रेसने हिंदी जनतेच्या आर्थिक परिस्थितीची चौकशी करण्यासाठी सरकारने स्वतंत्र समिती नेमावी अशी मागणी केली.

भारताचे दारिद्र्य व एकूण आर्थिक अवनती हे प्रश्न त्या वेळच्या आर्थिक विचारमंथनाचे प्रमुख विषय होते असे दिसते. भारताच्या दारिद्र्याची कारणमीमांसा ग. व्यं. जोशी, मदनमोहन मालवीय, रमेशचंद्र दत्त आदींच्या लेखांमधून व व्याख्यानांमधून होत होती. भारताच्या दारिद्र्याला येथील लोकसंख्येचा आकार जबाबदार असल्याचे १८८८ च्या सेंट अँण्ड्र्युज भोजनप्रसंगी लॉर्ड डफरीनने व १८९१ मधील एका व्याख्यानात लॉर्ड लॅण्ड्सडॉन ( डफरीननंतरचा व्हॉयसरॉय ) ह्यांनी म्हटले होते. ह्या कारणामीमांसेचा योग्य समाचार दादाभाईंनी आपल्या "पॉव्हर्टी अँण्ड अन-ब्रिटिश रूल इन इंडिया" ह्या १९०१ साली प्रसिद्ध झालेल्या ग्रंथात, जी. ए. अय्यर ह्यांनी १९०० साली भारतीय काँग्रेसला सादर केलेल्या अहवालात, चंदावरकर व सुरेंद्रनाथ बॅनर्जी ह्यांनी काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून बोलताना व रमेशचंद्र दत्त ह्यांनी १८९७ मध्ये "इंग्लंड व भारत" ह्या आपल्या ग्रंथात साधार घेतलेला आहे. युरोपातील काही देशांच्या लोकसंख्येची घनता भारतापेक्षा अधिक असूनही ते अधिक संपन्न कसे ? असा प्रश्न त्यांनी उपस्थित केला. पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या पत्रिकेच्या १८९० च्या अंकामध्ये लिहिताना ग. व्यं. जोशींनी तर दाखवून दिले की, माल्थसचा लोकसंख्येचा सिद्धांत भारतासारख्या मागास देशांना लागू पडत नसून येथे लोकसंख्यावाढीचा अर्थ श्रमाचा स्वस्त पुरवठा व अनुकूलता लाभल्यास त्यातून घडू शकणारी उत्पादनवाढ असा होऊ शकतो. भारताच्या दारिद्र्याचे मूळ अति-लोकसंख्येत न शोधता भारताच्या निम्न-उत्पादनात शोधले पाहिजे असे त्यांचे स्वच्छ प्रतिपादन होते. दादाभाई नवरोजींनी एका व्याख्यानात म्हटले की, "Let them (the British) withdraw their hand from India's throat and then see whether the increase in population is not an addition to its strength and production instead of British made famines and poverty." असेच विचार जी. एस. अय्यर ह्यांनी वेल्बी कमिशनसमोर साक्ष देताना मांडले आहेत. भारताच्या वाढत्या लोकसंख्येला अन्न पुरविणे महत्त्वाचे असले तरी त्याहून त्यांना रोजगार पुरविणे अधिक महत्त्वाचे असल्याची जाणीव न्या. रानडे ह्यांच्या निबंधातून व दिनशॉ वाच्छा ह्यांच्या काँग्रेस अध्यक्षीय भाषणातून व्यक्त होते. दादाभाईंनी तर भारतातील दारिद्र्य हे वाढत्या लोकसंख्येऐवजी ब्रिटिश राजवटीमुळे आहे असे प्रतिपादन करताना म्हटले की, "To talk of overpopulation at present is just as reasonable to cutoff a man's hand and then to taunt him that he was not able to maintain himself or move his hands." १९०१ साली कलकत्त्याहून प्रसिद्ध झालेल्या Indian Famines ह्या पुस्तकात पी. सी. रे म्हणतात की, भारताला दास्यात अडकवून वाढत्या लोकसंख्येमुळे भारताचे दारिद्र्य असल्याचे प्रतिपादन करणे म्हणजे लोकांचे लक्ष खऱ्या प्रश्नांपासून विचलित करण्यासारखे आहे. दादाभाईंना हे

प्रतिपादन "जखमेवर मीठ शिंपडल्यासारखे" वाटत होते.

१८८८ च्या आर्थिक चौकशीवरील ठरावात, तसेच लॉर्ड डफरीन व लॉर्ड कर्झन ह्यांच्या व्याख्यानांतून भारतीय दारिद्र्याची जी कारणमीमांसा सापडते तीनुसार मितव्ययीवृत्तीचा अभाव, विवाहादी समारंभांवरील वायफळ खर्च, कोर्ट–कज्ज्यांचा रयतेला असणारा हव्यास, रयतेतील अज्ञान व कामचुकारपणा, ह्या बाबी दारिद्र्याला कारणीभूत आहेत. ह्यावर रमेशचंद्र दत्त, रानडे, चंदावरकर, सुरेंद्रनाथ बॅनर्जी प्रभृतींनी हिंदी लोकांइतके काटकसरी लोक जगाच्या पाठीवर अन्यत्र शोधून सापडायचे नाहीत, लग्नादींवरील खर्च हा अल्प व क्वचित उद्भवणारा खर्च असतो असे दाखविले.

भारतीय दारिद्र्याच्या प्रश्नाची चर्चा सातत्याने चालू ठेवण्यामागील काँग्रेस पुढाऱ्यांची भूमिका ११ सप्टें. १८९४च्या 'केसरी'च्या अग्रलेखावरून लक्षात येते, 'केसरी' म्हणतो, "इंग्लिश कामगारांच्या खलबत्त्यामध्ये कुटून तयार झालेल्या आकड्यांवरूनच जर आपणास नेटीव्ह लोकांच्या दारिद्र्याचे, दीनावस्थेचे व सरकारच्या हलगर्जीपणाचे भरपूर माप सरकारच्या पदरात घालता आले तर, येथील अरेरावी कामगारांनी आपले न्यायाचे मागणे आपणास दिले नाही, तरी आपणास सर्व जगास ऐकू जाईल असा टाहो फोडीता येईल आणि इंग्लंडातील इंग्लिश लोक जागे होऊन आमच्या दुःखांचे परिमार्जन करतील."

१९ व्या शतकाच्या उत्तरार्धात भारतातील भीषण दुष्काळांमुळे भारतीय दारिद्र्याचा प्रश्न राजकीय पातळीवर आला. वारंवार उद्भवणारे दुष्काळ हे येथील लोकांच्या दारिद्र्याचे प्रमुख कारण असल्याचे प्रतिपादन इंग्रज अंमलदार करीत. ह्याउलट, दुष्काळ हे भारतीयांच्या दारिद्र्याचे कारण नसून तो त्यांच्या दारिद्र्याचा परिणाम आहे असे राष्ट्रीय पुढाऱ्यांचे म्हणणे होते. लॉर्ड कर्झन ह्यांनी १९०० साली केलेल्या भाषणात भारतातील दुष्काळ ही एक दैवी आपत्ती असून तो टाळण्यासाठी जगातील कोणत्याही सरकारला काहीही करता येण्यासारखे नाही अशी भूमिका घेतली. उलटपक्षी रमेशचंद्र दत्त, दादाभाई प्रभृती राष्ट्रवादी नेत्यांनी दुष्काळ हा निसर्गाच्या लहरीमुळे निर्माण होत नसून तो मानवी प्रमादातून उद्भवत असल्याने अनिवार्य नाही, अवर्षण हे दुष्काळाचे तात्कालिक कारण मानले तरी जलसिंचनाच्या शास्त्रीय वापराने त्यांचे नियंत्रण नक्कीच करता येते, व मुख्य म्हणजे काँग्रेसच्या १८९२, १८९६ व १९०० सालच्या ठरावांत म्हटल्याप्रमाणे देशात जलद वाहतुकीच्या साधनांची उपलब्धता असताना तर दुष्काळ हे टाळता येतात असे दाखवून दिले. २१ जुलै १९०३ च्या 'केसरी' ने तर लोकांच्या आवश्यकतेच्या निम्मे अन्नधान्य उत्पादन करणाऱ्या इंग्लंड देशातील लोकांची उपासमार का होत नाही असा प्रश्न उपस्थित केला. ३ एप्रिल १९०० च्या 'केसरी'ने भारतातील दुष्काळ हा अन्नधान्याचा नसून क्रयशक्तीचा असल्याचे म्हटले. हिंदी जनता ही सदैव अर्धपोटीच असते, शेतीच्या वाईट हंगामात तिची अवस्था अधिक बिकट होते एवढेच, असे दादाभाईंनी दाखवून दिले.

भारतीय दारिद्र्याच्या कारणमीमांसेविषयी येथील इंग्रज अंमलदाराचा सर्वसाधारण दृष्टिकोन असा की भारतीय दारिद्र्य हे निसर्गनिर्मित तरी आहे किंवा त्याचे मूळ येथील चुकीच्या समाजव्यवस्थेत सापडत असल्याने त्याचे निवारण करण्याची जबाबदारी येथील लोकांचीच आहे. हा मुद्दा लॉर्ड कर्झन ह्यांनी मद्रास महाजन सभेपुढे डिसें. १९०० मधील व्याख्यानात मांडला आहे. उलटपक्षी हिंदी लोकांच्या दारिद्र्याची व म्हणून त्याच्या निवारणाचीही जबाबदारी ही प्रामुख्याने राज्यकर्त्यांची आहे, ज्या प्रशासकीय धोरणांमुळे येथील जनतेचे दारिद्र्य निर्माण झाले आहे ती धोरणे बदलणे हा त्यावर उपाय आहे अशी मांडणी काँग्रेसचे पुढारी करीत असत. या संदर्भात डॉ. बिपनचंद्र ह्यांनी म्हटल्याप्रमाणे "By a strange irony of history, it came to pass that the scientifically advanced West stressed the fatalistic concept of the inevitable sway of nature and the existing social forces, and the backward East emphasised man's capacity to control and direct nature and society." (The Rise and Growth

of Econ. Nationalism in India-P. P. 53-54)

भारतातील देशी उद्योगांचा झालेला ऱ्हास हे आपल्या दारिद्रयाचे मूळ कारण असल्याने देशातील जनतेच्या भौतिक परिस्थितीत सुधारणा घडून आर्थिक पुनरुत्थान होण्यासाठी देशी उद्योगांना संरक्षण देऊन त्यांचे पुनर्वसन केले पाहिजे, त्यांचे पुनर्गठन करून आधुनिकीकरण घडविले पाहिजे अशी भूमिका राष्ट्रवादी नेते घेत होते. ( पहा- 'मराठा', २४ जाने. १८८६, मुधोळकर ह्यांचे कॉंग्रेस अध्यक्षीय भाषण.)

१९०१ च्या कलकत्ता कॉंग्रेसच्या ठरावात म्हटले होते की, हिंदी लोकांच्या दारिद्रयाचे एक कारण देशी हस्तकला व उद्योगांचा झालेला ऱ्हास हे होय. हिंदी उद्योगांचा ऱ्हास हा ब्रिटिशांच्या तद्विषयक धोरणांमुळे जसा घडून आला तसाच बाष्पशक्ती व सुधारित उत्पादनतंत्राचा वापर करून ब्रिटिश उद्योगांनी भारतीय बाजारपेठेतून भारतीयांची हकालपट्टी केल्यानेही झाला ही जाणीव १८८७ च्या कॉंग्रेसला सादर केल्या गेलेल्या अहवालात दिसून येते. या काळातील कॉंग्रेस नेत्यांचे लक्ष ज्या प्रमाणात शहरी उद्योगांच्या अवनतीकडे वेधले गेले त्याप्रमाणे ते ग्रामीण उद्योगांच्या स्थितीकडे होते असे दिसत नाही. १८९६ च्या कॉंग्रेसच्या ठरावात, "अस्तंगत होत जाणाऱ्या स्थानिक उद्योगांचे पुनरुज्जीवन हाच वारंवार उद्भवणाऱ्या दुष्काळावरील उपाय होय" असे म्हटले होते. हे पुनरुज्जीवन करताना हस्तोद्योग हे निसर्गशक्तीच्या जोरावर चालणाऱ्या उद्योगांच्या स्पर्धेत टिकू शकणार नाहीत ह्याची जाणीव न्या. रानडयांच्या निबंधातून व्यक्त होत होती. त्यामुळे त्यांनी आधुनिक उद्योगाच्या उभारणीचा पाठपुरावा केला. भारताच्या सर्व आर्थिक समस्यांवर येथे आधुनिक उद्योगांची स्थापना करून मात करता येईल हा विचार त्यांच्या आर्थिक धोरणाचा मुख्य गाभा बनला. १३ फेब्रु. १८८१ च्या 'मराठा' ने "We must become capitalist and enterprisers... a nation of traders, machine-makers, and shopkeepers" अशी अपेक्षा व्यक्त केली. आधुनिक उद्योगांपासून होणाऱ्या भौतिक लाभांबरोबरच जे सांस्कृतिक फायदे मिळतात त्यांच्याकडे न्या. रानडे, ग. व्यं. जोशी, न्या. तेलंग ह्यांचे लक्ष वेधले गेले होते. १८९० साली लिहिलेल्या निबंधात, "Factories and Mills rather than educational institutions, could far more effectively give a new birth to the activities of the nation" असे उद्गार न्या. रानडेंनी काढले,

१८५० च्या सुमारास भारतात ज्यूट, कोळसा व कापड ह्या उद्योगांना प्रारंभ झाला होता; तरीही ज्यूट व कोळसाउद्योगांची मालकी बव्हंशी इंग्रजांची असल्याने कापडउद्योगाच्या विकासाकडेच भारतीय पुढाऱ्यांनी लक्ष केंद्रित केले. परंतु तत्कालीन ब्रिटिश राज्यकर्ते ह्याबाबतीत भारतीयांना हतोत्साहित करण्याची भूमिका घेत असल्याचे दिसते. भारत हे औद्योगिक राष्ट्र कधीच बनू शकणार नाही असे सांगताना १९०३ मध्ये लॉर्ड कर्झन एका व्याख्यानात म्हणतात, "The vast majority of Indians have been trained to agriculture, are only physically fitted for agriculture, and will never practice anything but agriculture" त्यावर १९०३ च्या कॉंग्रेसच्या अध्यक्षपदावरून बोलताना सुरेंद्रनाथ बॅनर्जी ह्यांनी कर्झनच्या वरील विधानाचा प्रतिवाद करताना म्हटले, "The European traders were first attracted not by our raw produce, but by our manufactured wares." औद्योगिक प्रगती घडवून आणण्याच्या हिंदी जनतेच्या सामर्थ्यावर ह्या नेतृत्वाचा दृढ विश्वास होता.

म्हणूनच तंत्रशिक्षणाच्या सोयींचा अभाव ही तत्कालीन राष्ट्रवाद्यांना खटकणारी बाब होती. कॉंग्रेसच्या स्थापनेच्या आधी १८८३ मध्ये कलकत्याला भरलेल्या नॅशनल कॉन्फरन्समध्ये संपूर्ण देशभर तंत्र-शाळा व कॉलेजे काढून तांत्रिक शिक्षणाचा प्रसार व्हावा अशी मागणी पुढे आलेली होती. १८८७ च्या कॉंग्रेसच्या तिसऱ्या अधिवेशनानेही हीच मागणी उचलून धरली. १८८८, १८९१-९२ व ९३ साली झालेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत भारताच्या औद्योगिक स्थितीची चौकशी करण्यासाठी भारतीयांचा समावेश असलेला आयोग नेमावा

ही मागणी केली गेली. तांत्रिक शिक्षणाची जबाबदारी सरकारबरोबरच येथील शिक्षितवर्ग, जमीनदार, धनिक व संस्थानिक ह्यांच्यावरही पडत असल्याने त्यांनी सढळ हाताने तंत्रशाळा उघडण्यास व हिंदी लोकांना तंत्रशिक्षणासाठी परदेशी पाठविण्यास मदत करावी असे आवाहन पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या कार्यकारिणीने १८८२ साली केले. हाच मुद्दा १८ मार्च १९०२ च्या 'केसरी'च्या अग्रलेखात लो. टिळकांनी मांडला. १८९९ मध्ये जे. एन. टाटा ह्यांनी भारतात उच्च वैज्ञानिक शिक्षण व संशोधनाच्या विकासासाठी तीस लक्ष रुपये देऊ केल्याबद्दल त्या वर्षीच्या काँग्रेस अधिवेशनात टाटांचा गौरव करणारा ठराव पारीत करण्यात आला. १९०२ पर्यंत देशात १२३ तंत्रशाळा निर्माण झाल्या; परंतु त्यांमधून कुंभारकाम, सुतारकाम व लोहारकाम ह्यांचे शिक्षण मिळत असे. त्याऐवजी आधुनिक उद्योगांच्या वाढीसाठी आवश्यक असलेले तांत्रिक शिक्षण दिले जावे असा आग्रह राष्ट्रवादी नेत्यांनी धरल्याचे आढळते.

हिंदी लोकांत उद्योजकतेची वाढ झाली पाहिजे ह्या धोरणाचा पुरस्कार करीत असतानाच त्याबाबत त्यांनी स्वतः उदाहरणही घालून दिले. लंडन येथे स्थापन झालेल्या कात्रा ह्यांच्या पहिल्या भारतीय पेढीचे दादाभाई नवरोजी १८५५ मध्येच भागीदार बनले होते. १८६९ मध्ये त्यांनी स्वतःची स्वतंत्र पेढी सुरू केली. न्या. रानड्यांनी पुण्याला कापडगिरणी, पुना मर्कंटाईल बँक, पुना डाईंग कंपनी व रे पेपर मिल सुरू करण्यात पुढाकार घेतला. तेलंग व फिरोजशा मेथा ह्यांनी मुंबईला साबणाचा कारखाना सुरू केला. मेथांचे तर भारतीय वस्त्रउद्योगाशी अतिशय घनिष्ट संबंध होते. लोकमान्य टिळकांनी १८९१ मध्ये आपल्या दोन सल्लागारांच्या मदतीने लातूरला कापसाचा जिनिंग प्रेस काढला. दिनशॉ वाच्छा हे गोकलदास व सोलापूर ह्या भरभराटीला आलेल्या गिरण्यांचे व्यवस्थापन अभिकर्ते (Managing agents) व गिरणीमालक संघाचे प्रमुख सभासद होते.

१८९० मध्ये न्या. रानडे ह्यांच्या पुढाकाराने 'इंडस्ट्रियल असोसिएशन ऑफ वेस्टर्न इंडिया'ची स्थापना होऊन त्याच वर्षी पुण्याला औद्योगिक परिषद भरविण्यात आली. त्यानंतरच्याही काही वर्षांत औद्योगिक परिषद नियमितपणे भरत असे. न्या. रानडे व ग. व्यं. जोशी ह्यांच्या कित्येक प्रसिद्ध निबंधांचे वाचन प्रथम ह्या औद्योगिक परिषदांपुढे झालेले आहे. १८९६ मध्ये कलकत्ता काँग्रेसच्या अधिवेशनाला जोडून औद्योगिक प्रदर्शन पहिल्यांदाच भरविले गेले. लाहोर येथे भरलेल्या १९०० सालच्या काँग्रेसने औद्योगीकरणाच्या चळवळीला उत्तेजन देण्यासाठी एक औद्योगिक समिती स्थापन केली. तेव्हापासून काँग्रेसच्या दर अधिवेशनप्रसंगी औद्योगिक प्रदर्शन भरू लागले.

भारताच्या औद्योगीकरणाच्या प्रयत्नांत परकीय भांडवलाचे नेमके स्थान कोणते असावे ह्याविषयी राष्ट्रवादी नेत्यांत मतभेद होते असे दिसते. परकीय भांडवलाच्या साह्याने आपल्या उद्योगाची भरभराट होईल येथपासून परकीय भांडवलामुळे भारतीय उद्योजकता नष्ट होईल येथपर्यंत याबाबत भूमिका मांडल्या गेल्या. तथापि भारतीय प्रयत्नाने व भांडवलाच्या आधारानेच खराखुरा औद्योगिक विकास होऊ शकेल, या बाबतीत त्यांच्यात दुमत दिसत नाही. परकीय भांडवलाच्या स्वागताची भूमिका असणारांनादेखील एतद्देशीय भांडवलाची कमतरता व त्यामुळे औद्योगीकरणात उत्पन्न झालेला अवरोध हा अधिक चिंतेचा विषय वाटत होता. केवळ नाइलाजास्तव परकीय भांडवल स्वीकारणे भाग आहे असा त्यांच्या विचाराचा सर्वसाधारण रोख होता. त्यातही परकीय भांडवल हे भारतीय उद्योगात गुंतविले जावे, व्यापारात नव्हे असे त्यांना वाटत असे. या संदर्भात हेही लक्षात ठेवले पाहिजे की, प्रारंभीच्या काळात ब्रिटिश भांडवल हे येथील रेल्वेमार्गांच्या विकासाला कारणीभूत टरलेले असल्याने देशी भांडवल विरुद्ध परदेशी भांडवल हे द्वंद्व राष्ट्रवादी नेत्यांना फारसे स्पष्टपणे जाणवले नव्हते. त्यामुळेच कदाचित परकीय भांडवलाबाबत १९०० पर्यंत काँग्रेसने मौन धारण केल्याचे दिसते. याला अपवाद म्हणून १८९८ च्या काँग्रेसमध्ये जी. एस. अय्यर ह्यांनी ह्या विषयावर केलेल्या व्याख्यानाचा उल्लेख करता येईल. विसाव्या शतकाच्या प्रारंभी एका बाजूने भारतीय उद्योगांची थोडीबहुत वाढ झालेली होती तर दुसऱ्या बाजूने परकीय भांडवलाचा खंदा पुरस्कर्ता व ब्रिटिश

भांडवलदारांना आपला भारतातील मुख्य हितकर्ता वाटत असलेला लॉर्ड कर्झन हा त्या वेळी सत्तेवर होता, त्यामुळे विसाव्या शतकाच्या सुरुवातीलाच परकीय भांडवलाच्या वाढीला काँग्रेसच्या व्यासपीठावरून जाणवण्यासारखा विरोध होऊ लागला.

१८९१ मध्ये पुण्यात भरलेल्या औद्योगिक परिषदेने सरकारने खाजगी उद्योगांच्या वाढीच्या दृष्टीने वित्तीय व अन्य प्रकारे साह्य करावे अशी मागणी केली. परंतु जुजबी तांत्रिक शिक्षणाच्या सोयी व कशीबशी गोळा केलेली उद्योगव्यापाराबाबतची अपुरी माहिती येथील जनतेला पुरविण्यापलीकडे सरकारी प्रयत्नांची मजल त्या काळी जात नसल्याचे १९१६ ते १९१८ च्या 'इंडियन इंडस्ट्रियल कमिशन' च्या अहवालात मान्य करण्यात आलेले आहे. येथील उद्योगांच्या विकासाला सरकारने हातभार लावणे हे आपल्या अनिर्बंधित अर्थव्यवस्थेच्या स्वीकृत भूमिकेशी जुळणारे नाही असे प्रतिपादन तत्कालीन राज्यकर्त्यांचे होते. ह्या संदर्भात उपरोक्त कमिशनने "Government was ill-qualified to farther industrial development by direct action, and that all such matters should be left to private enterprise." असे म्हणून आपले हात झटकले आहेत. ह्या भूमिकेतील फोलपणा न्या. रानडयांनी आपल्या निबंधांतून समर्थपणे दाखवून दिला. ब्रिटिश भांडवलाच्या भारतातील गुंतवणुकीबाबत पूर्वी ब्रिटिश राज्यकर्त्यांनी सक्रिय व प्रत्यक्ष सहभाग दाखविला होता. भारतीय रेल्वेत गुंतवणूक करणाऱ्या ब्रिटिश भांडवदारांना किमान नफ्याची हमी प्रारंभी ब्रिटिशांनी दिली व नंतर स्वतःच रेल्वेविस्तारात गुंतवणूक केली असल्याचे, सुरुवातीच्या चहा व कॉफी मळयांत खुद्द सरकारने बरीच रक्कम गुंतविल्याचे, पोलाद उद्योगाच्या उभारणीसाठी भूगर्भशास्त्रीय पाहणी करणे, प्रायोगिक उत्खनन करणे इ. साठी सरकारने बराच खर्च केल्याचे व स्वतः सरकारने काही कोळसाखाणी चालविल्याचे न्या. रानडयांनी दाखवून दिले.

भारतीय कारखानदारीला उत्तेजन देण्यासाठी सरकारने स्वतःला लागणारे सामान भारतीय कारखानदारांकडून खरेदी करण्याचे धोरण ठेवावे अशी मागणी १८८७ च्या काँग्रेसने केली. ह्या मागणीला भारतातील ब्रिटिश भांडवलदारवर्गाने १८८० च्या दुष्काळआयोगाने, हिंदी औद्योगिक आयोगाने तसेच लॉर्ड रिपन ह्यांनी पाठिंबा दर्शविला हे लक्षणीय आहे.

स्वदेशी मालाचा पुरस्कार काँग्रेसच्या स्थापनेआधीपासूनच होऊ लागला होता. लोकहितवादींच्या 'प्रभाकर'मधील १८४९ साली लिहिलेल्या अनेक लेखांमधून परदेशी मालाऐवजी स्वदेशीचा वापर करण्याचा आग्रह दिसून येतो. स्वदेशीचा प्रसार करण्यासाठी बंगालमध्ये नवगोपाळ मित्रांनी १८६७ पासून पुढे चवदा वर्षे हिंदुमेळा दरवर्षी भरविला. त्यात स्वदेशी मालाचे प्रदर्शन असावयाचे. १८७० मधील 'नेटीव्ह ओपिनियन' मधून विश्वनाथ नारायण मंडलिकांनी स्वदेशी वस्तू महाग असल्या तरी त्याच लोकांनी वापराव्यात असे आवाहन केलेले आहे. १८७२ मध्ये न्या. रानडयांनी स्वदेशीचा पुरस्कार करणारी व्याख्याने पुण्यात दिली. परंतु १८८० ते १८९५ दरम्यानच्या काळात स्वदेशीच्या चळवळीने चांगलेच मूळ धरल्याचे दिसते. याचे मुख्य कारण म्हणजे याच काळात ब्रिटिश सरकारने लँकेशायरच्या कापडउत्पादकांच्या हितरक्षणासाठी विदेशी कापडाच्या आयातीवरील जकात रद्द केली हे होय. १८८१ मध्ये मदनमोहन मालवीय ह्यांच्या पुढाकाराने अलाहाबाद येथे 'देशी तिजारत कंपनी'ची स्थापना स्वदेशीला उत्तेजन देण्यासाठी करण्यात आली. १८९१ च्या काँग्रेस अधिवेशनाच्या व्यासपीठावरून पंजाबातील लाला मुरलीधर ह्या काँग्रेसी नेत्याने विदेशी मालाच्या वापराबद्दल प्रतिनिधींची कडक शब्दांत निर्भर्त्सना केली. १८९६ मध्ये भारतीय कापडाच्या निर्यातीला प्रतिबंध करण्याच्या हेतूने इंग्रजांनी त्यावरील जकातीत वाढ केल्यानंतरच्या काळात तर राजकीय दृष्टीने जागृत होऊ लागलेल्या हिंदी जनतेच्या मनात परदेशी मालाविषयी व विशेषतः परदेशी कापडाविषयी कमालीची चीड उत्पन्न झाली. तथापि स्वदेशीचा पुरस्कार हा राजकीय दृष्टीपेक्षा आर्थिक दृष्टीनेच अधिक केला जात होता असे लक्षात येते. १२ एप्रिल १८९६ च्या मराठ्याने स्वदेशी चळवळीविषयी लिहिताना म्हटले, "The movement is calculated to create a patriotic sentiment

which may serve as a keen incentive to the advance of cotton industry in India... the vast demand for indigenous native cloth getting vaster every moment, must before long rise to mechanical improvements and encourage the investment of capital in this line."

ब्रिटिश राज्यकर्ते बाल्यावस्थेतील भारतीय उद्योगांना संरक्षण देण्याचे नाकारत असतील तर भारतीयांनीच स्वदेशी उद्योगांना सक्रिय उत्तेजन द्यावे हा मुद्दा सुरेंद्रनाथ बॅनर्जींनी १९०२ मध्ये काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून बोलताना मांडला. आधी सांगितल्याप्रमाणे स्वदेशी आंदोलनाला मुख्यतः आर्थिक आशय होता; परंतु ह्या आंदोलनाला राजकीय आशय सहज लाभू शकतो असे दादाभाई नवरोजींच्या लक्षात आले होते. त्या काळी महाराष्ट्रात स्वदेशीचा प्रसार करणाऱ्या मेळ्यांचा उल्लेख करून दादाभाई आपल्या दारिद्र्यावरील सुप्रसिद्ध ग्रंथात म्हणतात, "We may laugh at this as a futile attempt to shut out English machine-made cheaper goods against handmade dearer ones. But little do we think what this movement is likely to grow into, and what new phases it may take in time. The songs are at present directed against English wares, but they are also a natural and effective preparation against other English things when the time comes, if the English in their blindness allow such a time to come... But if the present downward course of India continues, if the mass of the people at last begin to despair of any amelioration, and if the educated youth... become their leaders it will be but a very very short step from loyalty to disloyalty, to turn the course of indignation from English wares to English rule. The songs will remain the same; one word of curse for the rule will supply the spark."

स्वदेशी चळवळीला काँग्रेसचा एकमुखी पाठिंबा त्या काळी होता असे दिसत नाही. काँग्रेसचे सहकार्यवाह असणाऱ्या दिनशॉ वाच्छा ह्यांनी ११ मार्च व १८ मार्च १८९६ च्या 'टाईम्स ऑफ इंडिया'मध्ये पत्रे लिहून स्वदेशी चळवळ ही देशप्रेमाचे प्रतीक असली तरी आर्थिक दृष्टचा ती निष्फळ ठरेल असे म्हटले होते. वाच्छांच्या मनात स्वदेशी आंदोलनाच्या संदर्भात जी भीती होती ती वेगळीच. उपरोल्लिखित १८ मार्चच्या पत्रात स्वदेशी चळवळीची प्रतिक्रिया म्हणून ब्रिटिश उत्पादक भारताला गिरण्यांची यंत्रसामग्री व इतर आवश्यक माल पुरविण्याचे बंद करतील अशी काळजी त्यांना वाटत असल्याचे दिसते.

दिनशॉ वाच्छांसारख्या कापडउद्योगाशी मालकी हक्काने संबंधित असणाऱ्या राष्ट्रीय पुढाऱ्याच्या मनात स्वदेशीबाबत जो विकल्प निर्माण झाला त्याची दोन कारणे लक्षात येतात, ती अशी : (१) त्या वेळी कापड गिरण्यांना अशी खात्री वाटत होती की स्वदेशी चळवळीशिवायदेखील त्यांच्या जाडचाभरडचा कापडाला देशात मोठी मागणी होती. स्वदेशी आंदोलनामुळे त्यांचा फायदा न होता त्यांच्या प्रतिस्पर्धी उद्योगाचा– हातमागउद्योगाचा– अधिक फायदा होईल असेही त्यांना वाटत असावे; व (२) स्वतःच्या आर्थिक शक्तीबाबत व लोकांच्या त्याग करण्याच्या क्षमतेबाबत त्यांच्या मनात जबरदस्त शंका होती.

याचा एकत्रित परिणाम असा झाला की, स्वदेशी चळवळीला राष्ट्रीय भावनेने प्रेरित झालेल्या शिक्षित मध्यमवर्गाचा पाठिंबा मिळून ही चळवळ देशव्यापी होऊ लागली तरी काँग्रेसमधील गिरणीमालकांच्या प्रभावी गटाने याबाबत उदासीन वृत्ती धारण केल्याने ह्या चळवळीचे बळ पुढे वाढू शकले नाही; इतकेच नव्हे तर त्या काळी काँग्रेसची अधिकृत मान्यतादेखील ह्या चळवळीला मिळू शकली नाही.

१८५० नंतरच्या काळात आपल्या विदेशी व्यापाराच्या स्वरूपात महत्त्वाचे बदल घडून आले.

लोखंड– पोलाद, यंत्रसामग्री ह्यांची आयात वाढू लागली होती. निर्यातवस्तूंमध्ये सुती व ज्यूटच्या कापडाचे प्रमाण वाढू लागले होते. १९ व्या शतकाच्या संपूर्ण कालखंडातील भारताच्या विदेशी व्यापाराचे वैशिष्टच म्हणजे आयातीपेक्षा निर्यातीचे सतत वाढत जाणारे आधिक्य. १८५६ नंतरच्या सात वर्षांमध्ये याला अपवाद निर्माण झाला असेल तेवढाच काय तो. परकीय व्यापारातील ह्या अनुकूल शेषस्थितीचा राष्ट्रवादी पुढाऱ्यांच्या आर्थिक चिंतनावर प्रभाव पडल्याचे दिसते.

त्या काळी भारताचा परकीय व्यापार वाढत असल्याचे फारसे कौतुक भारतीय पुढाऱ्यांना वाटत नव्हते; कारण त्यांच्या दृष्टीने भारताचे दारिद्र्य, होणारे आर्थिक शोषण व औद्योगीकरण ह्या प्रश्नांचे महत्त्व अधिक होते. जॉन स्ट्राचीसारख्या सरकारी मुखंडांच्या मते भारताचा वर्धिष्णू विदेशी व्यापार हे भारताच्या भरभराटीचे गमक होते. ही भूमिका अर्थातच राष्ट्रवादी नेतृत्वाला मान्य नव्हती. वाढत्या व्यापाराचे काही अनुकूल परिणाम त्यांनी मान्य केले; परंतु त्यांचा भारताच्या आर्थिक विकासाशी संबंध जोडला जाणे त्यांना मान्य नव्हते. निर्यातीच्या आकारापेक्षा तिचा राष्ट्रीय शेतीवर व उद्योगांवर काय परिणाम होतो हे पाहणे त्यांना अधिक अर्थपूर्ण वाटत होते. परकीय व्यापाराच्या वैशिष्टचपूर्ण विकासामुळे भारतास ब्रिटनला शेतीमालाची निर्यात करणारे राष्ट्र असे स्वरूप प्राप्त व्हावे हे त्यांना मान्य नव्हते. भारताची निर्यात ही आयातीपेक्षा अधिक राहून भारताला व्यापारशेष अनुकूल असला तरी त्याचा फायदा भारताला न होता, हे आधिक्य, ( अ ) भारताच्या वाढत्या कर्जावर व्याज देण्यासाठी, (ब) ब्रिटनला गृहप्रभार (Home Charges) देण्यासाठी व (क) ब्रिटिश अंमलदार, मळेवाले, व्यापारी ह्यांनी मिळविलेले नफे व केलेली बचत स्वगृही पाठविण्यासाठी खर्ची पडत असल्याचे त्यांनी दाखविले. दुसऱ्या शब्दांत हे तथाकथित आधिक्य ब्रिटनला खंडणी देण्यासाठी खर्च होते असा दृष्टिकोन दादाभाई प्रभृती काँग्रेसच्या नेत्यांनी मांडला. रमेशचंद्र दत्त ह्यांनी तर म्हटले की, "The Economic drain from India for Home Charges compelled that country to export more than she would import."

११ जाने. १८९६ च्या अमृतबझार पत्रिकेने 'परकीय राज्यकर्त्यांना परकीय व्यापाराशिवाय भारताचे आर्थिक शोषण करणे शक्य झाले नसते' असे म्हटले. परदेशी मालाच्या आयातीमुळे येथील उद्योगधंदे नष्ट होऊन बेकारी निर्माण होते. परिणामी स्वस्त मजुरांचा पुरवठा वाढून परकीय भांडवलदारांना भारतात गुंतवणूक करण्यास उत्तेजन मिळून येथील उद्योगांचा अधिकच ऱ्हास होण्यास मदत होते असे ग. व्यं. जोशींसारख्या तत्कालीन अर्थपंडितांचे मत होते.

औद्योगिक विकासाचा ग्रामीण जीवनावर व शेतीवर काय परिणाम होईल या मुद्द्याला राष्ट्रवादी आर्थिक चिंतनात गौण स्थान होते. मुख्य भर परकीय उद्योगांच्या स्पर्धेत भारतीय उद्योगांची वाढ करण्याच्या धोरणाचा पाठपुरावा करणे यावर होता. परकीय व्यापाराच्या वाढीचा फायदा– विशेषतः निर्यातवृद्धीचा– रॅली ब्रदर्ससारख्या विदेशी निर्यात कंपन्यांना व त्यांच्या भारतीय मध्यस्थांना होत होता. कॉफी, चहा, ज्यूट, नीळ ह्यांच्या निर्यातीतील वाढ ही इंग्रज लोकांच्याच हिताची होती. १९०१ साली काँग्रेस अधिवेशनात जी. एस्. अय्यर ह्यांनी मांडलेल्या विचारांतून राष्ट्रवाद्यांचा परकीय व्यापारासंबंधीचा दृष्टिकोन ग्रथित होतो. ते म्हणतात, "भारताच्या प्रचंड लोकसंख्येमुळे असणारी विशाल व अमर्याद बाजारपेठ ही भारताच्या परकीय व्यापाराचा नैसर्गिक आधार होय. ही बाजारपेठ भारतीय औद्योगिक मालासाठी राखून ठेवली जावी व तेथे विकून जे उरेल त्याची निर्यात देशात तयार न होऊ शकणाऱ्या मालाच्या मोबदल्यात करावी. भारताला संपूर्ण विनाशापासून वाचविण्याचा हा एकच मार्ग आहे."

तत्कालीन राष्ट्रवाद्यांच्या परकीय व्यापाराबाबतच्या धोरणाचा परामर्ष घेताना असे दिसते की, त्यांना विदेशी व्यापाराचे स्वायत्तपणे महत्त्व वाटत नव्हते. भारताचे दारिद्र्य, औद्योगिक विकास ह्यांच्या दृष्टीनेच ते परकीय व्यापाराचे मूल्यमापन करीत होते. म्हणूनच स्थापनेपासूनच्या पुढील पंचवीस वर्षांत काँग्रेसच्या एकाही ठरावात परकीय व्यापाराचा विचारही झाल्याचे दिसत नाही.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात झालेल्या रेल्वेच्या विकासाचे येथील लोकांच्या जीवनावर, संस्कृतीवर व अर्थव्यवस्थेवर दूरगामी स्वरूपाचे परिणाम झाले. काँग्रेसच्या स्थापनेच्या काळी भारतीय रेल्वेच्या उभारणीत भारतीय भांडवलाचा वाटा नगण्य होता तर ब्रिटिशांनी केलेली गुंतवणूक ही डॅनियल थॉर्नरने म्हटल्याप्रमाणे एकोणिसाव्या शतकातील कोणत्याही एका उद्योगात झालेली सर्वांत मोठी आंतरराष्ट्रीय गुंतवणूक होती. मुख्य म्हणजे ही गुंतवणूक सुरक्षित होती कारण त्यावरील किमान व्याजाची हमी ब्रिटिश सरकारने दिलेली होती व त्यापायी १९०० सालापर्यंत सरकारला दरवर्षी ७६ को. रुपये मोजावे लागत. शिवाय हे खर्चिक काम येथील सरकार आर्थिक अडचणीत व जनता दुष्काळाने व प्लेगने ग्रासलेली असतानाच्या काळात अधिक वेगाने पार पाडले गेले. खुद्द ब्रिटनमध्येदेखील इतक्या वेगाने रेल्वेचा विकास झालेला नव्हता असे जेन्क्स् ह्यांनी दाखवून दिलेले आहे.

भारतीय दारिद्र्य हे वाहतुकीच्या साधनांमध्ये वाढ करून कमी होण्यासारखे आहे असे जॉन चॅपमनसारख्या इंग्रज अंमलदारांना १८४४ पासूनच वाटत होते. १८८४ मध्ये पार्लमेंटच्या सिलेक्ट कमिटीने दुष्काळ निवारणासाठी, देशी व विदेशी व्यापाराला उत्तेजन देण्यासाठी व सर्वसामान्य आर्थिक विकासासाठी रेल्वेची जलद वाढ करण्याची शिफारस केलेली होती. दादाभाई प्रभृती पुढाऱ्यांना रेल्वेमुळे झालेले लाभ मान्यच होते, परंतु तीमुळे झालेले तोटेही त्यांना दिसत होते. १८९७ मध्ये वेल्बी कमिशनपुढे दिलेल्या साक्षीत दिनशॉ वाच्छांनी रेल्वेमुळे आर्थिक व वित्तीय दृष्टीने हिंदी जनतेचे काही तोटे झाल्याचे म्हटले. टिळकांनी तर तत्कालीन भारताची विकासाची अवस्था लक्षात घेता रेल्वे, रस्ते व तारायंत्रे ह्यांचा फायदा भारताला होण्यासारखा नाही, सबब त्यांचा हव्यास म्हणजे "दुसऱ्याच्या बायकोस दागिन्यांनी मढविण्यासारखे होय" असे सांगितले.

रेल्वेच्या वाढीमुळे रोजगारावर असा प्रतिकूल परिणाम झाला आहे हे सांगताना ११ नोव्हें. १९०२ च्या 'केसरी'तील अग्रलेखात लो. टिळक म्हणतात, "आगगाड्या इकडील लोकांच्या फायद्यासाठी-- परकीय व्यापाऱ्यांच्या फायद्यासाठी अथवा लष्कराच्या मदतीसाठी नव्हे हो-जेव्हा इकडे अवतीर्ण झाल्या, तेव्हापासून या लोकांचे (गाडीवानांचे व नावाड्यांचे-लेखक) धंदे गेले. एकट्या गंगेच्या प्रवाहातून मालाची नेआण करणारे १७८० मध्ये ३०,००० नावाडी होते, एवढ्या एकाच गोष्टीचा विचार केला तरी आगगाडीने किती नावाड्यांच्या व किती गाडीवानांच्या तोंडचे अन्न काढून घेतले असेल व आपल्या श्रीमंत मालकांस चारिले असेल, याची कल्पना करता येण्यासारखी आहे, शेतकरी लोकच गाडीवानाचा धंदा बहुशः करीत असतात, तेव्हा त्यांस जबर साऱ्याबरोबर दुसरी कोणती गोष्ट निर्धन करीत आहे, याची सहज कल्पना करता येण्यासारखी आहे."

रेल्वेमुळे भारताच्या ब्रिटनकडून होणाऱ्या शोषणाला हातभार लागतो, रेल्वेत गुंतवणूक करणाऱ्या ब्रिटिश भांडवलदारांना द्यावे लागणारे व्याज व नफा, रेल्वेसाठी लागणाऱ्या यंत्रसामग्रीच्या आयातीपोटी द्यावा लागणारा पैसा, युरोपीय कामगार इत्यादींद्वारे भारताची संपत्ती इंग्लंडला वाहून नेली जाते असे दादाभाईंनी दाखविले.

रेल्वेच्या सोयीमुळे भारतातून धान्याची निर्यात होण्याला मदत होते व त्यामुळे शेती हंगामाच्या अनुकूल वर्षातदेखील धान्याचा तुटवडा जाणवतो हे दुष्काळ आयोगानेदेखील मान्य केल्याचे वाच्छांनी म्हटले. रेल्वेमुळे नगदी पिकांची निर्यातीसाठी मागणी वाढल्याने धान्य पिकांच्या उत्पादनावर त्याचा प्रतिकूल परिणाम होऊन अन्नतुटवडा निर्माण झाल्याचे 'बंगाली' ह्या राष्ट्रवादी पत्राने २८ एप्रिल १९०१ च्या अंकात दाखवून दिले.

रेल्वेची वाढ भारतीय भांडवलाच्या गुंतवणुकीतून साध्य झाली असती तर तिचा फायदा देशाच्या अर्थव्यवस्थेला अधिक झाला असता. ह्या दृष्टीने १४ जाने. १८८३ च्या मराठ्याने मागणी केली की, "एतद्देशीय व्यवस्थापनाखाली भारतीय भांडवल, माल व श्रमिक यांच्याद्वारे भारतात रेल्वे उभारण्याचे सरकारचे धोरण असावयास हवे."

रेल्वे विरुद्ध कालवे हा वादविषय आजच्या घडीला अप्रस्तुत वाटत असला तरी काँग्रेसच्या स्थापनेच्या सुरुवातीच्या काळात या वादाला

अनुक्रमणिका

चांगलाच रंग चढलेला होता. 'केसरी' च्या २८ मार्च १९०२ च्या अग्रलेखात लो. टिळक लिहितात, "गेल्या वीस वर्षांत रेल्वेची वाढ पाहिली तर ती ९,००० मैलांपासून २७,००० मैलांपर्यंत झालेली आहे, व त्याकरिता जवळजवळ ४५० कोटी रुपये खर्च झालेला आहे ! पण त्याच्या तृतीयांशदेखील पाटबंधाऱ्यांवर किंवा कालव्यांवर झालेले नाहीत." रेल्वे व पाटबंधारे ह्यांची दुष्काळनिवारणाच्या कामी असणारी उपयुक्तता ह्या मुद्द्याला धरूनच त्या वेळी ह्या विषयाची चर्चा राष्ट्रवादी पुढाऱ्यांनी केली. रेल्वेपेक्षा पाटबंधाऱ्यांच्या विकासाकडे सरकारने अधिक लक्ष द्यावयाला हवे कारण दुष्काळनिवारणाच्या कामी पाटबंधारे हे रेल्वेपेक्षा अधिक उपयुक्त असल्याचे त्याचे म्हणणे होते. रेल्वेच्या साहाय्याने धान्याची ने-आण दुष्काळात करता येईल हे खरे असले तरी धान्याचे उत्पादन हे कालव्यांमुळेच वाढू शकते हे त्यांना दिसत होते. ९ सप्टें. १८८३ च्या 'नेटीव्ह ओपिनियन' ने रेल्वे ही सतत तुटीत असताना पाटबंधाऱ्यांवरील गुंतवणुकीपासून ६ ते ९ टक्के इतका नफा सुटतो असे दाखवून दिले. शिवाय पाटबंधाऱ्यांवरील खर्च हा मुख्यतः कालवे व विहिरी खोदण्याच्या कामी होत असल्याने त्या खर्चामुळे भारतीयांना अधिक रोजगार मिळतो; उलट, रेल्वेला उपकरणे पुरविणाऱ्या ब्रिटनचाच फायदा रेल्वेवरील खर्चाने साधला जातो असाही मुद्दा 'नेटीव्ह ओपिनियन'ने मांडला.

१८५७ च्या सुमारास पेळू व सूत ह्यांच्या आयातीवर साडेतीन टक्के व इतर ब्रिटिश मालावर पाच टक्के जकात सरकारने लावली होती. १८५७ च्या बंडामुळे सरकारी तिजोरीवर पडलेला ताण कमी करण्याचे निमित्त पुढे करून त्यात अनुक्रमे पाच टक्के व दहा टक्केपर्यंत वाढ करण्यात आली. १८७४ मध्ये सरकारला जकातीपासून मिळणाऱ्या एकूण उत्पन्नापैकी निम्मे उत्पन्न वरील जकातींपासून मिळत असे. लँकेशायरच्या गिरणीमालकांच्या दबावाखाली त्या वेळचे भारतसचिव लॉर्ड सॅलीसबरी ह्यांनी वरील जकाती रद्द करण्याची मागणी सातत्याने केली. प्रारंभी हिंदुस्थानातील ब्रिटिश अंमलदार ह्या जकाती रद्द करण्याविरुद्ध होते; परंतु १८७७ मध्ये या जकाती रद्द करवून घेण्यात लँकेशायर व मँन्चेस्टरच्या कारखानदारांना यश मिळाले. तेथपासून पुढे बारा वर्षे तर कोणत्याही आयात मालावर जकाती नव्हत्या. कापसाच्या सुतावरील जकात रद्द करण्याच्या सरकारी कृतीचा राष्ट्रवादी पुढाऱ्यांनी तीव्र निषेध केला. ६ एप्रिल १८८२ च्या 'अमृत बझार' पत्रिकेने, "The repeal of the import duties is a crime, and any attempt to justify it, we repeat, simply hightens the enormity of the crime" असे म्हटले. १८९४ मध्ये पुनः सुती मालावर पाच टक्के जकात लावण्यात आली. त्याचे स्वागत राष्ट्रीय पुढाऱ्यांनी केले; परंतु त्याचबरोबर भारतीय गिरण्यांतून तयार होणाऱ्या जाडचा-भरडचा कापडावर सरकारने पाच टक्के अबकारी कर बसविला त्याचा निषेधही केला. १९०२ च्या तसेच १९०४ च्या काँग्रेसने ठराव करून हा अबकारी कर रद्द करावा अशी मागणी केली. गोखल्यांनी लेजिस्लेटीव्ह कौंसिलमध्ये केलेल्या भाषणातून भारतीयांच्या मनात ह्या अबकारी कराबद्दल किती असंतोष आहे हे इंग्रजी सत्तेच्या लक्षात आणून देण्याचा आटोकाट प्रयत्न केला. ह्या अबकारी कराचे ओझे जाडे-भरडे कापड वापरणाऱ्या येथील गरीब रयतेवर अधिक प्रमाणात पडेल असे, २७ जाने. १८९६ च्या 'मराठा' चे म्हणणे पडले.

जकातीबाबतच्या राष्ट्रवादी पुढाऱ्यांच्या धोरणाचे सार पुढीलप्रमाणे सांगता येईल : (अ) सरकारने लावलेल्या जकातींचा लाभ भारतीय उद्योगांच्या वाढीला झाला पाहिजे. (ब) जकाती आकारताना उपभोक्त्यांच्या हितसंबंधांपेक्षा भारतीय उद्योगाचे व्यापक हितसंबंध प्रथम पाहिले जावेत; तथापि पेट्रोलियम व साखर ह्यांसारख्या ज्या उद्योगांमध्ये त्या काळी भारतीयांचे हितसंबंध नव्हते, त्यांच्या बाबतीत जकातधोरण हे उपभोक्त्यांच्या हिताला प्राधान्य देणारे असावे.

काँग्रेसच्या पुढाऱ्यांच्या जकातविषयक धोरणाबाबत असे म्हणता येईल की, तत्कालीन ब्रिटिश राज्यकर्त्यांचे धोरण हे भारतीय हितसंबंधांचा बळी देऊन ब्रिटिश कारखानदारांचे हित पाहणारे होते या मुद्द्यावर त्यांनी अभूतपूर्व जनजागृती घडवून आणली व त्यामुळे राष्ट्रवादी विचाराचा परिपोष होऊन

हिंदी लोकांमध्ये राष्ट्रीय ऐक्याची भावना निर्माण झाली.

काँग्रेसच्या स्थापनेपासूनच्या पहिल्या पाव शतकातील काँग्रेसधुरिणांच्या आर्थिक धोरणावर दृष्टिक्षेप टाकल्यावर लक्षात येते की, त्यांची आर्थिक धोरणे ही मूलतः साम्राज्यवादविरोधी होती. त्यांच्या राजकीय मागण्यांचे स्वरूप नेमस्तपणाचे असले, तरी त्यांच्या आर्थिक मागण्या ह्या निखालस राष्ट्रवादी होत्या. ब्रिटिशांचा हिंदुस्थानातील लष्करी व सनदी सेवांवरील वाढता खर्च कमी झाला पाहिजे अशी त्यांच्याकडून सातत्याने केली गेलेली मागणी म्हणजे एकप्रकारे ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या भौतिक पायावर केलेला हल्लाच होता. ब्रिटिशांचे भारतीय अर्थव्यवस्थेतील विशेषाधिकारप्राप्त स्थान संपुष्टात आणणे हे त्यांच्या आर्थिक धोरणाचे सूत्र होते.

त्यांच्या आर्थिक धोरणाचे लक्षणीय वैशिष्टय असे की निरनिराळया आर्थिक प्रश्नांचा– उदा., परकीय व्यापार, वाहतूक ह्यांच्या विकासाचा–पृथक विचार करणे त्यांना अभिप्रेत नव्हते. सर्व प्रश्न हे भारताच्या आर्थिक विकासाच्या प्रश्नाशी निगडित आहेत, व हा आर्थिक विकास जलद व संपूर्ण औद्योगीकरणानेच साध्य होऊ शकतो असा त्यांच्या याविषयीच्या आकलनाचा मथितार्थ होता.

दुसरे असे की, कोणत्याही विवक्षित वर्गाचे हित त्यांच्या नजरेपुढे प्रकर्षाने नव्हते; व त्यामुळेच एकीकडे येथे कारखानदारीची वाढ झाली पाहिजे अशी मागणी करताना, धनिक वर्गावरील करांचे ओझे त्यांच्या समतेच्या प्रमाणानुसार अधिक असले पाहिजे; गरिबांना सोसावा लागणारा मिठावरील कराचा किंवा जमिनीवरील साऱ्याचा भार कमी झाला पाहिजे अशी मागणी ते निःसंकोचपणे करू शकले. हाच मुद्दा १८९३ च्या काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून दादाभाईंनी केलेल्या भाषणातील पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होतो, "We may rest fully assured that whatever political or national benefit we may acquire in one or the other way benefit all classes, the benefit of each taking various forms. The interests of us all are the same. We are all in the same boat, we must sink or swim together... As our Indian saying goes "If there is water in the well it will come to the cistern." If we have the well of prosperity we shall be able to draw each our share of it. But if the well is dry we must all go without any at all."

ब्रिटिश राजवटीचे वासाहतिक स्वरूप पूर्णपणे लक्षात आल्याने प्रारंभीच्या राष्ट्रवाद्यांचे हिंदुस्थानच्या आर्थिक प्रश्नांचे आकलन हे मूलगामी होते व नेमक्या याच कारणाने एतद्देशीय संस्थात्मक संरचनेकडे त्यांचे काहीसे दुर्लक्ष झाल्याचेही लक्षात येते. याचा अर्थ शोषित गट किंवा वर्गासाठी त्यांच्या विचारात स्थान नव्हते असा मात्र होत नाही. इंग्रजांच्या मालकीच्या मळ्यांतील भारतीय कामगारांना संरक्षण देण्यासाठी त्यांनी राजकीय चळवळ केली; कारण ह्यात येथील वर्गा-वर्गामध्ये संघर्ष निर्माण होण्याचा प्रश्नच नव्हता. परंतु भारतीयांच्या मालकीच्या कापडगिरण्यांमधील कामगारांच्या कामाच्या तासांत कपात व्हावी अशी सूचना करण्यात आली त्या वेळी मात्र काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी त्या सूचनेला कडाडून विरोध केलेला आहे.

शेतसारा कमी करण्यात यावा, कायमसाऱ्याची पद्धती अमलात आणावी अशी मागणी त्यांनी सातत्याने मांडली, त्यांच्या अनेक मागण्या ह्या अंतिमतः शेतकरी वर्गाच्याच हिताच्या होत्या. ब्रिटिशांच्या साम्राज्यवादी आर्थिक धोरणांचा बळी ठरलेल्या शेतकरी वर्गाला जेणेकरून आर्थिक विकासाचे लाभ मिळतील अशीच धोरणे त्यांनी अनुसरली.

ज्याला साधारणपणे गांधीयुग असे संबोधले जाते त्या एकोणीसशे वीसनंतरच्या कालखंडातील काँग्रेसची आर्थिक धोरणे ही मूलतः एकोणिसाव्या शतकातील राष्ट्रवाद्यांच्या धोरणाहून भिन्न नव्हती असे दिसून येते.

१९३१ मध्ये दादाभाई नवरोजींचे चरित्रकार श्री. आर. पी. मसानी ह्यांनी गांधीजींना दादाभाईंच्या आर्थिक धोरणाबाबत विचारले असताना गांधींनी म्हटले होते, "ते जर हयात असते तर

अनुक्रमणिका

अलीकडील काळात मी अनुसरत असलेल्या धोरणांप्रमाणेच त्यांचीही धोरणे राहिली असती." श्री. बी. एन. गांगुली ह्यांनी म्हटल्याप्रमाणे "Economic policies ( of Gandhi Era ) were a kind of spill-over reflecting the maturing ideas of the nineteenth century in their confrontation with the economic realities of the present century."

सुभाषचंद्र बोस गांधींसह काँग्रेसचे नेतृत्व हे सुधारणावादाच्या वळणाने जाणारे उदारमतवादी आहे असे म्हणत, त्याबाबत गांधींना १९४० साली एकाने पृच्छा केली असता दादाभाई, गोखले ह्या उदारमतवाद्यांचा उल्लेख करून गांधींनी म्हटले की, "ते राष्ट्राचे प्रतिनिधित्व करीत होते, आम्ही त्यांचेच वंशज आहोत. ("We would not have been, if they had not been.")

गांधींच्या भारतीय आर्थिक प्रश्नांच्या आकलनावर उदारमतवादी राष्ट्रीय विचारांची छाप कशी होती हे त्यांनी १९४६ साली प्रगट केलेल्या पुढील विचारांवरून लक्षात येते. गांधीजी म्हणतात, "हिंदुस्थानला झालेला फायदा हा ब्रिटिश राजवटीमुळे झालेला नसून, सामर्थ्यवान लोकांशी आलेल्या संपर्कामुळे झालेला आहे. ब्रिटिश राजवटीची चांगली बाजू ही नैमित्तिक असून वाईट बाजू ही तिची अंगभूत बाब आहे व ती अधिक हानीकारक आहे... आपल्याला ठाऊक असलेला दुष्काळ ही ब्रिटिश अमलाची निर्मिती आहे... अवर्षणावर मात करण्याची क्षमता नसल्याने दुष्काळ निर्माण होतो. रेल्वे येण्याआधी हिंदुस्थानातील प्रत्येक खेड्यात धान्याचा संग्रह असे, या अर्थाने दुष्काळावर मात करण्यास आपण अधिक समर्थ होतो, पिके बुडाली तर हस्तोद्योगांवर विसंबून राहता येत असे रेल्वेमुळे धान्यसाठे कमी झाले व हस्तोद्योग नामशेष झाले. शेतकऱ्यांना जो थोडाफार पैसा मिळतो तो परदेशी वस्तूंच्या हव्यासापायी व जबर सारा द्यावा लागत असल्याने, त्यांच्या हातातून निसटून जातो... दुर्भिक्षावर कोणतीही उपाययोजना नाही. रेल्वे व स्वस्त वाहतुकीची साधने हे सापळे बनलेले आहेत. जुन्या काळी राजे जुलुम करीत असत, परंतु त्याला मर्यादा होत्या. राज्याविरुद्ध बंड करणे किंवा परागंदा होणे हे स्वाभाविक मार्ग प्रजेला खुले होते. त्यांना निःशस्त्र किंवा निःसत्त्व केलेले नव्हते... पूर्वी प्रजेच्या अडचणींचा तोल त्यामुळे सावरला जात असे, आता अडचणींचेच पारडे जड आहे." वरील उद्‌गारांवरून ब्रिटिश राजवटीच्या स्वरूपाबाबत गांधींचा दृष्टिकोन हा एकोणिसाव्या शतकातील काँग्रेसच्या पुढाऱ्यांच्या दृष्टिकोनाहून फारसा वेगळा नव्हता हे लक्षात येते.

दादाभाईंनी मांडलेल्या परकीय शोषणाच्या सिद्धान्ताचा पुनरुच्चार गांधींनी अनेकदा केलेला आहे. याविषयी १९२५ मध्ये गांधीजी लिहितात, "आपल्या गुंतागुंतीच्या यंत्रणेद्वारे इतर देशांचे शोषण करून इंग्लंड जगत आहे. ज्याच्या बाबतीत दादाभाई नवरोजींनी आपले डोळे उघडले त्या गृहप्रभार व इतर प्रकारच्या शोषणापेक्षा सांप्रतचे आर्थिक शोषण हे अधिक विनाशकारक असे आहे. दादाभाईंच्या नजरेतून हे शोषण सुटले; परंतु मी त्यांचा शिष्य, त्यांच्याच विचारांचे अनुसरण करणारा असल्याने हे शोषण मला आढळले. एक राष्ट्र म्हणून आपल्याला आळशी बनविणारे हे शोषण सर्वांत घातक प्रकारचे आहे."

१९२० ते स्वातंत्र्यप्राप्तिकाळाच्या दरम्यानचे काँग्रेसचे आर्थिक धोरण हे बव्हंशी गेल्या शतकातील आर्थिक राष्ट्रवादी विचारसरणीशी समांतर असल्याचे एका बाजूने दिसत असेल तर दुसऱ्या बाजूने समाजवादी विचारांचाही एक लक्षणीय प्रवाह आर्थिक राष्ट्रवादाच्या मुख्य धारेशी जुळवून घेत पुढे चालला होता असे दिसते.

१९२० ते १९२९ चा कालखंड हा 'चरख्याच्या संगीताचा कालखंड' होता असे म्हटले जाते. ह्या काळातील काँग्रेसच्या आर्थिक धोरणाचे प्रमुख सूत्र स्वदेशी हे होते. स्वदेशीचा नकारात्मक आशय परकीय मालावर व त्यातल्या त्यात परदेशी कापडावर बहिष्कार हा होता. १९२१ च्या अहमदाबाद काँग्रेसच्या ठरावात म्हटले होते की, "उपासमारीकडे ढकलल्या जात असलेल्या लक्षावधी शेतकऱ्यांच्या उपजीविकेच्या साधनांत भर घालणारा कुटीर-उद्योग ह्या दृष्टीने खादीची गरज आहे." याच काळात कामगार-प्रश्नांबाबतही काँग्रेसने आस्था दाखविल्याचे दिसते. १९२० च्या नागपूर काँग्रेसने, "श्रमिकसंघाच्या स्थापनेद्वारे आपले न्याय्य हक्क पदरात पाडून घेण्या-

साठी सुरू असलेल्या श्रमिकांच्या लढ्याला" आपला पूर्ण पाठिंबा जाहीर केला होता. १९२२ मध्ये गया येथील अधिवेशनात शेतमजूर व औद्योगिक कामगारांना संघटित करण्याच्या कामी ऑल इंडिया ट्रेड युनियन काँग्रेसला मदत करण्यासाठी एक समिती काँग्रेसने नेमली. १९२८ मध्ये कलकत्ता काँग्रेसने औद्योगिक कलह अधिनियमाला असलेला आपला विरोध जोरदारपणे व्यक्त केला. तथापि ह्या सर्व कालखंडात खादी व परदेशी मालावरील बहिष्कार हेच काँग्रेसच्या आर्थिक धोरणाचे मुख्य अंग होते.

काँग्रेसने असहकाराची चळवळ मागे घेतल्यानंतरच्या काळात जैसे-थेवादी व बदलवादी अशी विभागणी काँग्रेसअंतर्गत झाली, पैकी बदलवादी मंडळींनी स्वराज्य पक्ष संघटित केला. परंतु नाव घेण्याजोगे आर्थिक धोरण त्यांच्यापाशी नव्हते. स्वराज्य पक्षाने १९२३ च्या फेब्रुवारीमध्ये खासगी मालमत्तेच्या हक्काच्या बाजूने आपण असल्याचे जाहीर केले. स्वराज्य पक्षाच्या १९२४ च्या जुहू निवेदनात, "एका बाजूने भांडवलदार व जमीनदारांच्या हातून कामगारांच्या होणाऱ्या शोषणाला पायबंद घालण्यासाठी त्यांना संघटित केले पाहिजे, परंतु दुसऱ्या बाजूने अशा संघटना भरमसाठ व अवाजवी मागण्या पुढे करून स्वतःच शोषक बनणार नाहीत ह्याची काळजी घेतली पाहिजे. कामगारांना जशी संरक्षणाची गरज आहे, तशी ती उद्योगधंद्यांनाही आहे." अशी भूमिका मांडली गेली. ह्या स्वराज्य पक्षाने काय मिळविले असेल तर तत्कालीन मध्यवर्ती कायदेमंडळात हिरिरीने प्रयत्न करून टाटा स्टील कंपनीसाठी सवलत !

जैसे-थेवादी गटाने उत्साहपूर्वक गांधींच्या खादी-कार्यक्रमात उडी घेतली. १९२३ च्या कोकानाडा काँग्रेसने अखिल भारतीय पातळीवर खादीचे कार्य संघटित करण्यासाठी खादी संघाची स्थापना केली. तुरुंगातून सुटका झाल्यावर गांधींनी खादी-कार्य महत्त्वाचे मानून १९२५ साली अखिल भारतीय कताईसंघाची स्थापना करण्यासाठी काँग्रेस महासमितीचे मन वळविले. १९२७ मध्ये गांधींनी देशभर दौरा करूनखादी कार्यासाठी साडेतीन लाख रुपये गोळा केले व असंख्य वेळा लोकमान्यांच्या "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" ह्या मंत्राला "परंतु ते खादीशिवाय मिळणार नाही" अशी पुस्ती जोडली.



१९२८ च्या बार्डोली सत्याग्रहाने काँग्रेस शेतकऱ्यांच्या बाजूने असल्याचे व्यक्त झाले.

गांधींच्या प्रभावाखालील काँग्रेसच्या आर्थिक धोरणांचा दुसरा कालखंड १९२९ पासून सुरू होतो. २५ मे १९२९ ला मुंबई येथे भरलेल्या काँग्रेस महासमितीच्या सामाजिक व आर्थिक परिवर्तनाविषयीच्या ठरावात म्हटले होते की, "भारतीय जनतेचे दारिद्र्य व दुःख हे केवळ परकीय शोषणातून निर्माण झालेले नसून आपल्या स्वार्थासाठी परकीय राज्यकर्ते ज्या आर्थिक रचनेला पाठिंबा देत आहेत त्यातूनही निर्माण झालेले आहे. त्यामुळे भारतीय जनतेचे दुःख, दैन्य निवारण होण्यासाठी प्रचलित आर्थिक व सामाजिक रचनेत क्रांतिकारक परिवर्तन घडले पाहिजे व भीषण विषमतेचे निर्मूलन झाले पाहिजे." १९२९ ते १९३४ ह्या कालखंडात एका बाजूने काँग्रेस गांधींच्या विधायक कार्यक्रमांना अधिकाधिक पाठिंबा देत होती तर आर्थिक पुनर्रचनेच्या तत्त्वाला मान्यता देऊन समाजवादाच्या दिशेकडे वळत होती. १९२७ साली युरोप व सोवियत युनियनच्या दौऱ्यावरून परतलेल्या नेहरूंच्या रूपाने समाजवाद्यांना नेतृत्व लाभले व काँग्रेसच्या व्यासपीठावरून समाजवादाचा आवाज बुलंद होऊ लागला. सविनय कायदेभंगाच्या एकोणीसशे तिशीतल्या चळवळीने काँग्रेसचा मोहरा समाजवादाच्या दिशेने अधिक प्रमाणात वळविल्याचे लक्षात येते. राजकीय स्वातंत्र्याबरोबरच आर्थिक स्वातंत्र्याचीही मागणी पुढे येऊ लागली. ३० जाने. १९३० च्या 'यंग इंडिया' मध्ये लिहिताना आपला संकल्पित सत्याग्रह मागे घेण्यासाठी ज्या अकरा अटी गांधींनी व्हॉइसरॉयपुढे मांडल्या, त्यात जमीनमहसुलात पन्नास टक्क्यांनी कपात करून त्याचे कायदेशीर नियंत्रण केले जाणे, मिठावरील कर रद्द होणे, उच्चपदस्थांचे पगार निम्म्याने किंवा त्याहून अधिक कमी करणे ह्यांसारख्या एकोणिसाव्या शतकातील काँग्रेस पुढाऱ्यांच्या मागण्यांची आठवण करून देणाऱ्या अटींचा समावेश होता. २ मार्च १९३० रोजी व्हॉइसरॉयला लिहिलेल्या पत्रातही गांधींनी आपल्या म्हणण्याचा पाठपुरावा केला. १९३१ च्या कराची काँग्रेसने देशी गिरणीमालकांना आवाहन केले की, त्यांनी कामगारांचा दर्जा उंचावण्यास मदत करावी, की जेणेकरून त्यांनाही मालकवर्गाच्या सुखदुःखात

सहभागी व्हावेसे वाटेल. राजकीय स्वातंत्र्यात आर्थिक स्वातंत्र्याचा अंतर्भाव केल्याखेरीज लक्षावधी भुके-कंगालांचे शोषण थांबणार नाही अशी भूमिका कराची काँग्रेसने घेतली. ह्याच काँग्रेसमध्ये मूलभूत अधिकार व आर्थिक परिवर्तनासंबंधीचा एक प्रदीर्घ ठराव पारीत झाला. त्यात काँग्रेस पक्ष हा नागरी स्वातंत्र्य, श्रमिकांना निर्वाहपातळी-वरील वेतन, शेतकऱ्यांवरील खंडातील कपात, प्रागतिक दराने उत्पन्नावरील कर, उच्च वेतनातील कपात, देशी कापडाला संरक्षण, कररहित मीठ व कळीच्या उद्योगांचे राष्ट्रीयीकरण ह्या धोरणाला बांधलेला असल्याचे जाहीर करण्यात आले. परंतु अद्यापही काँग्रेसने समाजवादाचा अंगीकार केलेला आहे असे म्हणता येण्यासारखे नव्हते. पंडित नेहरूंनी या संदर्भात आपल्या आत्मचरित्रात म्हटले की, " This was not socialism at all, and a capitalist state could easily accept almost everything contained in the resolution. " तरीसुद्धा व्यापक प्रमाणावर जनतेचा पाठिंबा मिळविण्यासाठी समाजवादी कल्पनांचा स्वीकार करण्याची तयारी असलेला एक प्रागतिक पक्ष असे काँग्रेस पक्षाचे रूप आकार घेऊ लागले व त्यानंतरच्या काळातही ते बव्हंशी तसेच राहिले.

१७ मे १९३४ रोजी पाटण्याला भरलेल्या अखिल भारतीय समाजवादी परिषदेने काँग्रेसअंतर्गत समाजवादी विचारांच्या नवीन अध्यायाला प्रारंभ केला असे म्हणता येईल. काँग्रेसअंतर्गत समाजवाद्यांनी संघटित होण्याची वेळ आलेली आहे याची ह्या परिषदेने दखल घेतली व थोडक्या कालावधीत काँग्रेस समाजवादी पक्ष स्थापन झाला. काँग्रेसच्या अधिकृत धोरणांतील अनेक मुद्द्यांबाबत ह्या समाजवादी गटाचे मतभेद होते, परंतु त्यापायी काँग्रेस संघटनेत बखेडा निर्माण व्हावा असे त्यांना वाटत नसे. त्यांनी वर्गसंघर्षाचा केलेला स्वीकार, खासगी संपत्तीच्या क्रमशः उच्चाटनाची केलेली मागणी, गांधींच्या विधायक कार्यक्रमाला चळवळीचे एकमेव व पुरेसे हत्यार मानण्याच्या भूमिकेशी असणारी त्यांची असहमती, नियोजित व नियंत्रित पद्धतीच्या अर्थव्यवस्थेचा त्यांनी केलेला पुरस्कार ह्या सर्व गोष्टी त्यांना गांधीजींशी संघर्षाच्या स्थितीत आणून सोडत असल्या तरीसुद्धा गांधींच्या नेतृत्वाविना स्वातंत्र्याची चळवळ पुढे चालविणे शक्य नसल्याची त्यांची खात्री पटल्याने, त्यांनी गांधीजींशी सतत तडजोड करण्याचे पत्करले.

दुसऱ्या बाजूने काँग्रेसमध्ये विधायक कार्यक्रमाला वाढता पाठिंबा मिळू लागला. १९३४ मध्ये गांधींच्या विधायक कार्यक्रमात नऊ बाबींचा समावेश होता. ही संख्या १९४६ पर्यंत अठरापर्यंत पोहोचली. त्यांची परिणामकारक अमलबजावणी होण्यासाठी अनेक अराजकीय स्वरूपाच्या संस्था निर्माण झाल्या. अखिल भारतीय ग्रामोद्योग संघ व हिंदुस्थानी मजदूर सेवक संघ ही त्यांतल्या काहींची नावे सांगता येतील.

१९३६ च्या डिसेंबरमध्ये प्रथमच खेड्यात भरलेल्या फैजपूरच्या काँग्रेसने शेतसाऱ्यात कपात, शेती-उत्पन्नावर कर, शेतकऱ्यावरील पाणीपट्टीत कपात, वेठबिगारविरोधी कायदा, कुळांच्या हक्कांचे रक्षण, सहकारी शेतीचा विकास, कर्जमाफी, शेतमजुरांसाठी निर्वाह वेतनाची तरतूद इ. मागण्या पुढे मांडून शेतकरीवर्गाचा पाठिंबा मिळविण्याचा प्रयत्न केला व त्यासोबतच बंगाल-नागपूर रेल्वेतील कर्मचाऱ्यांच्या संपाला आपला पाठिंबाही व्यक्त केला.

१९३७ मध्ये अनेक प्रांतांतून काँग्रेसची मंत्रिमंडळे सत्तेत आली. आपल्या उण्यापुऱ्या सत्तावीस महिन्यांच्या कारकिर्दीत कुळांना संरक्षण देणे, खंड कमी करणे, कर्जात सूट देणे अशांसारख्या सुधारणा त्यांनी कायद्याद्वारे घडवून आणल्या. मुंबई राज्यात संप व टाळेबंदीला मज्जाव करणारा व लवादाची तरतूद करणारा औद्योगिक कलह अधिनियम काँग्रेसने पास केला.

शेतकऱ्यांनी संघटित व्हावे असे आवाहन फैजपूर काँग्रेसने केलेले असले तरी किसानांच्या मागण्या आपल्याला पूर्ण करता येण्यासारख्या नसल्याचे व त्यांच्यात हिंसेचा प्रादुर्भाव होत असल्याचे लक्षात येताच हरिपुरा काँग्रेसने ठराव करून तत्कालीन किसान आंदोलनाचा निषेध तर केलाच, परंतु काँग्रेसच्या मूळ तत्त्वांशी विसंगत असणाऱ्या ह्या आंदोलनापासून काँग्रेसजनांनी स्वत:स दूर ठेवावे असेही आवाहन केले.

ह्याच काळात काँग्रेसने समाजवादी पद्धतीच्या नियोजनाच्या तत्त्वाचा स्वीकार केला. २ व ३ ऑक्टो. १९३८ ला दिल्लीला सर्व राज्यांतील उद्योग मंत्र्यांच्या झालेल्या परिषदेत नेहरूंच्या अध्यक्षतेखाली

"राष्ट्रीय नियोजन समिती'ची स्थापना झाली. तिचा उद्देश, "मूलभूत अवजड उद्योग, मध्यम व लघु-उद्योग त्याचप्रमाणे कुटीरोद्योग ह्यांचा विकास करणे" हा होता. ह्या समितीच्या पाच बैठका झाल्या. १९४० मध्ये नेहरूंना अटक झाल्यावर नियोजन समितीचे कार्य थंडावले. तथापि नियोजन समितीने नेमलेल्या विविध उपसमित्यांच्या कामकाजावरून लक्षात येते की, राष्ट्रीय नियोजन समिती ही लोकशाही समाजवादाच्या विचाराला मानणारी होती. मूलभूत उद्योग, संरक्षणाशी निगडित उद्योग व जन-सुविधांची मालकी सार्वजनिक असावी, अन्य उद्योगांची मालकी खासगी राहिली तरी त्यांवर सरकारी नियंत्रण असावे, देशातील जमीन, खाणी, नद्या व जंगले ही राष्ट्रीय संपत्ती असल्याने त्यांच्यावरील मालकी ही समस्त भारतीय जनतेची समाईक आहे, शेतीत सहकारी पद्धतीचा अंगीकार व्हावा, पतपुरवठ्यावर सामाजिक नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने बँका व विमा कंपन्या सरकारद्वारे नियंत्रित असाव्यात, असा दृष्टिकोन राष्ट्रीय नियोजन समितीचा सर्वसाधारणपणे होता. सामान्य माणसाचे हित डोळ्यांपुढे ठेवून नियोजन समिती समाजवादी धोरणांना अभिमुख होती असे दिसते.

थोडक्यात असे म्हणता येईल की, ह्या कालखंडात समाजवादाच्या वळणाने जात असलेला काँग्रेस पक्ष मिश्र अर्थव्यवस्थेच्या बाजूने होता. काँग्रेसच्या कार्यक्रमांत जमीनसुधारणा, उत्पन्नाचे समान वाटप, कुटीर-उद्योगांचा विकास, श्रमिक व मालक वर्गांतील मित्रत्वाचे संबंध ह्या गोष्टींचा समावेश होता. काँग्रेसचे स्वरूप किमानपक्षी कल्याणकारी कार्यक्रमांचा पाठपुरावा करणारा व कमालपक्षी लोकशाही समाजवाद मानणारा पक्ष असे स्पष्ट होऊ लागले. काँग्रेसी वळणाचा समाजवाद हा नियोजित पद्धतीने केलेले उत्पादन व त्याचे समप्रमाणात झालेले वितरण ह्यांपुरता मर्यादित होता. न्याय्य वितरण हे सत्य-अहिंसेच्या मार्गाने जरी नाही तरी शांततेच्या व कायद्याच्या मार्गाने साध्य व्हावे असेच नेहरू आदी समाजवाद्यांना अभिप्रेत होते. खासगी संपत्तीवरील मालकी हक्काचे उच्चाटन व वर्गसंघर्षाचे तत्त्वज्ञान हे काँग्रेसच्या अहिंसक विचारसरणीशी जुळणारे नाही अशी भूमिका काँग्रेसने अनेकदा घेतली. आपण ज्याप्रमाणे किसानांच्या बाजूने उभे आहोत त्याचप्रमाणे मजुरांच्याही बाजूने असल्याचे वेळोवेळी काँग्रेसने म्हटले असले, तरी भारतीय अर्थव्यवस्थेतील शेतीचे स्थान व गांधींनी ग्रामप्रधान अर्थरचनेचे मानलेले महत्त्व ह्यांच्या प्रभावाखाली औद्योगिक कामगारापेक्षा शेतकरी वर्गाचा विचार काँग्रेसने अधिक महत्त्वाचा मानला व त्यामुळेच "काँग्रेस हा मूलतः किसानांचा पक्ष" आहे असे त्याचे वर्णन गांधींनी केले. काँग्रेसने कुटीरोद्योग व बृहद्‌उद्योगांचे महत्त्व सारखेच असल्याचे म्हटले, तरी कुटीरोद्योगांचा समावेश विधायक कार्यक्रमात केला व मोठ्या आणि संघटित उद्योगांना काँग्रेसच्या पाठिंब्याची गरज नसल्याने सरकारी मदतीने त्यांचा होत असलेला विकास मान्य करीत त्यांच्याबाबत तटस्थतेचे धोरण स्वीकारले.

स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीच्या काँग्रेसच्या आर्थिक धोरणांचे परिपक्व रूप स्वातंत्र्यप्राप्तीनंतर लगोलग जाहीर करण्यात आलेल्या १९४८ च्या औद्योगिक धोरणविषयक ठरावात, आर्थिक नियोजनाच्या प्रयत्नांत तसेच समाजवादी समाजरचनेच्या तत्त्वाचा काँग्रेसने जो स्वीकार केला त्यात आढळून येते. प्रत्यक्षात स्वातंत्र्यप्राप्तीनंतर काँग्रेस पक्ष सत्तेवर आल्यावर ज्या मार्गाने देशाच्या अर्थव्यवस्थेची प्रगती होत गेली तो मार्ग समाजवादाचा नसून भांडवलदारी पद्धतीचा होता असाही एक विचारप्रवाह आहे. परंतु हा मुद्दा अर्थातच प्रस्तुत विषयाच्या कक्षेबाहेरचा असल्याने स्वातंत्र्यप्राप्तीपूर्वीच्या काँग्रेसच्या आर्थिक धोरणातील काही बाबींचाच तेवढा परामर्ष प्रस्तुत लेखात घेता आलेला आहे.

## संदर्भ


1). Bipan Chandra : The Rise and Growth of Economic Nationalism. (1966)

2). B. N. Ganguli : Indian Economic Thought : Nineteenth Centary perspectives. (1977)

3). P. D. Kaushik : The Congress Ideology and Programme. ( 1964 )


⊙ ⊙ ⊙



अनुक्रमणिका

# भारतीय मुसलमानांचे राजकारण

मे. पुं. रेगे

भारतीय मुस्लिमांच्या स्वातंत्र्यपूर्व राजकारणाची तीन स्वाभाविक कालखंडांत विभागणी होते. पहिला कालखंड म्हणजे १८५७ च्या बंडाच्या समाप्तीपासून ते डिसेंबर ३१, १९०६ रोजी झालेल्या मुस्लिम लीगच्या स्थापनेपर्यंतचा कालखंड. दुसऱ्या कालखंडाची अखेर आपल्या तीन वर्षांच्या इंग्लंडमधील विजनवासाची समाप्ती करून महंमदअली जीना मुस्लिम राजकारणाची सूत्रे परत हाती घेण्याच्या इराद्याने डिसेंबर १९३३ मध्ये भारतात परततात तेव्हा होते. तिसरा आणि अखेरचा कालखंड १९४७ मध्ये भारताची फाळणी होऊन पाकिस्तानची स्थापना होण्याने संपुष्टात येतो. महंमदअली जीना हे दुसऱ्या कालखंडात एक महत्त्वाचे मुस्लिम नेते होते आणि तिसऱ्या कालखंडात भारतीय मुस्लिम राजकारणाचे एकमेव सूत्रधार हे स्थान त्यांनी स्वतःसाठी प्राप्त करून घेतले होते.

पहिल्या कालखंडाचे अध्वर्यूपण सर सय्यद अहमदखान ह्यांच्याकडे होते ह्यात शंका नाही. प्लासीच्या लढाईनंतरचा काळ हा मोगल सत्तेच्या विघटनाचा आणि ब्रिटिश सत्तेच्या विस्ताराचा व दृढीकरणाचा काळ होता. सत्ता, अधिकारस्थाने, प्रतिष्ठा, संपत्ती आपल्या हातून निसटत आहेत ह्याचा तीव्र असंतोष मुसलमानांतील वरिष्ठ वर्गात होताच; पण ब्रिटिशांच्या आक्रमणापुढे आपण हतबल आहोत ही विषण्ण आणि नाउमेद करणारी जाणीवही त्याच्यात दृढमूल होत होती. गतवैभवाच्या, अनेकदा काल्पनिक असलेल्या स्मृतीत मश्गूल होऊन प्राप्त परिस्थितीचा विसर पाडून घेणे ही ह्या स्थितीला स्वाभाविक असलेली प्रतिक्रिया होती. आपण जिचे सत्तेपासून उच्चाटन केले त्या मुसलमान जमातीबद्दल ब्रिटिश सत्ताधीशांच्या मनात अविश्वास आणि संशय होताच. १७५८ मध्ये लिहिलेल्या एका पत्रात रॉबर्ट क्लाइव्ह म्हणतात, "हे मुसलमान, त्यांच्यात कृतज्ञतेची भावना यत्किंचितही नसते, ही अत्यंत कोत्या विचारांची अधम माणसे आहेत. राजकारणाच्या ज्या एका पद्धतीचा स्वीकार त्यांनी केला आहे ते ह्या देशाचे एक अनन्यसाधारण वैशिष्टच आहे– ही पद्धत म्हणजे आपल्याला जे साधायचे असेल ते बळाचा वापर करून न साधता विश्वासघाताने साधायचे."[१] नवीन ब्रिटिश सत्ताधाऱ्यांची पदच्युत मुस्लिम राज्यकर्त्यांविषयीची मनोवृत्ती पुढील वाक्यांतून चांगल्या प्रकारे व्यक्त होते. १८५७ च्या बंडाचा उद्रेक होण्यापूर्वीच्या नजीकच्या काळात प्लासीच्या लढाईच्या शतसांवत्सरीच्या निमित्ताने लिहिण्यात आलेल्या 'फ्रेंड ऑफ् इन्डिया' ह्या वर्तमानपत्राच्या संपादकीयातून ती उद्धृत करण्यात आली आहेत. "क्रूर, विषयासक्त, असहिष्णू असलेले हे (मुसलमान), त्यांच्यात राज्य करण्याची कुवत नाही आणि सेवा करण्याची इच्छा नाही... आम्ही ज्या चांगल्या गोष्टी त्यांना देऊ शकू, त्या ते कधी सहन करणार नाहीत आणि आमच्या वर्चस्वाबद्दल आम्हाला क्षमा करणार नाहीत."

१८५७ च्या बंडात इतर जमातींपेक्षा मुसलमानांचा सहभाग अधिक होता असे म्हणता येत नाही. तरी ह्या उद्रेकामागे मुसलमानांची प्रेरणा प्रामुख्याने होती असा संशय ब्रिटिशांना होता. बंड दडपून टाकण्यात आल्यानंतर लगेच 'टाइम्स' मध्ये प्रसिद्ध केलेल्या एका लेखात त्या पत्राचा भारतातील बातमीदार रसेल म्हणतो, "महंमदाच्या अनुयायांशी असलेले आमचे वितुष्ट शिव आणि विष्णू यांच्या उपासकांशी असलेल्या वितुष्टापेक्षा अधिक तीव्र आहे. आमच्या सत्तेला त्यांच्यापासून निःसंशय अधिक धोका आहे... एक जोमदार प्रयत्न करून महंमदाच्या परंपरेचा उच्छेद जर आपण करू शकलो आणि त्याची प्रार्थनास्थाने नष्ट करू शकलो तर ते ख्रिस्ती मताच्या प्रसारासाठी आणि ब्रिटिश सत्तेसाठी निश्चितपणे हितकर ठरेल."[२]

अनुक्रमणिका

एकंदरीत मुसलमानांनी ब्रिटिश राज्यकर्त्यांचा विश्वास गमावला होता. सरकारी नोकऱ्यांत त्यांना फारसे स्थान नव्हते आणि एकंदरीत राज्यकर्त्यांकडून त्यांना तुच्छतेची आणि उपेक्षेची वागणूक मिळत होती. उलट, हिंदूंविषयी सत्ताधाऱ्यांची वृत्ती औदार्याची होती. शासकीय सेवांमधील कनिष्ठ स्थानांवर त्यांच्या भराभर नेमणुका होत होत्या. हिंदू नोकरही आपल्या ब्रिटिश वरिष्ठांशी सर्वतोपरी सहकार्य करीत होते. ब्रिटिश सत्तेला त्यांनी आपली निष्ठा वाहिली होती.

ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या मनात मुसलमानांविषयी ही जी अविश्वासाची आणि वितुष्टाची भावना होती तिला मुसलमानांकडून मिळणारा प्रतिसाद त्याच स्वरूपाचा होता. तेही ब्रिटिशांपासून फटकून वागत होते. सार्वजनिक हितासाठी म्हणून ब्रिटिशांनी टाकलेल्या प्रत्येक पाऊलात त्यांना आपल्याला आपल्या धर्मापासून भ्रष्ट करण्याचा डाव दिसत होता. पण त्याबरोबरच आपली दशा अत्यंत अवनत झाली आहे आणि तिच्यातून बाहेर पडायचा काही मार्ग नाही, हा इतिहासाचा नेम आहे अशी एक खोल निराशेची वृत्ती त्यांच्यात पसरली होती. त्यांचे नीतिधैर्य गळले होते. ब्रिटिश शासकीय सेवांच्या विस्तारामुळे उपलब्ध होणाऱ्या प्रत्येक संधीचा हिंदू उत्साहाने लाभ उठवीत होते तर मुसलमान त्या सर्वांपासून पूर्णपणे अलिप्त राहत होते.

ह्या कोंडीतून वाट काढण्याचा पहिला प्रयत्न सर सय्यद अहमदखान ह्यांनी केला. ' धि लॉयल मुहामेडन्स ऑफ् इन्डिया " – " भारताचे राजनिष्ठ मुसलमान " – ह्या १८६० मध्ये प्रसिद्ध केलेल्या एका उर्दू पुस्तिकेद्वारा मुसलमानांविषयीच्या ब्रिटिश मनोवृत्तीत बदल घडवून आणण्याचा प्रयत्न त्यांनी केला. बंडाविषयी अधिकाधिक माहिती बाहेर येईल तेव्हा एकंदरीत मुसलमान जमात ब्रिटिश सत्तेशी एकनिष्ठ राहिली होती हे स्पष्ट होईल असा विश्वास, अनेक उदाहरणे देऊन, ह्या पुस्तिकेत त्यांनी व्यक्त केला होता. "... भारतात जर कुठली एक जमात अशी असेल की तिच्या धर्माची तत्त्वे, सवयी, कल्पना, वृत्तिसाम्य ह्यांच्या बळावर ख्रिस्ती जमातीवर भयानक संकट कोसळलेल्या वेळी, ती ह्या जमातीशी मैत्री आणि सख्य ह्यांच्या धाग्यांनी बांधलेली राहील तर ती मुसलमान ही एकमेव जमात होय. " हे ' अनावृत सत्य ' हळूहळू प्रकट होत जाईल अशी त्यांची खात्री होती.

मुसलमान जमात ब्रिटिश अमलापासून दुरावलेली आहे, ह्या अमलाने भारतीयांना उपलब्ध करून दिलेल्या शासकीय अधिकाराच्या व सन्मानाच्या पदांमध्ये मुसलमानांचा वाटा नगण्य आहे, ह्या बाबतीत हिंदू आणि मुसलमान ह्या दोन जमातींची तुलना केली तर हिंदूंकडे ह्या पदांचा भरघोस हिस्सा गेलेला आहे आणि मुसलमानांकडे, त्यांच्या संख्येच्या मानाने, अत्यल्प हिस्सा आहे आणि ही दरी निरुंद होण्याची चिन्हे नाहीत ह्या वस्तुस्थितीकडे ब्रिटिश धुरीण यांचेही लक्ष गेले होते. मुसलमानांसारखी एक मोठी आणि महत्त्वाची जमात राजवटीपासून अलिप्त, स्वतःत कुढत, धुमसत राहिली तर ती धोकादायक परिस्थिती ठरेल ह्याचे भान त्यांना होते. शासकीय सेवांमधील पदे हा ह्या प्रश्नाचा एक पैलू होता. ह्या पदांसाठी आणि आधुनिक व्यवसायांसाठी आवश्यक असलेली पात्रता कमावण्याचे साधन पाश्चात्त्य शिक्षण हे होते. आणि ह्या शिक्षणाविषयी मुसलमानात असलेली अनास्था, किंबहुना तिटकारा हा त्याचा दुसरा पैलू होता. सर विल्यम हंटर ह्यांनी १८७१ मध्ये प्रसिद्ध केलेल्या आपल्या ग्रंथात " इन्डियन मुसलमान्स : आर् दे बाउण्ड इन् कॉन्शन्स टु राइज अगेन्स्ट ध क्वीन ? " –" भारतीय मुसलमान : आपल्या (धार्मिक) श्रद्धेमुळे राणीविरुद्ध उठाव करायला ते बांधलेले आहेत का ? "–तपशीलवार आकडेवारी देऊन ह्या समस्येकडे लक्ष वेधले. मेयो, लिटन, रिपन, डफरिन इ. व्हाइसरॉयांनी ह्या समस्येच्या संदर्भात मुसलमानांविषयी सहानुभूतीचे धोरण स्वीकारले. पण मुसलमानांना शासकीय सेवांमध्ये अधिक प्रवेश देण्यात जी खरी अडचण होती तिचे स्वरूपही ब्रिटिश सरकारने दाखवून दिले.

जुलै १५, १८८५ रोजी ह्या संबंधात केलेल्या एका ठरावात भारतसरकारने परिस्थितीचे सर्वांगीण समालोचन करून पुढील निष्कर्ष स्वीकारला होता. "...भूतकाळात मुसलमान जमातीची प्रगती होण्यातील प्रमुख अडचण म्हणजे सरकारी शिक्षण-

अनुक्रमणिका

व्यवस्थेचा पूर्ण लाभ उठविण्याची त्यांची असमर्थता किंवा अनिच्छा ही होय...म्हणून सार्वजनिक सेवांमध्ये इतर जमातींच्या तुलनेने मुसलमानांचे प्रमाण कमी असले तर, सरकारच्या मते, त्याचा दोष सरकार किंवा सरकारी अधिकारी ह्यांच्या कृत्यांकडे लक्षणीय प्रमाणात येतो असे मानता येणार नाही." उलट, कित्येक प्रांतांत मुसलमानांवर विशेष मेहेरबानी करण्यात येत होती असे नमूद करून ठरावात पुढे असे म्हटले आहे की, खुल्या स्पर्धेने ज्यांच्यावर भरती करण्यात येते अशा पदांच्या बाबतीत मुसलमानांना पक्षपाती वागणूक देणे अनिष्ट तर आहेच पण मुसलमानांच्या प्रगतीच्या दृष्टीनेही ते अपायकारक ठरेल. तथापि स्थानिक सरकारच्या मुखत्यारीत असणाऱ्या जागांवर मुसलमानांची अधिक प्रमाणात नेमणूक करून सध्याच्या विषम परिस्थितीत सुधारणा घडवून आणायला स्थानिक अधिकाऱ्यांना उत्तेजन देण्यात येईल हे धोरणही ठरावाच्या अखेरीस स्वीकारण्यात आले होते.

मुसलमानांनी बदललेल्या काळाला अनुसरून आपल्या सामाजिक सवयी बदलल्या पाहिजेत, आणि इंग्रजी शिक्षण आत्मसात केले पाहिजे ह्यातच त्यांचा तरणोपाय आहे ही जाणीव मुसलमान पुढाऱ्यांत हळूहळू पसरू लागली होती. ह्या मार्गाचा अवलंब करण्यात मुख्य अडसर मुस्लिम धर्मपंडितांच्या –उलेमांच्या–शिकवणुकीचा होता. ब्रिटिशांकडून येणाऱ्या कल्पना आणि संस्था ह्यांच्याविरुद्ध उलेमांनी एक प्रकारचे जिहाद–धर्मयुद्ध–पुकारले होते. वहाबीसारख्या अधिक सनातनी आणि परंपरानिष्ठ पंथाने तर ब्रिटिश अमलाखालील भारत हा दार्–उल्–हर्ब आहे, म्हणजे युद्धदेश आहे आणि म्हणून भारतीय मुसलमानांनी देशत्याग करून मुस्लिम देशात वसतीला जावे ह्या मताचा प्रचार चालविला होता. अशिक्षित मुस्लिम बहुजनसमाजावर तर उलेमांचा प्रभाव होताच पण उच्चवर्गीय मुसलमानांवरही त्यांचा पगडा होता. उदा., अकबर अलाहाबादी ह्या उर्दू कवीने उलेमांच्या मतांचा अनुवाद करून ब्रिटिशांच्या प्रभावामुळे मुसलमानांमध्ये ज्या नवीन प्रवृत्ती आणि पद्धती सुरू होत होत्या त्यांची सुरेख टिंगल उडविली आहे.

पण ह्या विरोधाला न जुमानता देशात निर्माण झालेल्या नवीन शक्तींचा प्रभाव मुसलमानांवर पडू लागला होता. ब्रिटिश सरकार इंग्रजी शिक्षणाला उत्तेजन देत होते आणि त्याचा लाभ घेऊन हिंदू, शीख आणि पारसी ह्या जमाती आपली भौतिक प्रगती करून घेत आहेत हे मुसलमानांना दिसत होते. जुन्या पद्धती आणि सवयी ह्यांना चिकटून राहिल्याने काहीच साधत नाही हा धडा त्यांना प्रत्यही मिळत होता. इस्लामी धर्मशास्त्रातील सिद्धांत आणि इस्लामच्या इतिहासातील दाखले यांचा आधार घेऊन शिब्ली ह्यांच्यासारखे धर्मपंडितही सनातनी उलेमांच्या मतांचा प्रतिवाद करीत होते. इस्लामने नेहमीच बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेतलेले आहे, इतर समाजातील इष्ट आणि उपयुक्त चालीरीतींचे अनुकरण केले आहे आणि प्राप्त परिस्थितीत इंग्रजांचे अनुकरण करण्यात काहीच गैर नाही ह्या मताचा शिब्ली ह्यांनी जोमदारपणे आणि समर्थपणे पुरस्कार केला. मौलवी करामत अली ह्या जौनपूरच्या धर्मपंडिताने ब्रिटिश अमलाखालील भारत दार्–उल्–हर्ब नसून दार्–उल्–आमन (शांति–देश) आहे कारण ब्रिटिश राजवट मुसलमान धर्मात ढवळाढवळ करीत नाही, शुक्रवारच्या प्रार्थना निर्विघ्नपणे पार पडतात, ह्या परिस्थितीत ब्रिटिश राजवटीविरुद्ध जिहाद पुकारायला इस्लाममध्ये मुभा नाही ह्या भूमिकेचे प्रतिपादन केले. एकंदरीत ब्रिटिश सत्तेशी भारतीय मुसलमानांनी जुळवून घेतले पाहिजे हे मत हळूहळू जोम धरू लागले.

ह्या सर्व घटकांचा प्रभाव म्हणून मुस्लिम उच्च–वर्गीयांत इंग्रजी शिक्षणाचा हळूहळू प्रसार होऊ लागला. ह्याचे एक फळ म्हणजे १८६५ मध्ये कलकत्ता येथे स्थापन झालेली 'धि मुहामेडन लिटररी सोसायटी' ही संस्था. 'मुसलमानांमधील उच्च आणि सुशिक्षित वर्गांमध्ये' पाश्चात्त्य साहित्य, विज्ञान आणि सामाजिक विचार ह्या विषयांसंबंधी आस्था निर्माण करून त्यांच्याविषयीची माहिती त्यांना करून देणे हे ह्या संस्थेचे उद्दिष्ट होते. राजकीय बाबतीत मात्र ही संस्था पूर्णपणे राजनिष्ठ होती. बंगालचे लेफ्टनन्ट-गव्हर्नर संस्थेचे आश्रयदाते होते. सरकारी धोरणांवर यत्किंचितही टीका करायला ती मुभा देत

नसे. अशीच दुसरी एक संस्था म्हणजे सय्यद अहमदखान (हे पुढे 'सर' झाले) ह्यांनी १८६४ मध्ये घाझीपूर येथे स्थापन केलेली 'ट्रान्स्लेशन सोसायटी' —'भाषांतर संस्था'—. हिचे पुढे अलिगड येथे स्थलांतर झाले आणि 'सायन्टिफिक सोसायटी'—'वैज्ञानिक संस्था'— असे नामांतरही झाले. ह्या संस्थेच्या कार्याचा भर पाश्चात्त्य राज्यशास्त्रीय आणि अर्थशास्त्रीय विचारांची आणि व्यवहाराचे ज्ञान एतद्देशीय मुसलमानांना करून देण्यावर होता. ह्यामुळे ब्रिटिश सत्ताधाऱ्यांची धोरणे, त्यांनी घालून दिलेली शासकीय कार्यपद्धती ह्यांचे त्यांना ज्ञान होऊन राज्यकर्ते आणि मुसलमान प्रजा ह्यांच्यामधील सामंजस्य वाढेल अशी कल्पना होती. १८६६ मध्ये सय्यद अहमदखान ह्यांनी 'ब्रिटिश इन्डियन असोसिएशन' ही संघटना स्थापन केली. भारतीय प्रजेच्या गरजा आणि इच्छा ह्यांचे ब्रिटिश पार्लमेन्टला ज्ञान करून देणे आणि त्यायोगे पार्लमेन्टच्या सदस्यांची भारताविषयीची आस्था वाढवणे हे ह्या संघटनेचे उद्दिष्ट होते. पण सय्यद अहमदखान ह्यांच्या ह्या सर्व प्रयत्नांचेही 'राजनिष्ठा' आणि 'सत्ताधाऱ्यांवर विश्वास' हेच अधिष्ठान होते. भारतीय मुसलमानांमध्ये इंग्रजी शिक्षणाचा प्रसार करणे हेच त्यांनी आपले जीवितकार्य मानले होते आणि इतर सर्व उपक्रम त्यांच्या दृष्टीने गौण होते.

मध्यंतरात 'हिंदू' बाजूला ज्या घडामोडी झाल्या होत्या त्या ध्यानी घेणे आवश्यक आहे. राजा द्वारकानाथ टागोर ह्यांनी १८३३ मध्ये 'लँडहोल्डर्स असोसिएशन'— जमीनदार सभा — स्थापन केली. (भारतीय) ब्रिटिश सरकार आणि जमीनदार ह्यांच्यात परस्परसामंजस्याचे संबंध प्रस्थापित करणे हे ह्या संघटनेचे उद्दिष्ट होते. काही वर्षांतच तिने सरकारात आणि लोकांत स्वतःसाठी प्रतिष्ठेचे स्थान प्राप्त करून घेतले. भारतातील सनदशीर चळवळीचा पाया ह्या संघटनेने घातला, असे म्हणणे योग्य ठरेल. १८५१ मध्ये 'ब्रिटिश इन्डियन असोसिएशन' —'ब्रिटिश भारतीय परिषद'— ही दुसरी संस्था स्थापन करण्यात आली. "ग्रेट ब्रिटन आणि भारत ह्यांच्या समान हितसंबंधांचा परिपोष करण्यासाठी आणि एतद्देशीय जनतेची स्थिती सुधारण्यासाठी जे विविध उपक्रम चालविण्यात येत असतील" त्यांची माहिती सरकारला करून देण्याच्या हेतूने ही संस्था स्थापन करण्यात आली होती. 'धि हिंदू पेट्रिअट' हे तिचे अधिकृत मुखपत्र होते. सुशिक्षित हिंदू तरुण उदारमतवादी आणि राष्ट्रवादी सिद्धांत आत्मसात करू लागले होते. मिल, मॅझिनी, ऑस्टिन इ. विचारवंतांच्या राजकीय तत्त्वज्ञानाचा त्यांच्यात प्रसार होत होता आणि लोकांच्या पाठिंब्याचे अधिष्ठान नसलेल्या, निरंकुशपणे सत्ता वापरणाऱ्या भारतातील ब्रिटिश राजवटीचा नैतिक पाया डळमळीत आहे असे प्रतिपादन करण्याची धिटाई ते दाखवू लागले होते. ह्या वैचारिक आंदोलनाला जॉन ब्राइट, कॉब्डेन इ. उदारमतवादी ब्रिटिश राजकीय पुढाऱ्यांची सहानुभूती त्यांनी मिळविली होती.

हे आंदोलन जरी हिंदू असलेल्या व्यक्तींनी चालविले होते तरी ते राष्ट्रवादी आंदोलन होते; जातीयवादी नव्हते. पण मुसलमान पुढाऱ्यांच्या दृष्टीने ते 'हिंदू' होते. ह्या स्वरूपाची राजकीय जागृती जरी मुसलमानांत नव्हती तरीही राजकीय चळवळीत हिंदू आघाडीवर आहेत ह्या दृश्याची प्रतिक्रिया मुसलमानांत होणे अटळ होते. १८७८ मध्ये कलकत्ता येथे 'धि सेन्ट्रल नॅशनल मुहामेडन असोसिएशन' ही संघटना भारतीय मुसलमानांचे पहिले राजकीय व्यासपीठ म्हणून सैद अमीर अली ह्यांनी स्थापन केली. "राजनिष्ठ, पण स्वतंत्र दृष्टिकोणातून" भारतीय मुसलमानांच्या न्याय्य गरजा आणि इच्छा सरकारच्या कानावर घालणे हे तिचे उद्दिष्ट होते. आपली भूमिका हिंदूंच्या विरुद्ध नाही हे त्यांना पटवून देण्यासाठी दोघा हिंदूंना संघटनेच्या कार्यकारी समितीमध्ये घेण्यात आले होते. थोड्याच काळात मुंबई, लखनौ, अमृतसर अशा बऱ्याच शहरांत मुसलमानांच्या अशा संघटना स्थापन करण्यात आल्या. मुसलमानांच्या ह्या राजकीय संघटनांपासून सर सय्यद अहमदखान फटकून राहिले ही नमूद करण्यासारखी घटना आहे.

ह्या 'हिंदू' आणि मुसलमान राजकीय संघटनांचा काहीसा प्रभाव ब्रिटिश राज्यकर्त्यांवर पडू लागला. १८६१ च्या 'कौन्सिलस ॲक्ट' प्रमाणे गव्हर्नर जनरल आणि बंगाल, मद्रास व मुंबई येथील

अनुक्रमणिका

गव्हर्नर यांच्या कौन्सिलांत–मंडळांत–काही 'वरिष्ठ एतद्देशीयांना' स्थान देण्यात आले. त्यांना अर्थात काही अधिकार नव्हते आणि कामही नव्हते. ह्या मंडळीत हिंदूंचाच अधिक भरणा होता.

एकंदरीत असे म्हणता येईल की, तत्कालीन हिंदू पुढारी हे इंग्रजी शिक्षणाने निर्माण केलेल्या आधुनिक मध्यमवर्गीय व्यवसायांतून आले होते तर मुसलमान पुढारी पारंपरिक नबाब–जमीनदार वर्गातून आले होते. हिंदू पुढाऱ्यांनी पाश्चात्य उदारमतवादी, लोकशाहीवादी, राष्ट्रवादी विचारसरणी स्वीकारली होती तर मुसलमान पुढारी पारंपरिक मुस्लिम राजकीय विचारांच्या चौकटीतून बाहेर पडले नव्हते. हिंदू पुढारी केवळ भारताचा आणि अखिल भारताचा विचार करीत होते. मुसलमान पुढारी आपल्या जमातीकडे जागतिक मुसलमान जमातीचा भारतातील विभाग म्हणून पाहत होते. त्यांची दृष्टी भारताइतकीच तुर्कस्तान, इराण, इजिप्त, अरेबिया इ. मुसलमानी देशांकडे होती. थोडक्यात, तत्कालीन मुसलमान पुढाऱ्यांनी अलगतावादी आणि जातीयवादी भूमिका स्वीकारूनच भारताच्या राजकीय मंचावर पदार्पण केले होते.

१८८५ मध्ये इंडियन नॅशनल काँग्रेस–भारतीय राष्ट्रसभा–स्थापन होऊन देशात तोपर्यंत ठिकठिकाणी जागृत आणि विकसित झालेल्या राजकीय शक्ती एकत्र आल्या व संघटित झाल्या. काँग्रेसची स्थापना हा नवीन भारतीय सुशिक्षित वर्गात अगोदरच्या सुमारे अर्धशतकात झालेल्या राजकीय जागृतीचा व आकांक्षांचा परिपाक होता. काँग्रेस नवोदित भारतीय राष्ट्राचे प्रतिनिधित्व करू पाहत होती, ती कोणत्याही विशिष्ट जमातीशी किंवा वर्गाशी बांधलेली, त्याच्यापुरती मर्यादित नव्हती. सर्व भारतीयांच्या वतीने, सर्व भारतीयांसाठी ती राजकीय सुधारणांची मागणी करीत होती. पहिल्या काँग्रेसमध्ये काही युरोपिअन, पारसी, ख्रिस्ती आणि अर्थात हिंदू उपस्थित होते. अपरिहार्यपणे हिंदू बहुसंख्य होते.

पण प्रथमपासूनच काँग्रेसला 'हिंदू काँग्रेस' असे अभिधान देऊन तिचे अखिल भारतीय स्वरूप नाकारण्याचा आणि तिला हिंदू जमातीपुरते बंदिस्त करण्याचा विरोधकांचा प्रयत्न होता. 'इंग्लिशमन' ह्या त्या वेळच्या एका प्रतिष्ठित अँग्लो–इंडियन वृत्तपत्राने काँग्रेसचे पहिले अधिवेशन झाल्यानंतर लगेच तिचा उल्लेख 'हिंदू काँग्रेस' असा केला होता. पहिल्या काँग्रेसमध्ये अवघे दोन मुसलमान उपस्थित होते ह्याचा अँग्लो–इंडियन वृत्तपत्रे आणि ब्रिटिश अधिकारी आनंद व्यक्त करीत होते. पहिल्या काँग्रेसविषयी आपली प्रतिक्रिया व्यक्त करताना लंडनच्या 'टाइम्स'ने केलेले भाष्य असे होते की "आम्ही शक्तीच्या जोरावर भारत जिंकलेले आहे आणि शक्तीच्या जोरावरच आम्हाला भारतावर राज्य केले पाहिजे" आणि "आम्ही जर भारतातून निवृत्त झालो तर ते शब्दबंबाळ जिव्हाधाऱ्यांच्या आणि लेखणीबहाद्दरांच्या प्रीत्यर्थ असणार नाही तर ज्यांचे बाहू बळकट आहेत आणि ज्यांच्या तलवारीचे पाते तिखट आहे त्यांच्यासाठी होऊ." हिंदू ही बाबू लोकांची जमात आहे, मुसलमान आणि ब्रिटिश ह्या राज्यकर्त्या जमाती आहेत, ब्रिटिशांनी मुसलमानांपासून राज्य जिंकून घेतले, जर ब्रिटिशांना भारत कधीकाळी सोडावेच लागले तर राज्य परत मुसलमानांकडे स्वाभाविकपणे जाईल, ह्या घडामोडींमध्ये बाबू लोकांना काही स्थानच नाही असा हा सूर होता. नबाब–जमीनदार वर्गातून आलेल्या मुसलमान पुढाऱ्यांचाही तोच सूर होता. पण काळ बदलला आहे ह्याचे अंधुक भानही ह्या दोघांना होते आणि म्हणून ते अस्वस्थही होते.

दुसऱ्या काँग्रेसच्या स्वागतसमितीने मुसलमानांनी काँग्रेसला अधिक संख्येने उपस्थित रहावे म्हणून 'धि सेन्ट्रल नॅशनल मुहामेडन असोसिएशन' आणि 'धि मुहामेडन लिटररी सोसायटी' ह्या प्रमुख मुस्लिम संघटनांना त्यांनी आपले प्रतिनिधी काँग्रेसला पाठवावे म्हणून खास आमंत्रण दिले. दोन्ही संघटनांनी ते झिडकारले. (दुसऱ्या काँग्रेसला जे ४१३ प्रतिनिधी उपस्थित होते त्यांतील २७ मुसलमान होते.) तिसऱ्या काँग्रेसचे बद्रुद्दिन तैयबजी हे अध्यक्ष बनले तेव्हा काँग्रेसच्या संघटकांना तो आपला विजयच वाटला. "सर्व (भारतीयांच्या) लाभासाठी म्हणून ज्या महान सामान्य सुधारणांची आणि ज्या महान सामान्य हक्कांची" मागणी काँग्रेस करीत आहे, त्या ध्यानी घेतल्या तर भारतीय जमातीला



अनुक्रमणिका

अशा प्रयत्नांपासून अलिप्त रहायचे काही कारण नाही असे तय्यबजी ह्यांनी अध्यक्षपदावरून जाहीर केले.

आता मात्र सय्यद अहमदखान ह्यांना राहवेना. त्यांनी १८८७ मध्ये लखनौ येथे केलेल्या भाषणात काँग्रेसवर हल्ला चढविला. बंगाली बाबूंचा त्यांनी आपल्या भाषणात अत्यंत तुच्छतेने उल्लेख केला आणि तेच प्रामुख्याने काँग्रेसच्या चळवळीमागे आहेत असे जाहीर केले. आपल्या धर्मबांधवांना काँग्रेसमध्ये सहभाग घेण्यापासून परावृत्त करण्यासाठी त्यांनी मांडलेले मुद्दे असे होते : "हिंदू आणि मुसलमान ही भिन्न राष्ट्रे आहेत. कुराणात म्हटले आहे त्याप्रमाणे एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राकडून मैत्रीची किंवा ममतेची अपेक्षा करू शकत नाही. तेव्हा आपल्या हितसंबंधांचे रक्षण करण्यासाठी मुसलमानांना ब्रिटिशांचीच कास धरली पाहिजे. प्रातिनिधिक लोकशाही भारतात योग्य ठरणार नाही. कारण हिंदू हे संख्येने मुसलमानांच्या चौपट असल्याने हिंदू नेहमीच सत्ताधारी राहतील. भारतात लोकशाही येणे ह्याचा अर्थ मुसलमान जमात हिंदू जमातीच्या अधीन होणे." तेव्हा मुसलमानांनी काँग्रेसशी कोणताही संबंध न ठेवणे हेच त्यांच्या हिताचे आहे.

'राष्ट्रवादी' किंवा 'भारतीयवादी' वर्तमानपत्रांनी अर्थात ह्या 'जातीयवादी' भूमिकेचा कमीअधिक कडवटपणे निषेध केला. सय्यद अहमदखान हिंदू आणि मुसलमान ह्या जमातींत वितुष्ट निर्माण करीत आहेत आणि ब्रिटिशांची खुशामत करीत आहेत हे त्यांचे मुख्य आरोप होते. "भारतातील (हिंदू आणि मुसलमान ह्या) दोन जमातींमध्ये सख्य आणि ऐक्य नांदावे, आणि एकीने दुसरीला साहाय्य करावे अशी इतर कुणाइतकीच माझीही इच्छा आहे. भारत हा एका पक्ष्यासारखा आहे आणि हिंदू आणि मुसलमान हे त्याचे दोन डोळे आहेत असे मी अनेकदा म्हणतो. ह्या दोन्ही डोळ्यांचे तेज सारखेच असण्यात ह्या पक्ष्याचे सौंदर्य सामावलेले आहे." पण काँग्रेसच्या चळवळीचे उद्दिष्ट अखेरीस देशातील अंतर्गत सत्ता स्वतःच्या हातात घेणे हे आहे. म्हणजे काँग्रेसने अंतर्गत 'यादवी युद्ध' सुरू केले आहे. "हे शस्त्रांशिवाय होणारे यादवी युद्ध आहे. **ते शस्त्रांच्या साहाय्याने व्हावे** हे आम्ही पसंत करतो." (अधोरेखा मुळात नाही.) सय्यद अहमदखानांचा मथितार्थ असा की काँग्रेसचे अंतिम उद्दिष्ट देशात लोकशाही आणावी हे आहे आणि ह्याचा सरळ अर्थ असा की, बहुसंख्य हिंदू जमातीची अल्पसंख्य मुसलमान जमातीवर सत्ता स्थापन करावी हे काँग्रेसचे ईप्सित आहे. म्हणून काँग्रेसची चळवळ हे हिंदूंनी सनदशीर मार्गाने मुसलमानांविरुद्ध सुरू केलेले युद्ध आहे. पण जर हे युद्ध शस्त्रांनी झाले तर मुसलमान डरणार नाहीत. ते हे युद्ध जिंकतील. उलट, लोकशाहीचा नवा खेळ येथे सुरू झाला आणि त्यात मुसलमानांनी भाग घेतला तर ते अटळपणे हरतील. तेव्हा ह्या खेळात मुसलमानांनी भाग घेऊच नये. तेव्हा मुसलमानांनी काँग्रेसविरुद्ध ब्रिटिश सत्तेला धरून रहावे हेच तर्कशुद्ध आहे.



आपल्याला हिंदू व मुसलमान ह्यांच्यात ऐक्य व सलोखा पाहिजे असे मुसलमान पुढारी प्रथमपासून व आवर्जून सांगत होते. ह्यासाठी त्यांची प्रारंभापासून अखेरपर्यंत एकच अट राहिली. ती ही की, राजकीय सत्तेच्या विभागणीत हिंदूंच्या बहुसंख्यत्वाचे यत्किंचितही प्रतिबिंब पडता कामा नये, सत्तेत दोघांना पूर्णपणे समान वाटा असला पाहिजे. ब्रिटिश सत्ता फार काळ टिकून राहणार नाही आणि एकसंध भारतात आपल्याला सत्तेमध्ये समान वाटा मिळू शकणार नाही हे स्पष्ट झाले तेव्हा त्यांनी भारतातील ज्या प्रदेशांत आपली बहुसंख्या आहे त्यांचे वेगळे राज्य बनवावे ही मागणी केली. सत्तेचे विभाजन करता येत नाही म्हणून देशाचे विभाजन केले. मुसलमान पुढाऱ्यांच्या दृष्टीने स्वातंत्र्याचे आंदोलन हे हिंदूंनी स्वतःसाठी ब्रिटिशांपासून सत्ता हिसकावून घेण्यासाठी चालविलेले आंदोलन होते. ह्या वितुष्टात मुसलमान आणि ब्रिटिश ह्यांचे हितसंबंध समान होते आणि म्हणून ते एका पक्षाचे होते. मुसलमान पुढाऱ्यांच्या मताप्रमाणे भारतीय राजकीय आंदोलनात एक पोट-आंदोलन होते. ते मुसलमानांचे हिंदूविरुद्ध असलेले आंदोलन होते. जेवढी सत्ता ब्रिटिशांकडून भारतीयांकडे हस्तांतरित होईल तिच्यात ब्रिटिशांच्या पाठिंब्याने मुसलमानांसाठी जास्तीत जास्त, लोकसंख्येच्या मानाने कितीतरी अधिक वाटा हस्तगत करणे, हा त्यांच्या रणनीतीचा

अनुक्रमणिका

एक भाग होता. ह्याची किंमत म्हणून ब्रिटिश सत्तेची सतत साथ करणे हा दुसरा भाग होता.

हिंदू-मुसलमानांमधील 'यादवी' शस्त्रांच्या साहाय्याने व्हावी ही सय्यद अहमदखानांची इच्छा पुढे जीनांच्या आधिपत्याखालील मुस्लिम लीगने देशात पद्धतशीरपणे जातीय दंगली घडवून आणून पुरी केली. ह्याची भयानक किंमत हिंदू आणि मुसलमान ह्या दोन्ही जमातींनी दिली आणि भरतखंडातील हिंदू आणि मुसलमान अजून देत आहेत. सय्यद अहमदखान एक श्रेष्ठ द्रष्टे होते ह्यात शंका नाही. पाकिस्तानची बीजे त्यांनी रोविली होती.

सय्यद अहमदखान ह्यांनी स्थापन केलेल्या धि मुहामेडन अँग्लो-ओरिएन्टल कॉलेजच्या प्राचार्यपदी नियुक्त झालेले थिओडोर बेक ह्यांची साथ काँग्रेसवर ते करीत असलेल्या टीकेत सय्यदसाहेबांना होती. बेक ह्यांनीही हिंदू व मुसलमान ही दोन भिन्न राष्ट्रे आहेत आणि भारतात लोकशाही आली, तर हिंदू-मुसलमानांच निरंकुश मालक बनतील हे विचार स्वतंत्रपणे मांडले होते. मुसलमान जरी राजकीय दृष्ट्या संघटित नव्हते तरी मुंबई, लाहोर, अलाहाबाद, मद्रास इ. अनेक ठिकाणच्या मुसलमानांनी भरविलेल्या सभांत सय्यदसाहेबांच्या भूमिकेला पाठिंबा व्यक्त करण्यात आला. ह्या उत्तेजनाचा परिणाम म्हणून आणि काँग्रेसच्या वाढत्या प्रभावाला पायबंद घालण्यासाठी म्हणून सय्यदसाहेबांनी धि इन्डियन पेट्रिऑटिक असोसिएशन स्थापन केली. ह्यात मुसलमानांबरोबर राजा शिवप्रसाद यांसारखे हिंदू जमीनदारही त्यांचे साहाय्यक होते.

काँग्रेसमध्ये खरोखर किती प्रमाणात मुसलमान आहेत हा ह्या काळातील एक महत्त्वाचा वादाचा विषय होता. मुसलमानांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात पाहिले तर काँग्रेसच्या एकूण ४३१ प्रतिनिधींतील ९७ प्रतिनिधी मुसलमान असणे आवश्यक होते, तर प्रत्यक्षात ते ३३ होते; तुलनेने मुसलमानांत इंग्रजी शिक्षणाचा प्रसार कमी असल्यामुळे ह्या कमी प्रमाणाची उपपत्ती लावता येते, मुसलमान जनतेचा काँग्रेसला विरोध नाही असे स्पष्टीकरण काँग्रेसच्या सचिवांनी १८८६ मध्ये दिले. उलट, काँग्रेसच्या अधिवेशनात भाग घेत असलेले मुसलमान प्रतिष्ठित व प्रातिनिधिक नाहीत, भूलथापांचा वापर करून त्यांना काँग्रेसमध्ये आणले जाते किंवा ते लाचारीने जातात असा आरोप मियां महंमद शफी यांच्यासारखे मुसलमान पुढारी करीत होते. ( हे पुढे अखिल भारतीय मुस्लिम लीगचे अध्यक्ष झाले. )

ब्रिटिश राजकीय पुढारी आणि सनदी अधिकारी ह्यांच्यात दोन प्रवृत्ती होत्या. ग्लॅडस्टन आणि इतर उदारमतवादी पुढाऱ्यांच्या, तसेच मँचेस्टर गार्डियन, डेली क्रॉनिकल इ. उदारमतवादी वृत्तपत्रांच्या दृष्टीने काँग्रेसची चळवळ प्रागतिक व स्वागतार्ह होती. लॉर्ड लँड्स्डाउन ह्या व्हाइसरॉयनेही तिला आशीर्वाद दिला होता. काँग्रेसच्या पुढाऱ्यांची राजनिष्ठा वास्तविक संशयातील होती. त्यांना ब्रिटिश सत्तेला अजिबात आव्हान द्यायचे नव्हते. "आमच्याजवळ जे काही आहे ते सर्व, आमचे स्थान, आमची प्रतिष्ठा ब्रिटिश संबंधामुळे आहे हे न ओळखण्याइतकी आमची मती भ्रष्ट झालेली नाही" असे उद्‌गार सुरेन्द्रनाथ बॅनर्जींनी काँग्रेसच्या अध्यक्षपदावरून काढले होते. (१८८८) बादशहाच्या सर्व नागरिकांना आपण वंशनिरपेक्ष समानतेने वागवू असे जे अभिवचन ब्रिटिश सत्ताधीशांनी दिले होते त्याची पूर्तता त्यांनी करावी एवढीच त्यांची विनीत मागणी होती. पण अनेक ब्रिटिश अधिकाऱ्यांना काँग्रेसच्या चळवळीमुळे आपले विशेषाधिकार आणि आपली निरंकुश सत्ता धोक्यात येईल ह्याची जाणीव झाली होती आणि त्यांनी काँग्रेसविरुद्ध मोहीम उघडली होती. ह्या मोहिमेत त्यांना मुसलमानांना स्वतःच्या बाजूला वळवून घ्यायचे होते. हुजूर (काँझर्व्हेटिव्ह ) पक्षही काँग्रेसविरुद्ध होता. "आमचे मुसलमान प्रजाजनच आमच्या धोरणांचे समंजस आणि नेमस्त दृष्टीने आकलन करू शकतील' असे समाधान व्यक्त करणारे विधान लंडन टाइम्सने केले होते.

ब्रिटिश सत्ताधारी आणि मुसलमान यांमधील दुरावा संपला होता.

ह्या परिस्थितीत आपल्याला मुसलमान जमातीचा पाठिंबा आहे हे दाखवून देण्याचा आणि मुसलमानांना वळवून घेण्याचा निकराचा प्रयत्न काँग्रेसच्या नेत्यांनी सुरू केला. "गेल्या काँग्रेसला ८३ मुसलमान प्रति-



अनुक्रमणिका

निधी उपस्थित होते; ह्या काँग्रेसला त्याच्या दुप्पट (आवाज : नाही, तिप्पट, तिप्पट !) प्रतिनिधी हजर आहेत आणि त्यांतील काही राजघराण्यातील आहेत" असे अलाहाबाद काँग्रेसमध्ये एका वक्त्याने दाखवून दिले. (१८८८) ह्या काँग्रेसमध्ये बद्रुद्दिन तय्यबजी ह्यांच्या प्रेरणेने संमत करण्यात आलेल्या एका ठरावाप्रमाणे एखाद्या विषयाची चर्चा होण्याला हिंदू प्रतिनिधी किंवा मुसलमान प्रतिनिधी ह्यांचा एकमताने किंवा जवळजवळ एकमताने विरोध असेल तर तो विषय चर्चेसाठी घ्यायचा नाही किंवा त्याविषयी ठराव संमत करायचा नाही असे ठरविण्यात आले.

तथापि ह्या प्रयत्नांना फारसे फळ आले नाही. १८९४ मध्ये मद्रास येथे भरलेल्या काँग्रेसच्या १२०० प्रतिनिधींपैकी फक्त २४ मुसलमान होते व त्यांतील बहुसंख्य मद्रासजवळील ठिकाणांहून आले होते. पुढल्या, पुणे येथे भरलेल्या काँग्रेसच्या १५८४ प्रतिनिधींतील १९ मुसलमान होते आणि त्यांतील १७ पुण्याचे होते.

डिसेंबर ३०, १८९४ ला सय्यद अहमदखान ह्यांनी 'धि मुहामेडन अँग्लो-ओरिएन्टल डिफेन्स असोसिएशन ऑफ अपर इन्डिया' ह्या लांबलचक नावाची संघटना स्थापन केली. ह्याच्यामागची प्रेरणाही थिओडोर बेक ह्यांचीच होती. स्थापनेपूर्वी बेक ह्यांनी केलेल्या मार्गदर्शक भाषणाचे सार असे होते : "देशात अलीकडे दोन आंदोलनांनी जोर धरला आहे. एक काँग्रेसचे. ते ब्रिटिशांविरुद्ध आहे. दुसरे गोहत्याविरोधी आंदोलन. ते ब्रिटिश व मुसलमान ह्या दोघांविरुद्ध आहे. देशात लोकशाहीची वाढ होण्याने दोघांनाही धोका संभवतो. तेव्हा दोघांचे हितसंबंध समान आहेत. दोघांनी एक झाले पाहिजे आणि दोघांमध्ये जो अनुबंध आहे त्याची मुसलमान जनतेला जाणीव करून दिली पाहिजे." ही संघटनाही फारशी प्रभावी ठरली नाही.

मुसलमानांना वळवून घेण्याचे काँग्रेस नेत्यांचे प्रयत्न चालूच होते. १८९६ मध्ये कलकत्ता येथे भरलेल्या बाराव्या काँग्रेसचे अध्यक्ष म्हणूच रहिमतुल्ला सयानी ह्या मुंबईच्या एका सॉलिसिटर गृहस्थांची निवड करण्यात आली. ह्या प्रसंगी सय्यदसाहेबांचे एक जवळचे साहाय्यक हाजी महंमद इस्माइल खान ह्यांनी सयानी ह्यांच्याकडे हिंदू आणि मुसलमान ह्यांच्यामध्ये राजकीय समझोता घडवून आणण्यासाठी एक प्रस्ताव पाठविला. काँग्रेसने सरकारच्या मंडळांत (काउन्सिल्स), तसेच नगरपालिका आणि लोकल बोर्डात हिंदू आणि मुसलमान ह्यांच्यात समान प्रतिनिधित्व असेल हे जर मान्य केले आणि तसा ठराव मंजूर केला तर हिंदू-मुसलमान ऐक्याचा पाया घातला जाईल आणि मुसलमान काँग्रेसमध्ये प्रवेश करतील अशी ही सूचना होती. सय्यदसाहेबांनी तिच्याविषयी फारसा उत्साह दाखविला नाही पण मुस्लिम वर्तमानपत्रांनी तिचे स्वागत केले.

रहिमतुल्ला सयानी ह्यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात मुसलमानांनी काँग्रेसला मिळू नये म्हणून सामान्यपणे जी कारणे आणि युक्तिवाद पुढे करण्यात येत असत त्यांचे समालोचन केले. ही कारणे अशी होती :

१) मुसलमानांनी काँग्रेसमध्ये प्रवेश करणे धर्माच्या विरुद्ध होते. २) मुसलमानांनी काँग्रेसमध्ये प्रवेश घेतला तर सरकारची त्यांच्यावर इतराजी होईल आणि सरकारचे साहाय्य त्यांना मिळणार नाही. ३) काँग्रेस यशस्वी झाली तर ब्रिटिशांच्या राज्याऐवजी हिंदू राज्य देशात स्थापन होईल. ४) काँग्रेस सर्व जमातींचे प्रतिनिधित्व करीत नाही. तिचे हेतू प्रामाणिक नाहीत आणि तिची ध्येयधोरणे व्यवहार्य नाहीत. ५) पश्चिमेकडील प्रातिनिधिक लोकशाहीची पद्धती भारताला योग्य नाही. ती येथे आणली तर सर्व सरकारी अधिकारस्थाने आणि नोकऱ्या हिंदूंना मिळतील. ६) हिंदूंची प्रचंड बहुसंख्या असल्यामुळे काँग्रेसमध्ये हिंदूंचे वर्चस्व राहील आणि काँग्रेस हे केवळ हिंदू हितसंबंधांचे साधन बनेल.

ह्यांतील काही आक्षेपांत तथ्य होते. पण कोणताही आक्षेप टिकण्यासारखा नव्हता असे मत सयानी ह्यांनी व्यक्त केले. १) काँग्रेसचा कोणत्याही धर्माशी कसलाही संबंधच नाही. २) काँग्रेस सरकारविरुद्ध नाही. भारतीय जनतेची रास्त गाऱ्हाणी सरकारच्या कानी घालणे हेच केवळ काँग्रेसचे कार्य आहे. ३) म्हणून ब्रिटिश सरकार संपुष्टात आणणे हे काँग्रेसचे साध्य नव्हे. काँग्रेसच्या

कार्यामुळे सरकार आणि भारतीय जनता ह्यांच्यात अधिक सलोखा निर्माण होऊन सरकार कायम टिकायला साहाय्य होईल. ४) काँग्रेसने मुसलमानांसमोर नेहमीच मैत्रीचा हात पुढे केला आहे. जर मुसलमानच काँग्रेसशी फटकून राहिले तर काँग्रेस सर्व जमातींचे प्रतिनिधित्व कसे करू शकेल ? ५) इस्लामची परंपरा ही लोकशाहीची आणि मानवी बंधुत्वाची आहे. मुसलमान लोकशाही पद्धतीला कसा विरोध करू शकतील ? नोकऱ्या मिळवायच्या तर मुसलमानांनी विद्येमध्ये प्रावीण्य मिळवून आवश्यक ती पात्रता संपादन केली पाहिजे. ६) काँग्रेस ही काही व्यापारी पेढीसारखी संघटना नाही. म्हणजे भागधारकांना नफा करून देणे हे तिचे उद्दिष्ट नाही. कोणत्याही विशिष्ट जमातीचे किंवा विभागाचे हित साधायला काँग्रेसला कुणी रावबू शकणार नाही.

इस्माइलखान ह्यांनी जी सूचना केली होती तिच्याविषयी सयानी ह्यांचे म्हणणे असे होते की, ती चांगली सूचना होती, पण मुसलमान उत्साहाने काँग्रेसमध्ये आल्यानंतरच तिचा विचार करणे शक्य होईल आणि योग्य ठरेल. उलट, इस्माइलखान ह्यांची भूमिका अशी होती की, ह्या प्रस्तावाची पूर्तता ही मुसलमानांनी काँग्रेसमध्ये प्रवेश करण्याची अट राहील.

सयानी ह्यांच्या भाषणामुळे मुसलमानांनी काँग्रेसमध्ये प्रवेश घ्यावा की नाही ह्याविषयीच्या विचाराला काहीशी चालना मिळाली. "काँग्रेसमध्ये प्रवेश न केल्याने आम्हाला काय मिळाले ? सरकार कायदेमंडळे, नगरपालिका इत्यादींमध्ये निवडणुकीचे तत्त्व हळूहळू मान्य करीत आहे. अखेरीस येथे प्रातिनिधिक सरकार येणार. आम्ही सरकारला चिकटून राहिलो म्हणून ही प्रक्रिया काही थांबणार नाही. फक्त तिच्यात हिंदूंना आपण साथ दिली नाही म्हणून हिंदूंचा राग मात्र आपण ओढवून घेऊ. तेव्हा खूप उशीर होण्यापूर्वी ह्या दोन जमातींत समझोता घडवून आणणे इष्ट ठरेल" असे विचार काही मुसलमानांनी मांडले. पण एकंदरीत मुस्लिम मत सयानींविरुद्धच राहिले. काँग्रेसशी फटकून राहिल्याने आणि ब्रिटिश सरकारला साथ दिल्याने मुसलमानांचा एकंदरीत फायदाच झाला आहे असा बहुमताचा सूर होता. बेक ह्यांनीही ह्या विवादात भाग घेऊन ब्रिटिश सरकारशी एकनिष्ठ राहिल्याने मुसलमानांची प्रतिष्ठा वाढलेली आहे, त्यांना नोकऱ्यांतही लाभ झाला आहे असे दाखवून देण्याचा प्रयत्न केला. भारतात प्रातिनिधिक लोकशाही संस्था रुजवायचा ब्रिटिश सरकारचा इरादा नाही, निवडलेले लोकप्रतिनिधी कायदेमंडळात किंवा अन्यत्र कधीही बहुसंख्य असणार नाहीत, सरकार सत्ता आपल्या हातातच ठेवील ही गोष्टही त्यांनी स्पष्ट केली.

कर्झन ह्यांनी व्हाइसरॉय म्हणून भारतात एका शुक्रवारी पदार्पण केले ही गोष्ट मुसलमानांना शुभ वाटली. धि सेन्ट्रल मुहामेडन असोसिएशनने नवीन व्हाइसरॉयचे स्वागत करणारे निवेदन सादर केले आणि त्याच्यात नेहमीच्या, नोकऱ्यांत मुसलमानांसाठी अधिक राखीव जागा ठेवण्यात याव्या इ. मागण्या केल्या. कर्झन ह्यांनी "ह्या हृद्य स्वागताला माझ्या हृदयाने प्रतिसाद दिला नाही तर ते अचेतन आहे असे म्हणावे लागेल" असे भावुक उद्‌गार काढले तरी सरकार मुसलमानांना नेहमीच उत्तेजन देत आले आहे, "सार्वजनिक सेवांमध्ये (सरकारी नोकऱ्यांमध्ये) सरकारने मुसलमानांना दिलेला वाटा न्याय्य आणि उदार आहे" आणि तुमच्या प्रयत्नांकडे सरकार सख्यत्वाच्या दृष्टीने पाहत आहेच, तथापि अखेरीस तुमचे भवितव्य तुमच्याच हातांत आहे हे स्पष्ट केले. हा प्रतिसाद मुसलमानांना निराशाजनक वाटला.

ह्या सुमारास सय्यदसाहेबांचे निधन झाले. (१८९८) मुसलमान पुढाऱ्यांत पोरकेपणाची भावना पसरली. आधारासाठी ते बेक ह्यांच्याकडे वळले. ह्या इंग्रज आणि ख्रिस्ती माणसावर भारतीय मुसलमानांची जी निष्ठा बसली होती तिला तोड नव्हती. पण वर्षभरात बेक हेही मृत्यू पावले. ह्या निर्नायकी अवस्थेत सुशिक्षित मुसलमानांत एका बाजूला वैफल्याची भावना पसरली होती तर दुसऱ्या बाजूला आपल्या राजकीय भूमिकेचा पुनर्विचार करण्याकडे त्यांचा कलही वाढत होता. हिंदू पुढारी अनेकदा विद्रोही विचार मांडतात, सरकारविरुद्ध चळवळी करतात आणि तरीही हिंदूंची राजकीय प्रगती झपाट्याने होत आहे. उलट, राजनिष्ठ आणि हिंदूंपासून अलग राहूनही आपल्या

हाताला काही लागत नाही असा विचार त्यांच्यात बळावत होता. ह्या परिस्थितीत एक पर्याय असा होता की, काँग्रेसमध्ये मोठ्या संख्येने प्रवेश करावा तिच्या कार्यक्रमांत भाग घ्यावा आणि आपल्या हितसंबंधांचे आणि हक्कांचे रक्षण करावे. दुसरा पर्याय म्हणजे मुसलमानांनी आपली वेगळी राजकीय संघटना निर्माण करावी हा होता. बेक ह्यांच्यानंतर मुहामेडन अँग्लो-ओरिएन्टल कॉलेजचे अध्वर्यू बनलेले थिओडोर मॉरिसन ह्यांना सुशिक्षित मुसलमानांमधील राजकीय अस्वस्थता जाणवत होती. पण राजकीय चळवळीपासून पूर्णपणे अलिप्त राहून, ब्रिटिश सरकारचा व अधिकाऱ्यांचा विश्वास संपादन करून मुसलमानांनी आपली शैक्षणिक, सामाजिक आणि आर्थिक प्रगती करून घ्यावी ह्या सय्यदसाहेबांच्या धोरणापासून फारकत घेण्यात धोकाही होता. धि सेन्ट्रल नॅशनल मुहामेडन असोसिएशन आणि धि मुहामेडन लिटररी सोसायटी ह्या संघटना क्षीण झाल्या होत्या. ह्या परिस्थितीत काही मुसलमान पुढाऱ्यांनी हिंदूंबरोबर एकी करून मुसलमानांनी राजकीय चळवळीत भाग घ्यावा हा पक्ष उचलून धरला. तर मॉरिसन आणि त्यांचे मुस्लिम सहकारी यांनी प्रतिष्ठित मुसलमान पुढाऱ्यांचे एक 'महामंडळ' ( ग्रँड काउन्सिल ) संघटित करावे आणि त्याने मुसलमानांच्या हितसंबंधांचे पालकत्व करावे असा आग्रह धरला. एकंदर मुसलमानी मताचा कल मुसलमानांची स्वतंत्र राजकीय संघटना असावी असा होता.

बरीच भवती न भवती होऊन जुलै १९०३ मध्ये सहरणपूर ( उ. प्र. ) येथे 'धि मुहामेडन पोलिटिकल असोसिएशन'ची स्थापना करण्यात आली. तिच्यात पुढाकार घेतलेले नबाब विक्र-उल् मुल्क ह्यांनी ह्या संघटनेचा काँग्रेसशी कोणताही संबंध नाही हे स्पष्ट केले. संघटनेची उद्दिष्टे अशी होती : १) ब्रिटिश सत्तेच्या स्थैर्यावर आणि सातत्यावर मुसलमानांचे कल्याण आणि भरभराट सर्वस्वी अवलंबून आहे ही गोष्ट मुसलमानांच्या मनावर बिंबविणे; २) सरकारपुढे मुसलमानांची गाऱ्हाणी नेमस्तपणे आणि आदरपूर्वक मांडणे; ३) इतर जमातींशी विरोधीवृत्ती धारण करण्यापासून निवृत्त होणे आणि ४) प्रातिनिधिक सरकार आणि स्पर्धात्मक परीक्षांविषयीच्या काँग्रेसच्या प्रमुख मागण्यांना विरोध करणे.

पण ही संघटना अल्पजीवी ठरली.

कर्झन ह्यांनी केलेल्या बंगालच्या फाळणीमुळे ( १९०५ ) मुसलमानांमधील राजकीय जागृतीला नवी चालना मिळाली. ही फाळणी केवळ शासकीय सोयींसाठी करण्यात आली नव्हती. हिंदु–मुसलमानांमध्ये फूट पाडणे हे राजकीय उद्दिष्टही तिच्यामागे होते. पूर्व बंगाल आणि आसाम मिळून मुसलमानी बहुसंख्येचा प्रांत तिच्यामुळे निर्माण झाला होता आणि त्याच्यात मुसलमानांचे वर्चस्व राहणार होते. म्हणून अनेक मुस्लिम संघटनांनी फाळणीचे स्वागत केले. तथापि काही बंगाली मुसलमान फाळणीच्या विरुद्ध होते. उदा. कलकत्ता, ढाक्का, फरीदपूर आणि मेमनसिंग येथे फाळणीचा निषेध करण्यासाठी झालेल्या सभांचे अध्यक्ष मुसलमान होते. पूर्व बंगाल व आसाम प्रांताचे पहिले ले. गव्हर्नर बॅम्फिल्ड फुलर हे उघडउघड मुसलमानांचे पक्षपाती होते त्यांनी फाळणीला पाठिंबा देणारी मुस्लिम संघटना निर्माण करायला उत्तेजन दिले. पण तो डाव फसला. फाळणीमुळे झालेला लोकक्षोभ इतका वाढला की फुलर ह्यांना राजीनामा द्यावा लागला. त्याची प्रतिक्रिया म्हणून ढाक्क्याच्या नबाबांनी मुसलमानांची एक प्रचंड सभा भरवून सरकारच्या दुबळ्या धोरणाचा निषेध केला.

ह्याच सुमाराला संयुक्त प्रांतात (उत्तरप्रदेशात) ते तत्पूर्वी सरकारी कामकाजात प्रचलित असलेल्या उर्दू लिपीबरोबर नागरी लिपीलाही मान्यता देण्यात आली होती. हिंदू संघटनांनी केलेल्या चळवळीची ही निष्पत्ती होती आणि तिच्यामुळे आपली सांस्कृतिक पीछेहाट झाली आहे अशी भावना मुसलमानांमध्ये पसरली. बंगालच्या फाळणीला जी देशभर प्रतिक्रिया झाली होती तिच्यामुळे उफाळून आलेल्या ब्रिटिशविरोधी राजकीय चैतन्याला काही प्रमाणात हिंदू पुनरुज्जीवनवादी रूपही प्राप्त झाले होते. ह्या सर्व गोष्टींमुळे आपली स्वतंत्र राजकीय संघटना स्थापन करणे अगत्याचे आहे ही मुसलमानांची धारणा दृढ होत गेली. तिच्या पूर्तीसाठी जी पूर्वतयारी आवश्यक होती ती करण्यात ढाक्क्याचे नबाब आणि आगाखान हे प्रमुख होते.

अनुक्रमणिका

ह्या सुमाराला पुढे 'मॉर्ले-मिंटो सुधारणा' म्हणून ओळखण्यात येणाऱ्या घटनात्मक सुधारणा भारतीयांच्या पदरात टाकण्याचे घाटत होते. तेव्हा मुसलमानांची वेगळी राजकीय संघटना निर्माण करायला ही अनुकूल वेळ होती. नवीन व्हाइसरॉय मिंटो ह्यांना मुसलमानांविषयी विशेष सहानुभूती होती. तेव्हा मुसलमानांनी त्यांच्याकडे एक भारदस्त प्रतिनिधि-मंडळ न्यावे आणि आपली गाऱ्हाणी व आकांक्षा त्यांच्या कानावर घालाव्या असे ठरले. व्हाइसरॉयना सादर करावयाच्या विज्ञापनापत्राचा मसुदा 'पेशावरपासून मद्रासपर्यंत'च्या प्रमुख मुसलमानांच्या साहाय्याने अतिशय काळजीपूर्वक बनविण्यात आला होता.

ह्या घडामोडींची कुणकूण काँग्रेसला लागली होती. तिच्या दृष्टीने ही चिंताजनक बाब होती. सुरेन्द्रनाथ बॅनर्जी ह्यांनी मुसलमान पुढाऱ्यांना त्यांनी हिंदूंशी सहकार्य करावे, हिंदू व मुसलमान यांची संयुक्त आघाडी बनवावी आणि तिने दोन्ही जमातींना समान असलेल्या शैक्षणिक, आर्थिक औद्योगिक इ. मागण्या सरकारवर दडपण आणून पदरात पाडून घ्याव्या असे आवाहन केले. ते निष्प्रभ ठरले. ऑक्टोबर १, १९०६ रोजी अखिल भारतातील पन्नास मुसलमान पुढाऱ्यांच्या शिष्टमंडळाने मिंटो यांची भेट घेतली आणि आपले विज्ञापना-पत्र त्यांना सादर केले. मागण्या अर्थात मुसलमानांना अधिक प्रतिनिधित्व आणि नोकऱ्या पाहिजेत, वेगवेगळ्या मंडळांचे मुसलमान सदस्य मुसलमान जमातीचे प्रतिनिधी असले पाहिजेत आणि म्हणून त्यांना निवडून देणारे मुसलमानांचे निर्वाचन-संघ (इलेक्टोरल कॉलेज) बनविण्यात यावेत अशा होत्या. मुसलमानांचे प्रतिनिधित्व त्यांच्या संख्येच्या प्रमाणात न ठरविता मुसलमान जमातीचे राजकीय महत्त्व आणि साम्राज्याच्या संरक्षणाला ती करीत असलेले योगदान (म्हणजे मुसलमानांची सैन्यातील संख्या) ध्यानात घेऊन निश्चित करण्यात यावे अशीही मागणी होती. मिंटो ह्यांनी विभक्त मतदारसंघ स्थापन करण्याचे ठाम आश्वासन न देता विज्ञापना-पत्राला एकंदरीत सहानुभूतिपूर्ण आणि अनुकूल प्रतिसाद दिला.

ह्या घटनेने ब्रिटिश अधिकाऱ्यांना अतिशय आनंद झाला. 'राजद्रोही चळवळीपासून ६.२ कोटी लोकांना मागे खेचणारी' आणि 'भारतावर आणि भारताच्या इतिहासावर दीर्घकाल परिणाम करणारी' घटना असे तिचे स्वागत करण्यात आले. विज्ञापना-पत्रात मुस्लिम हितसंबंधांचा मुसलमानांचे राष्ट्रीय हितसंबंध असा उल्लेख करण्यात आला होता.

ह्यानंतर थोड्याच दिवसांनी ३१ डिसेंबर १९०६ रोजी 'धि ऑल इंडिया मुस्लिम लीग'ची स्थापना करण्यात आली. मुस्लिम लीगची अधिकृत उद्दिष्टे अशी होती : "(अ) भारतातील मुसलमानांमध्ये ब्रिटिश सरकारविषयी निष्ठेची भावना वृद्धिंगत करणे आणि सरकार करीत असलेल्या उपाययोजनांमागील उद्दिष्टांविषयी जर काही गैरसमजुती उपस्थित झाल्या तर त्यांचे निवारण करणे; (ब) भारतातील मुसलमानांचे राजकीय अधिकार व हितसंबंध ह्यांचे संरक्षण व संवर्धन करणे व त्यांच्या गरजा व आकांक्षा सरकारला विनीतभावाने कळविणे; (क) ह्या उद्दिष्टांत विक्षेप येणार नाही अशा रीतीने, भारतातील मुसलमानांमध्ये अन्य जमातींविषयी वितुष्टाची भावना निर्माण होण्याला प्रतिबंध करणे."

अखिल भारतीय मुस्लिम लीगच्या स्थापनेने भारतीय मुसलमानांच्या ब्रिटिश राजवटीतील राजकारणाचे एक पर्व संपते. ह्या राजकारणाची प्रमुख उद्दिष्टे आणि त्यातील प्रमुख प्रवृत्तींचे सारांशाने असे वर्णन करता येईल : १) ब्रिटिश सत्ताधारी आणि भारतीय मुसलमान (म्हणजे त्या जमातीतील पारंपरिक वरिष्ठ वर्ग) ह्यांच्यात सामंजस्य निर्माण करणे; २) मुसलमानांतील वरिष्ठ वर्गात इंग्रजी शिक्षणाचा प्रसार करून त्याचा शासकीय सेवांमधील सहभाग वाढविणे; ३) काँग्रेसच्या राष्ट्रवादी चळवळीपासून मुसलमान जमातीला अलग राखणे; ४) भारताच्या शासकीय व्यवस्थेत प्रातिनिधिक लोकशाहीचा सावकाश विस्तार व्हावा आणि शासकीय सेवांच्या सर्व श्रेणींमध्ये भारतीयांचा सहभाग वाढवीत न्यावा ह्या काँग्रेसच्या मागण्यांना निकराने विरोध करणे; ५) आपण भारतीय राष्ट्रवादी आंदोलनाचे प्रतिनिधित्व व नेतृत्व करीत आहोत हा काँग्रेसचा दावा

नाकारणे आणि काँग्रेसला हिंदू राजकीय संघटना असे मर्यादित, जातीय स्वरूप देण्याचा प्रयत्न करणे.

भारतीयांनी, विशेषतः सुशिक्षित भारतीयांनी 'आधुनिक' उदारमतवादी मूल्ये आत्मसात करावी, आधुनिक ज्ञान आणि कौशल्ये प्राप्त करून घेऊन लोकशाही राज्यव्यवस्थेत आणि तिचे साधन असलेल्या आधुनिक शासकीय सेवांमध्ये सहभाग घेण्याची पात्रता त्यांनी कमवावी आणि त्याबरोबरच ब्रिटिशांनी लोकशाहीच्या तत्त्वाचा भारतात विस्तार करावा आणि शासकीय सेवांमध्ये भारतीयांचा वाटा वाढवीत न्यावा ह्या मागण्यांचा रेटा धरावा हे काँग्रेसचे धोरण होते. मुसलमान वरिष्ठ वर्गाची मनोवृत्ती त्याला पूर्णपणे प्रतिकूल होती. आम्ही राज्यकर्ती जमात होतो, ब्रिटिशांनी राज्य आमच्यापासून जिंकून घेतले. येथे लोकशाही आली तर हिंदूंचे आम्ही अंकित होऊ, ते आम्हाला खपणार नाही, तेव्हा ब्रिटिश येथे कायमचे रहावेत, त्यांनी आमच्या 'महत्त्वा'च्या प्रमाणात आम्हाला शासनात वाटा द्यावा, निवडणुकीचे तत्त्व येथे लावता कामा नये, लोकांनी प्रतिनिधी निवडण्यापेक्षा ब्रिटिशांनी नेमणुकी कराव्या, स्पर्धात्मक परीक्षांच्या द्वारा शासकीय सेवांमध्ये भरती न करता कुलशील वगैरे पाहून ती करावी, असे ह्या वर्गाचे विचार व भावना होत्या. कॉन्झर्व्हेटिव्ह मनोवृत्तीचे ब्रिटिश राजकारणी आणि अधिकारी ह्यांच्या दृष्टिकोनाशी संवादी असा हा दृष्टिकोन होता. भराभर परीक्षा पास होणाऱ्या, उदारमतवादी राजकीय तत्त्वे, ब्रिटिश न्यायव्यवस्थेचे आधारभूत नियम तुमच्या तोंडावर अस्खलितपणे केव्हाही फेकू शकणाऱ्या बाबू लोकांविषयी विशेषत: बंगाली बाबूंविषयी ब्रिटिश अधिकारी आणि वरिष्ठवर्गीय मुसलमान ह्यांना सारखीच भीती व तुच्छता होती. तुच्छता बरीचशी भीतीतून निर्माण झाली होती. उलट, उदारमतवादी ब्रिटिश राजकारणी व अधिकारी ह्यांची काँग्रेसला सहानुभूती होती. आपण ज्या तत्त्वांना आधारभूत मानतो त्यांचीच सावकाश अमलबजावणी भारतात करा एवढीच मागणी करणारे हे आंदोलन कायद्यांचा आदर करीत, शांततेने आणि नेमस्तपणे चालविलेले आहे; त्याला विरोध कसा करावा, त्याच्या मागण्या कशा नाकाराव्या हे त्यांना समजत नव्हते.

जेव्हा प्रातिनिधिक लोकशाही किंचित अंशाने का होईना भारतात अवतरणार हे अटळ झाले तेव्हा मुसलमान पुढाऱ्यांनी आपली अलग राजकीय संघटना स्थापन केली आणि विभक्त मतदारसंघाची मागणी केली.

सर्वच सुशिक्षित मुसलमान ह्या प्रवृत्तीचे होते असे नाही. मुसलमानांनी आधुनिक शिक्षणाबरोबर येणारी उदारमतवादी मूल्ये स्वीकारावी, लोकशाहीचे स्वागत करावे, इतर जमातींबरोबर, विशेषतः हिंदूंबरोबर सहकार्य करून आधुनिक राजकीय तत्त्वज्ञानावर आधारलेल्या भारतीय राष्ट्राच्या उभारणीत सहभाग घ्यावा ह्या मताचेही अनेक मुसलमान होते. उदा. महंमदअली जीना ह्यांनी मुसलमानांसाठी स्वतंत्र मतदारसंघ असावा, ह्याला मुस्लिम लीगच्या नागपूर येथील अधिवेशनात विरोध केला होता. पण प्रागतिक राष्ट्रवादी मुसलमानांचा आवाज आणि प्रभाव क्षीण ठरला. १९०९ च्या इन्डियन काउन्सिलस ॲक्टने ज्या सुधारणा भारतीयांच्या पदरात घातल्या त्यांत मुसलमानांसाठी स्वतंत्र मतदारसंघ आणि संख्येच्या प्रमाणापलीकडे अधिक जागा ह्या मुसलमानांच्या मागण्या मान्य झाल्या. कुणाच्याही डोळ्यांवर यावा एवढा पक्षपात मुसलमानांच्या बाजूने करण्यात आला होता.

ऑल इन्डिया मुस्लिम लीगने आपल्या पहिल्या सहा अधिवेशनांत केलेल्या मागण्या अशा होत्या : मध्यवर्ती ('इंपीरियल') कायदेमंडळापासून नगरपालिका, जिल्हा बोर्डापर्यंत आणि विद्यापीठांच्या मंडळांत मुसलमानांना वेगळे प्रतिनिधित्व असावे; सरकारी नोकऱ्यांत मुसलमानांना त्यांची संख्या आणि 'राजकीय महत्त्व' यांना अनुसरून वेगळ्या जागा असाव्यात (मौलवी मुहम्मद याकूब यांनी १९०८ च्या अमृतसर येथील अधिवेशनात "आमचे विशेष महत्त्व आणि शंभराहून थोड्याच अधिक वर्षांपूर्वी हिंदुस्थानात आमचे जे स्थान होते त्याला अनुसरून आमच्या हिंदू बांधवांइतक्या जागा आम्हाला असाव्या अशी आमची न्याय्य मागणी आहे" असे विधान केले होते.); देशाची राष्ट्रभाषा उर्दू असावी इत्यादी. बंगालच्या फाळणीनंतर

देशात जो दहशतवाद उफाळून आला होता त्याच्या निषेधपर ठरावांनी मुस्लिम लीगने आपली राजनिष्ठा व्यक्त केली होती. पण ह्या सुमारास घडलेल्या काही घटनांनी मुस्लिम लीगच्या धोरणाला वेगळे वळण लागले. तुर्कस्तानच्या साम्राज्याचा भाग असलेल्या ट्रिपोलीवर इटलीने हल्ला केला आणि रशियाने इराणच्या उत्तर प्रदेशावर आक्रमण केले. ह्या झगडयात ब्रिटिश सरकारची आणि जनतेची सहानुभूती 'ख्रिस्ती' राष्ट्रांच्या बाजूने आणि 'मुस्लिम' देशांविरुद्ध होती असे भारतीय मुसलमानांना आढळून आले. बंगालची फाळणी सरकारने रद्द केली हाही मुसलमान पुढाऱ्यांना आपला विश्वासघात वाटला. ब्रिटिश आणि मुसलमान यांच्या राजकीय युतीला अशा रीतीने तडा गेला. अलिगड येथून जे सुशिक्षित मुसलमान तरुण बाहेर पडत होते तेही त्यांच्या ब्रिटिश सदुपदेशांना जुमानीतसे झाले होते. त्यांच्या अगोदरच्या पिढीने ब्रिटिश प्रभुत्व ज्या प्रकारे मान्य केले होते तो त्यांना सहन होण्यासारखा नव्हता. १९१२ च्या डिसेंबरमध्ये भरलेल्या लीग काउन्सिलच्या बैठकीत बहुसंख्य सभासदांच्या पाठिंब्याने स्वीकृत करण्यात आलेल्या ठरावात ब्रिटिश सम्राटाविषयीच्या निष्ठेचा परिपोष करणे आणि मुसलमानांच्या राजकीय आणि इतर हितसंबंधांचे संरक्षण व संवर्धन करणे ह्यांबरोबरच; इतर जमातींच्या सहकार्याने 'भारताच्या शासनव्यवस्थेत स्थिरपणे सुधारणा घडवून आणून भारताला साजेल अशी स्वायत्त राज्यपद्धती प्राप्त करून घेणे' हे साध्यही मान्य करण्यात आले. ह्या प्रस्तावाला लीगच्या ज्येष्ठ सदस्यांनी विरोध केला; पण जीना आणि इतर काही तरुणांनी ह्या विरोधाला जुमानले नाही. मुस्लिम लीगचे 'कायमचे' अध्यक्ष असलेल्या आगाखानांनी राजीनामा दिला.

जीना ह्यांनी आपल्या राजकीय जीवनाची सुरवात काँग्रेसमध्ये केली होती. 'हिंदु–मुस्लिम ऐक्याचे राजवकील' (ॲम्बॅसडर) होण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. तथापि ते विभक्त मुस्लिम मतदार संघातून मध्यवर्ती कायदेमंडळात निवडून आले होते ( १९१० ). ह्या गोष्टीला अर्थात त्या परिस्थितीत त्यांचा नाइलाज होता. १९१२ पासून ते काँग्रेस आणि लीग ह्या दोन्ही संघटनांच्या अधिवेशनांना हजर राहू लागले. १९१३ पासून मुस्लिम लीगच्या पुढाऱ्यांनी काँग्रेसच्या आणि काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी मुस्लिम लीगच्या अधिवेशनांना उपस्थित रहावे अशी प्रथा पडू लागली. स्वराज्याचे साध्य दोघाही संघटनांनी स्वीकारले होते. लीगमधील जुन्या आणि वरिष्ठ वर्गाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या नेत्यांचा अर्थात ह्याला विरोध होता. १९१६ मध्ये मुंबई येथे भरलेल्या लीगच्या अधिवेशनात हा विरोध तीव्रपणे प्रकट झाला. तरीही ह्या अधिवेशनात लीग आणि काँग्रेस ह्यांनी परस्परांत बोलणी करून उभयमान्य अशी सुधारणांची योजना तयार करावी असा ठराव जीना यांनी संमत करून घेतला. काँग्रेसनेही समांतर ठराव संमत केला. आणि उभय पक्षांत बोलणी सुरू झाली.

ह्या वाटाघाटींचे फलित म्हणून उभयपक्षांना मान्य असलेली सुधारणांची जी योजना बनविण्यात आली, ती डिसेंबर १९१६ मध्ये पृथक्पणे भरलेल्या काँग्रेस व लीग यांच्या अधिवेशनांत अधिकृत रीत्या स्वीकारण्यात आली. तिच्याप्रमाणे काँग्रेसने विभक्त मतदारसंघ आणि मुसलमानांसाठी प्रमाणाधिक राखीव जागा ही तत्त्वे मान्य केली. पंजाबमध्ये लोकनिर्वाचित जागांच्या पन्नास टक्के आणि बंगालमध्ये चाळीस टक्के जागा मुसलमानांसाठी राखून ठेवण्यात आल्या. 'इंपीरियल' कायदेमंडळात त्या तेहतीस टक्के होत्या व ह्या प्रमाणात इतर प्रांतांत होत्या. हे भरघोस प्रमाणाधिक्य होते. शिवाय हिंदू आणि मुसलमान ह्या दोन्ही जमातींच्या प्रतिनिधींना, आपापल्या जमातीच्या व्यवहारांत दुसऱ्या जमातींकडून संभाव्यपणे होणाऱ्या हस्तक्षेपाला प्रतिबंध करता यावा ह्यासाठी 'नकाराधिकार' देण्यात आला होता. ह्यासंबंधीचे कलम असे होते : 'ज्या विधेयकाचा किंवा विधेयकाच्या एखाद्या कलमाचा किंवा बिन-सरकारी सदस्याने मांडलेल्या प्रस्तावाचा ह्या दोहोंपैकी एखाद्या जमातीवर परिणाम होणार असेल तर त्या विशिष्ट कायदेमंडळातील त्या जमातीच्या सदस्यांतील तीन-चतुर्थांश सदस्यांनी त्याला विरोध केला असता त्या विधेयकाविषयी किंवा कलमाविषयी किंवा प्रस्तावाविषयी पुढे कार्यवाही करू नये; आणि विशिष्ट जमातीवर त्या विधेयकाचा, इ. परिणाम होणार आहे की नाही, ह्याचा निर्णय त्या जमातीच्या

प्रतिनिधींनी करावा.' ह्याशिवाय ह्या 'लखनौ करारा'त ब्रिटिश सरकारकडे अनेक लोकशाहीवादी घटनात्मक सुधारणांची मागणी करण्यात आली होती. जीनांचा विभक्त मतदारसंघांना असलेला तात्त्विक विरोध अशा रीतीने विरघळून गेला होता.

ह्या मागण्यांचा पाठपुरावा करण्यासाठी जीना, श्रीनिवास शास्त्री, सप्रू आणि वझीर हुसेन यांचे शिष्टमंडळ इंग्लंडला गेले. बहुधा ह्याचा परिणाम म्हणून भारतमंत्र्यांनी ब्रिटिश सरकारच्या भारता-विषयीच्या धोरणाची अधिकृत घोषणा केली. "(भारताच्या) शासनाच्या प्रत्येक शाखेशी भारतीयांचे साहचर्य वाढविणे आणि ब्रिटिश साम्राज्याचा अंतर्गत भाग म्हणून राहणाऱ्या भारतात लोकमतानुवर्ती शासनाची क्रमशः उत्क्रांती साधण्यासाठी स्वयंशासित संस्थांचा पायरीपायरीने विकास करणे हे ब्रिटिश सरकारचे धोरण आहे व त्याच्याशी भारतसरकार सहमत आहे. ह्या दिशेने भरघोस पावले टाकण्याचा निर्णय त्यांनी घेतला आहे."

जून १९१८ मध्ये मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा जाहीर करण्यात आल्या. त्या निराशाकारक होत्या. लखनौ-करारातील एकच कलम ह्या सुधारणांत स्वीकारण्यात आले होते. ते म्हणजे मुसलमानांसाठी स्वतंत्र मतदारसंघ आणि त्यांना दिलेले प्रमाणाधिक्य. 'इंपीरियल' काउन्सिलच्या जीना आणि इतर सदस्यांनी ह्या सुधारणांविषयीची आपली तीव्र निराशा जाहीर करणारे निवेदन प्रसिद्ध केले.

ह्या सुधारणा राबवाव्या की नाही, ह्याची चर्चा सुरू झाली असतानाच देशात एक नवीन वावटळ उठली. महायुद्धाच्या काळात भारतातील ब्रिटिश सरकार उलथून टाकण्यासाठी होत राहिलेले कट, वाढती दहशतवादी चळवळ आणि लोकांचा उग्र होत जाणारा असंतोष ह्यांच्याशी मुकाबला करण्यासाठी सरकारला दडपशाही करण्याचे अधिकार देणारी "रौलट विधेयके" जेव्हा कायदेमंडळात मांडण्यात आली, तेव्हा देशभर निषेध सुरू झाले. त्यांचा प्रतिकार करण्याच्या प्रयत्नांतून जालियनवालाबाग हत्याकांड घडून आले. युद्धानंतर तुर्कस्तानला, तुर्कस्तानच्या सुलतानाला— जो सर्व मुसलमानांचा खलिफा होता— जी वागणूक देण्यात आली तिच्यामुळे भारतीय मुसलमानांत तीव्र असंतोष निर्माण झाला होता. खिलाफतीचा बचाव करण्यासाठी खिलाफत समिती स्थापन करण्यात आली. १९१९ मध्ये जमियत-उल् उलेमा-इ-हिंद ही परिषद स्थापन करण्यात आली. तिची उद्दिष्टे अशी होती : १. धार्मिक दृष्ट्या राजकीय आणि राजकीयेतर बाबतीत मुसलमानांचे मार्गदर्शन करणे आणि त्यांचे धार्मिक व राष्ट्रीय हक्क संपादन करून ह्या हक्कांचे संरक्षण करणे; २. इस्लाम, इस्लामी राष्ट्रवाद, पवित्र स्थाने, विधी आणि रूढी ह्यांचे संरक्षण करणे; ३. जमातीचे संघटन करून तिची नैतिक व धार्मिक सुधारणा करण्यासाठी कार्यक्रम सुरू करणे; ४. इतर जमातींशी सख्याचे संबंध स्थापन करणे आणि देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढणे; ५. धर्मप्रसार करणे आणि धार्मिक न्यायालये स्थापन करणे; ६. देशाबाहेरच्या मुसलमानांशी ऐक्याचे बंध आणि भ्रातृसंबंध प्रस्थापित करणे व वृद्धिंगत करणे.

खिलाफत चळवळीला हिंदूंनी संपूर्णपणे पाठिंबा द्यावा असे आवाहन गांधीजींनी केले. "गायीला वाचविण्याचा सर्वोत्कृष्ट आणि एकमेव मार्ग म्हणजे खिलाफतीला वाचविणे" हे विधान त्यांनी वारंवार केले. खिलाफतीचा बचाव करण्यासाठी असहकारितेची चळवळ सुरू करण्याचा इरादा त्यांनी जाहीर केला. १९२० मध्ये नागपूर येथे वेगवेगळ्या वेळी भरलेल्या लीग आणि काँग्रेस ह्यांच्या खास अधिवेशनांत असहकारितेचा गांधीजींनी मांडलेला कार्यक्रम स्वीकारण्यात आला. लीगच्या अधिवेशनाचे जीना अध्यक्ष होते. असहकारितेच्या कार्यक्रमाविषयी त्यांनी स्वतःचे मत व्यक्त केले नाही; पण प्रतिनिधींनी सर्व साधकबाधक घटकांचा विचार करून असहकारितेचे तत्त्व आणि तपशील स्वीकारार्ह आहे की नाही हे ठरवावे असे आवाहन केले. काँग्रेसच्या अधिवेशनात मात्र त्यांनी असहकारितेला कडाडून विरोध केला आणि बहुमत आपल्याविरुद्ध आहे हे पाहून सभात्याग केला.

असहकारितेची चळवळ ऐन भरात असताना मलबारमध्ये मोपल्यांनी बंड केले. ह्या बंडात ६०० हिंदूंना ठार मारण्यात आले, हजारोंचे सक्तीने धर्मांतर घडवून आणले, अनेक हिंदू देवळे 'भ्रष्ट' करण्यात आली आणि हिंदूंची मालमत्ता मोठ्या प्रमाणावर लुटण्यात किंवा जाळण्यात



अनुक्रमणिका

आली. ह्या घटनांना सरकारने भरपूर प्रसिद्धी दिली. काँग्रेसच्या अधिवेशनात ह्या बंडाची चर्चा होण्याला मुसलमान प्रतिनिधींनी निकराचा विरोध केला आणि मुसलमान पुढाऱ्यांचा एकंदर कल मोपल्यांचे समर्थन करण्याचा होता. पुढे चौरीचौऱ्याला जमावाने एका पोलिसचौकीत एक पोलिस सबइन्स्पेक्टर आणि एकवीस पोलिस यांना बंदिस्त करून जाळण्याची घटना घडल्यानंतर गांधीजींनी असहकारितेची चळवळ एकाएकी तहकूब केली. १९२४ मध्ये तुर्कस्तानने खलिफाला हद्दपार करून खिलाफत रद्द केली आणि खिलाफत चळवळ संपुष्टात आली.

काँग्रेसने खिलाफत आंदोलनाला पाठिंबा दिल्यामुळे काही काळ हिंदु-मुसलमानांच्या एकतेचा आभास निर्माण झाला व बरेच मुल्लामौलवी राष्ट्रीय चळवळीत आले हे खरे; पण जातीयवादी मुसलमानांची वृत्ती बदलली नाही. लखनौ कराराने मुसलमानांना जे लाभले होते त्यावर ते संतुष्ट नव्हते. मुसलमान अल्पसंख्य असलेल्या प्रांतांत ज्याप्रमाणे त्यांना प्रमाणाधिक्य देण्यात आले होते त्याप्रमाणे मुसलमान बहुसंख्य असलेल्या पंजाब आणि बंगाल या प्रांतांत त्यांना घटनात्मक बहुसंख्या हवी होती. माँटफर्ड सुधारणांना अनुसरून बनविण्यात आलेल्या कायदेमंडळांत मुसलमान पुढाऱ्यांनी सरकारच्या दडपशाही धोरणाला सतत पाठिंबा दिला.

मध्यंतरात जवळजवळ बंद पडलेल्या मुस्लिम लीगचे १९२४ साली फजली हुसेन आणि जीना ह्यांच्या नेतृत्वाखाली पुनरुज्जीवन करण्यात आले. लीगच्या ह्या नवीन पर्वात द्विराष्ट्रवादाचा पुनरुच्चार करण्यात आला, ब्रिटिश सरकारला पाठिंबा आणि लखनौ करारापलीकडे जाऊन मुसलमानांना अधिक राखीव जागा मिळाव्या ही तिच्या धोरणाची मुख्य सूत्रे होती. १९२४ साली सर्व राजकीय पक्षांनी मिळून स्वतंत्र भारतासाठी राज्यघटनेचा आराखडा बनविण्याच्या उद्देशाने एक सर्वपक्षीय समिती नेमली. जीना तिचे सदस्य होते. तिच्या एकंदर विचारविनिमयात जीनांनी भाग घेतला नाही. ते केवळ शेवटच्या बैठकीला उपस्थित होते आणि लखनौ करार कायम ठेवावा, फक्त पंजाब आणि बंगाल ह्यांमध्ये मुस्लिम प्रतिनिधित्व वाढवावे एवढी मागणी सादर करून ते निघून गेले. मुस्लिम लीगच्या १९२५ डिसेंबरच्या अलिगड येथील अधिवेशनात ह्याच धर्तीचा ठराव संमत करण्यात आला. लखनौ कराराप्रमाणे मुसलमानांना जे संरक्षण मिळाले होते ते कायम राखावे; पुढे जाऊन पंजाब, बंगाल आणि वायव्य सरहद्द प्रांत ह्यांत मुसलमानांना घटनात्मक बहुसंख्यत्व मिळावे; आणि लखनौ करारात दोन्ही जमातींना जो नकाराधिकार देण्यात आला होता तो घटनेचा भाग बनविण्यात यावा. १९२५ च्या पूर्वीच्या दहा वर्षांत काँग्रेसच्या अधिवेशनाला मुसलमान प्रतिनिधी मोठ्या संख्येने हजर राहत असत. त्या वर्षीच्या अधिवेशनाला अलीबंधू आणि मौलाना आझाद ह्यांच्याशिवाय कुणी मुस्लिम पुढारी उपस्थित नव्हता. पंडित मालवीय ह्या अधिवेशनाला उपस्थित होते. मुसलमानांनी काँग्रेसचा त्याग केला आहे असे उद्‌गार ही परिस्थिती पाहून त्यांनी काढले. हिंदु-मुसलमान युती संपुष्टात आली होती.

माँटफर्ड सुधारणांनी प्रांतांमध्ये लोकप्रतिनिधींना जे मर्यादित अधिकार मिळाले होते त्यांचा उपयोग मुस्लिम (आणि अन्य) जातीयवादींनी प्रांतिक कारभाराला जातीय वळण देऊन आपले राजकीय स्थान आणि देशातील जातीयवादी प्रवाह ह्यांना बळकट करण्यासाठी केला. पंजाबमध्ये फजली हुसेन ह्यांनी काउन्सिलच्या मुस्लिम सदस्यांना एकत्र करून, सरकारी सदस्यांच्या पाठिंब्याने आपले बहुमत प्रस्थापित केले. लखनौ कराराच्या धर्तीवर सरकारी नोकऱ्यांतही मुसलमानांना पन्नास टक्के जागा असल्या पाहिजेत अशी मागणी त्यांच्या पक्षाने केली आणि ती सरकारने मान्य केली. वरिष्ठ जागांमध्ये गुणवत्ता, ज्येष्ठता इ. निकष बेगुमानपणे बाजूला सारून मुसलमानांची भरती करण्यात आली. १९१९ साली ढवळून निघालेल्या पंजाबी लोकमताची भीती वाटून पंजाब सरकारने जनतेत ग्रामीण विरुद्ध शहरी अशी फूट पाडण्याचा प्रयत्न केला होता. सरकारने शेतकरी जमातींना सरकारी नोकऱ्यांत साठ टक्के जागा राखीव म्हणून ठेवल्या. आता पन्नास टक्के जागा मुसलमानांसाठी राखण्यात आल्यामुळे शहरी पंजाबी हिंदूंना सरकारी नोकऱ्यांचे क्षेत्र बंद झाल्यासारखे झाले. परिणामी पंजाबी हिंदूंना हिंदू म्हणून

राजकीय दृष्ट्या संघटित होण्याची गरज भासू लागली. फजली हुसेन ह्यांनी जिल्हा बोर्डाच्या निर्वाचन-क्षेत्रांचीही, जास्तीत जास्त बोर्डांत मुसलमानांची बहुसंख्या व्हावी अशा रीतीने फिरून आखणी केली. त्यांच्या अमदानीत पंजाब सरकारचा कारभार, गव्हर्नरच्या पाठिंब्याने उघडपणे मुसलमानांना पक्षपाती होता.

बंगालमध्ये स्वराज्य पक्षाने काउन्सिलच्या मुस्लिम सदस्यांच्या एका गटाशी केलेल्या कराराप्रमाणे लखनौ करारापलीकडे जाऊन मुसलमानांना बंगालमध्ये संख्येच्या प्रमाणात बहुमत असावे हे मान्य करण्यात आले. प्रत्येक जिल्ह्यात मुसलमानांना साठ टक्के जागा राखून ठेवण्यात आल्या. तसेच मुसलमानांसाठी सरकारी नोकऱ्यांत पंचावन्न टक्के जागा राखण्यात आल्या. मशिदीपुढे दिवसातल्या चोवीस तासांत वाद्ये वाजविण्यात येणार नाहीत आणि गोहत्येला पूर्ण मोकळीक असावी ह्या मुसलमानांच्या मागण्याही मान्य करण्यात आल्या. अनेक हिंदू पुढाऱ्यांनी बंगाल कराराला विरोध केला हे समजण्यासारखे आहे; पण ए. के. गझनवी आणि फजलूल हक इ. मुसलमान पुढाऱ्यांनीही त्याला, त्यांत मुसलमानांना देण्यात आलेल्या सवलती अपुऱ्या आहेत ह्या कारणासाठी विरोध केला. मात्र लखनौ कराराला मूठमाती देण्यासाठी बंगाल कराराचा त्यांनी उपयोग करून घेतला.

मध्यवर्ती कायदेमंडळात लोकप्रतिनिधींनी सरकारला सतत अडचणीत आणण्याच्या धोरणाचा यशस्वीपणे अवलंब केल्यामुळे आणि देशातील असंतोष वाढत गेल्यामुळे राजकीय सुधारणांचा पुढचा हप्ता जाहीर करण्याची पूर्वतयारी सुरू करणे सरकारला भाग पडले. भारतमंत्री बर्कनहेड यांनी १९२७ मध्ये जॉन सायमन ह्यांच्या अध्यक्षत्वाखाली ह्यासंबंधी शिफारसी करण्यासाठी एक आयोग नेमला. ह्या आयोगाचे सर्व सदस्य इंग्रज असल्यामुळे भारतीयांनी त्याच्यावर बहिष्कार घालावा असे विविध पक्षांच्या राजकीय नेत्यांनी ठरविले. त्यांत जीना समाविष्ट होते. मुस्लिम लीगच्या काही सदस्यांना हे धोरण मान्य नव्हते आणि महंमद शफी यांच्या नेतृत्वाखाली ते एकत्र आले. मुस्लिम लीगमध्ये दुफळी पडली. बहुसंख्य सदस्य जीनांच्या गटात होते. सायमन आयोगावर बहिष्कार संघटित करण्यात जीनांनी उत्साहाने सहभाग घेतला आणि महत्त्वाची कामगिरी बजाविली. जीना काही काळ पुन्हा राष्ट्राच्या मध्यवर्ती प्रवाहात सामील झाले.

तत्पूर्वी काही काळ जीनांनी २७ प्रमुख मुस्लिम नेत्यांची परिषद भरवून मुसलमानांच्या राजकीय मागण्यांविषयीचा एक ठराव सर्वानुमते स्वीकृत करून घेतला होता. त्याचा आशय असा होता : मुसलमानांना मध्यवर्ती कायदेमंडळात एकतृतीयांश जागा असतील अशी घटनात्मक तजवीज असावी; पंजाब आणि बंगाल ह्या प्रांतांत मुसलमानांना लोकसंख्येच्या प्रमाणात जागा असाव्या; वायव्य सरहद्द प्रांत आणि बलुचीस्तान ह्या विभागांत राजकीय सुधारणा अंमलात आणाव्यात; सिंध प्रांत, मुंबई इलाख्यापासून अलग करावा; आणि ह्या मागण्या मान्य झाल्या तर मुसलमानांसाठी असलेले विभक्त मतदारसंघ रद्द करून संयुक्त मतदारसंघ सर्वत्र लागू करावेत. पण ह्या मागण्यांना संमती दिलेल्या महंमद शफी आणि झुल्फिकार अलीखान यांनी आपली संमती मागे घेतली आणि मुसलमान संयुक्त मतदारसंघ कधीही स्वीकारणार नाहीत असे जाहीर केले. मुस्लिम लीगच्या जीना गटाच्या कलकत्ता येथे झालेल्या ( १९२७ ) अधिवेशनात सायमन आयोगावर बहिष्कार घालण्याच्या धोरणाला आणि वरील मागण्यांना पाठिंबा देण्यात आला. अबुल कलम आझाद ह्यांनी ठरावावर अनुकूल भाषण करताना, लखनौ कराराने मुसलमानांच्या हिताची हानी झाली होती, प्रस्तुत तरतुदी स्वीकारण्यात आल्या तर मुसलमानांना पाच प्रांतांत बहुमत मिळेल आणि हिंदूंना नऊ प्रांतांत मिळेल, अशा आशयाची विधाने केली होती. " ...नऊ प्रांतांत हिंदू मुसलमानांना जी वागणूक देतील तीच ह्या पाच प्रांतांत मुसलमान हिंदूंना देतील. हा मुसलमानांचा मोठा लाभ नाही का ? मुस्लिम हक्कांची अमलबजावणी करण्यासाठी मुसलमानांना हे नवीन शस्त्र मिळालेले नाही का ? " पुढे देशाची फाळणी झाल्यावर हिंदुस्थानातील मुसलमान किंवा पाकिस्तानातील हिंदू हे ओलीस आहेत असे मानायला आझाद ह्यांनी कडाडून विरोध केला होता. वरील भाषणात ह्या ओलीसतत्त्वाचा त्यांनी स्पष्टपणे

अनुक्रमणिका

स्वीकार केला आहे. जीनांचा पहिल्यापासून संयुक्त मतदारसंघांना पाठिंबा होता. पण मुसलमानांतील नेतृत्वाचा मोठा भाग त्याच्या विरोधी आहे ह्याची दखल त्यांना घ्यावी लागत होती. ह्या ठरावावरील त्यांचे भाष्य असे होते : "...लोकांना (ह्या प्रश्नाचे) आकलन घडवून त्यांची खात्री पटविणे हे आता आपले काम आहे आणि त्यासाठी आपण शिकस्तीचे प्रयत्न केले पाहिजेत; कारण हा प्रस्ताव मुसलमानांच्या आणि भारताच्या दृष्टीने सर्वांत अधिक हितकर आहे अशी माझी खात्री आहे." शफी गटाने लाहोर येथे भरविलेल्या वेगळ्या अधिवेशनात सायमन आयोगाशी सहकार्य करावे असे आवाहन करण्यात आले होते.

१९२८ च्या प्रारंभी काँग्रेस वर्किंग कमिटीने देशातील सतरा भिन्न राजकीय पक्षांना व संस्थानांतील प्रजा, कामगार, जमीनदार, उद्योजक–व्यापारी यांच्या प्रतिनिधींना एका सर्वपक्षीय राजकीय परिषदेसाठी आमंत्रण दिले. मुस्लिम लीगच्या दोन्ही गटांनी परिषदेत भाग घेण्याचे नाकारले. पण मुस्लिमेतर राजकीय पक्षांनी, कलकत्ता येथे आपण संमत केलेल्या तजविजींना अनुमती देईपर्यंत देशाची राज्यघटना बनविण्याचे काम स्थगित करावे असा ठराव जीना लीगने केला. सर्वपक्षीय परिषदेने राज्यघटनेचा आराखडा तयार करण्यासाठी मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती नेमली. ह्या समितीचे तेजबहाद्दूर सप्रू (लिबरल पक्ष), अलि इमाम आणि शुऐब कुरेशी (मुस्लिम प्रतिनिधी), अणे व जयकर (हिंदू महासभा), प्रधान (ब्राह्मणेतर प्रतिनिधी), मंगलसिंग (शीख प्रतिनिधी), ना. म. जोशी (कामगार प्रतिनिधी) आणि सुभाषचंद्र बोस असे इतर सदस्य होते. ह्या समितीच्या शिफारसी 'नेहरू अहवाल' म्हणून प्रसिद्ध आहेत.

देशात (आणि विशेषतः पंजाब व बंगाल ह्या प्रांतांत) मुसलमानांच्या वसतीचे वितरण असे आहे की प्रौढ मताधिकार जर स्वीकारण्यात आला तर मुसलमानांच्या लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षा अधिक मुसलमान प्रतिनिधी निवडून येतील ही गोष्ट समितीने दाखवून दिली. तसेच विभक्त मतदारसंघ राष्ट्रीय वृत्ती आणि अल्पसंख्याकांचे हित ह्या दोहोंना प्रतिकूल आहे हे आपले मत तिने नोंदविले. ह्या कारणासाठी विभक्त मतदारसंघ रद्द करावे अशी शिफारस समितीने केली. सिंध प्रांत मुंबई इलाख्यापासून वेगळा करावा, वायव्य सरहद्द प्रांत आणि बलुचिस्तान येथे राजकीय सुधारणा कराव्या ह्या मुसलमानांच्या मागण्याही अहवालात स्वीकारण्यात आल्या. सर्वपक्षीय परिषदेच्या लखनौ येथे भरलेल्या पुढल्या अधिवेशनात अहवालाचा विचार करण्यात आला. अधिवेशन चालू असतानाच पंजाब प्रांताच्या हिंदू आणि मुसलमान पुढाऱ्यांमध्ये जर प्रौढ मताधिकार देण्यात आला तर संयुक्त मतदारसंघ असावेत आणि कोणत्याही जमातीला राखीव जागा असू नयेत असा समझोता झाला. असाच समझोता बंगालच्या हिंदू-मुसलमान पुढाऱ्यांत झाला. अधिवेशनाने देवनागरी किंवा अरबी लिपीमध्ये लिहिलेली हिंदुस्थानी देशाची समान भाषा असावी असा ठराव मंजूर केला. अहवालाच्या मसुद्याचा अधिक विचार करण्यासाठी आणि त्याच्याविरुद्ध घेण्यात आलेल्या आक्षेपांचे समाधान करण्यासाठी विस्तारित समिती नेमण्यात आली. तिच्यावर ॲनी बेझंट, एम्. ए. अन्सारी, मालवीय, लजपतराय, आझाद, जीना, विजयराघव चारियार आणि अब्दुल कादिर कसुरी ह्यांना स्वीकृत करून घेण्यात आले. पण जीनांनी समितीवर काम करण्याचे नाकारले.

राजनिष्ठ मुसलमान पुढाऱ्यांनी नेहरू अहवालाचा अव्हेर केला. ह्यात आगाखानांचा पुढाकार होता. केंद्र सरकारचे स्वरूप आणि अधिकारक्षेत्र काय असावे हा विविध राष्ट्रीय पक्ष आणि राजनिष्ठ मुसलमान पुढारी ह्यांच्यामधील एक वादाचा विषय होता. नेहरू अहवालाने भारत हे संघराज्य (फेडरेशन) असेल आणि प्रांतांना स्वायत्तता असेल ह्या तत्त्वांचा स्वीकार केला होता. तरीही आगाखान आणि इतर राजनिष्ठ मुसलमानांनी नेहरू अहवालाला ब्रिटिश सरकारच्या जागी हिंदू सरकार स्थापन करावयाचे आहे असा प्रचार सुरू केला. शफी लीगने आपले १९२८ चे अखिल भारतीय अधिवेशन भरविले नाही. परंतु प्रांतिक अधिवेशनांत नेहरू अहवालाचा धिक्कार केला, प्रौढ मताधिकाराला विरोध केला, मुस्लिमांसाठी स्वतंत्र मतदारसंघ, सर्व प्रांतिक मंडळांत ५० टक्के आणि केंद्र मंत्रिमंडळात ३३ टक्के जागा, सार्वजनिक सेवांत

अनुक्रमणिका

३३ टक्के राखीव जागा, सैन्य आणि पोलिस दलात ५० टक्के राखीव जागा इ. मागण्या जाहीर केल्या.

जीना लीगने १९२८ मध्ये कलकत्ता येथे भरविलेल्या अधिवेशनात बहुसंख्याक हिंदू दृष्टिकोण आणि अल्पसंख्य मुस्लिम दृष्टिकोण यांच्यातील अंतर संकुचित झाले आहे आणि मतभेद फक्त तीन मुद्द्यांसंबंधी आहे असा विचार मांडण्यात आला. हे तीन मुद्दे म्हणजे : १. बहुसंख्य मुस्लिम प्रांतांत मुसलमानांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात त्यांना राखीव जागा असाव्यात का ? २. भारत हे संघराज्य असावे की एकात्म राज्य असावे ? ३. केंद्र सरकारात मुसलमानांना कोणत्या प्रमाणात राखीव जागा असाव्यात ? जीना लीगने सर्वपक्षीय परिषदेच्या पुढील अधिवेशनासाठी एक प्रतिनिधिमंडळ पाठविण्याचा ठराव मंजूर केला. नेहरू-अहवालाला अंतिम स्वरूप देण्यासाठी भरविलेल्या सर्वपक्षीय परिषदेच्या अधिवेशनाला जीना हजर राहिले. प्रौढ मताधिकार स्वीकारण्यात आला तर पंजाब आणि बंगाल ह्या प्रांतांत मुसलमानांना राखीव जागा देण्याचे कारण नाही हे त्यांनी मान्य केले. पण नाहीतर ह्या प्रांतांत मुसलमानांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात त्यांना राखीव जागा असाव्यात ही त्यांची पहिली मागणी होती. केंद्र कायदेमंडळात मुसलमानांना ३३ टक्के राखीव जागा असाव्यात, म्हणजे पंजाब व बंगाल ह्या प्रांतांतील मुसलमानांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात व इतर प्रांतांतील मुसलमानांना प्रमाणाधिक्याने राखीव जागा असाव्यात ही दुसरी मागणी होती. तिसरी मागणी म्हणजे अवशिष्टाधिकार (रेसिड्युअल पॉवर्स) हे प्रांतांकडे असावेत.

परिषदेचे बहुमत जीनांविरुद्ध गेले व त्यांच्या मागण्या फेटाळण्यात आल्या. मुसलमान जमातीसाठी जर राखीव जागा मान्य करण्यात आल्या तर शीख, ख्रिश्चन, दलित इ. जमातीही तशी मागणी करतील ही मुख्य भीती होती. सर्वपक्षीय परिषदेला शह देण्यासाठी दिल्ली येथे १९२९ च्या वर्षारंभदिनी आगाखानांच्या अध्यक्षतेखाली मुस्लिम सर्वपक्षीय परिषद भरविण्यात आली. आपल्या अध्यक्षीय भाषणात आगाखानांनी भारतीय मुसलमान ही जमात नसून अनेक जमातींचे बनलेले ते एक राष्ट्र आहे असे जाहीर केले. परिषदेत पुढील मागण्या अंतर्भूत करणारा ठराव स्वीकृत करण्यात आला. शफी मुस्लिम लीग, खिलाफत परिषद आणि जमियत उल् उलेमा ह्यांच्या या संयुक्त मागण्या होत्या : १. विभक्त मतदार संघ; २. पूर्ण प्रांतिक स्वायत्तता व अवशिष्टाधिकार प्रांतांकडे; ३. केंद्र सरकारकडे घटकप्रांत देतील तेवढेच अधिकार; ४. जातीय नकाराधिकार; ५. मुसलमान बहुसंख्य असलेल्या प्रांतांत मुसलमानांना बहुसंख्य प्रतिनिधित्व आणि अल्पसंख्य असतील तेथे प्रमाणाधिक्य; ६. सिंध प्रांताची फारकत आणि वायव्य सरहद्द प्रांत आणि बलुचिस्तान ह्यांना प्रांतांचा पूर्ण दर्जा; ७. सार्वजनिक सेवांमध्ये पुरेशा जागा; ८. मुस्लिम संस्कृती, धर्म, भाषा, इत्यादींना संरक्षण; ९. सरकारी अनुदानात योग्य तो वाटा; १०. संघराज्याच्या सर्व घटक प्रांतांच्या अनुमतीशिवाय घटनेत बदल न करणे.

जीना मुस्लिम लीगने मुस्लिम सर्वपक्षीय परिषदेचे आमंत्रण नाकारून तिच्यात भाग घेतला नव्हता. परंतु मुस्लिम सर्वपक्षीय परिषदेच्या ह्या मागण्या जाहीर झाल्यानंतर जीनांचे अनुयायी गळू लागले. जीनांनी आपल्या लीगची दिल्ली येथे बैठक घेतली आणि तिच्यापुढे एक निवेदन ठेवले. त्याच्यात त्यांनी आपले प्रसिद्ध चौदा मुद्दे मांडले होते. दिल्ली येथील मुस्लिम सर्वपक्षीय परिषदेने केलेल्या सर्व मागण्या ह्या चौदा मुद्द्यांत समाविष्ट होत्या आणि शिवाय सायमन कमिशनपुढे इतर काही जणांनी सादर केलेल्या काही मागण्याही त्यात अंतर्भूत केल्या होत्या. ज्या अर्थी कलकत्ता सर्वपक्षीय परिषदेत जीना मुस्लिम लीगच्या प्रतिनिधींनी मांडलेल्या सूचना फेटाळल्या गेल्या, त्या अर्थी मुस्लिम लीगला आपल्या मागण्या स्वतंत्रपणे मांडण्याची मोकळीक मिळालेली आहे अशी भूमिका त्यांनी घेतली. अखेरीस बैठकीने सर्वपक्षीय परिषदेच्या कलकत्ता अधिवेशनात संमत झालेल्या निर्णयांना, त्यांत पुढील बदल करण्यात येतील ह्या अटीवर, मान्यता दिली : १. मध्यवर्ती कायदेमंडळाच्या दोन्ही गृहांत मुसलमानांना एकतृतीयांश जागा असतील अशी घटनेत तरतूद असावी; २. जर प्रौढ मताधिकार स्वीकारण्यात आला नाही तर पंजाब आणि बंगाल ह्या प्रांतांत मुसलमानांना लोकसंख्येच्या प्रमाणात प्रतिनिधित्व असावे;

३. केंद्र सरकारला प्रांतांच्या व्यवहारात हस्तक्षेप करायला प्रतिबंध असावा; ४. पूर्ण प्रांतिक स्वायत्तता असावी; ५. मध्यवर्ती किंवा प्रांतिक कायदेमंडळाने, त्या कायदेमंडळातील मुसलमान सदस्यांचा बहुमताने पाठिंबा असल्याशिवाय, मुस्लिम कायद्यांत बदल करू नये. आपल्या लीगने कलकत्ता अधिवेशनात केलेल्या मागण्या आणि मुस्लिम सर्वपक्षीय परिषदेने केलेल्या मागण्या ह्यांत काही फरक नाही असे निवेदन जीनांनी लगेच प्रसिद्ध केले. हे अर्थात असत्य होते आणि त्याचा इन्कार अबुल कलम आझाद ह्यांनी ताबडतोब केला.

सायमन आयोगाने, अपेक्षेप्रमाणे, मुस्लिम पुढाऱ्यांच्या मागण्या बऱ्याच प्रमाणात उचलून धरल्या. मुस्लिम अल्पसंख्य असलेल्या प्रांतांच्या कायदेमंडळांत मुसलमानांना विभक्त मतदारसंघ आणि प्रमाणाधिक जागा बहाल केल्या. प्रौढ मताधिकार अमान्य करून मताधिकार २० टक्के प्रौढांपर्यंत मर्यादित केला. पंजाब आणि बंगाल ह्या प्रांतांत मात्र लखनौ कराराला अनुसरून मुसलमानांच्या जागा निश्चित व्हाव्यात किंवा आपल्या बहुसंख्येच्या जोरावर संयुक्त मतदारसंघातून निवडून येऊन मुसलमानांनी कायदेमंडळात बहुमत प्रस्थापित करावे अशी शिफारस त्याने केली. ( पण भारत सरकारने सायमन आयोगाच्या अहवालावरील आपले जे मत व्यक्त केले त्यात ह्या शिफारशीला विरोध करून ह्या प्रांतांत मुस्लिम लोकसंख्येच्या प्रमाणात मुस्लिम प्रतिनिधींच्या जागा निश्चित व्हाव्यात अशी सूचना केली.) राष्ट्रीय चळवळीच्या दृष्टीने महत्त्वाचा मुद्दा असा की, भारताच्या संरक्षणासाठी, अंतर्गत शांतता राखण्यासाठी आणि भारतातील भिन्न जमातींना निःपक्षपातीपणे वागविले जाईल ह्याची हमी म्हणून भारतात ब्रिटिश सत्तेचे अस्तित्व बराच काळ टिकणे आवश्यक आहे ह्या भूमिकेचा अहवालात पुरस्कार करण्यात आला होता. पण मुसलमान पुढाऱ्यांना सायमन आयोगाच्या शिफारसी अपुऱ्या वाटल्या. त्यांचा मुख्य असंतोष सरकारी नोकऱ्यांमध्ये मुसलमानांना खास हिस्सा असावा ही मागणी आयोगाने स्वीकारली नाही ह्यामुळे होता.

सायमन आयोगाचा अहवाल १९३० मध्ये प्रसिद्ध झाला. पण त्यापूर्वीपासूनच देशातील राजकीय वातावरण तापू लागले होते. काँग्रेसमधील तरुण पिढीचा वाटाघाटी आणि समझोता ह्या मार्गांवरील विश्वास ढळू लागला होता. विद्यार्थी, शेतकरी, कामगार ह्यांच्या चळवळी जोम धरू लागल्या होत्या आणि दहशतवादी चळवळही नव्याने संघटित होऊ लागली होती. मे १९२९ मध्ये व्हाइसरॉय आर्यविन ह्यांनी केंद्रीय कायदेमंडळाची मुदत बेमुदत वाढविली. ह्या वातावरणात निवडणूक घेणे सरकारला परवडणारे नव्हते. ह्यानंतर लवकरच लंडनशी सल्लामसलत करून व्हाइसरॉय ह्यांनी "डोमिनीअन स्टेटसची अंतिम स्थापना १९१७ च्या जाहीरनाम्यात अभिप्रेत आहे आणि राज्यघटनेतील तरतुदीविषयी भारतीय पुढाऱ्यांत शक्य तितके एकमत निर्माण करण्याच्या उद्देशाने एक गोलमेज परिषद बोलविण्याचा सरकारचा इरादा आहे" असे जाहीर केले. १९३० च्या काँग्रेसच्या अधिवेशनात 'नेहरू-अहवालाला रावीच्या प्रवाहात जलसमाधी देण्यात आली', संपूर्ण स्वातंत्र्य हे राष्ट्रीय साध्य म्हणून स्वीकारण्यात आले आणि देशव्यापी सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याचा इरादा जाहीर करण्यात आला.

ब्रिटिश सत्ता आणि काँग्रेसच्या नेतृत्वाखाली स्वातंत्र्योत्सुक भारतीय जनता परस्परांविरुद्ध ठाकलेले आहेत अशा ह्या संघर्षाच्या परिस्थितीत स्पष्टपणे राष्ट्रवादी भूमिका घेणाऱ्या मुसलमानांचा एक लहान पण प्रभावी गट उदयाला आला. जुलै १९२९ मध्ये युसुफ मेहेरअली आणि एस्. ए. ब्रेलवी ह्यांच्या नेतृत्वाखाली काँग्रेस मुस्लिम पक्षाची स्थापना करण्यात आली. आगाखान आणि महंमद शफी इ. 'हुजरे, खुशामतखोर' पुढारी भारतीय मुसलमानांचे खरे नेते नव्हेत असे जाहीर करण्यात आले. ह्याच महिन्यात अलाहाबाद येथे अखिल भारतीय राष्ट्रवादी मुस्लिम परिषद भरविण्यात आली. आझाद हे तिचे अध्यक्ष होते आणि राष्ट्राच्या स्वातंत्र्याची किंमत देऊन मुस्लिम पक्ष आपला राजकीय स्वार्थ साधत असतात, असा आरोप परिषदेत करण्यात आला. लाहोर येथेही राष्ट्रवादी मुस्लिमांची परिषद भरविण्यात आली. काँग्रेसने सुरू केलेल्या स्वातंत्र्यसंग्रामात मुसलमानांनी मोठ्या संख्येने भाग घ्यावा असे आझाद व अन्सारी यांनी आवाहन केले.

विशेषतः वायव्य सरहद्द प्रांतात खान अब्दुल गफारखान ह्यांच्या नेतृत्वाखाली पठाणांनी राजकीय सुधारणांसाठी उग्र आंदोलन केले. अन्य ठिकाणीही अनेक मुसलमान पुढारी स्थानिक लढ्या समितीमध्ये भाग घेत होते आणि लढ्याचे नेतृत्व करीत होते.

जातीयवादी मुसलमानांची प्रतिक्रिया अपेक्षित होती. त्यांनी, उदा. अलिबंधु, शफी, दाउदी, इस्माइल खान इत्यादींनी देशाचे स्वातंत्र्य जाहीर करणाऱ्या लाहोर काँग्रेसच्या ठरावाचा निषेध केला आणि स्वातंत्र्यसमारंभात मुसलमानांनी सहभागी होऊ नये असे आवाहन केले. मुस्लिम लीगचे जीना आणि शफी गट एक झाले आणि त्यांनीही लाहोर ठराव आणि सविनय कायदेभंगाची चळवळ ह्यांचा निषेध केला. ठिकठिकाणी मुसलमान-हिंदू दंगली झाल्या. पोलिसांची वागणूक स्पष्टपणे मुसलमानांना पक्षपाती होती. विशेषत: संयुक्त प्रांतात मुसलमान जमीनदारांनी सरकारच्या दडपशाहीला सक्रिय साहाय्य केले.

दरम्यान लंडनला गोलमेज परिषदेचे पहिले अधिवेशन भरले. मुसलमानांना पुरेसे संरक्षण देण्यात येईपर्यंत, म्हणजे त्यांचे समाधान होईपर्यंत कोणत्याही राजकीय सुधारणा करण्यात येऊ नयेत असा मुसलमान सदस्यांनी एकमुखी आग्रह धरला. ह्या परिषदेत जीना हे काँग्रेस आणि सविनय कायदेभंगाची चळवळ ह्यांच्या विरोधात उभे राहिलेल्या जातीयवादी मुसलमानांना पूर्णपणे सामील झालेले दिसले. काँग्रेसच्या पुढाऱ्यांना गोलमेज परिषदेत भाग घेता यावा म्हणून ब्रिटिश सरकारने पुढाकार घेऊन गांधीजींशी समझोता केल्यावर परिषदेच्या पुढील अधिवेशनाची पूर्वतयारी सुरू झाली. राष्ट्रवादी मुसलमानांनी मुस्लिम लीग आणि मुस्लिम परिषद यांच्या पुढाऱ्यांशी बोलणी सुरू केली, पण ती फिसकटली. त्यांच्या आग्रहामुळे काँग्रेस वर्किंग कमिटीने जातीय प्रश्नावर एक दीर्घ ठराव स्वीकृत केला. त्यात भारतातील प्रत्येक जमातीला तिची संस्कृती, भाषा, लिपी, शिक्षण, धार्मिक श्रद्धा आणि आचरण व व्यक्तिगत कायदे ह्यांच्या बाबतीत पूर्ण संरक्षण मिळेल अशी हमी देण्यात आली. देशाची भावी राज्यघटना संघराज्यात्मक असेल व अविशिष्टाधिकार घटक-राज्यांकडे राहतील हे स्पष्ट करण्यात आले. घटनेत प्रौढ मताधिकार व संयुक्त मतदारसंघ यांची तजवीज असेल, सिंधमध्ये हिंदूंना, आसाममध्ये मुसलमानांना, पंजाब व वायव्य सरहद्द प्रांत यांत शिखांना त्यांच्या संख्येच्या प्रमाणात राखीव जागा असतील इत्यादी आश्वासने देण्यात आली. केंद्र आणि प्रांतीय मंत्रिमंडळांत अल्पसंख्याकांना प्रतिनिधित्व असेल असे संकेत पाळण्यात येतील असे वचन देण्यात आले. मुस्लिम लीग आणि मुस्लिम परिषद यांनी हा ठराव फेटाळून लावला. जीनांचे १४ मुद्दे आणि मुस्लिम परिषदेच्या मागण्या (ह्या दोन भिन्न गोष्टी नव्हत्याच) सर्व राजकीय पक्षांनी स्वीकारल्याशिवाय जातीय प्रश्न सुटणार नाही असे त्यांनी जाहीर केले. मुस्लिम परिषदेच्या अधिवेशनाला जीना विशेष निमंत्रित म्हणून उपस्थित होते. मुसलमानांनी स्वत:मध्ये ऐक्य प्रस्थापित करावे असे कळकळीचे आवाहन त्यांनी केले आणि राष्ट्रवादी मुसलमानांनी मुस्लिम जमातीच्या मध्यवर्ती प्रवाहात सामील व्हावे असे त्यांना आमंत्रण दिले. जीना आता मुस्लिम जमातीच्या मुख्य प्रवाहात निष्ठेने प्रविष्ट झाले होते. गांधीजींनी जीनांबरोबर बोलणी सुरू करण्याचा प्रयत्न केला आणि राष्ट्रवादी मुसलमान धरून सर्व मुसलमान पुढारी एकमताने ज्या मागण्या सादर करतील त्या मान्य करण्याचे आगाऊ आश्वासन दिले. पण दोन अटी होत्या. संपूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी काँग्रेसने चालविलेल्या प्रयत्नांत मुसलमानांनी सहभागी झाले पाहिजे ही एक अट आणि दुसरी, हिंदू-मुसलमानांचा समझोता इतर अल्पसंख्याकांना अन्याय्यकारक असता कामा नये. जीनांनी ह्या बोलण्यात भाग घेण्याचे नाकारले आणि "हजारो गांधींशी लढा द्यायला पुढे या" असे मुसलमानांना आवाहन केले.

गांधीजी दुसऱ्या गोलमेज परिषदेला आल्याबरोबर त्यांना अल्पसंख्याक उपसमितीवर घेण्यात आले. उपसमितीच्या पहिल्याच बैठकीत आंबेडकर आणि अँग्लो-इन्डियन प्रतिनिधींनी, गांधीजी आणि मुस्लिम प्रतिनिधी ह्यांच्यात झालेला कोणताही समझोता जर इतर अल्पसंख्याकांना अन्याय करणारा असेल तर तो आपण स्वीकारणार नाही असे जाहीर केले. विविध जमातींच्या प्रतिनिधींनी जातीय प्रश्न सर्वांचे समाधान होईल अशा रीतीने सोडविण्याचे

अनुक्रमणिका

केलेले अनेक प्रयत्न असफल ठरल्यानंतर गांधीजींनी हा प्रश्न लीग ऑफ नेशन्स, वरिष्ठ न्यायाधीश ह्यांसारख्या एखाद्या अपक्ष मंडळाकडे सोपवावा असे सुचविले. इतर सर्व पक्ष विभागीय हितसंबंधांचे प्रतिनिधित्व करतात, फक्त काँग्रेस सर्व भारतीय जनतेचे प्रतिनिधित्व करते, काँग्रेस सर्व प्रकारच्या जातीय वादाविरुद्ध आहे, ती वंश–धर्म–वर्ण अशा भेदांना थारा देत नाही असा काँग्रेसच्या वतीने त्यांनी दावा केला. ब्रिटिश पंतप्रधान मॅक्डोनाल्ड ह्यांनी, जर भारतीय प्रतिनिधींना लवकरच जातीय प्रश्न सोडविता आला नाही तर ब्रिटिश सरकार जातीय निवाडा देईल; पण अखिल भारतीय संघराज्य अस्तित्वात आणण्याचा सरकार प्रयत्न करील आणि नव्या राज्यघटनेत अल्पसंख्याकांच्या नैसर्गिक हक्कांचे संरक्षण करणाऱ्या तरतुदी असतील असे जाहीर केले.

दुसऱ्या गोलमेज परिषदेने राजनिष्ठ जातीयवादी मुसलमान पुढारी आणि ब्रिटिश सरकार ह्यांच्यामधील पूर्वापार एकजुटीला नवीन बळकटी आली. ह्या स्नेहरज्जूमध्ये एक नवीन धागाही गुंफण्यात आला. तो म्हणजे पूर्वास्पृश्य आणि संस्थानिक ह्या भारतीय राजकारणात उदयाला आलेल्या नवीन शक्ती. पूर्वास्पृश्यांचे एक पुढारी एम्. सी. राजा ह्यांनी आपल्या जमातीने मुस्लिम, अँग्लो-इंडियन, भारतीय ख्रिस्ती, इत्यादी जमातींशी हातमिळवणी करून संयुक्त मतदारसंघाला विरोध केला पाहिजे असे प्रतिपादन केले. ब्रिटिश सरकारने भारतीय लोकप्रतिनिधींकडे भरघोसपणे सत्तांतर केले तर इथे हिंदूंचे (किंवा सवर्ण हिंदूंचे) जुलमी राज्य प्रस्थापित होईल ह्या कारणासाठी ह्या जमातींच्या प्रतिनिधींचा सत्तांतराला विरोध होता. आंबेडकरांनी गोलमेज परिषदेत केलेली विधाने अशी होती, "ब्रिटिशांपासून भारतीय जनतेकडे ताबडतोब सत्तांतर व्हावे यासाठी डिप्रेस्ड वर्ग उत्सुक नाहीत, ते तसा आरडाओरडा करीत नाहीत, ह्या मागणीसाठी त्यांनी आंदोलन सुरू केलेले नाही... पण जर राजकीय सत्तेचे हस्तांतर व्हावे म्हणून कलकलाट करणाऱ्या ज्या शक्ती देशात निर्माण झाल्या आहेत त्यांचा प्रतिकार करायला ब्रिटिश सरकार असमर्थ असेल– आणि आम्हाला हे माहीत आहे की डिप्रेस्ड वर्ग आजच्या परिस्थितीत ह्या मागणीला विरोध करायला असमर्थ आहेत– तर आमचे म्हणणे असे आहे की जर तुम्ही सत्तांतर केले तर त्या सत्तांतराबरोबर अशा अटी आणि तरतुदी असल्या पाहिजेत की त्यांच्यामुळे सत्ता एका कंपूच्या... हाती पडणार नाही; सर्व जमातींचा त्यांच्या संख्येच्या प्रमाणात सत्तेमध्ये हिस्सा असेल अशा रीतीने हा प्रश्न सोडविला पाहिजे."

दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या अपयशानंतर देशातील राजकीय आंदोलनाने फिरून जोर धरला आणि व्हाइसरॉय विलिंग्डन यांनी दडपशाहीचे धोरण उग्रतर केले. ह्या संघर्षात (राष्ट्रवादी मुसलमान सोडले तर) एकंदर मुस्लिम नेतृत्व सरकारच्या बाजूने उभे राहिले. जून १९३१ मध्ये वीस राजनिष्ठ मुस्लिम नेत्यांनी भारत व इंग्लंड येथे एकाच वेळी एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्यात मुसलमान जमातीने ब्रिटिशांविषयी जो स्नेहभाव व्यक्त केला आहे त्याची ब्रिटिशांनी योग्य ती दखल घ्यावी आणि पुढील कारणांसाठी मुस्लिम जमातीच्या मागण्या मान्य कराव्या असे आवाहन केले : (१) ब्रिटिशांच्या भारतीय सैन्यात बहुसंख्य मुसलमान आहेत; (२) वायव्य सरहद्द प्रांत सोडला तर काँग्रेसच्या चळवळीपासून ते अलिप्त आहेत; (३) एकही मुसलमान दहशतवादी चळवळीत सामील झालेला नाही; (४) मुस्लिम वर्तमानपत्रांनी सरकारला सातत्याने, एकनिष्ठपणे पाठिंबा दिला आहे. ह्याबरोबरच ब्रिटिशांनी आपली सत्ता भारतीय संघराज्याकडे किंवा केंद्राकडे सुपूर्द न करता ती सरळ स्वायत्त प्रांतांकडे सुपूर्द करावी ही मुस्लिम मागणी अधिक नेटाने पुढे करण्यात येऊ लागली. अनेक ब्रिटिश अधिकारीही भारत हा एक देश नसून एक उपखंड आहे अशी भाषा बोलू लागले. अलिगडच्या मुहामेडन अँग्लो-इन्डियन कॉलेजचे भूतपूर्व प्राचार्य थिओडोर मॉरिसन ह्यांनी १९३२ मध्ये प्रसिद्ध केलेल्या एका लेखात असे प्रतिपादन केले की, "हिंदू आणि मुसलमान ही दोन भिन्न राष्ट्रे आहेत. कोणत्याही दोन युरोपिअन राष्ट्रांएवढीच ती परस्परांहून भिन्न आहेत. 'परक्या' सरकारखाली, विशेषतः सर्व नागरिकांना समान साच्यात घालू पाहणाऱ्या लोकशाही सरकारखाली

मुस्लिम संस्कृती टिकू शकणार नाही. आपल्या वैशिष्टयपूर्ण संस्कृतीचे संरक्षण करण्याविषयी मुसलमानांना जी कळकळ, अगत्य वाटत आहे त्यात ते एकाकी नाहीत असा भरवसा मुसलमानांनी बाळगावा."

राष्ट्रीय आंदोलन सुरू झाले की त्याला छेद देणाऱ्या जातीय दंगलींमध्ये लक्षणीय वाढ होते हा जुना अनुभव ह्या वेळीही आला. मुस्लिम जातीय प्रचाराला नवीन भर आला. परदेशी मालावर बहिष्कार घालण्याचे आंदोलन मुसलमान दुकानदारांविरुद्ध आहे असा शौकत अली यांनी १९३२ मध्ये आरोप केला. मुस्लिम सनातनीवादाचे पुरस्कर्ते मौलाना मौदुदी यांनी स्वामी श्रद्धानंदांच्या (पूर्वी झालेल्या) खुनाचे, मुसलमानांचे अनिवार्य कर्तव्य असलेल्या जिहादमधील एक कृत्य म्हणून समर्थन केले. देशात आदर्श इस्लामी सरकार स्थापन करणे हे जिहादचे साध्य आहे, 'अयोग्य' माणसांनी चालविलेले अधार्मिक सरकार हे स्वतः अनिष्ट असतेच पण त्यातून सर्व प्रकारचा नैतिक भ्रष्टाचार माजतो हे त्यांच्या भूमिकेचे सार होते.

मुसलमानांना स्वातंत्र्य-आंदोलनापासून अलिप्त राखण्यासाठी हे सर्व भगीरथ प्रयत्न चालले असताही अनेक मुसलमान स्वातंत्र्यसैनिक त्याच्यात सहभागी होत होते. १९३० च्या जागतिक मंदीमुळे कनिष्ठ मध्यमवर्गीय आणि शेतकरी-कामगार यांची आर्थिक दुरवस्था वाढली होती आणि सर्वसामान्य हिंदू-मुसलमान जनतेला ब्रिटिशांनी चालविलेल्या राजवटीत आपली आर्थिक पिळवणूक होते आणि तिच्यात वरिष्ठवर्गीय हिंदू-मुसलमान यांची भागीदारी असते हे दिसू लागले होते. राजकारणात आर्थिक प्रश्नांना प्राधान्य येऊ लागले. बंगालमध्ये ८६ टक्के जनता शेतकरी-शेतमजूर आहे, तिला पुरेसे प्रतिनिधित्व मिळाले पाहिजे, मुसलमान शेतकऱ्यांनी हिंदू शेतकऱ्यांशी एकजूट करून उभयतांची स्थिती सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे, ह्यासाठी ह्या दोघांत भिंत उभी करणारे स्वतंत्र मतदारसंघ रद्द करून संयुक्त मतदारसंघ स्थापन केले पाहिजेत अशी बंगाल मुस्लिम लीगने मागणी केली व तिला अनुसरून बंगालच्या कायदेमंडळाने स्वतंत्र मतदारसंघ नाहीसे करावे आणि संयुक्त मतदारसंघांची निर्मिती करावी असा ठरावही केला. पूर्वास्पृश्यांचे एक पुढारी एम्. सी. राजा ह्यांनीही ज्यात डिप्रेस्ड वर्गाला राखीव जागा आहेत अशा प्रौढ मताधिकारावर आधारलेल्या संयुक्त मतदारसंघांची मागणी केली आणि प्रौढ मताधिकाराला विरोध करणाऱ्या आणि वरिष्ठवर्गीय मुसलमान नेतृत्वाशी हातमिळवणी करणाऱ्या डॉ. आंबेडकरांविरुद्ध पवित्रा घेतला.

स्वतंत्र मतदारसंघ रद्द करायची ब्रिटिश सरकारला ही चांगली संधी होती. पण मॅक्डोनाल्ड ह्यांनी जो जातीय निवाडा दिला त्यात मुस्लिम, शीख, ख्रिश्चन, अँग्लो-इन्डियन आणि युरोपिअन ह्यांच्यासाठी वेगवेगळे मतदारसंघ कायम करण्यात आले. पूर्वास्पृश्यांसाठी काही वेगळे मतदारसंघ स्थापन करण्यात आले. आणि उरलेल्या सर्वसामान्य मतदारसंघांतही त्यांना मताधिकार देण्यात आला. मुसलमानांना ते अल्पसंख्य असलेल्या प्रांतांत पूर्वी जे प्रमाणाधिक्य देण्यात आले होते ते राखण्यात आले. एकंदरीत मुसलमानांच्या बाजूने ह्या निवाड्यात बराच पक्षपात करण्यात आला होता. मुसलमान पुढाऱ्यांनी निवाड्याचे सामान्यपणे स्वागत केले; पण पंजाब आणि बंगाल या प्रांतांत मुसलमानांना घटनात्मक बहुमत देण्यात आले नाही म्हणून त्याचा निषेधही त्यांनी केला.

ह्या घडीला आझाद, सय्यद महमूद, इ. राष्ट्रवादी मुसलमानांनी परस्परांत वाटाघाटी करून एक करार घडवून आणावा म्हणून प्रयत्न सुरू केले. अपेक्षेप्रमाणे राजनिष्ठ मुसलमानांनी त्यांचा कडाडून निषेध केला. तरीही काँग्रेस, हिंदू महासभा, लिबरल फेडरेशन, नॅशनलिस्ट पार्टी, खिलाफत कॉन्फरन्स, मुस्लिम कॉन्फरन्स, राष्ट्रवादी मुस्लिम, जमियत-उल-उलेमा, मुस्लिम लीग, अहरार, शिया कॉन्फरन्स, वेगवेगळे शीख पक्ष, ख्रिश्चन संघटना, सिंध व पंजाब हिंदू इत्यादींनी अलाहाबादच्या 'एकता परिषदे'त भाग घेतला. परिषदेने मुसलमानांना पंजाब आणि बंगाल ह्या प्रांतांत घटनात्मक बहुमत दिले; मुस्लिम अल्पसंख्य असलेल्या प्रांतांत मुसलमानांना प्रमाणाधिक्य दिले; मध्यवर्ती कायदेमंडळात मुसलमानांना ३२ टक्के राखीव जागा दिल्या, इ. आणि संयुक्त मतदारसंघाला मान्यता



अनुक्रमणिका

दिली. पण मुस्लिम कॉन्फरन्स आणि जमियत-उल-उलेमाचा फुटून निघालेला गट यांनी ह्या शिफारसी फेटाळल्या. यानंतर दोनच दिवसांनी भारतमंत्र्यांनी जातीय निवाड्याचा अवशिष्ट भाग जाहीर करून मुसलमानांना संघराज्याच्या कायदेमंडळात आणि मंत्रिमंडळात ३३⅓ टक्के जागा राखीव असतील असे जाहीर केले. एकता परिषदेचे प्रयत्न निरर्थक ठरले. ह्या संदर्भात आझादांनी केलेले विधान असे होते की ते जीनांची १४ कलमे स्वीकारायच्या विरुद्ध होते, पण समझोता व्हावा म्हणून त्यांनी ती स्वीकारली; पण ही १४ स्वीकारली जाण्याबरोबरच समझोता घडून येऊ नये म्हणून आणखी ६ कलमे पुढे करण्यात आली. ह्या संदर्भातील जीनांची प्रतिक्रिया नमूद करण्यासारखी आहे. मुसलमानांनी आपल्या १४ कलमांना चिकटून रहावे आणि ह्या बाबतीत समाधान झाले तर केवळ विभक्त मतदारसंघाच्या मागणीला चिकटून राहू नये असा त्यांचा प्रारंभीचा सल्ला होता. पण अलाहाबाद समझोता घडून येण्याच्या सुमाराला त्यांनी त्याच्या उपयुक्ततेविषयी निराशा व्यक्त करणारे निवेदन प्रसिद्ध केले.

एव्हाना जातीयवादी मुस्लिम राजकारणाचे नेतृत्व करणारी ज्येष्ठ पुढाऱ्यांची पिढी अस्तंगत झाली होती. जीनांना मुस्लिम लीगचे तहहयात अध्यक्ष होण्यासाठी पाचारण करण्यात आले. ते स्वीकारून त्यांनी मुस्लिम लीग कौन्सिलची फेब्रुवारी १९३४ मध्ये सभा भरविली. जातीय निवाड्याला त्यांनी आपली संपूर्ण संमती व्यक्त केली, पण राष्ट्रीय स्वायत्ततेच्या मागणीला पाठिंबा देण्याची तयारीही दाखविली. ह्याने राष्ट्रीय मुसलमानांच्या आशा उंचावल्या. ऑगस्ट १९३४ मध्ये जातीय निवाड्याचा तिसरा भाग जाहीर करण्यात आला. मुसलमानांना मध्यवर्ती सरकारी आणि रेल्वे नोकऱ्यांत २५ टक्के जागा राखीव म्हणून देण्यात आल्या. इतर अल्पसंख्याकांसाठी ८⅓ टक्के जागा राखून ठेवण्यात आल्या. ह्या जागा केवळ लोकसंख्येच्या प्रमाणात आहेत, प्रमाणाधिक्याचे तत्त्व स्वीकारून ३३⅓ टक्के जागा मुसलमानांना देण्यात आल्या नाहीत म्हणून जीनांच्या अध्यक्षतेखाली मुस्लिम लीगने निषेध केला. वर्षाच्या अखेरीस मध्यवर्ती कायदेमंडळाच्या झालेल्या निवडणुकीत जीना धरून जीना गटाचे २२ सदस्य निवडून आले. जीनांनी एकंदरीत अधिकारी सदस्य आणि सरकारने नेमलेले सदस्य ह्यांच्या गटाच्या पाठिंब्याने कायदेमंडळात काँग्रेसविरोधी धोरणाचा अवलंब केला. जातीय प्रश्न सोडविण्यासाठी काँग्रेसचे अध्यक्ष राजेंद्रप्रसाद ह्यांनी जीनांशी परत बोलणी सुरू केली आणि उभयतांना मान्य असा एक आराखडाही बनविण्यात आला. पण त्याला काँग्रेसने हिंदू महासभेचीही संमती मिळवावी असा जीनांनी आग्रह धरला. जातीय निवाड्याला हिंदू महासभेने सतत केलेला विरोध ध्यानी घेता हे शक्य नव्हते. तेव्हा ह्या बोलण्यातून काही निष्पन्न झाले नाही. जीनांचे अडवणुकीचे धोरण कधी बदलले नाही.

१९३५ च्या कायद्यात जातीय निवाडा समाविष्ट करण्यात आला, प्रांतांना बऱ्याच प्रमाणात स्वायत्तता देण्यात आली, आणि प्रांत आणि संस्थाने ह्यांच्या मिळून बनलेल्या संघराज्याची योजना स्वीकारण्यात आली. पन्नास टक्के संस्थानिक स्वखुषीने संघराज्यात सामील होईपर्यंत, संघराज्य अस्तित्वात येईपर्यंत केंद्र सरकार १९१९ च्या कायद्याप्रमाणे चालणार होते. अर्थात संस्थानिक कधी संघराज्यात सामील झाले नाहीत आणि ते अस्तित्वात आले नाही. थोडक्यात, जातीयवादी मुसलमानांची सत्तांतर केंद्राकडे न होता सरळ प्रांतांकडे व्हावे ही मागणी मान्य झाली.

जीनांच्या अध्यक्षतेखाली पुनःसंघटित झालेल्या मुस्लिम लीगचे उद्दिष्ट भारतीय मुसलमानांची एकमेव प्रतिनिधी हे स्थान लीगला प्राप्त करून देण्याचे होते. ह्यासाठी नव्या कायद्याखाली होणाऱ्या प्रांतिक निवडणुकांत बहुसंख्याक मुस्लिम प्रांतांत लीग सरकारे स्थापन करू शकेल आणि अल्पसंख्याक प्रांतांत सरकारांत हिस्सा मिळवू शकेल—जीनांच्या १४ कलमांप्रमाणे ⅓ हिस्सा एवढे लीगचे उमेदवार निवडून आणणे आवश्यक होते. पण हे साधण्याचा प्रयत्न करण्याइतकेही मुस्लिम लीगचे सामर्थ्य नव्हते. पंजाबमधील शिकंदर हयत खान यांचा युनियनिस्ट पक्ष, बंगालमधील फजलूल हक यांचा कृषक प्रजा समिती पक्ष, इ. प्रादेशिक मुस्लिम पक्षांनी मुस्लिम लीगमध्ये विलीन होण्याची गोष्ट सोडाच, पण

तिच्याशी पूर्णपणे सहकार्य करण्याचेही नाकारले. अखिल भारतीय बाबींमध्ये ते लीगचे नेतृत्व स्वीकारायला तयार होते; पण प्रादेशिक बाबींत त्यांना सवतासुभा हवा होता. संयुक्त प्रांतासारख्या लीगच्या दृष्टीने महत्त्वाच्या असलेल्या प्रांताच्या लीगमध्ये तीन भिन्न गटांची तिफळी होती. संयुक्त प्रांताच्या ६६ मुस्लिम जागांतील फक्त ३५ जागांसाठी लीग उमेदवार उभे करू शकली.

निवडणुकीचे निकाल जाहीर झाले तेव्हा सर्वांना धक्का बसला. मुस्लिम अल्पसंख्य असलेल्या प्रांतांत काँग्रेसने झंझावाती विजय मिळविला होता. हिंदू महासभेचे उमेदवार कोसळले होते. उलट लीगची दुर्दशा झाली होती. बहुसंख्य मुसलमान प्रांतांतील पंजाबात लीगला ८४ पैकी १, सिंधमध्ये ३३ पैकी ३, आणि वायव्य सरहद्द प्रांतात ० जागा मिळाल्या होत्या. अल्पसंख्य प्रांतांत ती अधिक यशस्वी ठरली होती. मुंबई प्रांतात २९ तील २०; संयुक्त प्रांतात ६४ तील २७, मद्रासमध्ये २८ तील १० आणि आसामात ३४ तील ९ असा ह्या यशाचा हिशोब होता.

काँग्रेसच्या यशाने राष्ट्रवादी मुसलमानांची उमेद वाढली. अलाहाबादमध्ये १९३६ च्या मेमध्ये भरलेल्या राष्ट्रवादी मुस्लिम परिषदेत मुसलमानांनी मोठ्या संख्येने काँग्रेसमध्ये यावे आणि स्वातंत्र्य-लढ्यात सहभागी व्हावे असे आवाहन करण्यात आले. आर्थिक प्रश्नांना महत्त्व येत आहे आणि जातीय प्रश्न मागे पडत आहेत, धार्मिक विभागणी अस्पष्ट होत जाऊन जमीनदार-तालुकदार, शेतकरी-कुळे, मालक-कामगार हे वर्ग त्यांची जागा घेत आहेत, मुसलमान कुळे आणि हिंदू कुळे ह्यांचे हितसंबंध समान आहेत ह्याची जाणीव शेतकरी वर्गात, हिंदूंत आणि मुसलमानांत पसरत आहे असे दृश्य दिसू लागले होते. काँग्रेसने मुसलमान बहुजनसमाजाशी संपर्क वाढविण्याची – 'मास-कॉन्टॅक्ट' – मोहीम हाती घेतली. तिला जीनांनी तीव्र प्रतिक्रिया व्यक्त केली. जातीय प्रश्न सोडविण्यापूर्वी बहुजन समाजाचे भुकेचे व गरिबीचे प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करणे हा 'आधी कळस मग पाया' असा प्रकार आहे, ह्या पद्धतीने हे प्रश्न सोडविण्यात कुणाला यश येणार नाही असा इशारा त्यांनी दिला.

सर्व भारतीय मुसलमानांना मुस्लिम लीगच्या छत्राखाली संघटित करण्याचा निकराचा प्रयत्न जीनांनी सुरू केला. मे महिन्यात संयुक्त प्रांताच्या मुस्लिम लीगच्या संसदीय मंडळाच्या बैठकीत काही सदस्यांनी काँग्रेसशी आपण सहकार्य करावे असे जेव्हा सुचविले, तेव्हा "सध्या तरी आपण काँग्रेसशी किंवा सरकारशी जूट न करता, मुसलमानांना संघटित करून शक्ती कमावेपर्यंत वाट पाहू या" असा सल्ला त्यांनी दिला. जूनमध्ये एका पोटनिवडणुकीत लीगच्या उमेदवाराविरुद्ध काँग्रेसने जेव्हा आपला उमेदवार उभा केला तेव्हा यामुळे इस्लाम धोक्यात आला आहे अशी गर्जना जीनांनी केली आणि मुस्लिम मतदारांना अतिरेकी जातीय भाषेत आवाहन केले. जवाहरलाल नेहरूंनी धार्मिक व जातीय भावना भडकविण्याच्या ह्या प्रयत्नाचा तीव्र निषेध केला. जीना भारताला परत कृष्णयुगाकडे घेऊन जाण्याच्या खटपटीत आहेत असे भाष्य त्यांनी केले.

ह्या सुमाराला घडलेला एक प्रसंग नमूद करणे आवश्यक आहे. चौधरी खलिक उझामन ह्या संयुक्त प्रांतातील मुस्लिम लीगच्या पुढाऱ्याने संयुक्त प्रांतात काँग्रेस-लीग यांचे संयुक्त मंत्रिमंडळ बनविण्यात यावे म्हणून प्रयत्न सुरू केले होते. जीनांनी त्यांना काही अटींवर आशीर्वाद दिला होता. अखिल भारतीय पातळीवर जातीय समझोता होईपर्यंत जातीय निवाड्याला आणि स्थानिक संस्थांमध्ये मुसलमानांच्या वेगळ्या प्रतिनिधित्वाला बाधा येईल असे काही करू नये ही त्यांतील एक अट होती. चौधरी खलिक उझामन यांनी मंत्रिमंडळात मुसलमानांना ३३$\frac{1}{3}$ टक्के प्रतिनिधित्व पाहिजे अशी मागणी केली; ती आझादांनी मान्य केली. पण आपण मंत्रिमंडळाच्या संयुक्त जबाबदारीचे तत्त्व मान्य करू, आणि कायदेमंडळात वेगळा गट म्हणून बसणार नाही अशा करारनाम्यावर चौधरींनी सही करावी असे सुचविले. हे चौधरींनी मान्य केले, पण दोन अटी पुढे केल्या. एक म्हणजे जातीय प्रश्नांच्या बाबतीत मुस्लिम लीगला कृतिस्वातंत्र्य आणि उच्चारस्वातंत्र्य दिले पाहिजे; त्यांच्या कृती आणि मते काँग्रेसच्या विरुद्ध असली तरी त्यांना आक्षेप घेता कामा नये. दुसरी अट म्हणजे आपण स्वतः आणि नबाब इस्माइल खान यांना मंत्रिमंडळात

घेतले पाहिजे. ह्या अटी स्वीकारणे अशक्य होते. जातीय प्रश्न धरून सर्व बाबतीत मंत्रिमंडळाच्या संयुक्त जबाबदारीचे तत्त्व स्वीकारले पाहिजे असा काँग्रेसचा आग्रह होता. शिवाय नबाब इस्माइल खान हे बडे जमीनदार होते. त्यांना मंत्रिमंडळात घेण्याला बऱ्याच काँग्रेसजनांचा तीव्र विरोध होता. ही बोलणी अर्थात फिसकटली.

काँग्रेसने अधिकारग्रहण करून सात प्रांतांत मंत्रिमंडळे बनविल्यानंतर जीनांनी मुसलमानांचा एकमेव प्रातिनिधिक राजकीय पक्ष ह्या स्वरूपात मुस्लिम लीगचे संघटन करण्याचे काम जिद्दीने हाती घेतले. ह्या कामाला पोषक ठरावे म्हणून काँग्रेस राजवटीत मुसलमानांच्या हक्कांची पायमल्ली होत आहे, काँग्रेसकडून मुसलमानांना न्याय किंवा रास्त वागणूक मिळणे अशक्य आहे अशी हाकाटी त्यांनी सतत सुरू ठेवली. लखनौला ऑक्टोबर १९३७ मध्ये भरलेल्या मुस्लिम लीगच्या अधिवेशनात, गांधीजींच्या शब्दांत बोलायचे तर जीनांनी काँग्रेसविरुद्ध युद्ध पुकारले. गांधीजी, नेहरू, काँग्रेसचे अध्यक्ष सुभाषचंद्र बोस या नेत्यांनी जीनांना भेटण्याची उत्सुकता दाखविली. जीनांनी अशी भेट होऊन बोलणी करण्यासाठी पुढील अट घातली : गांधीजींना ३ मार्च १९३८ रोजी लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात, " आपण आता अशा टप्प्यावर येऊन पोचलो आहोत की, आता कोणतीही संदिग्धता राहू देता कामा नये तुम्ही अखिल भारतीय मुस्लिम लीग ही भारतातील मुसलमानांची एकमेव अधिकृत आणि प्रातिनिधिक संघटना आहे आणि दुसऱ्या पक्षी तुम्ही स्वत: काँग्रेस व सबंध देशातील इतर सर्व हिंदू यांचे प्रतिनिधित्व करता ह्याला मान्यता द्या. ह्याच एका पायावर आपण पुढे जाऊ शकू आणि पुढील कार्यवाहीसाठी यंत्रणा उभारू शकू. " गांधीजींनी आणि इतर पुढाऱ्यांनी अर्थात ही अट मान्य करण्याचे नाकारले. लीगच्या लखनौ अधिवेशनात काँग्रेस राजवटीवर जे आरोप करण्यात आले होते त्यांचा नेहरूंनी तपशीलवार परामर्ष घेऊन त्यांत काही तथ्य नसल्याचे दाखवून दिले. तितक्याच तपशीलात जाऊन त्यांनी जीनांच्या नेमक्या मागण्या काय आहेत ह्याची जीनांकडे चौकशी केली. जीनांनी त्रागा केला, पण उत्तर दिले नाही. जीनांनी जाणीवपूर्वक जातीय वातावरण तापत ठेवले.

ह्या सुमाराला पाकिस्तानची मागणी जोर धरू लागली होती. इक्बाल यांनी जीनांना मे १९३७ मध्ये लिहिलेल्या पत्रात असे म्हटले होते की, " इस्लामी कायद्याच्या दीर्घकाळ आणि काळजीपूर्वक केलेल्या अभ्यासानंतर मी ह्या निष्कर्षाला येऊन पोचलो आहे, की ह्या कायद्याचे सम्यक् आकलन करून जर तो अंमलात आणला तर प्रत्येकाला निर्वाहाचा जो हक्क आहे त्याचे संरक्षण होईल. पण ह्या देशात स्वतंत्र मुसलमान राज्य किंवा राज्ये असल्याशिवाय इस्लामच्या शरियतची अमलबजावणी आणि विकास होणे अशक्य आहे... ही गोष्ट जर हिंदुस्थानात अशक्य असेल तर यादवी युद्धाशिवाय पर्याय नाही." पुढल्या पत्रात त्यांनी " हिंदुस्थानच्या वायव्य प्रदेशातील आणि बंगालमधील मुसलमान हे हिंदुस्थानातील आणि बाहेरील इतर राष्ट्रांप्रमाणे स्वायत्ततेचा अधिकार असलेली राष्ट्रे आहेत असे का मानू नये ? ", असा प्रश्न उपस्थित केला. ऑक्टोबर १९३८ मध्ये कराचीला भरलेल्या सिंध मुस्लिम लीग परिषदेत जीनांच्या उपस्थितीत हिंदू व मुसलमान ही दोन राष्ट्रे आहेत आणि ह्या दोन्ही राष्ट्रांना 'सन्माननीय आणि न्याय्य' राज्ये लाभतील अशी भारताची राज्यघटना असली पाहिजे अशी मागणी करण्यात आली. " जर आठ वर्षांचा पोरगा असलेला महंमद बिन कासिम १८ सैनिकांसह सिंध जिंकू शकतो तर मग ८ कोटी मुसलमान खात्रीने सबंध भारत जिंकू शकतील " असे फझलूल हक यांनी विधान केले आणि टाळ्यांचा कडकडाट झाला. " तुम्ही हुकूम करा आणि आम्ही प्राणांची बाजी करतो " असा त्याला प्रतिसादही मिळाला.

१९३५ च्या कायद्याखाली संघराज्य अस्तित्वात येऊ नये अशी जीनांची इच्छा होती कारण मुस्लिम लीगला मध्यवर्ती कायदेमंडळात तुटपुंजे प्रतिनिधित्व मिळणार होते. काँग्रेसचा संघराज्याला विरोध होता; कारण त्या योजनेप्रमाणे १) लोकप्रतिनिधी असलेल्या मंत्र्यांना खरीखुरी सत्ता मिळणार नव्हती आणि २) संस्थानांच्या लोकप्रतिनिधींऐवजी संस्थानिकांनी नेमलेले प्रतिनिधी कायदेमंडळात बसणार होते. काँग्रेसने संस्थानांमध्ये लोकशाही राजवट सुरू

अनुक्रमणिका

व्हावी म्हणून चळवळ सुरू करायला स्थानिक जनतेला उत्तेजन दिले. जीनांनी हैदराबादसारख्या मुस्लिम संस्थानात लोकशाहीवादी चळवळ चालविण्याला सक्त विरोध केला.

१९३८ मध्ये पाटणा येथे भरलेल्या मुस्लिम लीगच्या अधिवेशनात बिहार, संयुक्त प्रांत आणि मध्य प्रांत यांतील काँग्रेस सरकारांविरुद्ध 'प्रत्यक्ष कृती' करण्याचा ठराव स्वीकृत करण्यात आला. मुस्लिम लीगच्या घटनात्मक आंदोलन करण्याच्या परंपरेत झालेला क्रांतिकारक बदल असे जीनांनी त्याचे वर्णन केले.

१९३५ च्या कायद्याखालील संघराज्य अस्तित्वात आणायला ब्रिटिश सत्ताधीश फारसे उत्सुक होते असे नाही. मुसलमान नेतृत्वाचा संघराज्याला असलेला विरोध हे त्यांना ह्या बाबतीत चालढकल करायला एक चांगले कारण सापडले. ऑगस्ट १९३८ मध्ये हंगामी व्हाइसरॉय ब्रेबर्न ह्यांची जीना व शिकंदर हयत खान ह्यांनी वेगवेगळ्या वेळी गाठ घेऊन केंद्र सरकार १९१९ च्या कायद्याप्रमाणे चालावे आणि काँग्रेस राजवटीतील अल्पसंख्य मुसलमानांना संरक्षण द्यावे अशी त्यांना गळ घातली आणि त्याबद्दल परतफेड म्हणून मुस्लिम लीग सरकारला मध्यवर्ती कायदेमंडळात पूर्ण पाठिंबा देईल असे आश्वासन दिले. भारतमंत्री मार्क्विस ऑफ् झेटलंड हे मुसलमानांचा विरोध ध्यानी घेता संघराज्याची स्थापना करण्याची घाई करू नये ह्या मताचे होते; तर व्हाइसरॉय लिन्लिथगो ह्यांचे कायद्याप्रमाणे संघराज्याची स्थापना करण्याचे प्रयत्न करायला आपण बांधलेले आहोत आणि मुसलमानांच्या आक्षेपांत काही तथ्य नाही असे मत होते. ऑगस्ट १९३९ मध्ये संस्थानिक आणि ब्रिटिश राजप्रतिनिधी (क्राउन रेप्रेझेन्टेटिव्ह) यांची बैठक झाली आणि तिच्यात संस्थानिकांनी उपस्थित केलेल्या शंकांचे समाधान करण्यात आले. संघराज्य लवकरच अस्तित्वात येईल अशी चिन्हे दिसू लागली.

मुसलमानी राजकारणाचे एक स्थायी सूत्र केंद्र सरकारमध्ये आपल्याला हिंदूंएवढा, पूर्णपणे समान असा वाटा असला पाहिजे हे होते. तेव्हा मुसलमान पुढारी ब्रिटिश भारताचे प्रांत आणि संस्थाने हे घटक असलेल्या संकल्पित संघराज्याला वेगवेगळे पर्याय सुचवू लागले. एक पर्याय उत्तर हिंदुस्थान मुसलमानांना आणि दक्षिण हिंदुस्थान हिंदूंना द्यावा असा होता. दुसरा पर्याय हिंदुस्थानात पाच मोठे आणि अनेक लहान मुस्लिम प्रदेश वेगळे काढावे, आणि इतरत्र राहत असलेल्या मुसलमानांनी स्थलांतर करून त्यांत सामील व्हावे आणि त्यांच्या बदल्यात ह्या प्रदेशांतील हिंदूंनी उर्वरित हिंदुस्थानात जावे असा तोडगा सुचविला. एप्रिल १९३९ मध्ये दिल्ली येथे भरलेल्या मुस्लिम लीग काउन्सिलच्या बैठकीत अखिल भारतीय संघराज्याला ज्या वेगवेगळ्या पर्यायी योजना सुचविण्यात आल्या होत्या त्यांचा विचार करण्यासाठी एक समिती नेमण्यात आली असल्याचे जाहीर केले.

१९३९ मध्ये दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर १९३५ च्या कायद्याखालील संघराज्याची योजना स्थगित करण्यात आली. लोकांची संमती घेतल्याशिवाय भारत सरकारने युद्ध जाहीर केले ह्याचा काँग्रेसने निषेध केला. प्रांतिक काँग्रेस मंत्रिमंडळाने राजीनामे दिले. युद्धाविषयी काँग्रेसची चित्तवृत्ती दोलाचल होती. नात्सी जर्मनीविरुद्ध लढणाऱ्या लोकशाही राष्ट्रांशी तिची पूर्ण सहानुभूती होती; पण युद्धाचा आपत्काल संपल्यानंतर भारतात लोकशाही राजवट येईल असे आश्वासनही तिला हवे होते. ब्रिटिश सरकारने आपली युद्धविषयक उद्दिष्टे जाहीर करावी असे आवाहन काँग्रेसने केले. व्हाइसरॉय लिन्लिथगो यांनी राजकीय पक्षांचे ५२ पुढारी आणि संस्थानिकांचे प्रतिनिधी ह्यांच्या भेटी घेऊन झालेल्या बोलण्याचा निष्कर्ष म्हणून जे निवेदन प्रसिद्ध केले त्यात वेगवेगळ्या पक्षांत असलेल्या मतभेदांवर भर दिला होता. युद्धाच्या समाप्तीनंतर सर्व जमाती, पक्ष, हितसंबंध आणि संस्थानिक यांच्या प्रतिनिधींशी सल्लामसलत करून इष्ट ठरतील त्या घटनात्मक सुधारणा ब्रिटिश सरकार करील आणि भारतात वसाहतीचे स्वराज्य स्थापन करायला साहाय्य करील असे आश्वासन होते. असेच निवेदन भारतमंत्री झेटलंड ह्यांनी केले. आपल्या भाषणात भारतमंत्र्यांनी एक सूचक वाक्य उच्चारले होते. "भारताच्या राजकीय एकतेला अजून विघातक असलेल्या जातीय वितुष्टांचे निराकरण करण्याचा प्रयत्न

आपण केला पाहिजे." म्हणजे हे निराकरण झाले नाही तर देशाची एकताही राहणार नाही. देशाची फाळणी शक्यतेच्या कोटीतील आहे अशी सूचना ब्रिटिश सरकारच्या प्रवक्त्याकडून मिळण्याची ही पहिली वेळ.

काँग्रेसने ह्या निवेदनाविषयी असमाधान व्यक्त केले. भारतीय पुढाऱ्यांमधील मतभेदांची ढाल पुढे करून ब्रिटिश भारतीय स्वातंत्र्याविषयीची आपली उद्दिष्टे स्पष्ट करण्याचे टाळत आहे असा तिने आरोप केला. भारतीय जनतेचा स्वातंत्र्याचा, आणि घटनासमितीद्वारा राज्यघटना बनविण्याचा हक्क ब्रिटिश सरकार मान्य करीपर्यंत त्याच्याशी समझोता होणार नाही असे काँग्रेसने जाहीर केले. नेहरूंनी जीनांशी बोलणी करण्याचा फिरून प्रयत्न केला पण ती सुरू होण्यापूर्वीच काँग्रेस राजवटी-पासून सुटका झाल्यामुळे झालेला संतोष व्यक्त करण्यासाठी २२ डिसेंबर हा दिवस मुसलमानांनी मुक्तिदिन म्हणून साजरा करावा असा आदेश दिला. काँग्रेस राजवटींवरील आरोपांची फेडरल कोर्टाचे सरन्यायाधीश मॉरिस ग्वॉयर यांच्याकरवी चौकशी करावी अशी राजेंद्रप्रसादांची सूचना जीनांनी धुड-कावून लावली. जीनांशी बोलणी करायला अजून अवसर आहे का, असे नेहरूंनी विचारले असता मुस्लिम लीग ही भारतीय मुसलमानांची एकमेव प्रतिनिधी आहे हे काँग्रेस मान्य करीत नसल्यामुळे आणि काँग्रेसची घटनासमितीची कल्पना लीगला अमान्य असल्यामुळे अवसर नाही असे त्यांनी उत्तर दिले.

अखेरीस मार्च १९४० मध्ये लीगचे लाहोरला ऐतिहासिक अधिवेशन भरले. एक लाखाहून अधिक मुसलमान उपस्थित होते. आपल्या अध्यक्षीय भाष-णात जीनांनी आपली भूमिका स्पष्ट केली.

"भारतातील समस्या आंतर्जातीय स्वरूपाची आहे असे मानणे गैर आहे. ती आंतरराष्ट्रीय स्वरू-पाची आहे आणि ह्या दृष्टीने तिला हाताळले पाहिजे. जी राज्यघटना ह्या मूलभूत वस्तुस्थितीवर आधारली जाणार नाही तिच्यापासून केवळ आपत्ती निष्पन्न होईल. इस्लाम आणि हिंदुधर्म ह्या दोन भिन्न सामाजिक व्यवस्था आहेत आणि हिंदू व मुसलमान कधीही समान राष्ट्रीयत्व विकसित करू शकणार नाहीत. त्यांची धार्मिक तत्त्वज्ञाने, सामा-जिक प्रथा, साहित्य भिन्न आहेत. त्यांच्या संस्कृती भिन्न आहेत... हिंदुस्थानची कृत्रिम एकता ब्रिटि-शांनी देश पादाक्रांत केला यावर आधारली आहे आणि ब्रिटिश बागनटांनी ती टिकवून धरली आहे. बहुसंख्य हिंदूंचे सरकार स्थापन करील अशी राज्य-घटना मुस्लिम हिंदुस्थान कधीही मान्य करणार नाही. मुसलमान ही अल्पसंख्य (जमात) नाही; ते एक राष्ट्र आहे आणि त्याला स्वतःचा गृहप्रांत (होमलँड), स्वतःचा प्रदेश आणि स्वतःचे राज्य असले पाहिजे. ह्या उपखंडात शांतता आणि सुख नांदावे अशी ब्रिटिश सरकारला खरी आच असेल तर भारताची स्वायत्त राज्यांमध्ये फाळणी करून ह्या मोठ्या राष्ट्रांना त्यांचे गृहप्रांत उपलब्ध करून देणे हा एकमेव मार्ग आहे."

फाळणीची मागणी करणारा ठराव फजलुल हक यांनी मांडला. "... पुढील मूलभूत तत्त्वाला अनुसरून जिची रचना झालेली नाही अशी कोणतीही घटनात्मक योजना काम देऊ शकणार नाही किंवा मुसलमानांना मान्य होणार नाही. हे तत्त्व असे की, भौगोलिकदृष्ट्या सलग असलेल्या भूखंडांची अशा रीतीने सीमा-आखणी करावी की ज्या प्रदेशांत, भारताच्या वायव्य आणि पूर्व दिशांना असलेल्या भूभागांप्रमाणे मुसलमान बहुसंख्य असतील, ते प्रदेश स्वतंत्र राज्ये म्हणून एकत्रित आणि ह्या राज्यांतील घटक स्वायत्त आणि सार्वभौम असतील."

मुसलमान अल्पसंख्य असलेल्या प्रांतांतील लीगच्या प्रतिनिधींनी ह्या ठरावाला बहुसंख्य प्रांतांतील प्रति-निधींइतकाच उत्साही पाठिंबा दिला. 'हिंदू' प्रांतांतील मुसलमानांच्या भवितव्याची काळजी बहु-संख्य मुसलमानी प्रांतांनी करू नये असे सयद अब्दुर रॉफ शहा यांनी सांगितले. "बहुसंख्य प्रांतांतील मुसलमानांप्रमाणे तेही स्वतंत्र होतील असा एक दिवस उजाडेल असा त्यांचा अल्लावर विश्वास आहे" असे आश्वासन त्यांनी दिले.

हा ठराव म्हणजे देशाला हादरून टाकणारा धक्का होता. एप्रिल १९४० मध्ये 'अखिल भारतीय आझाद मुस्लिम परिषद' ह्या नावाने लीगेतर मुस्लिमांची परिषद भरविण्यात आली. तिच्यात

स्वीकृत करण्यात आलेले ठराव असे होते : मौलाना हफिझुर रेहमान यांनी मांडलेल्या ठरावाप्रमाणे– (१) प्रौढ मताधिकारावर आधारलेली घटना-समिती तावडतोब बोलविण्यात यावी आणि (२) ह्या समितीच्या निवडून आलेल्या मुस्लिम सदस्यांनाच केवळ मुस्लिम जमातीच्या हितसंबंधांचे आणि हक्कांचे संरक्षण करण्यासाठी आवश्यक त्या घटनात्मक तजवीज करण्याचा हक्क असावा अशा मागण्या केल्या होत्या. आसफ अली ह्या काँग्रेसपक्षीय पुढाऱ्याने मांडलेल्या ठरावाप्रमाणे २७ पुढाऱ्यांचे एक मंडळ पुढील प्रश्नांविषयी आवश्यक त्या शिफारशी करण्यासाठी नेमण्यात आले होते : (१) मुस्लिम संस्कृती, वैयक्तिक कायदा आणि धार्मिक हक्क यांचे संरक्षण; (२) मुस्लिमांचे राजकीय हक्क आणि त्यांचे संरक्षण; (३) न–एकात्म (नॉन-युनिटरी), संघ-राज्यात्मक राज्यघटना, जिच्यान्वये संघ-राज्याच्या सरकारला मर्यादित सत्ता असेल; (४) मुस्लिमांच्या आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक हक्कांना संरक्षण; (५) मुस्लिमांचा सार्वजनिक सेवांतील हिस्सा. सारांश, 'राष्ट्रवादी' मुसलमानांनी पाकिस्तानाची मागणी सोडली तर जातीयवादी मुसलमानांच्या इतर सर्व मागण्या मान्य केल्या होत्या.

जीनांनी द्विराष्ट्रवादाचा तर्कशुद्ध निर्धाराने पाठपुरावा केला. व्हाइसरॉय यांना लिहिलेल्या पत्रात लाहोर ठरावाविरुद्ध जाईल अशी कोणतीही घोषणा ब्रिटिश सरकारने करू नये आणि मध्यवर्ती व गव्हर्नर-शासित सरकारांत मुसलमानांना हिंदूइतकाच (काँग्रेसइतकाच) हिस्सा असावा अशा मागण्या केल्या. काँग्रेस वर्किंग कमिटीने ७ जुलै १९४० रोजी केलेल्या ठरावात भारताला संपूर्ण स्वातंत्र्य देण्यात येईल अशी ब्रिटिश सरकारने घोषणा करावी आणि ह्या दिशेने टाकलेले पहिले पाऊल म्हणून मध्यवर्ती कायदेमंडळाला जबाबदार असणारे हंगामी राष्ट्रीय सरकार स्थापन करावे असे आवाहन काँग्रेसने केले. जीनांनी त्याला विरोध केला.

ऑगस्ट ८ व १४ ह्या दिवशी अनुक्रमे व्हाइसरॉय आणि भारतमंत्री एमरी यांनी महत्त्वाच्या घोषणा केल्या. लिन्‌लिथगो म्हणाले की, "भारताच्या राष्ट्रीय जीवनातील मोठे आणि समर्थ घटक ज्याचा अधिकार सरळ अमान्य करीत आहेत अशा शासनव्यवस्थेकडे भारतातील शांतता आणि भारताचे कल्याण ह्यांविषयीच्या आपल्या जबाबदाऱ्या संक्रांत करण्याचे मनात आणणे, किंवा अशी शासनव्यवस्थेला त्यांनी मान तुकवावी म्हणून त्यांच्यावर जबरदस्ती करण्यात सहभाग घेणे शाही (ब्रिटिश) सरकारला शक्य नाही हे सांगायलाच नको." एमरी ह्यांनी केलेले विधान असे की "ह्या घटकांतील सर्वप्रमुख घटक म्हणजे महान मुस्लिम जमात. ही ९ कोटी आहे आणि वायव्य आणि ईशान्य भारतात बहुसंख्य आहे, पण अल्पसंख्य म्हणून सबंध उपखंडात विखुरलेली आहे. धार्मिक व सामाजिक दृष्टिकोण, ऐतिहासिक परंपरा व संस्कृती ह्या बाबतीत ते आणि त्यांचे हिंदू देशबांधव यांच्यामधील भेद युरोपातील अशाच भेदांइतकेच खोल, कदाचित अधिक खोल आहेत." ह्या विधानांद्वारे ब्रिटिश सरकारने द्विराष्ट्रवाद मान्य केला आणि मुस्लिम लीगला घटनात्मक सुधारणांच्या बाबतीत नकाराधिकार (व्हीटो) दिला असा त्यांचा जीनांनी अर्थ लावला. तो गैर होता असे म्हणता येत नाही.

हळूहळू राष्ट्रवादी मुसलमानांत गळती सुरू झाली. अलाहाबाद समझोत्यावर सही केलेले मलिक बरकत अली, लियाकत अली खान, चौधरी खलिक उझमन आणि इतर अनेक नेते पाकिस्तानवादी आंदोलनात सामील झाले. अनेक प्रमुख खिलाफतवाद्यांनी त्यांचे अनुकरण केले. १९४० व ४१ मध्ये जवळजवळ प्रत्येक प्रांतातील मुस्लिम विद्यार्थी परिषदेने पाकिस्तानवरील आपल्या निष्ठेची ग्वाही दिली. १९४० च्या अखेरीपर्यंत बहुतेक सुशिक्षित मुसलमानांनी जीनांचे नेतृत्व स्वीकारले होते.

पाकिस्तानची धूसर संकल्पना हळूहळू आकार धारण करू लागली. जानेवारी १९४१ मध्ये मुंबई येथे केलेल्या एका भाषणात सर्व संबंधित पक्षांनी पाकिस्तानची योजना स्वीकारावी, आणि हिंदू व मुसलमान यांनी आपापल्या गृहभूमीमध्ये वसती करावी असे आवाहन जीनांनी केले. ह्याचा अर्थ लोकसंख्येची मोठ्या प्रमाणावरील अदलाबदल जीना यांना अभिप्रेत होती. फेब्रुवारी १९४१ मध्ये अखिल भार-

तीय मुस्लिम लीगच्या परराष्ट्र समितीने पाकिस्तानच्या योजनेचा तपशील प्रसिद्ध केला. तिच्याप्रमाणे भारतात तीन मुस्लिम राज्ये होणार होती. दिल्लीपर्यंत पसरलेले वायव्येकडील मुस्लिम राज्य, बंगाल व आसाम हे पूर्वेकडील राज्य आणि हैद्राबाद व वऱ्हाड मिळून बनलेले निजामाचे राज्य. एप्रिल १९४१ मध्ये मजलिस–इत्तेहद–उल्–मुसलमीन ही संघटना हैद्राबाद संस्थानात स्थापन करण्यात आली. तिच्या स्थापना-परिषदेत हैद्राबाद राज्याचे सार्वभौमत्व मुसलमानांत अधिष्ठित आहे आणि निजाम हे त्याचे प्रतीक आहे अशी घोषणा करण्यात आली. जीनांनी द्रविडिस्तानलाही आशीर्वाद दिला.

"ह्या उपखंडात दोन भिन्न समाज आहेत– मुस्लिम समाज आणि हिंदू समाज– आणि विशेषत: ह्या भूमीत आणखी एक राष्ट्र आहे– ते म्हणजे द्रविडिस्तान. ही भूमी खरे म्हणता द्रविडिस्तान आहे आणि कल्पना करा की ३ टक्के असलेले उच्चजातीय ब्राह्मण कौशल्याने खटपटी करून आणि निवडणुका लढविण्याच्या कुशल पद्धतींचा वापर करून बहुमत मिळवितात. ही लोकशाही आहे की तमाशा ( फार्स ) आहे ? म्हणून मला ब्राह्मणेतरांविषयी पूर्ण सहानुभूती आहे व मी त्यांना पूर्ण पाठिंबा देतो. मी तुम्हाला असे सांगतो की, तुम्हाला आपले स्वत्व प्रस्थापित करायचे असेल तर तुम्ही आपल्या संस्कृतीप्रमाणे, आपल्या भाषेप्रमाणे आपले जीवन जगले पाहिजे– हे अल्लाचे उपकार आहेत की हिंदी येथे फार पसरली नाही– आपल्या इतिहासाला अनुसरून तुम्ही जगले पाहिजे– तुम्ही पुढे चला. मला पूर्ण सहानुभूती आहे, तुम्हाला मी सर्व साहाय्य करीन आणि तुम्ही द्रविडिस्तान स्थापन करू शकाल आणि ७ टक्के मुसलमान प्रजा आपला मैत्रीचा हात पुढे करील आणि तुमच्या समवेत सुरक्षितता, न्याय आणि ऋजुता यांना अनुसरून जगेल."

असे विषारी जातीय विद्वेषाचे विघातक राजकारण जीना खेळत होते.

पाकिस्तानी चळवळीला मुसलमानांकडून विरोध होत नव्हता असे नाही; पण तो क्षीण होता. लाहोरला मार्च १९४१ मध्ये खान अब्दुल गफार खान ह्यांच्या अध्यक्षतेखाली जातीयताविरोधी परिषद झाली. तिच्यात पाकिस्तानची योजना देशद्रोही, राष्ट्रविरोधी आणि देशहिताच्या विरुद्ध आहे म्हणून तिचा धिक्कार करण्यात आला. आझाद मुस्लिम परिषदेने ९ मुसलमान संघटनांच्या वतीने पाकिस्तानविरोधी भूमिका व्यक्त केली आणि देशाचे राजकीय स्वातंत्र्य तांबडतोब मान्य करण्यात यावे अशी मागणी केली. पण ह्या ९ संघटना कोणत्या ह्याचा हिशोबही लागत नाही असे व्हाइसरॉयने भारतमंत्र्याला कळविले. जीनांची मुस्लिम लीग आणि सर्व मुस्लिम नेतृत्व यांवरील पकड अतिशय मजबूत होत गेली. व्हाइसरॉय ह्यांनी जेव्हा राष्ट्रीय संरक्षण मंडळावर पंजाब, बंगाल व आसाम यांच्या पंतप्रधानांची 'महान मुस्लिम जमातीचे प्रतिनिधी' म्हणून नेमणूक केली व जीनांना तसे कळविले तेव्हा मुस्लिम जमातीचा एकमेव प्रतिनिधी असलेल्या मुस्लिम लीगशी सल्लामसलत न करता अशी परस्पर नेमणूक केली म्हणून जीनांनी क्रोध व्यक्त केला आणि ह्या पंतप्रधानांना– शिकंदर हयतखान, फजलूल हक आणि सादुल्ला यांना– राजीनामा द्यायला भाग पाडले. पंजाबमध्ये शिकंदर हयतखान आणि बंगालमध्ये फजलूल हक मुस्लिम लीगची शिस्त पूर्णपणे पाळत होते असे नाही. पण ह्या प्रांतांत मुसलमानांचे असलेले बहुमत अल्प असल्यामुळे त्यांना तडजोडी कराव्या लागतात असा ह्याचा अर्थ जीनांनी लावला आणि मुसलमानांचे भरघोस बहुमत प्रस्थापित करण्यासाठी पंजाब व बंगाल ह्या प्रांतांची फाळणी करण्याकडे त्यांच्या मनाचा कल होऊ लागला. ह्याचा सुगावा अल्पसंख्य प्रांतांतील मुसलमानांना लागला तेव्हा त्यांच्या मनाला भीती चाटून गेल्याशिवाय राहिली नाही. खलिक उझामन ऑक्टोबर १९४२ मध्ये जीनांना लिहिलेल्या पत्रात म्हणतात, "शिवाय पाकिस्तानच्या कल्पनेमागील एक मूलभूत तत्त्व असे आहे की, हिंदू प्रांतांत जे मुसलमान असतील त्यांना अनुलक्षून मुस्लिम प्रांतांत (हिंदू) ओलीस ठेवावेत. जर आपण लक्षावधी हिंदूंना आपल्या प्रभावक्षेत्राच्या बाहेर जाऊ दिले तर अल्पसंख्य प्रांतांतील मुस्लिमांची सुरक्षितता खूपच कमी होईल."

अनुक्रमणिका

युद्धकाळात व्हाइसरॉय लिन्‌लिथगो हे खरा राजकारभार भारतीय पुढाऱ्यांच्या हाती देण्याला उत्सुक नव्हते. दीर्घकालीन दृष्टिकोणातूनही भारतातील ब्रिटिश सत्ता शक्य तितका काळ टिकवून धरावी असेच त्यांचे धोरण होते. पण १९४२ च्या सुमाराला युद्धपरिस्थिती इंग्लंड-अमेरिका यांच्या दृष्टीने बिकट झाली होती. भारतीय राजकीय पुढाऱ्यांना सरकारात सामावून घेण्यात आले तर युद्धप्रयत्नाला जोर येईल आणि हे युद्ध लोकशाही मूल्यांसाठी आहे हे त्याचे स्वरूपही स्पष्ट होईल ह्या विचाराने अमेरिका आणि ब्रिटिश मजूर पक्ष यांचे भारत सरकारने काँग्रेसशी समझोता करावा म्हणून दडपण वाढत होते. चीनचे नेते मार्शल चिआंग-कै-शेक यांनीही १९४२ मध्ये केलेल्या भारतभेटीत अशा आशयाचे आवाहन ब्रिटिश सरकारला केले होते. मुस्लिम लीगची कोणतीही तडजोड स्वीकारायला तयार नसलेली भूमिका ह्या दडपणाला तोंड देण्यासाठी भारतमंत्री व व्हाइसरॉय ह्यांना उपयोगी पडत होती. तरीही भारतात राजकीय समझोता घडवून आणण्यासाठी ब्रिटिश सरकारने पावले टाकावी ह्या अमेरिकन आणि अंतर्गत ब्रिटिश मागणीमागचा आग्रह वाढत असल्याने तिचे समाधान करण्याचा प्रयत्न आपण करीत आहोत असा देखावा करणे चर्चिल सरकारला आवश्यक वाटले. ब्रिटिश सरकारचे राजकीय सुधारणांविषयीचे काही प्रस्ताव घेऊन स्टफर्ड क्रिप्स मार्च १९४२ मध्ये भारतात आले. ह्या प्रस्तावांविषयी स्वतः भारतमंत्री एमेरी ह्यांची वृत्ती काय होती हे त्यांनी १० मार्चला लिन्‌लिथगो ह्यांना लिहिलेल्या पत्रातील एका विधानावरून स्पष्ट होते. " काँग्रेसविषयी बोलायचे तर सप्रूंनी सुचविल्यासारखे (म्हणजे कायदेमंडळाला जबाबदार असलेले) सरकार त्यांना मिळणार नाही आणि ( ह्या प्रस्तावांच्या ) घरट्यात कोकिळेचे पाकिस्तानी अंडे आहे तिची विरोधी प्रतिक्रिया अधिकच तीव्र होईल." क्रिप्स प्रस्तावांना काँग्रेसची मान्यता मिळणार नाही अशी एमेरी ह्यांची खात्री होती आणि ते त्यांना हवेही होते.

क्रिप्स प्रस्तावाचे दोन भाग होते. युद्धकाळापुरत्या भागात सर्व सत्ता विशेषतः संरक्षणविषयक बाबीविषयीची म्हणजे युद्ध चालविण्याविषयीची सत्ता व्हाइसरॉयच्या हातात केंद्रित राहणार होती; पण भारताच्या नैतिक, भौतिक व लष्करी सामग्रीचा युद्धप्रयत्नासाठी विनियोग व्हायला चालना मिळावी म्हणून व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव्ह काउन्सिलमध्ये भारतीय पुढाऱ्यांना प्रवेश मिळणार होता. युद्धसमाप्तीनंतर प्रांतिक निवडणुका घेऊन जे प्रतिनिधी निवडून येतील **त्यांनी** निवडून दिलेल्या सदस्यांची घटनासमिती स्थापन होणार होती. तिच्यात संस्थानिकांनी **नेमलेल्या** सदस्यांचा अंतर्भाव होणार होता. ब्रिटिश भारतातील प्रजेचे तिने अप्रत्यक्षरीत्या निवडलेल्या घटनासमितीतील सदस्यांशी जे प्रमाण असेल तेच संस्थानी प्रजेचे संस्थानिकांनी नेमलेल्या सदस्यांचे राहणार होते. ह्या घटनासमितीने बनविलेली राज्यघटना अमलात आणण्याचे अभिवचन ब्रिटिश सरकारने पुढील दोन अटींवर दिले होते : १) कोणत्याही प्रांताला किंवा संस्थानला नवीन भारतीय संघराज्यात सामील न होण्याचे स्वातंत्र्य राहणार होते. सामील न होणाऱ्या घटकांना ब्रिटिश सरकार स्वतःची राज्यघटना बनविण्यासाठी आवश्यक त्या सोयी उपलब्ध करून देणार होते आणि भारतीय संघराज्याशी समान दर्जा देणार होते. २) ब्रिटिश सरकारने वांशिक आणि धार्मिक अल्पसंख्याकांना संरक्षणाच्या ज्या हमी दिलेल्या आहेत त्यांना अनुसरून ह्या घटनासमितीशी किंवा घटनासमित्यांशी आवश्यक ते करारमदार करणार होते.

ह्या भावी राज्यघटनेविषयीच्या तरतुदींचे संभाव्य परिणाम काय होणार होते ? एमेरींच्या स्वतःच्या विवेचनानुसार भारताचे अनेक स्वतंत्र घटकांत भाग पडणार होते. 'हिंदू' भारत, वायव्येकडे आणि ईशान्येकडे दोन मुस्लिम राज्ये, सर्व संस्थानांचे मिळून बनलेले राज्य, डोंगराळ आदिवासी प्रदेशांचे राज्य ही स्वतंत्र राज्ये आणि ह्या कोणत्याही राज्याला स्वतःचे वेगळे लष्कर ठेवण्याचे सामर्थ्य असणे शक्य नसल्यामुळे संरक्षणाची जबाबदारी 'भारत सरकार'वर म्हणजे ब्रिटिश गव्हर्नर जनरलवर राहणार होती. भारतातील ब्रिटिश उपस्थिती कायम होणार होती.

क्रिप्स मसुद्याला काँग्रेसचा विरोध होता तो मुख्यत्वे दोन कारणांसाठी होता. एक, नजीकच्या भविष्यात युद्धप्रयत्नाला लोकांचा खराखुरा पाठिंबा

मिळविण्यासाठी लोकमान्य पुढाऱ्यांना नजीकच्या भविष्यामध्ये सत्तेत जो सहभाग मिळणे आवश्यक होते तो नाकारण्यात आला होता. आणि भविष्यातल्या घटनासमितीत आपले प्रतिनिधी नेमण्याचा संस्थानिकांना देण्यात आलेला अधिकार काँग्रेसला सर्वथैव अमान्य होता. भावी संघराज्यापासून फुटून निघण्याच्या प्रांतांना दिलेल्या स्वातंत्र्याबद्दल काँग्रेसने घेतलेली भूमिका अशी होती : "भारताचे स्वातंत्र्य आणि एकता ह्यांना काँग्रेस वाहिलेली आहे आणि ह्या एकतेचा कोणताही भंग हानिकारक ठरेल. त्याचा विचारही काँग्रेसला दु:खद आहे. तथापि कोणत्याही प्रादेशिक घटकाला त्याच्या जाहीर आणि प्रस्थापित इच्छेविरुद्ध भारतीय संघराज्यात रहायची सक्ती करावी असा विचार वर्किंग कमिटी करू शकत नाही; विभिन्न घटकांना एक समान आणि सहकार्याधिष्ठित राष्ट्रीय जीवन घडविण्याला साहाय्य करील अशी परिस्थिती निर्माण करण्यासाठी शक्य ते प्रयत्न केले पाहिजेत असे तिला वाटते."

जीनांनी क्रिप्स यांच्याबरोबर झालेल्या भेटीत योजनेविषयी पूर्ण समाधान व्यक्त केले. पण काँग्रेसने ती नाकारल्यानंतर भावी घटनासमितीच्या निवडणुकांच्या संदर्भात मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघाद्वारा आपले प्रतिनिधी निवडण्याचा अधिकार तिच्यात नाकारण्यात आला आहे ह्या कारणास्तव ती फेटाळून लावली. कारण जरी प्रांतिक कायदेमंडळांतील मुसलमान प्रतिनिधी स्वतंत्र मतदारसंघांतून निवडून येणार होते, तरी पुढे घटनासमितीवर सदस्यांना निवडून देण्यासाठी प्रांतिक कायदेमंडळांतील मुस्लिम व इतर सदस्यांचा मिळून एकच निर्वाचन-संघ ( इलेक्टोरल कॉलेज) बनणार होता. तसेच संघराज्यात एखाद्या प्रांताने सामील व्हायचे की नाही ह्याविषयी अंतिम निर्णय घेण्यासाठी ज्या सार्वमताची योजना होती तीतही स्वतंत्र मतदारसंघाला स्थान नव्हते.

ह्या कारणास्तव मुस्लिम लीगने क्रिप्स योजना फेटाळली. पुढे ही मुस्लिम लीगची नेहमीची चाल ठरली. कोणत्याही योजनेविषयी काँग्रेसने निर्णय घेतल्यानंतर मुस्लिम लीग निर्णय घेऊ लागली.

युद्धकालात जीनांची मुस्लिम लीग आणि ब्रिटिश ( भारतीय ) सरकार यांचे अनौपचारिक पण दृढ असे सहकार्य होते. भारतीय एकता टिकवून धरण्याचे महत्व एमेरी व लिन्लिथगो मधूनमधून प्रतिपादन करीत. जीनाही ब्रिटिश सरकारवर मधूनमधून कडक ताशेरे झाडीत. पण हे नाटक होते. आपली राजवट टिकवून धरायला ब्रिटिशांना लीग हा सच्चा सहकारी लाभला होता.

एप्रिल ८, १९४३ रोजी राजाजींनी गांधीजींच्या आशीर्वादाने लीगशी कायम समझोता करण्यासाठी म्हणून पुढील योजना जीनांकडे पाठविली. "वायव्य व पूर्व भारतातील ज्यांच्यात सरळ मुस्लिम बहुमत आहे अशा सलग जिल्ह्यांच्या सीमा निश्चित करण्यासाठी एक आयोग नेमण्यात येईल आणि फाळणीच्या प्रश्नावर तेथे सार्वमत घेण्यात येईल... जर बहुसंख्यांचा निर्णय सार्वभौम राज्य स्थापन करायला अनुकूल असेल तर तो अमलात आणण्यात येईल ... लोकसंख्येची अदलाबदल केवळ ऐच्छिक पायावर होईल." पण गांधीजींनी देऊ केलेले पाकिस्तान ही केवळ छाया, टरफल आहे, ते पांगळे, छिन्नविछिन्न, कसरीने खाल्लेले पाकिस्तान आहे अशी त्याची संभावना करून जीनांनी ते धुडकावून लावले. ते पांगळे, इ. होते; कारण त्यात पंजाब आणि बंगाल यांची फाळणी अभिप्रेत होती. पंजाबमध्ये पाकिस्तानची स्थापना झाल्यानंतर शीख, दलित, ख्रिस्ती, इत्यादिकांचे हितसंबंध सुरक्षित राहतील अशी आश्वासने ते देत होते. पाकिस्तानच्या भावी राजवटीचे स्वरूप काय असेल ह्याविषयी काही बोलून इतर धर्मीयांना बिथरवू नये असे आपल्या अनुयायांना सूचित करीत होते.

१० ऑगस्ट १९४५ ला जपानने शरणागती पत्करल्यानंतर युद्ध संपले. युद्धानंतरची पहिली निवडणूक लीगने अर्थात पाकिस्तानच्या मुद्द्यावर लढविली. साठ लक्ष मुस्लिम मतांपैकी ४५ लक्ष मते लीगला मिळाली. लीगेतर मुस्लिम पक्षांना— सिंधमधला जी. एम्. सैद यांचा पक्ष किंवा पंजाबमधील मुस्लिम युनियनिस्ट पक्ष— यांना मिळालेली मते पाकिस्तानविरोधी होती असे म्हणता येत नाही; कारण ह्या पक्षांनी पाकिस्तानला पाठिंबा दिला होता. बंगालमध्ये लीगला ८२ टक्के मते

पडली. मध्यवर्ती कायदेमंडळावर काँग्रेसचे जे ५७ उमेदवार निवडून आले, त्यांतील एकही मुसलमान नव्हता.

युद्धानंतर ब्रिटनमध्ये मजूर मंत्रिमंडळ सत्तेवर आले. ब्रिटिश सरकारची भारताविषयीची वृत्ती व धोरण बदलले. पंतप्रधान ॲटली ह्यांनी ब्रिटिश कॅबिनेटतर्फे एक 'मिशन' भारतात पाठविण्यात येईल अशी घोषणा ९ फेब्रुवारी १९४६ ला करताना संस्थाने आणि अल्पसंख्य ह्यांना भारताच्या स्वातंत्र्याच्या आड येऊ दिले जाणार नाही हे स्पष्ट केले. काँग्रेसने ह्या स्पष्टीकरणाचे स्वागत केले. जीनांनी अर्थात नापसंती व्यक्त केली.

२४ मार्चला त्रिसदस्य कॅबिनेट प्रतिनिधिमंडळ भारतात आले. निवडून आलेल्या लीग सदस्यांच्या एप्रिलमध्ये भरविलेल्या परिषदेत लाहोर ठरावाला मुरड घालून मुस्लिम लीगला एकच पाकिस्तान हवे असे जाहीर करण्यात आले. मुस्लिम प्रांत आणि उरलेले प्रांत ह्यांच्यासाठी दोन भिन्न घटनासमित्या स्थापन करण्यात याव्या, पाकिस्तान मान्य केल्याशिवाय हंगामी सरकार स्थापन करण्याचा प्रयत्न करण्यात येऊ नये अशा मागण्या करण्यात आल्या.

प्रारंभिक बोलण्यात कॅबिनेट मिशनने दोन पर्यायी योजना मांडल्या : एक योजना खंडित पाकिस्तानची, ज्याला जीनांनी टरफल म्हटले होते त्या पाकिस्तानची. दुसरी योजना तीन प्रांतसमूहांच्या (ब्लॉक) महासंघाची (कॉन्फेडरेशन); मुस्लिम प्रांतसमूह, इतर प्रांतसमूह आणि संस्थानांचा समूह. ह्या महासंघाच्या केंद्राकडे फक्त संरक्षण, परराष्ट्रव्यवहार आणि दळणवळणाची साधने एवढे विषय राहणार होते. मुस्लिम लीग, काँग्रेस व इतर पक्ष यांच्या पुढाऱ्यांशी बऱ्याच वाटाघाटी केल्यानंतर आपला निवाडा कॅबिनेट मिशनने जाहीर केला. ह्यांत पुढील तरतुदी होत्या. (१) प्रांतांची तीन गटांत विभागणी करण्यात आली. 'हिंदू' किंवा सामान्य प्रांत ह्यांचा 'A' गट (मुसलमान, शीख आणि 'सामान्य' (जनरल) एवढ्याच तीन जमाती कॅबिनेट मिशनने ओळखल्या होत्या.); वायव्य सरहद्द प्रांत, सिंध व पंजाब ह्यांचा 'B' गट; आणि बंगाल व आसाम ह्यांचा 'C' मुसलमानी गट. (आसाम हा मुस्लिम बहुसंख्य प्रांत नसतानाही त्याला मुसलमानी गटात ढकलले होते.) (२) ब्रिटिश भारताचे प्रांत आणि संस्थाने ह्यांचे मिळून बनलेले भारतीय संघराज्य असेल. संघराज्याचे स्वतःचे सरकार (एक्झिक्युटिव्ह) जसे असेल त्याप्रमाणे त्याचे कायदेमंडळही असेल. परराष्ट्रसंबंध, संरक्षण आणि दळणवळण एवढे विषय संघराज्याकडे असतील. संघराज्याला ह्या विषयांसाठी पैसा उभा करण्याचे अधिकार असतील. उरलेले सर्व विषय आणि अवशिष्टाधिकार प्रांतांकडे राहतील. संस्थाने ब्रिटिश आधिपत्यापासून मुक्त होतील आणि संघराज्याकडे सुपूर्द केलेले विषय वगळता इतर सर्व कारभार आणि अधिकार त्यांच्याकडे राहतील. (३) प्रांतांचे जे गट पाडण्यात आले होते त्या गटांची सरकारे आणि कायदेमंडळे असतील आणि गटाकडे कोणते समान प्रांतिक विषय सोपवावेत हे गटाने ठरवायचे आहे. (४) कोणत्याही प्रांताला त्याच्या कायदेमंडळाने बहुमताने तसा निर्णय घेतला तर प्रारंभीच्या दहा वर्षांनंतर व त्यानंतर दर दहा वर्षांनी घटनेचा पुनर्विचार करण्याची मागणी करण्याचा अधिकार राहील अशी तरतूद संघराज्याच्या व गटाच्या राज्यघटनेत असेल. (५) घटनासमितीत कायदेमंडळे आपले प्रतिनिधी निवडून पाठवतील. (६) 'जातीय नकाराधिकार' मान्य करण्यात येईल. कोणत्या ठरावामुळे जातीय प्रश्न उपस्थित होतो ह्याचा निर्णय घटनासमितीचे अध्यक्ष घेतील आणि त्या त्या जातीच्या सदस्यांनी बहुमताने तशी मागणी केली तर अध्यक्ष आपला निर्णय घेण्यापूर्वी फेडरल न्यायालयाची संमती घेतील. (७) घटनासमितीची प्राथमिक बैठक झाल्यानंतर A, B आणि C ह्या गटांचे प्रतिनिधी वेगवेगळे बसून प्रांतिक व आवश्यक वाटले तर गटाची राज्यघटना ठरवतील. (८) सबंध राज्यघटना तयार झाल्यानंतर कोणत्याही प्रांताला गटातून फुटता येईल; पण हा निर्णय नव्या राज्यघटनेखाली झालेल्या तरतुदीप्रमाणे निवडून आलेल्या प्रांतिक कायदेमंडळाने घ्यायचा असेल. (९) नवीन राज्यघटना अमलात येईपर्यंतच्या काळासाठी व्हाइसरॉय प्रमुख राजकीय पक्षांशी सल्लामसलत करून पूर्णपणे भारतीय असे हंगामी सरकार बनविण्याचा प्रयत्न करतील.

अनुक्रमणिका

कॅबिनेट मिशनच्या १६ मेच्या ह्या योजनेने जीनांना त्यांचे पाकिस्तान बहाल केले यात शंका नाही. पश्चिम आणि पूर्व पाकिस्तान संघराज्याकडे सुपूर्द केलेले विषय वगळून आपापली राज्यघटना बनवायला मोकळे झाले होते. हिंदू बहुमत असलेला आसाम बंगालला जोडण्यात आला होता. आसामला सक्तीने 'C' गटात कोंबण्यात आले होते. नव्या राज्यघटनेनंतर त्याला फुटून निघण्याचे स्वातंत्र्य होते; पण त्या राज्यघटनेत प्रमाणाधिक्य देऊन आसाममध्ये मुसलमानांचे आसामच्या कायदेमंडळात बहुमत राहील अशी व्यवस्था नव्या राज्यघटनेत मुस्लिम लीगला करता आली असती. ह्या कारणासाठी आणि संस्थानातील प्रजेला घटनासमितीवर आपले प्रतिनिधी निवडण्याचा अधिकार देण्यात न आल्यामुळे काँग्रेसला ही योजना नापसंत होती. कॅबिनेट मिशन योजनेप्रमाणे संस्थानांवरील ब्रिटिश आधिपत्य संपुष्टात येणार होते. ते भारतीय संघराज्याकडे संक्रांत होणार नव्हते. निजाम ह्याचा फायदा घेऊन स्वातंत्र्य जाहीर करणार होता आणि त्याचे तसे प्रयत्न होते हे काँग्रेसला माहीत होते. (हैद्राबादला दिवाण म्हणून नाझीमुद्दिन ह्या जीनांना पसंत असलेल्या लीग पुढाऱ्याची नेमणूक व्हावी आणि स्वतःची हंगामी सरकारात युद्ध-मंत्री म्हणून नेमणूक करून घ्यावी असा जीनांचा डाव होता) काँग्रेसला समर्थ आणि 'सेंद्रीय' असे मध्यवर्ती सरकार हवे होते. ते मिशनच्या योजनेत नव्हते. काँग्रेस ही योजना फेटाळून लावील अशी सर्वांची अपेक्षा होती.

जीनांच्या मागण्या केंद्र सरकारचे कायदेमंडळच असू नये आणि असलेच तर त्याच्यात पाकिस्तानी गट व हिंदुस्थानी गट ह्यांना समान प्रतिनिधित्व असावे, मध्यवर्ती मंत्रिमंडळातही दोन्ही गटांना समान प्रतिनिधित्व असावे अशा होत्या. त्या मान्य झाल्या नाहीत म्हणून त्यांनी योजनेचा शाब्दिक निषेध केला तरी आपल्याला हवे असलेले पाकिस्तान ह्या योजनेद्वारा मिळाले आहे हे त्यांना दिसत होते. तेव्हा सार्वभौम पाकिस्तान हे आपले साध्य आहे ह्याचा पुनरुच्चार करून आणि प्रांत, गट आणि संघराज्य ह्या पातळचांवरील राज्यघटना तयार झाल्यावर आपण आपले अंतिम मत व्यक्त करू असे जाहीर करून, नवी घटना तयार होईपर्यंत कधीही आपण हा निर्णय बदलण्याचे स्वातंत्र्य राखून ठेवत आहोत हे नमूद करून मुस्लिम लीगने योजना स्वीकारली. काँग्रेसने योजना फेटाळली तरी हंगामी सरकार स्थापन होईल असे आश्वासन त्यांनी व्हाइसरॉयकडून मिळविले होते. त्यात अर्थात सत्ता लीगची राहणार होती. काँग्रेसने योजना स्वीकारलीच तर काँग्रेसचे ५, लीगचे ५, आणि इतर २ असे मंत्री मंत्रिमंडळात असावेत असा जीनांचा आग्रह होता. तो मान्य झाला नाही हे खरे; पण व्हाइसरॉय जीनांचे इतर अनेक हट्टी आग्रह तत्परतेने पुरवीत आहेत हे काँग्रेसला दिसून येत होते. शिवाय काँग्रेस मिशनची योजना नाकारील व केवळ लीगच्या साहाय्याने हंगामी सरकार बनवावे लागेल अशी व्हाइसरॉयची अपेक्षा होती.

पण पटेल यांच्या सांगण्यावरून काँग्रेसने योजना स्वीकारली. जीनांचा डाव उधळला गेला. लीगने योजनेचा केलेला स्वीकार मागे घेतला आणि १६ ऑगस्ट हा पाकिस्तान मिळविण्यासाठी 'प्रत्यक्ष कृति'-दिन म्हणून पाळण्यात येईल असे जाहीर केले. लीगने योजना नाकारल्यामुळे आणि काँग्रेसने स्वीकारल्यामुळे नेहरूंना काँग्रेसच्या वतीने हंगामी सरकार बनविण्यासाठी पाचारण करण्यात आले. लीगच्या प्रत्यक्ष–कृति-दिवशी बंगालचे मुस्लिम लीगचे पंत-प्रधान सुऱ्हावर्दी यांच्या पुरस्काराने कलकत्त्यात हत्याकांड झाले आणि जातीय दंगलींच्या ज्वाला देशभर भडकू लागल्या. पूर्व बंगालमध्ये हिंदूंवर झालेल्या अत्याचारांचे मुरिएल लेस्टर यांनी केलेले वर्णन असे : " सर्वांत वाईट दुर्दशा बायकांची झाली. अनेकींना आपल्या नवऱ्यांचे खून झालेले आणि त्यानंतर आपल्याला सक्तीने बाटवून आपल्या नवऱ्यांच्या खुनाला जबाबदार असलेल्यांशी लग्न लावून दिलेले पहावे लागले. ह्या बायकांच्या चेहऱ्यावर प्रेतकळा आहे. ही निराशा नाही, निराशेत असतो तो जिवंतपणा तिच्यात नाही. तो केवळ काळोख आहे ... जाळपोळ आणि हिंसा ह्यांच्या ह्या थैमानाविषयी जे निश्चितपणे म्हणता येईल ते एवढेच की त्याच्यामागे खेडचातल्या लोकांनी उत्स्फूर्तपणे केलेले उत्थान नव्हते." मुस्लिम लीगच्या गुंडांची ती कारवाई होती.

ह्या दंगलीच्या पार्श्वभूमीवर, जीनांच्या नेतृत्वाखालील मुस्लिम लीगचा पाकिस्तानविषयीचा आग्रह ध्यानात घेता पाकिस्तान मान्य करण्याशिवाय इलाज नाही हे हळूहळू सर्वांना स्पष्ट होत गेले. लीगला हंगामी सरकारात आणण्याचे खूप प्रयत्न करण्यात आले आणि बऱ्याच वाटाघाटीनंतर लीग मंत्रिमंडळात आली. पण "पाकिस्तानचे आमचे जे वांछित साध्य आहे त्याच्या प्रीत्यर्थ लढण्यासाठी पाय रोवायला जागा हवी म्हणून आम्ही हंगामी सरकारात जात आहोत" असे गझनाफर अली यांनी जे स्पष्टीकरण केले ते यथार्थ होते हे लीगमंत्र्यांच्या वागणुकीवरून दिसून आले. घटनासमितीत लीग आलीच नाही. देशातील दंगली भडकत राहिल्या. अखेरीस पंजाब व बंगालची फाळणी करून मुस्लिम बहुसंख्य असलेल्या विभागांचे पाकिस्तान स्वीकारण्याशिवाय पर्याय नाही ह्या राष्ट्रीय सममतीवर (कॉन्सेन्सस) औपचारिक शिक्कामोर्तब व्हायचे काय ते बाकी राहिले. असले छिन्न पाकिस्तान जीनांना नको होते; पण देशाची फाळणी करायची तर प्रांताची फाळणी करावी लागेल ह्या निर्णयाबाबत काँग्रेस तडजोड करू शकणार नाही हे जीनांना माहीत होते. सबंध वांछित पाकिस्तान हवे असेल तर ते ब्रिटिशांच्या पाठिंब्यावरच मिळू शकेल, पण ब्रिटिश स्वतःच्या कारणांसाठी सत्तांतर करायला अधीर झाले आहेत ही परिस्थिती त्यांना दिसत होती.

३ जून १९४७ रोजी माउन्टबॅटन यांच्या पंजाब आणि बंगाल यांची फाळणी करून देशाची फाळणी करणाऱ्या व पाकिस्तानची निर्मिती करणाऱ्या योजनेला मान्यता देणारी भाषणे पंडित नेहरू व जीना ह्यांनी रेडिओवरून भारतीय जनतेला उद्देशून केली.

मागे वळून पाहता, द्विराष्ट्रवादाचा सिद्धांत जीनांनी एकाएकी निर्माण आणि प्रसृत केला असे मानणे गैर ठरेल. जीना द्विराष्ट्रवादाचे जनक नव्हेत. वरिष्ठ मुसलमानांत आपल्या धार्मिक व सांस्कृतिक अलगतेची भावना पहिल्यापासून होती. त्यांची पाळेमुळे जुन्या इस्लामी राजवटीत खोल गेलेली होती. त्यांची सत्ता, ऐश्वर्य, सामाजिक दर्जा ह्यांचा इस्लामी राजवट हा आधार होता. तो उलथून गेल्यावर त्यांनी ब्रिटिश राजवटीशी जुळवून घेतले. त्यांना भारतात लोकशाही नको होती, कारण तिच्यामुळे त्यांचे पारंपरिक विशेषाधिकार नष्ट होणार होते. ह्या बाबतीत त्यांचे व ब्रिटिशांचे हितसंबंध एक होते. म्हणून ब्रिटिशांनी मुस्लिम जातीयवादाला, अलगतेच्या भावनेला खतपाणी घातले आणि काँग्रेसच्या चळवळीला अटकाव करण्यासाठी तिचा उपयोग केला. मुस्लिम राजकारण हे लाचारीचे राजकारण होते; पुढारी ब्रिटिशांचे मिंधे होते.

१९३० पासून मुसलमानांत आधुनिक शिक्षणाचा पुरेसा प्रसार झालेला दिसतो. तेव्हा जुन्या जमीनदारी, जातीयवादी नेतृत्वाची जागा व्यावसायिक मध्यमवर्गीय, आधुनिक नेतृत्व घेईल, भारतीय राष्ट्रीयत्वाच्या व लोकशाहीच्या चौकटीत मुसलमानांनी आपले योग्य ते स्थान घ्यावे म्हणून प्रयत्न करील, मुस्लिम राजकारणाला विधायक वळण देईल अशी आशा होती. प्रथमपासूनच असा मतप्रवाह मुसलमानांत निर्विवादपणे होता व शेवटपर्यंत तो टिकून राहिला. पण तो नेहमीच क्षीण राहिला. हे का घडले ह्याचा शोध घ्यायचा तर मुस्लिम सांस्कृतिक परंपरेच्या वैशिष्ट्यांकडे वळावे लागेल.

ह्या संदर्भात जीनांची भूमिका विशेषेकरून ध्यानात घेतली पाहिजे. जीना आधुनिक, उदारमतवादी होते, हिंदू-मुस्लिम ऐक्याचे पुरस्कर्ते होते, त्यांचा विभक्त मतदारसंघाला विरोध होता, ते ब्रिटिश राजवटीच्या विरुद्ध होते, त्यांना भारतीय स्वातंत्र्य हवे होते असे म्हणण्यात येते. ह्या सर्व विधानांत तथ्य होते. पण उदारमतवादी लोकशाहीच्या विचारप्रणालीच्या अधिष्ठानावर जातीयवादी मुसलमानी नेतृत्वाला जीनांनी कधी विरोध केला नाही. जातीयवादी नेतृत्वाशी त्यांनी केवळ तडजोड केली नाही तर त्याच्या आश्रयाने आपले नेतृत्व त्यांनी टिकविले व वाढविले, अतिरेकी जातीयवादी मागण्यांचा ते सातत्याने पुरस्कार करीत राहिले. गांधीजींनी अंधश्रद्ध खिलाफती चळवळीला पाठिंबा दिला, घटनात्मक राजकारणाचा मार्ग सोडून जमावाचे राजकारण सुरू केले, म्हणून सेक्युलर जीना विटले व त्यांनी काँग्रेसचा त्याग केला असे अनेकदा म्हणण्यात येते; पण ते पूर्णपणे पोकळ आहे. जीना धर्मांध मुसलमानी नेतृत्वाबरोबर जन्मभर सुखाने

अनुक्रमणिका

नांदले. लिबरल पुढाऱ्यांना गांधीजींच्या जमावाच्या राजकारणाचा मनापासून तिटकारा होता. त्यांनी ह्या कारणासाठी गांधीजींना अखेरपर्यंत तत्त्वनिष्ठ विरोध केला. उलट, जीनांनी जमावाचे विधिनिषेध-शून्य आणि अत्यंत निर्घृण असे राजकारण केले. जीनांची वैयक्तिक जीवनातील नेकी प्रसिद्ध आहे. ती त्यांच्या राजकीय जीवनात उतरली नाही. सोयीचे असेल तेव्हा त्यांनी असत्याचा आश्रय घ्यायला कमी केले नाही.

लोकशाही येणार हे स्पष्ट झाले तेव्हा जातीय-वादी मुस्लिम मागणीचे स्वरूप द्विराष्ट्रवादाला अनुसरून राहिले. मध्यवर्ती सत्तेत हिंदूंएवढी समान भागीदारी आणि मुसलमानांच्या बाबतीत हस्तक्षेप करण्यापासून राज्यसंस्थेला आडकाठी. म्हणजे मुसलमानांनी जी तडजोड केली ती ही की मुसल-मानांचे हिंदूंवर राज्य असणार नाही; तर भारता-वर मुसलमान व हिंदू या दोन जमातींचे मिळून राज्य असेल आणि शिवाय ह्या देशात मुसलमानांचे स्वत:पुरते स्वायत्त राज्यही असेल. ह्याचा अर्थ असा की केंद्रसरकारपासून खेडेगावापर्यंत द्विदल सत्ता असेल. भारत भौगोलिक दृष्ट्या अभंग राहिला असता; पण तेथे दोन राष्ट्रांची, दोन भिन्न सत्तांची वसती राहिली असती. द्विराष्ट्रवादाचा दुसरा आवि-ष्कार म्हणजे मुसलमानांचे अलग सार्वभौम राज्य होणे. जीनांनी दोन्ही पर्याय शेवटपर्यंत रेटले. दुसरा पर्याय कितीतरी कमी हानिकारक म्हणून काँग्रेसने स्वीकारला. काँग्रेसने फाळणी स्वीकारली याचे ज्यांना वाईट वाटते ते फाळणी टाळण्यासाठी मुस्लिम लीगने मागितलेली किंमत ध्यानात घेत नाहीत. किंवा फाळणी कोणत्या स्वरूपात स्वीका-रावी एवढाच काँग्रेसपुढे पर्याय होता हे त्यांना समजत नाही. कितीही बौद्धिक बावळटपणा अंगी असला तरी जीनांना फाळणी खरोखर नको होती, ते त्यांचे 'बार्गेनिंग काउन्टर' होते, काँग्रेसने ती त्यांच्यावर लादली असे कुणी म्हणू शकणार नाहीत. केवळ भोंदू माणसे असे म्हणतील. §

§ ह्या लेखात नमूद करण्यात आलेली माहिती डॉ. रफीक झकेरिया यांच्या 'राइज ऑफ् मुस्लिम्स इन् इन्डियन पॉलिटिक्स' (सोमैय्या पब्लिकेशन्स, मुंबई, १९७२) आणि श्री. वसंतराव नगरकर यांच्या 'जेनेसिस ऑफ् पाकिस्तान' (अलाइड पब्लिशर्स, मुंबई, १९७५) ह्या पुस्तकांवरून घेतली आहे. लेखातील जवळजवळ प्रत्येक वाक्याला ह्या दोन पुस्तकांचे पृष्ठ-संदर्भ द्यावे लागतील आणि तळ-टीपांची गर्दी अनावर होईल ह्या भयाने ह्या एकाच खुलासेवजा तळटीपेवर भागवावे असा संशोधकाला न साजेसा निर्णय मी घेतला आहे. लेख संशोधनात्मक नसून संकलनात्मक असल्यामुळे ह्या निर्णयाने फारशी हानी झालेली नाही असा भरवसा वाटतो. जिज्ञासू वाचकांनी ह्या दोन पुस्तकांचा अभ्यास करावा अशा योग्यतेची ती आहेत.

० ० ०

# कॉंग्रेसची चळवळ आणि डॉ. आंबेडकरांचे राजकारण

वसंत पळशीकर

— १ —

लोकप्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धतीचा अंगीकार हिंदुस्थानात केला जावा अशी मागणी इंग्रजी शिक्षण घेतलेल्या वर्गाकडून पुढे येऊ लागली तेव्हा हिंदुस्थानावरील आपल्या राज्याची सुरक्षितता कशात आहे याचा शोध घेण्यास इंग्रज राज्यकर्ते व प्रशासक यांनी जारीने सुरुवात केली. हिंदुस्थानात अनेक धर्मांचे, वंशांचे लोक राहतात, आणि त्यांच्यात सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक अंतर आहे, त्यांच्या हितसंबंधांमध्ये विरोध व संघर्ष आहे या वस्तुस्थितीत त्यांना फार मोठे आश्वासन मिळाले. इंडियन नॅशनल कॉंग्रेसच्या स्थापनेच्या वेळी व्हाइसरॉय असलेल्या लॉर्ड डफरिन यांनी हिंदी समाजाचे रेखाटलेले चित्र लक्षात घेण्यासारखे आहे. डफरिन म्हणतात, 'हिंदुस्थान अनेकानेक पृथक राष्ट्रीय समूहांचा मिळून बनलेला आहे. वेगळे धर्म, वेगळे विधी व संस्कार, वेगवेगळ्या भाषा. इतकेच नाही तर, परस्परांमध्ये विसंवाद निर्माण करणारे पूर्वग्रह, एकमेकांमध्ये वितुष्ट निर्माण करणारे रीतिरिवाज व त्यांचे मूलस्रोत, आणि परस्परविरोधी ऐहिक हितसंबंध यांच्यामुळे हे लोकसमूह एकमेकांपासून अधिकच दुरावलेले आहेत. खेरीज प्रागैतिहासिक युगापासून ते थेट वर्तमान युगापर्यंत जे विभिन्न टप्पे मानवजातीने सुसंस्कृततेच्या व प्रगतीच्या वाटचालीत ओलांडले ते सर्व टप्पे वेगवेगळ्या समूहांच्या रूपाने जिवंत स्वरूपात येथे आढळतात.' 'विविधतेत एकता' हे भारतीय समाज व संस्कृती यांचे गुणवैशिष्टच आहे असे सांगण्यासाठी डफरिन यांनी हा प्रपंच केलेला नव्हता हे सांगावयास नको. हिंदुस्थान हे एक राष्ट्र आहे असे समजून त्यास स्वराज्याचे अधिकार देणे कसे अशक्य, अव्यवहार्य व अहितकर आहे, येथे इंग्लंडच्या धर्तीची जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धती अंगीकारणे कसे चुकीचे होईल, हे दाखवून देण्यासाठी हा सारा प्रपंच होता.

मुसलमान, पारशी, ज्यू, अँग्लो-इंडियन, हिंदी, ख्रिश्चन या जमाती भिन्नधार्मिक असल्याने त्यांचे वेगळेपण चटकन ठसण्यासारखे व मान्य होण्यासारखे होते. पण यांच्या वेगळ्या, पृथक 'राष्ट्रीयत्वा'वर भर देणे पुरेसे नव्हते. कारण उर्वरित समाजाचे आकारमान पुरेसे मोठे होते. राष्ट्रसभेची चळवळ ही प्रथमपासूनच सर्वसमावेशक होती. तरीपण, स्वाभाविकपणे, हिंदू समाजाचे या संघटनेच्या अनुयायांमधील आधिक्य मोठे होते. तेव्हा, केवळ अन्यधर्मीय जमातींच्या पृथक्पणावर भर देऊन न थांबता, 'हिंदू' म्हणून ओळखला जाणारा समाजही कसा एकसंध नाही; या एका हिंदू समाजाच्या पोटातही खरे तर पृथक अशा जमाती असून त्यांच्यात एकराष्ट्रीयत्व निर्माण होणे कसे अशक्य आहे, हे दाखवून देण्यावर तेवढाच भर दिला जाऊ लागला. हिंदू समाज जातिव्यवस्थाधिष्ठित आहे या वस्तुस्थितीचा या कामी इंग्रज राज्यकर्त्यांनी पुरेपूर उपयोग करून घेतलेला दिसतो.

भारतातील कोणत्याही प्रदेशात ज्या अनेकानेक जाती आढळतात त्या सर्वांची उत्पत्ती एकाच पद्धतीने झाली असे म्हणणे शक्य नाही. पण एक गोष्ट खरीच की, एकेक जात-उपजात म्हणजे एकेक पृथक वांशिक-सांस्कृतिक टोळीसमान वा लोकसमूह असे जरी नसले तरी, मुळात एक असलेल्या लोकसमूहाचे तुकडे असे जातींचे स्वरूप नाही; अनेक पृथक वांशिक-सांस्कृतिक ( एथ्निक ) लोकसमूह/टोळीसमाज यांच्या एकत्र बांधणीमधून जात्यधिष्ठित भारतीय समाज आकारास आला असला पाहिजे. या घटनेकडे दोन प्रकारे पाहता येते. मुळात कधीकाळी पूर्णतः वेगळ्या असलेल्या लोकसमूहांच्या पृथकपणावर जोर देता येतो किंवा जातपातीच्या विषम व श्रेणीप्रधान व्यवस्थेच्या आधारे का होईना, पण त्यांच्या

अनुक्रमणिका

साह्याने एका समाजाची बांधणी झाल्यामुळे आलेल्या एकात्मतेवर भर देता येतो. जातिभेदांमधील उच्चनीचता व कनिष्ठ जातीयांवरील अनेक निर्बंध दूर करून भविष्यात आणखी एकात्म असा समाज निर्माण करण्याची भूमिका काँग्रेसच्या नेत्यांनी अंगीकारलेली होती. तर पृथक्‌पणावर जोर देऊन, एकाच समाजाचे हे घटक आहेत हे मान्य न करण्याकडे इंग्रज राज्यकर्ते व सनदी प्रशासक यांचा कल होता.

हिंदू समाजातील विविध जातिजमातींनी आपल्या वेगळेपणावर भर देऊन फुटीर भूमिका घेतली तर काँग्रेसची चळवळ अटळपणे दुबळी बनणार ही गोष्ट इंग्रजांनी ओळखली होती. मुसलमानांना काँग्रेसच्या चळवळीपासून वेगळे करण्यासाठी त्यांना विशेष परिश्रम घ्यावे लागले नाहीत. मुसलमानी राजवटींच्या कालखंडापासून राजकीय सत्तेच्या मुद्द्यावरून येथील हिंदू व मुस्लिम समाजांतील वरिष्ठ वर्गीयांमध्ये स्पर्धा, तणाव व संघर्ष होताच. नव्या इंग्रजी राज्यात शिक्षण व नोकऱ्याचाकऱ्या, व्यवसाय या क्षेत्रांतील आघाडीच्या आधारे व त्याहीपेक्षा बहुसंख्येच्या जोरावर, हिंदू समाज राजकीय सत्तेच्या क्षेत्रात आपणावर कुरघोडी करील या वरिष्ठवर्गीय मुसलमानांच्या मनातील भयाला चुचकारून, त्याला खतपाणी घालून फुटीर मुस्लिम राजकारणाला इंग्रज राज्यकर्त्यांनी लौकरच बळकटी आणली.

हिंदू समाजातील जाती व पंथभेदांचीही त्यांनी अशा प्रकारे दखल घेतली की ज्यामुळे फुटीर राजकीय अस्मितेचा व मागण्यांचा परिपोष व्हावा. दशवार्षिक जनगणना करीत असताना जातिजमाती व पंथ यांची जेवढी वेगवेगळी नोंद करता येईल तेवढी करण्यामागे केवळ समाजशास्त्रीय/मानववंशशास्त्रीय जिज्ञासा व ज्ञानलालसा नव्हती. या सर्व उपक्रमाला एक निश्चित राजकीय टोक होते. एका विचारप्रणालीचे (आयडियालॉजी) जनगणना हे हत्यार होते. मोर्ले-मिंटो सुधारणांच्या वेळी इंग्रज राज्यकर्त्यांच्या ध्यानात आले की, जबाबदार लोकप्रातिनिधिक राज्यपद्धती प्रस्थापित करण्याच्या दिशेने होणारी वाटचाल आपण आता रोखू शकणार नाही; तिची गती धिमी राहील हे आपण फार तर पाहू शकू. घटनात्मक सुधारणांचे हप्ते दर आठ-दहा वर्षांनी द्यावे लागणारच; पण ते देत राहूनही खरी सत्ता आपल्याच हाती कायम राहावी या दृष्टीने कोणत्या क्लृप्त्या करता येतील याचा विचार ते करू लागले तेव्हा हिंदी समाजातील भेदाभेद हा एक अत्यंत उपयुक्त मुद्दा आहे ही गोष्ट त्यांनी हेरली. त्यांनी असे एक वातावरण निर्माण केले जे स्वतःच्या जातिजमातीचे पृथकपण, आणि एक ना एक प्रकारचे 'मागासलेपण' वा 'कमकुवतपण' पुढे करून जादा प्रमाणात प्रतिनिधित्व मागण्यास जातिजमातींना उद्युक्त करील. याचा एक परिणाम सरळच असा होता की, सर्वांना विशेष प्रकारची वागणूक व प्रमाणाबाहेर प्रतिनिधित्व देऊन झाल्यावर उरतील तेवढ्याच जागा 'सर्वसाधारण' या कोटीत काँग्रेससारख्या चळवळीच्या आटोक्यात राहतील. काँग्रेसला ज्या जागा जिंकणे सहज शक्य आहे त्या जागा कमी करूनच इतरांना दिल्या जायच्या असल्याने असे सर्व समूह व त्यांचे प्रतिनिधी हे काँग्रेस व काँग्रेसची चळवळ यांना विरोधी राहण्याची शक्यता अधिक होती. इतकेच नाही तर, उद्या ब्रिटिश येथून गेले व स्वराज्य मिळाले की प्रमाणाबाहेर विशेष प्रतिनिधित्व टिकून राहीलच अशी खात्री देता येत नव्हती. असे विशेष प्रमाणातील प्रतिनिधित्व हे ब्रिटिश राजवटीच्या कृपेनेच टिकून राहणार हे माहीत असल्याने, ब्रिटिशांचे राज्य येथे टिकून राहण्यात या समूहांचा स्वार्थी हितसंबंध तयार होत होता. म्हणजे हिंदी समाजातील भेदाभेदांवर जोर देणे, वेगळे व प्रमाणाबाहेर प्रतिनिधित्व मिळावे म्हणून मागणी पुढे करण्यास प्रोत्साहक वातावरण निर्माण करणे यांमुळे एका बाजूला काँग्रेसच्या चळवळीला खीळ घालणे आणि दुसऱ्या बाजूला ब्रिटिश राजवटीवर परावलंबन वाढविणे या दोन्ही गोष्टी साधल्या जाणार होत्या.

घटनात्मक सुधारणांचा हप्ता मिळणार असे १९१७ च्या आसपास स्पष्ट झाल्यानंतर हिंदुस्थानातील वेगवेगळ्या जातिजमाती आपल्यासाठी विधिमंडळांमध्ये खात्रीशीर प्रतिनिधित्व मिळविण्याच्या दृष्टीने तयारीस लागल्या. आपल्यापुरतेच पहावयाचे या मर्यादेत त्या विचार करीत असल्याने, लोकसंख्येतील प्रमाणापेक्षा काकणभर अधिकच

प्रतिनिधित्व मिळाले पाहिजे अशी मागणी करणे जातिजमातीय पुढाऱ्यांना योग्यच वाटले. अशी मागणी समर्थनीय ठरण्याच्या दृष्टीने कोणता युक्तिवाद पुढे करावा याचा पाठ मुस्लिम नेतृत्वाने सर्वांसाठी घालून दिलेलाच होता.

अस्पृश्य समाजाचा कैवार घेऊन भारतीय राजकारणाच्या मंचावर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा प्रवेश या प्रसंगाने झाला.

– २ –

माँटेग्यू-चेम्सफर्ड (घटनात्मक) सुधारणांनुसार विधिमंडळाची पुनर्रचना करीत असताना मताधिकार कोणास द्यावा व कोणत्या जातिजमातीस किती व कोणत्या पद्धतीने प्रतिनिधित्व द्यावे याचा विचार करण्यासाठी साऊथबरो कमिटीची नेमणूक झालेली होती. या कमिटीपुढे आंबेडकरांची २७ जानेवारी १९१८ रोजी साक्ष झाली. या कमिटीस डॉ. आंबेडकरांनी एक विस्तृत लेखी निवेदन आधीच सादर केले होते. हे निवेदन व ही साक्ष यांच्या आधारे आंबेडकरांची हिंदी राजकारणातील भूमिका समजावून घेता येते व तशी ती समजावून घेणे महत्त्वाचे आहे.

लॉर्ड डफरिन यांनी हिंदी समाजाचे रेखाटलेले चित्र बाबासाहेब आपल्या लेखी निवेदनाच्या आरंभालाच उद्धृत करतात व त्यास आपली स्वीकृती देतात ही गोष्ट महत्त्वाची आहे. आंबेडकरांचा युक्तिवाद तपशीलामध्ये जाऊन चिकित्सक दृष्टीने तपासून तो खोडून काढता येणार नाही अशातली गोष्ट नाही. पण येथे त्यांची भूमिका जाणून घेणे हेच उद्दिष्ट असल्याने तेवढ्या खोलात जाण्याचे कारण नाही. मुसलमान, पारशी, ख्रिश्चन, ज्यू या जमाती जशा व जेवढ्या एकमेकांपासून पृथक आहेत तेवढेच व त्याच प्रकारचे पृथकपण (आणि अंतर व दुरावा) सवर्ण व अवर्ण हिंदू यांच्यात आढळतो असे म्हणून हिंदू या नात्याने ते एकच होत असे न धरता, वेगळे समाज म्हणून त्यांची दखल घेतली पाहिजे असे ते म्हणतात. एखादा समाज एकजिनसी कधी असतो ? जेव्हा त्या समाजातील व्यक्ती व गट यांच्यातील भेदाभेदांच्याही पलीकडे जाऊन पोचणारे असे मनाचे एकसारखेपण समाजातील सर्वांच्या ठायी आढळते आणि याच्या आधारे त्यांच्यात मोकळा संवाद होऊ शकतो तेव्हा तो समाज एकजिनसी समाज म्हणता येतो, असे आंबेडकरांचे प्रतिपादन आहे. या कसोटीवर, सारे मुसलमान, ज्यू, पारशी, ख्रिश्चन हे जसे एक म्हणता येतात तसे सारे हिंदू एक आहेत असे म्हणता येत नाही. सवर्ण व अवर्ण यांच्यात अनुल्लंघनीय असे अंतर व दुरावा आहे असे त्यांचे म्हणणे.

अशा बहुजिनसी हिंदी समाजाला जर लोकप्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धती बहाल करावयाची म्हटली तर, विविध पृथक समाजांमधील व्यक्तींना राज्य करण्याच्या कामी समानत्वाने सहभाग देता येण्याच्या दृष्टीने कोणती व्यवस्था असायला हवी, हा प्रश्न आंबेडकर उपस्थित करतात. प्रादेशिक मतदारसंघ हे एकजिनसी समाजात ठीक आहेत; बहुजिनसी समाजात ते निकामी ठरतात. का तर अशा समाजात मतदार मत देताना योग्य उमेदवारास मत देत नाहीत, तर ते आपल्या जातीच्या/जमातीच्या उमेदवारास मत देतात. त्यामुळे बहुसंख्याक जातिजमातींमधूनच दर वेळी प्रतिनिधी निवडून जाणार व त्याच जातिजमाती राज्यकर्त्या बनणार; राज्यसत्तेवर काही मोजक्या जातिजमातींची मक्तेदारी प्रस्थापित होणार. आंबेडकर म्हणतात, 'प्रादेशिक मतदारसंघ जबाबदार प्रातिनिधिक राज्यसत्ता प्रस्थापित करण्यात अपयशी व असमर्थ ठरतात कारण अल्पसंख्याक समाजातील व्यक्तींची प्रतिनिधी म्हणून निवड अशा व्यवस्थेत होत आही.'

त्यांचे पुढे असे म्हणणे होते की, सर्वसाधारण मतदारसंघांमधून जर वेगवेगळ्या जातिजमातींना प्रमाणशीर प्रतिनिधित्व प्राप्त व्हावयाचे असेल तर त्या त्या जातिजमातींमधील मतदारांची संख्या पुरेशी मोठी असायला हवी; इतकी मोठी की केवळ आपल्या जातिजमातीच्या मतदारांच्या मतांच्या भरवशावर त्या जातिजमातीमधील उमेदवार निवडून यावा. यासाठी एकेका मतदारसंघामधून अनेक प्रतिनिधी निवडून देण्याची व्यवस्था अंगीकारली पाहिजे आणि मताचा अधिकार त्या त्या जातिजमातीमधील पुरेशा लोकांना मिळण्याच्या दृष्टीने त्यासाठीच्या कसोट्या जातिजमातीनुसार वेगवेगळ्या कमीजास्त असायला पाहिजेत. ही पद्धती स्वीकारल्यास सामान्यतः विभक्त मतदारसंघांची गरज पडणार नाही. पण

अस्पृश्यांच्या बाबतीत विभक्त मतदारसंघांची गरज अशासाठी आहे की, स्पृश्य व अस्पृश्य यांचा जर एकच मतदारसंघ असला तर, अस्पृश्य मतदार पुरेशा मोठ्या संख्येने निर्माण केले तरी, अस्पृश्यही स्पृश्य उमेदवारांनाच मतदान करतील, कारण त्यांच्या मनावर संस्कारच असे असतात की आपण अस्पृश्य लायक नाही. आणि स्पृश्यांच्या मनावर तर, आपल्याशिवाय अन्य कोणी लायक नाही, असा दृढ संस्कार असतो. म्हणून अस्पृश्य मतदार अस्पृश्य उमेदवारांनाच निवडून देतील याची खात्री करून घ्यावयाची असेल तर इतर कोणाला नाही तरी अस्पृश्यांना विभक्त मतदारसंघ दिले पाहिजेत.

सवर्ण हिंदू समाजातील व्यक्ती अस्पृश्य समाजाला कधीच न्याय देणार नाहीत असे प्रतिपादन बाबासाहेबांनी याच वेळी केलेले आढळते. कॉंग्रेसविषयी ते लिहितात, "राजकारणात जहाल सुधारक आणि समाजकारणात प्रतिगामी सनातनी असा ज्यांचा पिंड आहे अशा व्यक्तींचाच कॉंग्रेसमध्ये प्रामुख्याने भरणा आहे." ते पुढे म्हणतात, "कॉंग्रेस ही अशा रीतीने, अराष्ट्रीय वा राष्ट्रीयतेच्या आड येणारीच संघटना असल्याने जातजमातविशिष्ट विभक्त मतदारसंघ असावेत की नाही यासंबंधी तिच्या मतांची गंभीर दखल घेण्याइतकी त्यांची लायकी नाही." अस्पृश्यांविषयी आत्मीयता वाटणारे, त्यांच्या उद्धारासाठी झटणारे सवर्ण हिंदू नाहीत असे नाही. पण ते अगदी हाताच्या बोटांवर मोजण्याइतके थोडे असून साऱ्या सवर्ण समाजाचे वळण बदलण्याचे सामर्थ्य त्यांच्या ठायी नाही, असे आंबेडकर म्हणतात. कॉंग्रेस संघटनेमध्ये सनातनी विचारप्रणालीचा प्रभाव वाढत आहे, याकडे ते लक्ष वेधतात.

अस्पृश्य समाजाची आर्थिक व सामाजिक स्थिती सुधारावी एवढे मर्यादित उद्दिष्ट आंबेडकरांनी डोळ्यांसमोर ठेवले नव्हते. त्यांना अस्पृश्य समाजाला राज्यसत्तेमध्ये सहभाग मिळावयास हवा होता आणि त्यासाठी विधिमंडळांमध्ये अस्पृश्य प्रतिनिधींचे व मताचे वजन पडेल इतक्या प्रमाणात त्यांना जागा दिल्या जाव्यात अशी त्यांची मागणी होती. अस्पृश्य समाजामध्ये उच्च शिक्षितांचे प्रमाण अत्यल्प असले तरी, मतदानाचा अधिकार व्यापक प्रमाणावर अस्पृश्यांना देण्यास काही प्रत्यवाय नव्हता. किंबहुना, अस्पृश्यांचे राजकीय शिक्षण करण्याच्या दृष्टीने व्यापक मताधिकार देणे इष्ट व आवश्यक होते.

बाबासाहेबांनी घेतलेल्या भूमिकेसंबंधी तीन गोष्टी सांगता येतील. अस्पृश्य समाज ही मुस्लिम, ख्रिश्चन, पारशी, ज्यू यांच्याप्रमाणेच एक अगदी वेगळी जमात आहे; तांत्रिकदृष्ट्या यांनाही हिंदू म्हणूनच गणले जात असले तरी, त्यांच्यात त्यांना कोणतीच एकात्मता आढळत नाही. दुसरी गोष्ट, अस्पृश्यांखेरीज अन्य कोणीही, विशेषतः सवर्ण हिंदू, अस्पृश्य उमेदवारांना कधीही निवडून देणार नाहीत, याविषयी ते ठाम होते. आणि कॉंग्रेसवर त्यांनी पुरता अविश्वास व्यक्त केला, ही तिसरी गोष्ट.

बहुप्रातिनिधिक सर्वसाधारण मतदारसंघ व राखीव जागा ही व्यवस्था स्वीकारूनही अस्पृश्य प्रतिनिधी विधिमंडळांमध्ये जाऊ शकले असते, पण बाबासाहेबांनी अस्पृश्यांसाठी विभक्त मतदारसंघ मागितले. मुसलमान समाजाला प्रमाणाबाहेर जागा व विभक्त मतदारसंघ आधीच मिळालेले असल्याने, इतर सर्व आकांक्षी जातिजमाती त्या समाजाच्या पावलावर पाऊल टाकूनच आपल्या मागण्या सादर करीत होत्या. आंबेडकरही तसेच करीत असलेले आढळतात.

राखीव जागा, विभक्त मतदारसंघ यांची मागणी करणाऱ्या जातिजमातींना आपल्या मागणीच्या समर्थनार्थ भारतीय समाजामध्ये एकराष्ट्रीयत्वाचा अभाव आहे यावर भर देणे जसे अनिवार्य होते, तसेच एकराष्ट्रीयत्वाच्या परिपोषासाठी सर्वसाधारण व संयुक्त मतदारसंघांचेच प्राधान्य एकंदर व्यवस्थेत राहिले पाहिजे व वाढले पाहिजे अशी भूमिका घेणाऱ्या कॉंग्रेसच्या विरोधात उभे राहणेही आवश्यक वाटत होते. कॉंग्रेस ही खऱ्या अर्थाने राष्ट्रीय संघटना नाहीच, ती केवळ एक हिंदू संघटना आहे असे मुस्लिम नेत्यांचे आग्रही प्रतिपादन होतेच. मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांच्या वेळी, कॉंग्रेस ही सर्व हिंदूंची पण संघटना नाही, ती फक्त सवर्ण हिंदूंची आहे वा ती फक्त ब्राह्मण व तत्सम उच्चवर्णीयांची संघटना आहे, असे तेवढेच आग्रही प्रतिपादन केले जाऊ लागले.

आंबेडकरांनी आपल्या राजकीय कारकीर्दीच्या अगदी आरंभीच, अशा रीतीने, काँग्रेसविरोधी भूमिका घेतली.

— ३ —

१९२० साली कोल्हापूर जिल्ह्यातील माणगाव येथे आणि नागपूर येथे अस्पृश्यांच्या परिषदांमध्ये डॉ. आंबेडकरांनी भाग घेतला. कोल्हापूरच्या राजर्षी शाहू महाराजांनी त्यांना राजकीय व्यासपीठ मिळवून देण्यात आणि त्यांचे पुढारीपण प्रस्थापित करण्यात महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली. टिळकपक्षीय काँग्रेसच्या चळवळीच्या विरोधात समर्थ ब्राह्मणेतर चळवळ उभी राहावी यासाठी शाहू महाराजांचे प्रयत्न होते, आणि या कामी होतकरू व्यक्ती हेरून त्यांना सर्व प्रकारे साहाय्य करण्याची त्यांची भूमिका होती. या काळी महाराष्ट्रातील काँग्रेस ही टिळकपक्षीयांच्या हाती होती आणि टिळकपक्षाचे वळण सनातनी व ब्राह्मणी होते. आक्रमक वृत्ती व अहंमन्यताही भरपूर होती. 'राजकारणात बंडखोर व समाजकारणात प्रतिगामी' हे आंबेडकरांनी त्यांचे केलेले वर्णन योग्यच होते. ही स्थिती ध्यानात घेता राजकीय कारकीर्दीची सुरुवात बाबासाहेबांनी काँग्रेसविरोधक म्हणून करावी याचे नवल उरत नाही. टिळकांचा काँग्रेससंघटनेवर वरचष्मा प्रस्थापित झाल्यामुळे १९१८ मध्ये प्रागतिकांनी (लिबरल) काँग्रेसचा त्याग करून आपली वेगळी संघटना स्थापन केली होती ही गोष्टही येथे ध्यानात घेणे आवश्यक आहे. पण १९२० ते १९३० या काळात काँग्रेसचे बदलते वळण लक्षात घेऊनही आंबेडकरांनी आपली भूमिका का बदलली नाही?

हिंदी राजकारणात व काँग्रेस संघटनेत महात्मा गांधींचा प्रवेश १९१६–१९१७ साली झाला. अंशतः त्यांच्या प्रभावाखाली १९१७ च्या अधिवेशनात अस्पृश्यतानिवारणाचे महत्त्व विशद करणारा ठरावही पसार झाला. तरी परंतु, १९२० सालापावेतो लाला लजपतराय, लोकमान्य टिळक यांच्या तुलनेने गांधींचे स्थान कनिष्ठच होते. खिलाफत प्रकरण व जालियनवाला हत्याकांड या मुद्द्यांवरून उभारलेल्या असहकार आंदोलनामुळे १९२० च्या अखेरीस काँग्रेस-संघटना गांधींच्या प्रभुत्वाखाली निर्विवादपणे आली. हिंदू-मुस्लिम ऐक्य, अस्पृश्यतानिवारण, दारिद्र्यनिर्मूलन यांच्याखेरीज स्वराज्य अर्थपूर्ण ठरणार नाही यावर त्यांनी १९१५ पासूनच भर दिला होता. अहमदाबादजवळ स्थापन केलेल्या आश्रमाच्या नियमांनुसार अस्पृश्यता पाळणाऱ्यास प्रवेश निषिद्ध मानलेला होता. अस्पृश्य कुटुंबास आश्रमात प्रवेश देण्याच्या मुद्द्यावरून, असहमती असेल तर, गांधींनी खुद्द आपल्या पत्नीसही— कस्तुरबांना— आश्रम सोडून जाण्यास सांगितले होते. या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी, सनातनी वळणाच्या उच्चवर्णीय हिंदू नेत्यांचे काँग्रेस संघटनेतील स्थान व त्यांचे पुढारीपण लगोलग काढून घेण्याची भूमिका गांधींनी अंगीकारली नाही. देशभरच्या जिल्हा व प्रांतिक पातळीवरील काँग्रेस समित्यांचा कारभार हाती घेऊ शकतील असे नव्या विचारांशी बांधिलकी असलेले नेतृत्व जागोजाग पुरेशा संख्येने निर्माण झालेले नसताना असा आग्रह ठेवणे व्यवहार्य ठरले नसते. चळवळीच्या अनुभवातून अनेकानेक जुन्या काँग्रेस पुढाऱ्यांची व कार्यकर्त्यांची वैचारिक बैठक बदलण्याची आकांक्षा त्यांनी बाळगली. एका महाराष्ट्राचे उदाहरण घेतले तरी आपणांस असे आढळते की, टिळकांचे कित्येक तरुण सहकारी व अनुयायी यांच्या भूमिकेत गांधींनी १९२० ते १९३० या काळात परिवर्तन घडवून आणले, तसेच नवे नेतृत्वही निर्माण केले. पण याची काही किंमतही गांधींना मोजावी लागली. त्यांचे विचार व व्यक्तिगत आचरण सामाजिक, आर्थिक व राजकीय तिन्ही अंगांनी क्रांतिकारक व बंडखोर होते. पण आपल्याएवढी बंडखोर भूमिका घेण्याची तयारी नसलेले सहकारी व अनुयायी यांच्या सहकार्याने राजकीय स्वातंत्र्यप्राप्तीचे राजकारण करण्याची किंमत म्हणून त्यांना सामाजिक व आर्थिक मुद्द्यांवरूनचे आपल्या सहकारी व अनुयायी यांचे प्रतिगामी वागणे, बोलणे खपवून घ्यावे लागले.

या देशात राजकीय स्वातंत्र्याचे राजकारण यशस्वीपणे व व्यवहार्यपणे करावयाचे तर, 'फोडा व झोडा' या ब्रिटिशांच्या राजनीतीचे सतत भान ठेवून, तीवर मात करणारे 'बेरजे'चे, आघाडीचे राजकारण करावयास हवे, अशी गांधींची रणनीती होती. कामगार विरुद्ध भांडवलदार, जमीनदार विरुद्ध कुळे, ब्राह्मण विरुद्ध ब्राह्मणेतर, सवर्ण विरुद्ध

अस्पृश्य, हिंदू विरुद्ध मुसलमान, शीख, अँग्लो-इंडियन इत्यादी प्रकारे जेवढ्या म्हणून अंगांनी हिंदी समाजात फूट पडणे शक्य होते तेवढी ती पडत राहावी यात ब्रिटिश राजवटीचा सरळ सरळ हित-संबंध होता. परक्या शत्रूबरोबरच्या सामन्याच्या प्रसंगी आपण सर्व एकत्र एकशेपाच हीच योग्य भूमिका व नीती असू शकते, ही गांधींची धारणा असल्याने ज्या कार्यक्रमांमुळे, चळवळींमुळे आपापसात भांडण लागून मुख्य उद्दिष्टांवरून लक्ष विचलित होईल आणि एकजूट व सामर्थ्य खच्ची होत राहील अशा कार्यक्रमांना व चळवळींना आवर घालावयाचा, फूट पाडून पाचर ठोकण्याची संधी ब्रिटिशांना द्यावयाची नाही, असे धोरण गांधींनी स्वीकारले. सद्य:स्थितीत राजकीय पारतंत्र्याविरुद्ध शक्तिशाली लढा उभारावयाचा झाल्यास येथील उच्चवर्णीय, उच्चवर्गीय, शिक्षित व आर्थिकदृष्ट्या सुस्थितीत असलेल्या मंडळींचा पुढाकार आवश्यक आहे, नव्हे त्यांच्याशी वैर पत्करून तर हे काम साध्य होणारच नाही, ही जाण गांधींच्या भूमिकांच्या बुडाशी होती. दक्षिण आफ्रिकेमध्ये जनसामान्यांचा सहभाग आपल्या लढ्यांमध्ये मिळविण्याचे महत्त्व गांधींनी पूर्णपणे जाणले होते एवढेच नाही तर असा सहभाग मिळविण्यात त्यांनी अभूतपर्व यश संपादन केले होते. जनसामान्यांच्या आर्थिक व सामाजिक हिताचा वरिष्ठांच्या स्वार्थी हितसंबंधांशी मूलगामी विरोध आहे याकडेही त्यांचे दुर्लक्ष नव्हते. गांधींची सत्याग्रही भूमिका स्वभावत: व मूलत: संघर्षप्रवण होती ही गोष्टही दक्षिण आफ्रिकेत पुरेशी सिद्ध झालेली होती. हिंदुस्थानात परतल्यावर काँग्रेससंघटनेच्या झेंड्याखाली राजकीय स्वातंत्र्याचे राजकारण करीत असतानादेखील सर्व जातिजमातींच्या आणि सर्व आर्थिक परिस्थितींतल्या लोकांना बरोबर घेऊन आपले राजकारण सिद्ध करण्याची आवश्यकता व इष्टता त्यांना वाटत होती.

हिंदुस्थानच्या राजकीय स्वातंत्र्याचा मुद्दा एका अर्थी कळीचा मुद्दा होता ही गोष्ट ध्यानात घ्यायला हवी. आपापल्या जातीजमातीय मागण्यांची पूर्तता **आधी** झाल्याशिवाय देशाला राजकीय स्वातंत्र्य मिळता कामा नये अशी भूमिका घेणार की आपापसांतील प्रश्नांचा निकाल आपण नंतर लावून घेत बसू, पण आधी राजकीय पारतंत्र्यातून मुक्त होऊ अशी भूमिका घ्यावयाची ? असा तो प्रश्न होता. ब्रिटिश राज्यकर्त्यांचे हेतू आणि त्यांची नीती याविषयीची चिकित्सक जाण काय आहे याचाही येथे संबंध पोचत होता. हिंदुस्थानातील जातिजमातींना न्याय देण्याच्या हेतूने ब्रिटिश येथे राज्य करीत आहेत की स्वत:चे राज्य अधिक भक्कम करण्यासाठी आपणच तेवढे न्याय देऊ असा आभास निर्माण करीत आहेत, याचा निवाडा करण्याचीही आवश्यकता होती. आणि शेवटी, काँग्रेससंघटना ही राष्ट्रीय बाण्याची आहे की, ती ब्रिटिश म्हणतात त्याप्रमाणे केवळ उच्चवर्णीय शिक्षित बाबूलोकांचा स्वार्थ साधणारी संघटना आहे याचा निर्णय करणे क्रमप्राप्त होते.

ब्रिटिश राजवटीचे खरे स्वरूप काय आहे, तिने अस्पृश्य समाजाला न्याय देण्याच्या दृष्टीने खरोखर पावले उचलली आहेत की नाही, हिंदुस्थानचे हित ती साधते की हिंदुस्थानविरुद्ध पक्षपाती वागणूक ठेवते, या प्रश्नांची वस्तुनिष्ठ उत्तरे देण्याइतकी चिकित्सक बुद्धी बाबासाहेबांपाशी होती. त्यांनी वरील प्रश्नांची जी उत्तरे दिली ती कितपत वस्तुनिष्ठ होती ? याचे उत्तर सर्वांचे सारखेच येणार नाही. पण एक गोष्ट येथे नमूद करण्याजोगी आहे. एक रणनीती म्हणून का होईना, आंबेडकरांनी ब्रिटिश राजवटीवर जो भरवसा ठेवला, त्या राजवटीचा उपयोग एक तरफ म्हणून करून घेण्याचे योजिले. त्यात त्यांच्या पदरी अखेरीस घोर निराशा पडली. जीना आणि आंबेडकर या दोघांनाही ब्रिटिशांविषयी कटू अनुभव आला.

स्वत:च्या संघटित सामर्थ्याच्या जोरावर, समाजातील इतर घटकांशी संघर्ष करीत, पण त्याच वेळी सामंजस्य प्रस्थापित करीत आपल्या आकांक्षांची, मागण्यांची शक्य तेवढी पूर्तता करून घेण्याची भूमिका ठेवण्याऐवजी ब्रिटिश सत्तेच्या जोरावर त्यांची पूर्तता करून घेणे राजकीयदृष्ट्या अधिक सूज्ञपणाचे होईल अशा निर्णयाला आंबेडकर १९२६/२७च्या सुमारासच आलेले दिसतात. राजकीय स्वातंत्र्याचा लढा हा त्यांनी गौण मानला; किंबहुना, अस्पृश्य समाजाच्या वतीने ते करीत असलेल्या मागण्या जोवर स्वीकृत होत नाहीत, येथील घटनात्मक व्यवस्थेत त्यांचा समावेश होत नाही

अनुक्रमणिका

तोवर ब्रिटिशांचे राज्य येथे कायम राहणेच आपण पसंत करू अशी भूमिका त्यांनी घेतली.

याचाच अर्थ असा की, १९२० नंतरच्या काळात गांधींच्या नेतृत्वाखाली काँग्रेसला जे वेगळे वळण प्राप्त होत होते त्याची दखल घ्यावयास बाबासाहेब तयार नव्हते. काँग्रेसची सूत्रे आज उच्चवर्णीय, उच्चवर्गीय हिंदू मंडळींच्या हाती असली, तरी काँग्रेस ही सवर्ण हिंदूंची संघटना नसून ती व्यापक राष्ट्रवादी चळवळीचे नेतृत्व करणारी संघटना आहे, आणि जातीय वा धार्मिक संकुचित हितसंबंधांचा पाठपुरावा तिने कधी केलेला नाही; गांधींचे नेतृत्व प्रस्थापित झाल्यापासून सामाजिक सुधारणेस राजकीय सुधारणेइतकेच महत्त्व आहे हा मुद्दाही मान्य होत चालला आहे, या वास्तवाची उपेक्षा त्यांनी केली. काँग्रेस ही सबगोलंकार स्वरूपाची आघाडी असल्याकारणाने, अस्पृश्य समाजाच्या हिताचे समाजकारण व राजकारण पुढे रेटण्यासाठी काँग्रेसच्या राष्ट्रीय चळवळीला पूरक पण तिच्याहून स्वतंत्र अशा अस्पृश्यांच्या लॉबीची गरज आहे, अशी भूमिका बाबासाहेब घेऊ शकले असते. पण त्यांनी अशी भूमिका घेतली नाही. त्यांनी काँग्रेसविरोधी भूमिका सरळसरळ घेतली.

— ४ —

सायमन कमिशनच्या कामात मदत करण्यासाठी सरकारने प्रांतिक पातळ्यांवर समित्या नेमल्या होत्या. मुंबई इलाख्यासाठी नेमलेल्या समितीत आंबेडकरांचा समावेश होता. या समितीचे सभासद म्हणून त्यांनी एक स्वतंत्र भिन्नमतपत्रिका सादर केली. बहिष्कृत हितकारिणी सभेच्या वतीने आंबेडकरांनी अस्पृश्यांच्या हितसंबंधांचे रक्षण करण्यासाठी कोणत्या तरतुदींची गरज आहे याची स्पष्टता करणारे एक लेखी निवेदन सादर केले. १९२८ सालच्या ऑक्टोबरमध्ये सायमन कमिशनसमोर आंबेडकरांची साक्ष झाली. सर्व कागदपत्रांवरून १९२८ अखेर त्यांची भूमिका काय होती हे जाणून घेता येते.

सायमन कमिशनवर एकाही हिंदी इसमाची सभासद म्हणून नेमणूक केली नाही म्हणून देशातील सर्व राजकीय संघटनांनी निषेध केला. काँग्रेसने कमिशनच्या कामावर बहिष्कार टाकला. हिंदी लोकमत व राजकीय संघटना यांच्याविषयीच्या बेपर्वा वृत्तीच्या या प्रदर्शनामुळे देशामध्ये मोठा प्रक्षोभ उत्पन्न झाला. तरुणांमध्ये चैतन्य संचारले होते. यातूनच काँग्रेसने 'वसाहतीच्या स्वराज्या'च्या जागी 'पूर्ण स्वराज्य' हे ध्येय म्हणून घोषित करावे यासाठी दबाव उत्पन्न झाला. वसाहतीच्या स्वराज्याचा घटनात्मक आराखडा तयार करण्यासाठी पं. मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखाली एक सर्वपक्षीय परिषद भरविण्यात आली. तिने आपला अहवाल १९२८ अखेर प्रसिद्ध केला. १९२९ अखेर हिंदुस्थानला ताबडतोब वसाहतीचे स्वराज्य देण्यात आले नाही तर काँग्रेस पूर्ण स्वराज्य हे आपले ध्येय म्हणून घोषित करील व त्यासाठी लढ्याचा मार्ग अनुसरेल असे जाहीर झाले.

या पार्श्वभूमीवर आंबेडकरांची भूमिका काय होती हे पाहू या. बहिष्कृत हितकारिणी सभेतर्फे जे लेखी निवेदन त्यांनी सादर केले त्याच्या आरंभालाच त्यांनी असे म्हटले की, 'आयोगावर एखाद्या हिंदी गृहस्थाची सभासद म्हणून नेमणूक न करण्याच्या पार्लमेंटच्या निर्णयामुळे सभेची फार मोठी चिंता दूर झाली आहे.' समाधानाचा सुस्कारा सोडण्याचे कोणते स्पष्टीकरण सभेने दिले? सभा म्हणते, 'स्वराज्याची मागणी जर सर्व हिंदवासीयांची समान मागणी असती आणि तिचा विचार आयोगाला करावयाचा असता तर हिंदी गृहस्थाच्या नेमणुकीवरून आंदोलन करणे उचित झाले असते. पण देशात जे विभिन्न हितसंबंधी घटकसमूह अस्तित्वात आहेत त्यांच्या वेगवेगळ्या स्वरूपाच्या मागण्यांचा विचार आयोगाला करावयाचा आहे ही वस्तुस्थिती आहे.' घटनात्मक सुधारणांच्या पुढच्या हप्त्याबरोबर राज्यकारभारात प्राप्त होणाऱ्या वाट्यामध्ये स्वतःचा हिस्सा मागण्यासाठी विविध हिंदी जातिजमाती आपापल्या मागण्या सादर करणार असल्यामुळे **निःपक्षपाती निवाड्याच्या दृष्टीने** हिंदी सभासद कमिशनवर नसणेच सभेस योग्य वाटत होते. याचा अर्थ हाच की, हिंदुस्थानातील सर्वच व्यक्ती व संघटना या जातीय व धार्मिक हितसंबंधाचेच प्रतिनिधित्व करू शकतात वा करणाऱ्या आहेत; राष्ट्रीय हिताचा पक्ष हिंदुस्थानातील कोणीच घेऊ शकत नाही, असे सभेचे मत होते.

काँग्रेससंघटना सर्व राष्ट्राचे, राष्ट्रातील विविध जातिजमातींचे हित ध्यानात घेऊन आपली भूमिका ठरवीत असली तरी, तिच्या भूमिकेत अमूकअमूक त्रुटी आहेत, त्या भरून काढण्यासाठी अमूक एक विचार काँग्रेसने करावयास हवा, अशा प्रकारची टीका आंबेडकर करीत नाहीत. अस्पृश्य समाजास काँग्रेस अद्याप न्याय देत नाही अशी टीका करून न्याय द्यावयाचा झाला तर कोणत्या गोष्टी काँग्रेसने स्वीकारल्या पाहिजेत, याची स्पष्टता करून काँग्रेसला खऱ्या अर्थाने राष्ट्रीय बनविण्याचा त्यांचा प्रयत्न नाही. इतकेच नाही तर, सर्व हिंदी संघटना, निरपवादपणे, फक्त एकेकटा संकुचित हितसंबंधच काय तो बाळगू शकतात, आणि म्हणून सर्वांना समान अशा स्वरूपाचा राष्ट्रीय स्वयंनिर्णयाचा मुद्दा असूच शकत नाही, अशा आशयाचा युक्तिवाद ते करतात.

हिंदी लोक केवळ आपापल्या जातिजमातींपुरते पाहणाऱ्याच संघटना व चळवळी उभारू शकणार असतील तर अशा सर्व फुटीर वृत्तीच्या घटकांना एका व्यवस्थेत बांधून ठेवून राज्यकारभार चालविण्याचे काम हे कोणा तरी त्रयस्थाने केले पाहिजे हा निष्कर्ष अटळ ठरतो. आंबेडकरांची भिस्त औपचारिकतः सुस्पष्टपणे सत्तेची वाटणी करून देणाऱ्या लिखित राज्यघटनेच्या अस्तित्वावर व तिच्या राबवणुकीची कायम हमी ब्रिटिश राजवटीने घेण्यावर होती. म्हणूनच काँग्रेसच्या 'पूर्ण स्वराज्या'च्या मागणीची त्यांनी काहीशी कुचेष्टा केलेली आढळते.

सायमन कमिशनसमोर त्यांनी बहिष्कृत हितकारिणी सभेच्या वतीने जे निवेदन दिले, व पुढे त्यांची जी साक्ष झाली, त्यात त्यांच्या मागण्या कोणत्या होत्या ? मागण्यांकडे वळण्याच्याही आधी एका मुद्द्याचा निकाल लावण्याची आवश्यकता होती. मुसलमान ही ज्या अर्थाने अल्पसंख्याक जमात होती त्या अर्थाने अस्पृश्य ही एक हिंदूंपासून वेगळी अशी राजकीय जमात होती का ? अस्पृश्यांचे मागासलेपण निर्विवाद होते. अस्पृश्य म्हणून त्यांच्यावर जे अनेक निर्बंध होते त्यांमुळे त्यांची उन्नती ही अवघड गोष्ट होती, हे खरे. पण अस्पृश्य हे हिंदू समाजाचाच एक घटक होते. त्यांना राजकीयदृष्ट्या पृथगात्म अल्पसंख्याक जमातीचा दर्जा देणे कितपत योग्य होते ? माँटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांच्या वेळी अस्पृश्य समाजाचे विशेष स्वरूपाचे मागासलेपण ध्यानात घेतले गेले होते, व अस्पृश्यांचे काही प्रतिनिधी विधिमंडळांमध्ये असले पाहिजेत ही गोष्ट स्वीकारली गेली होती. शिक्षण, व्यवसाय, मालमत्ता या अंगांनी विचार करता अस्पृश्य समाजामधून किमान पात्रता असणारे मतदार अत्यल्प निघू शकणार असल्याने निवडणुकीचे तत्त्व न अंगीकारता नेमणुकीची तरतूद केली गेली होती. अस्पृश्य ही एक पृथगात्म राजकीय अल्पसंख्याक जमात म्हणावी इतका तिचा दर्जा आहे, वा तशी पार्श्वभूमी आहे ही गोष्ट मान्य झाली नव्हती. बहिष्कृत हितकारिणी सभेच्या निवेदनामध्ये अस्पृश्य ही मुसलमानांप्रमाणेच एक पृथक राजकीय अल्पसंख्याक जमात असे गृहीत धरून मुसलमान जमातीइतकेच महत्त्व आपणास मिळाले पाहिजे अशी मागणी केलेली होती.

कमिशनसमोर आंबेडकरांची जी साक्ष झाली तीमध्ये आंबेडकर एका प्रश्नाच्या उत्तरात म्हणतात, 'हिंदू समाजातच आमचा समावेश केला जात गेल्याने आम्ही एक पृथक अल्पसंख्याक जमात आहोत या वास्तवावर आजपावेतो पांघरूण घातले गेले. वास्तविक पाहता, पददलित वर्ग (डिप्रेस्ड क्लासेस) आणि हिंदू जमात यांच्यामध्ये खऱ्या अर्थाने कोणताच दुवा नाही. म्हणून, आम्ही एक पृथगात्म व स्वायत्त अल्पसंख्याक जमात आहोत ही गोष्ट स्वीकृत झाली पाहिजे हा पहिला व प्राथमिक मुद्दा मला आयोगासमोर जोर देऊन मांडावयाचा आहे.'

स्पृश्यास्पृश्यता आणि जातिभेद या दोन्ही गोष्टींचा हिंदू असण्याशी अंगभूत संबंध आहे ही गोष्ट समाजशास्त्राचा अभ्यास केलेल्या बाबासाहेबांना ठाऊक नव्हती असे म्हणता येणार नाही. महाड सत्याग्रहाच्या प्रसंगी २५ डिसेंबर १९२७ रोजी त्यांनी जे भाषण केले त्याची साक्ष काढता येईल. या भाषणात ते म्हणतात, 'आजची ही सभा हिंदू समाजाचे संघटन करण्यास्तव बोलविण्यात आलेली आहे. बेटीबंदीपासून भेटीबंदीपर्यंत वर्णाश्रमाच्या चौकटीचे खिळे उडवून हिंदू समाजाचा एक वर्ण केला पाहिजे. त्याशिवाय अस्पृश्यता

जाणार नाही व समताही प्रस्थापित होणार नाही' ते पुढे म्हणतात, 'यास्तव हिंदू समाज समर्थ करावयाचा असेल तर चातुर्वर्ण्य व अस्पृश्यता यांचे उच्चाटन करून हिंदू समाजाची रचना एकवर्णत्व व समता या दोन तत्त्वांच्या पायावर केली पाहिजे. अस्पृश्यतानिवारणाचा मार्ग हा हिंदू समाज समर्थ करण्याच्या मार्गापासून भिन्न नाही. म्हणून मी म्हणतो की आपले कार्य जितके स्वहिताचे आहे तितकेच ते राष्ट्रहिताचे आहे, यात काही किंतू नाही.' महाडला जो जाहीरनामा प्रसृत केला त्याच्या प्रास्ताविकात म्हटले आहे, 'सामाजिक अन्याय, धार्मिक ग्लानी, राजकीय अवनती आणि आर्थिक गुलामगिरी यांच्यामुळे राष्ट्र कसे अधोगतीस जाते याचे सांप्रतचा हिंदू समाज हे एक ठळक व अनुकंपनीय उदाहरण आहे, असे या सभेचे ठाम मत आहे. हिंदू समाजास अशी घोर दशा प्राप्त होण्याचे मुख्य कारण असे की बहुजन समाजाने मनुष्यमात्राचे जन्मसिद्ध हक्क कोणते याची जाणीव करून घेण्याची तत्परता दाखविली नाही...... हिंदुमात्राचे जन्मसिद्ध हक्क कोणते, हे सतत हिंदू जनांच्या डोळ्यांसमोर असावे म्हणून जगन्नियंत्या सर्वसाक्षी परमेश्वराला साक्षी ठेवून आणि त्याचा आशीर्वाद मागून खालील जाहीरनामा ही सभा सर्वांच्या माहितीकरता प्रसिद्ध करीत आहे.'

अवघ्या वर्षभराच्या आत आंबेडकर आपलेच प्रतिपादन पूर्णपणे नाकारण्यापर्यन्त कसे काय येऊन पोचले ? महाडच्या सत्याग्रहाच्या प्रसंगी ब्राह्मण व ब्राह्मणेतर मंडळींचे जे वर्तन झाले त्यामुळे त्यांच्या ठायी कटुता निर्माण झाली असली तर ती गोष्ट समजू शकते. पण तेवढ्याने समाजशास्त्रीय वस्तुस्थिती बदलू शकत नाही. काय घडले असावे ? १९२४ ते १९२८ या कालखंडात बाबासाहेबांची भूमिका अस्पृश्यांच्या राजकारणी नेत्याइतकीच हिंदु समाजसुधारकाची होती. २७ डिसेंबर १९२७ रोजी सत्याग्रह स्थगित केल्यानंतर जो मोठा मोर्चा महाड गावातून काढण्यात आला त्यामध्ये एकनाथ, ज्ञानेश्वर या संतांचा तसेच रामशास्त्री, आगरकर, महात्मा गांधी व अन्य समाजसुधारकांचा व अस्पृश्यांच्या उद्धारकांचा आणि शिवाजी व छत्रपती शाहू महाराज यांचा जयजयकार करण्यात आला, ही गोष्ट या त्यांच्या भूमिकेचीच द्योतक आहे. यावरून असा तर्क होतो की, सायमन कमिशनच्या घोषणेनंतर त्यांच्या भूमिकेमध्ये जो संकुचितपणा आला, त्यांनी समाजशास्त्रीय वास्तव जे नाकारले त्याचा संबंध सायमन कमिशनमुळे उत्पन्न झालेल्या राजकीय संदर्भाशी होता. विधिमंडळांची पुनर्रचना व त्यांचा विस्तार, राज्य चालविण्याच्या अधिकारांमध्ये वाढ, वेगवेगळ्या जातिजमातींना दिल्या जावयाच्या जागा, त्यांच्या प्रतिनिधींच्या निवडणुकीची रीत, या साऱ्याच गोष्टींच्या फेरविचाराची बैठक, हिंदी समाज हा पृथगात्म जातिजमातींचा बनलेला व एकजिनसी नसलेला समाज आहे ही धारणाच असल्याने त्याच धारणेतून विचार करण्यास, मागण्या मांडण्यास राजकारणी पुढारी प्रवृत्त झाले. मोर्ले-मिंटो व माँटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांच्या वेळीही नेमके असेच घडले होते.

मुसलमानांप्रमाणे अस्पृश्य ही राजकीयदृष्ट्या स्वतंत्र अल्पसंख्याक जमात आहे हे आंबेडकरांचे म्हणणे चोख बौद्धिक चिकित्सेत टिकले नसते. जातपात, व कमीअधिक परीने आपापसातील व्यवहारांमध्येही स्पृश्यास्पृश्यता पाळणाऱ्या अनेकविध प्रादेशिक जातींची मिळून बनणारी अस्पृश्य समाज ही एक वर्गवारी होती; ती काही एकजिनसी जमात नव्हती. जो काही एकजिनसीपणा अस्पृश्य असण्यामधून निर्माण होत असेल तो या सर्व जाती हिंदू धर्म व जातिव्यवस्था मानीत असल्यामुळेच निर्माण होत होता. पण अस्पृश्यांची एक वेगळी अल्पसंख्याक जमात आहे, व राजकीय संरक्षण मिळावे इतकी ती दुबळी पण त्याचवेळी महत्त्वाची जमात आहे, हा युक्तिवाद ब्रिटिशांच्या पथ्यावर पडणारा होता. इतका की, सायमन कमिशनपुढे झालेल्या साक्षीच्या वृत्तांतातही, आंबेडकरांच्या भूमिकेची खोलवर परखड चिकित्सा सभासदांपैकी काहींनी होऊ दिली नाही, ही गोष्ट स्पष्ट दिसून येते.

एकदा अस्पृश्य ही हिंदूंशी काही देणेघेणे नसलेली अशी स्वतंत्र राजकीय अल्पसंख्याक जमात आहे असे म्हटल्यावर, अँग्लो-इंडियन, मुसलमान यांच्याप्रमाणेच अस्पृश्यांनाही लोकसंख्येतील प्रमाणानुसार प्रतिनिधित्व मिळाले पाहिजे ही मागणी मग ओघा-

अनुक्रमणिका

नेच येते. पृथक राजकीय जमात आहे असे मानल्यास तिचे प्रतिनिधित्व अन्य कोणी करू शकत नाही हा युक्तिवाद स्वीकारावाच लागतो. अल्पसंख्याक असण्याच्या आधारे प्रमाणाबाहेर जादा प्रतिनिधित्वही मागता येते व या मागणीचे समर्थनही करता येते. सभेच्या निवेदनामध्ये पुढीलप्रमाणे युक्तिवाद केलेला आढळतो : '**या प्रकारच्या गोष्टींविषयीचे निर्णय करीत असतांना एकाद्या जमातीची लोकसंख्या किती आहे एवढा एकच मुद्दा विचारात घेणे पुरेसे नाही ही गोष्ट पहिल्याप्रथम ध्यानात घेतली जाणे आवश्यक आहे. एकाद्या जमातीला किती जागा दिल्या जाव्यात हे ठरविण्यासाठी त्या जमातीचे स्थान वा दर्जा ही गोष्ट तितकीच महत्त्वाची म्हणून विचारात घेतली गेली पाहिजे.** जो जीवनकलह चाललेला असतो त्यात स्वतःच्या हितसंबंधांचे संरक्षण करण्याची ताकद एकाद्या समाजात किती आहे, त्या दृष्टीने तिच्या हाती किती सत्ता आहे, यावरून त्या जमातीचा दर्जा कनिष्ठ की वरिष्ठ ते ठरविले गेले पाहिजे. ...**जमातीचा दर्जा जेवढा कनिष्ठ तेवढा त्या जमातीस, जागांच्या संदर्भात, इतर जमातींच्या तुलनेत झुकते माप मिळावयास हवे.**' (जाड ठसा मुळातला.) प्रमाणापेक्षा जास्त संख्येने म्हणजे किती जास्त संख्येने? अल्पसंख्याक जमात ही विधिमंडळात अल्पसंख्य असूनही वजन टाकू शकण्याइतकी प्रभावी होण्याइतके तिचे प्रतिनिधी असले पाहिजेत. थोडक्यात, जो समाज बहुसंख्याक असेल त्या समाजाचे बहुसंख्याकपण निष्प्रभ करून टाकण्याइतक्या कमी संख्येने त्या बहुसंख्याक समाजाचे प्रतिनिधी विधिमंडळात असले पाहिजेत, असा निष्कर्ष काढला जातो.

उपरोधाची गोष्ट अशी की, एखाद्या राष्ट्रातील वेगवेगळ्या जमातींपैकी काहींनी लोकसंख्येतील प्रमाणाबाहेर प्रतिनिधित्व मागण्यास सुरुवात केली तर काय परिस्थिती उत्पन्न होते याचे चित्र आंबेडकरांनीच रेखाटले आहे. काँग्रेस व लीग यांच्यात झालेल्या लखनौ करारावर त्यांनी सायमन कमिशनच्या मुंबई प्रांतिक कमिटीचे सभासद म्हणून सादर केलेल्या भिन्नमतपत्रिकेमध्ये जी टीकाटिप्पणी केली आहे ती पाहण्यासारखी आहे. आंबेडकर म्हणतात, 'मुसलमान जमातीला जे काही झुकते माप दिले जाते ते अन्य कोणत्या तरी घटकाच्या वा घटकांच्या पदरातले काढून घेऊनच, ही गोष्ट करार करणारे महाभाग विसरले.' लखनौ कराराला उद्देशून हिंदुस्थान सरकारने केलेली पुढील टीकाटिप्पणीही ते आपल्या पसंतीनिशी उद्धृत करतात : 'राज्यपद्धती अधिक लोकप्रातिनिधिक व जबाबदार बनत जाण्याच्या दृष्टीने, वेगवेगळ्या जमातींच्या प्रतिनिधित्वाचे प्रमाण हे कायमचे निश्चित करून देणे हे गोष्ट हितावह नाही; विभक्त वर्गीय व जातजमातीय मतदारसंघांची साचेबंद रचना जितकी अधिक काळ टिकून राहील तितके प्रतिनिधित्वाच्या नेहमीच्या स्वाभाविक पद्धतीच्या दिशेने पावले टाकणे अधिकाधिक अवघड बनत जाईल.'

प्रौढ मताधिकाराचे तत्त्व स्वीकारले तरी विभक्त मतदार संघाची मागणी आपण करणार नाही, संयुक्त मतदार संघात राखीव जागा मिळाल्या तर आपले समाधान होईल अशी भूमिका आंबेडकरांनी घेतली. लोकसंख्येतील प्रमाणापेक्षा थोड्या अधिक जागा मिळाव्यात असा आग्रह त्यांनी धरला. अस्पृश्यांची मोजदाद किती होते, या मुद्द्यावर आदिवासी जमातींचाही समावेश ते अस्पृश्यांमध्ये करीत असावेत असे दिसते. प्रौढ मताधिकाराचे तत्त्व जर मान्य झाले नाही तर मात्र विभक्त मतदारसंघ आपणास मिळावेत असा आपला आग्रह राहील, ही गोष्ट त्यांनी स्पष्ट केली. ही स्पष्टता कमिशनसमोर झालेल्या साक्षीच्या ओघात त्यांनी केली. येथेही उपरोधाची गोष्ट अशी की, आपल्या भिन्नमतपत्रिकेत त्यांनी विभक्त मतदारसंघांची अनेकांगी घातकता विशद करण्याचे परिश्रम घेतले आहेत. यांपैकी तीन प्रमुख युक्तिवाद पुढीलप्रमाणे आहेत. १) विभक्त मतदारसंघांमुळे फुटीर जातीय वृत्ती बळावत जातात. २) जी ती प्रमुख जमात आपले प्रतिनिधी निवडून देणार असल्याने समाजात समरसता निर्माण होत जाण्याऐवजी तटबंदीआड राहण्याची वृत्ती बळावते. ३) जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीमध्ये बहुमतवाल्या पक्षाची राजवट प्रस्थापित होण्यास महत्त्व असते. असा पक्ष देशातील साऱ्या घटकांचे प्रतिनिधित्व करीत असतो. कारण सर्व घटकांमधील मतदारांचा निवडणुकीत सहभाग

अनुक्रमणिका

असतो. विभक्त मतदारसंघ असले तर एखाद्या पक्षाचे बहुमत झाले तरी तो इतर घटकांचे प्रतिनिधित्व करीत नाही असा दावा करणे शक्यच राहील. त्यामुळे खऱ्या अर्थाने जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धती कधीच साकार होऊ शकणार नाही.

बहुसंख्याक जमातीच्या हातची बाहुली बनण्याइतके दुबळे असलेले उमेदवारच अल्पसंख्याक जमातीचे प्रतिनिधी म्हणून संयुक्त मतदारसंघांमधून निवडून येतील या आक्षेपालाही आंबेडकरांनी आपल्या भिन्नमतपत्रिकेत उत्तर दिले आहे. हे उत्तर दोनपदरी आहे. संयुक्त मतदारसंघ व राखीव जागा या पद्धतीमुळे जबाबदार व विवेकी उमेदवार निवडून येण्याची खात्री जास्त; विभक्त मतदारसंघाच्या पद्धतीने अतिरेकी व बेजबाबदार माणसे निवडून येण्याचा धोका खूप जास्त. दुसरा पदर असा की, मताधिकार पुरेसा व्यापक असला आणि मतदारांची संख्या पुरेशी मोठी असेल तर मतदारसंघ संयुक्त असले तरी बहुसंख्याक जमातीचे सर्व मतदार केवळ अल्पसंख्य उमेदवारास पाडण्यासाठी एकत्र येतील हे खरे नाही; बहुसंख्याक जमातीतून जे अनेक उमेदवार उभे राहतील त्यांच्यात मतांची विभागणी होईल. त्यामुळे अल्पसंख्याक जमातीलाही आपला उमेदवार निवडून आणण्याची बऱ्यापैकी संधी राहील.

विभक्त मतदारसंघांविरुद्ध आणखीही एक युक्तिवाद आंबेडकरांनी केलेला आढळतो. विभक्त मतदारसंघांच्या पद्धतीखाली अल्पसंख्याक जमातीस तिच्या कोट्याप्रमाणे प्रतिनिधित्व मिळते जरूर; पण विधिमंडळातील इतर प्रतिनिधींशी अल्पसंख्याक जमातीच्या प्रतिनिधींचे कोणतेच लागेबांधे नसल्याने त्यांच्या इच्छाआकांक्षांची कदर करण्याचे बहुसंख्याक प्रतिनिधींना कोणतेच कारण नसते. आंबेडकर लिहितात, 'अशा रीतीने अल्पसंख्याक जमातीला सर्वस्वी स्वतःच्या सामर्थ्यावरच विसंबून राहण्याची पाळी येते. प्रतिनिधित्वाची कोणतीही पद्धती अवलंबिली तरी अल्पसंख्याक जमातीचे रूपांतर बहुमतामध्ये होणे शक्य नसल्याने, अल्पसंख्याक जमातीवर बहुसंख्याक जमातीची कायमची मात राहणार ही गोष्टही अटळ आहे.' याउलट, बहुसंख्याक जमातीचे प्रतिनिधी जर काही प्रमाणात अल्पसंख्याक जमातीच्या मतदारांच्या मतांच्या पाठिंब्यावर निवडून आलेले असतील तर ते प्रतिनिधी अल्पसंख्याक जमातीच्या हिताची जपणूक करणे आपले कर्तव्य समजतील.

सायमन कमिशनच्या कामकाजाच्या ओघात आंबेडकरांनी घेतलेली भूमिका विस्ताराने येथवर पाहिली. काँग्रेसच्या भूमिकेशी या भूमिकेचा विरोध कोठे कोठे व का होता ते आता थोडक्यात पाहू. हिंदू समाजातील जातिभेद, विषमता आणि कनिष्ठ जातीयांची दडपणूक यासंबंधी काँग्रेसच्या नेत्यांचे दुमत नव्हते. हिंदी लोकांचे खऱ्या अर्थाने काँग्रेसला प्रतिनिधित्व करावयाचे झाल्यास तिच्या कार्यात ब्राह्मणेतर व अस्पृश्य जातींचा सहभाग वाढायला हवा, जातपातीशी निगडित उच्चनीचता व अस्पृश्यता दूर व्हायला हवी, ही काँग्रेसचीही भूमिका होती. पण, सध्याच्या राजकीय जीवनात उच्चवर्णीय, उच्चवर्गीय व उच्चशिक्षितांचा सहभाग अधिक आहे याकारणाने राखीव जागा व विभक्त मतदारसंघ यांचा पुरस्कार करणे राष्ट्रीय एकात्मतेच्या दृष्टीने तसेच जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीच्या विकासाच्या दृष्टीने घातक होईल असे काँग्रेसचे म्हणणे होते. सर्वसाधारण जागांचे प्रमाण वाढेल, निदान आता आहे त्यापेक्षा कमी होणार नाही आणि या सर्व जागांवर राष्ट्रीय बाण्याचे प्रतिनिधी निवडून येतील असे पाहिले पाहिजे, असा काँग्रेसच्या पुढाऱ्यांचा युक्तिवाद होता. प्रतिनिधी संयुक्त मतदारसंघांच्या द्वारा जरी निवडून गेलेले असले तरी ते जर आपल्या जातिजमातींसाठी 'राखीव' गणले जाणार असले तर मुसलमान, अँग्लोइंडियन, जमीनदार, इत्यादी आधीपासून असलेल्या तुकड्यांमध्ये वाढ होऊन राष्ट्रीय एकात्मता व जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धती यांच्या विकासाला त्यांच्या दृष्टीने खीळ बसणार होती. काँग्रेसचे हे प्रतिपादन आंबेडकरांनी केलेल्या प्रतिपादनाशी मिळतेजुळतेच होते.

काँग्रेससंघटना व चळवळ यांच्याशी सहकार्य करून अस्पृश्यांचे हितसंबंध जोपासावयाचे की काँग्रेसच्या वाढत्या सामर्थ्याचे खच्चीकरण करूनच ते जोपासता येतील असे मानावयाचे आणि या बाबतीत ब्रिटिश राजवटीशी हातमिळवणी करावयाची ?

आंबेडकरांचा मूळ पवित्रा काँग्रेसविरोधीच होता हे आपण वर पाहिले आहे. राजर्षी शाहू महाराजांच्या राजकीय धोरणाचे हे वळण स्पष्ट होते. महाराष्ट्रात काँग्रेससंघटनेची सूत्रे ज्या टिळकपक्षीयांच्या हाती होती, त्यांच्याशी आंबेडकरांचे न जुळणे स्वाभाविक होते. पेशवाईचा अभिमान बाळगणाऱ्या ब्राह्मण मंडळींचा पक्ष ही काँग्रेसची ओळख असल्याकारणाने या काँग्रेसवर मात करण्यासाठी ब्रिटिश राजवटीशी सहकार्य करणाऱ्यांची एक फळीच तयार झाली होती. आंबेडकर तिचे एक घटक होते. काँग्रेसला विरोध करावयाचा ही गोष्ट स्वतंत्रपणे ठरलेलीच होती. एरवी मुसलमानांच्या मागण्यांमधील घातकता स्पष्ट करीत असतानाच स्वतःच्या समाजासाठी त्याच प्रकारच्या मागण्या आंबेडकरांनी का केल्या असत्या ? मुसलमानांना एकदा विभक्त मतदारसंघ व प्रमाणाबाहेर प्रनिनिधित्व दिले म्हणून ते चालूच ठेवले पाहिजे असे म्हणणे गैर आहे; चूक एवढी घातक आहे तर ती दुरुस्त केलीच पाहिजे, असे आंबेडकरांचे प्रतिपादन होते. मुसलमानांच्या पावलावर पाऊल टाकून ब्राह्मणेतर, अस्पृश्य, इत्यादींनी आपणासाठी त्याच गोष्टी पदरात पाडून घेण्यातून ही घातक चूक दुरुस्त न होता अधिक जास्त घातक बनणार नव्हती का ?

काँग्रेसला विरोध करावयाचा म्हटल्यावर टीका करण्यासाठी मुद्दे सापडणे कठीण नव्हते. अस्पृश्यतेचा कलंक धुवून काढल्याखेरीज स्वराज्याला अर्थ प्राप्त होणार नाही असे गांधी सतत सांगत असले तरी, जातिव्यवस्थेतील उच्चनीचता, स्पृश्यास्पृश्यता व दडपणूक यांविषयी सर्वसाधारण काँग्रेसी पुढारी व अनुयायी यांना तीव्र आक्षेप नव्हता; परंपरेने चालत आलेली व्यवस्था त्यांना स्थूलमानाने ठीकच वाटत होती ही वस्तुस्थिती होतीच. तसेच, सायमन कमिशनला पर्याय म्हणून घटनात्मक सुधारणांचा आराखडा हिंदी राजकीय पक्षोपपक्षांनी तयार करावयाचा असे ठरल्यावर काँग्रेसमध्ये नसलेल्या ब्राह्मणेतर व अस्पृश्य पुढाऱ्यांचा वाटाघाटींमध्ये सन्मानपूर्वक सहभाग मिळविण्यासाठी विशेष प्रयत्न करणे उचित झाले असते. उदयोन्मुख अस्पृश्य चळवळीची दखल न घेण्यात अस्पृश्य पुढाऱ्यांचा अधिक्षेप झाला ही गोष्ट खरीच. सर्वपक्षीय तोडगा काढण्याच्या भरात आपल्या काही मुख्य तत्त्वांपासून काँग्रेसला फारकत घ्यावी लागली, आणि आंबेडकरांनी तो एक टीकेचा मुद्दा बनविला हे योग्यच होते. आंबेडकरांनी त्यांच्या 'जनता' पत्राच्या १८–१–१९२९ च्या अंकातील 'नेहरू कमिटीची योजना व हिंदुस्थानचे भवितव्य' या मथळयाच्या अग्रलेखात मुसलमानांच्या सरळ सरळ जातीय व फुटीर भूमिकेला चुचकारण्याचा, खतपाणी घालण्याचा अपराध काँग्रेसकडून घडत असल्याची जी जळजळीत टीका केली आहे ती अगदी खरीच होती. ब्रिटिश पार्लमेंटमध्ये मंजुरी मिळवून पदरात घटनात्मक सुधारणा पाडून घ्यावयाच्या व त्या आधारे स्वराज्याच्या दिशेने वाटचाल करावयाची अशी उमेद बाळगण्यातच भ्रम होता. कारण यात तराजूची दांडी ब्रिटिश शास्त्यांच्या हातीच अखेरपर्यंत राहावयाची होती. मुसलमान जमातीला ब्रिटिशांकडून मिळणाऱ्या पक्षपाती आवडतीच्या वागणुकीच्या तुलनेत थोडे जास्त देऊ करून त्यांच्या जातीयवादी पुढाऱ्यांना आपल्या बाजूला वळवून 'एकी' निर्माण करण्याचे प्रयत्न आत्मघातकी व देशाचे अकल्याण करणारे होते. घटनात्मक सुधारणांच्या खोड्यात न सापडता स्वातंत्र्याची चळवळ लोकलढ्यांच्या व लोकसंघटनेच्या मार्गाने पुढे नेत राहणे हाच योग्य पर्याय होता. १९२४ ते १९२९ च्या दरम्यानचे काँग्रेसांतर्गत 'स्वराज्य पक्षा'चे राजकारण हे अनेक अंगांनी हिणकस राजकारण होते यात शंका नाही.

येथेही, मुसलमानांच्या जातीय व फुटीर राजकारणाचे मर्म उघड केल्यानंतर, या सर्व मामल्यामागील ब्रिटिशांची कुटिल नीती आंबेडकरांनी का जाणली नाही, आणि देशाच्या व हिंदू समाजाच्या कल्याणाच्या दृष्टीने आपल्या राजनीतीची तत्त्वे का सुनिश्चित व सुस्पष्ट केली नाहीत, या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर मिळत नाही.

– ५ –

हिंदुस्थानसाठी घटना तयार करण्याच्या कामात हिंदी पुढाऱ्यांचा सहभाग असायला हवा याचे भान ब्रिटिश सायमन कमिशनच्या नेमणुकीनंतर देशभर उठलेल्या विरोधाच्या आवाजाने ब्रिटिशांना झाले. यातून गोलमेज परिषदेची कल्पना बाहेर पडली.

हिंदुस्थानातील वेगवेगळ्या जातिजमातींचे व हित-संबंधांचे मान्यवर पुढारी यासाठी आमंत्रित करण्याचे ब्रिटिश राज्यकर्त्यांनी ठरविले. हिंदुस्थान म्हणजे अनेकानेक जातिजमातींचे, परस्परविरोधी हितसंबंधांचे कडबोळे असून त्यांच्यात एक 'समतोल'-राखला जाण्याच्या दृष्टीने घटना बनविली गेली पाहिजे, ही धारणा बाळगूनच गोलमेज परिषदेचा घाट घातला गेला. इंग्लंडच्या धर्तीच्या लोकशाही राज्यपद्धतीचा अंगीकार हिंदुस्थानात करता येणार नाही, कारण हिंदी समाज हा बहुजिनसी व फुटीर समाज आहे, या निष्कर्षाच्या पार्श्वभूमीवर 'समतोला'ची ब्रिटिश राज्यकर्त्यांची संकल्पना जाणून घ्यावी लागते. बहुजिनसीपणा व फुटीरपणा आहे तसाच पण 'संतुलित' स्वरूपात कायम राखण्यात न्याय आहे अशी भूमिका होती. हे संतुलन कायम राखण्यासाठी तराजूची दांडी हिंदुस्थानातील कोणत्याही एका जमातीच्या व राजकीय संघटनेच्या हातांत जाणार नाही, ती शक्यतोवर ब्रिटिशांच्या हातीच राहील, हे पाहायला लागेल अशीही दृढ समजूत होती. हिंदुस्थान किती बहुजिनसी आहे, तो किती फुटीर आहे, आणि त्याची एकसंधता महत्प्रयासाने टिकवून धरण्यासाठी ब्रिटिशांकडे सूत्रधाराची भूमिका असणे किती आवश्यक आहे याचे दर्शन घडून येईल अशा पद्धतीनेच गोलमेज परिषदेची आखणी झालेली होती.

वसाहतीचे स्वराज्य हिंदुस्थानला दिले जाईल आणि वसाहतीच्या स्वराज्याची घटना तयार करण्यासाठी गोलमेज परिषद भरेल अशी घोषणा निःसंदिग्धपणे ब्रिटिश करतील तर काँग्रेस या परिषदेत भाग घेईल अशी शर्त काँग्रेसने घातली. वसाहतीच्या स्वराज्याच्या दिशेने वाटचाल जरूर करावयाची आहे, पण वसाहतीचे स्वराज्य दिले जाण्यास अद्यापि बराच काळ लोटावयास हवा, अशी स्पष्टता ब्रिटिश राजकारण्यांनी व व्हाइसरॉय यांनी केल्यामुळे काँग्रेसने लाहोरच्या अधिवेशनात 'पूर्ण स्वराज्य' हे आपले ध्येय असल्याचे जाहीर केले व लढ्याची तयारी केली. मार्चमध्ये गांधींची जगप्रसिद्ध दांडी यात्रा सुरू झाली. देशभर मिठाचा सत्याग्रह पेटला.

गोलमेजपरिषदेसाठी अस्पृश्यांचे प्रतिनिधी म्हणून सरकारने डॉ. आंबेडकर व श्रीनिवासन यांची निवड केली. अखिल भारतीय नेतृत्वाच्या पातळीवर आंबेडकरांचा अधिकृतपणे प्रवेश या प्रसंगी झाला असे म्हणणे वावगे होणार नाही. अखिल भारतीय स्वरूपाची अस्पृश्यांची संघटित चळवळ आकारास अद्याप आलेली नव्हती. १९२४ पासून बहिष्कृत हितकारिणी सभेचे व १९२६ पासून मुंबई प्रांतिक कौन्सिलचे सभासद या नात्याने केलेले कार्य त्यांच्या पाठीशी होते. त्यांची निवड हा त्यांचा बहुमान होता.

ऑगस्ट १९३० मध्ये नागपूर येथे अखिल भारतीय दलितवर्ग परिषद भरली. आंबेडकर तिचे अध्यक्ष होते. अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणात त्यांनी काँग्रेसने सुरू केलेल्या सत्याग्रह लढ्यापासून अस्पृश्य बांधवांनी दूर राहावे असे आवाहन केले. वसाहतीचे स्वराज्य देण्याचा हेतू ब्रिटिशांनी जाहीर केला असताना, व धिम्या गतीने का होईना त्या दिशेने प्रगती होत असताना काँग्रेसने चळवळ करणे समयोचित नाही, असा त्यांचा एक मुद्दा. पण त्यांची खरी टीका काहीशी वेगळीच होती. ते म्हणतात, 'भारतीय समाजामध्ये ज्या शक्ती सध्या कार्यरत आहेत त्यांमध्ये राजकीय सत्तेच्या वाटपाद्वारा खराखुरा सापेक्ष बदल घडून येईल अशा प्रकारचे सत्तांतर आम्हाला हवे आहे. यासाठी तडजोडीची आवश्यकता आहे. अशा प्रकारची तडजोड होण्यावर व तिची प्रत्यक्षात कार्यवाही होण्यावरच दलितवर्गाचे भवितव्य पूर्णतः अवलंबून आहे.' काँग्रेसच्या चळवळीची निष्पत्ती म्हणून सत्तांतर घडून यायला त्यांना नको होते. कारण काँग्रेस ही केवळ उच्चवर्णीय सवर्णांचेच राज्य जातिभेद व स्पृश्यास्पृश्यता यांच्या बैठकीवर प्रस्थापित करील असा त्यांनी ठाम पूर्वग्रह करून घेतला होता. काँग्रेसचे बदलते व्यक्तिमत्त्व व वळण यांची मोकळ्या मनाने दखल घ्यायला ते तयार नव्हते. काँग्रेसमध्ये ब्राह्मणेतर व अस्पृश्य यांचा सहभाग वाढतो आहे, त्यांना तेथे 'पेशवाई अंमला'चा अनुभव येत नाही ही वस्तुस्थिती जाणून घ्यावयास ते तयार नव्हते. त्यामुळे अस्पृश्यांना सत्तेत वाटा मिळण्यासाठी, स्वसामर्थ्याच्या अभावी, त्यांची मदार ब्रिटिशांच्या सूत्रचालनाखाली केल्या जाणाऱ्या तडजोडींवर व ब्रिटिश सत्तेच्या आश्रयाने त्या तडजोडींच्या अमलबजावणीवर होती. काँग्रेसच्या चळ-

वळीचे व नेतृत्वाचे त्यांनी खंडन करावे ही गोष्ट मग स्वाभाविकच होती, पण ती योग्य होती असे नाही.

जातपात आणि स्पृश्यास्पृश्यता यांच्या पालनामागे धार्मिक श्रद्धेचाच भाग होता असे नाही, तर राजकीय व आर्थिक हितसंबंधही गुंतलेले होते हा आंबेडकरांचा मुद्दा अयोग्य नव्हता. इतक्या प्रदीर्घ कालावधीचे आयुष्य असलेली अशी गाभ्याची गोष्ट काँग्रेसने पाचदहा वर्षांमध्ये घालवून दाखवावी ही अपेक्षा अनुचित होती. घटनात्मक तरतुदींच्या बळावर व प्रशासकीय कारभाराद्वारा सामाजिक शक्तींचा असमतोल बदलता येतो ही त्यांची कल्पना भाबडी होती. तसे शक्य असते तर ब्रिटिशांनी अत्यंत आनंदाने येथील वरिष्ठवर्गीय व जातीयांना चिरडले नसते का? पुणेरी ब्राह्मणवर्गाविषयी टोकाचा अविश्वास व आकस असूनही त्यांना ब्राह्मणांचे प्रभुत्व स्वीकारावे लागले, कारण समाजात खोलवर रुजलेल्या शक्तींना उखडण्यासाठी वैकल्पिक शक्ती प्रथम समाजजीवनातच आकारास याव्या लागतात. किंवा मग सर्वंकष हुकूमशाही राजवट प्रस्थापित करून ती निर्घृणपणे टिकवून धरण्याचे आव्हान पत्करावे लागते.

अस्पृश्यांना मुक्त करण्याचे काम ब्रिटिश सरकार करू इच्छित नाही, उच्चवर्णीयांची नाराजी ओढवून करू धजत नाही हे आंबेडकरांचेच १९३० सालच्या परिषदेतील विश्लेषण. आणि तरीही त्यांना ब्रिटिश कावा लक्षात आला नाही? की ब्रिटिशांच्या सवाई कावेबाज आपण आहोत; आणि त्यांच्यावरही कढी करून दाखवू, अशा समजुतीत ते राहिले?

भावी हिंदी राज्यघटनेच्या संदर्भातला खरा मुद्दा असा होता की, प्रांतिक पातळीवर लोकप्रातिनिधिक शासन प्रस्थापित करण्यास त्यांची तयारी होती; पण ब्रिटिशांना केंद्रामध्ये जबाबदार प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा अंगीकार करावयाचा नव्हता. म्हणजेच वसाहतीच्या स्वराज्याची सुरुवातही करावयास त्यांची तयारी नव्हती. पण या आपल्या भूमिकेचा बचाव करण्यासाठी मतदारसंघ, जागा इत्यादी मुद्द्यांवरून हिंदी पुढाऱ्यांमध्ये असलेल्या मतभेदांवर ते बोट ठेवीत होते. गोलमेज परिषदेच्या पहिल्या फेरीत काँग्रेसच्या अनुपस्थितीतदेखील इतर सर्व पुढाऱ्यांचे या बाबतीत एकमत होऊ शकले नाही. आंबेडकर व श्रीनिवासन यांनी मिळून अस्पृश्यांच्या मागण्यांविषयी एक लेखी निवेदन परिषदेस सादर केले. त्यात प्रौढ मताधिकाराचे तत्त्व मान्य केले तरी पहिल्या दहा वर्षांसाठी अस्पृश्यांना विभक्त मतदारसंघ दिले जावेत ही मागणी नव्याने केली होती. राखीव जागा व संयुक्त मतदारसंघ ही भूमिका सुटली होती. सवर्ण हिंदू ही बहुसंख्याक जमात मानून इतर सर्वांनी स्वत:साठी लोकसंख्येतील प्रमाणापेक्षा काहीशा जास्तच जागा मिळाव्यात, व त्याही विभक्त मतदारसंघाच्या पद्धतीने मिळाव्यात असा आग्रह धरला. इतक्यानेही अल्पसंख्याक जमातींचे समाधान झाले नाही. त्याशिवाय प्रांतिक व केंद्रीय मंत्री वा कार्यकारी मंडळांमध्ये प्रतिनिधित्व दिले जावे, घटनेत अनेक संरक्षक तरतुदी केल्या जाव्यात, सरकारी नोकऱ्यांमध्ये प्रमाणशीर भरती केली जावी, इत्यादी मागण्या केल्या गेल्या. हिंदी ख्रिश्चन, अँग्लो-इंडियन, शीख, मुसलमान, अस्पृश्य, ब्रिटिश व्यापारी हितसंबंध, जमीनदारी हितसंबंध इत्यादी सर्वांच्या मागण्या मंजूर करावयाच्या असे म्हटले तर एकराष्ट्रीयत्वाचा व लोकशाहीचा विकास अशक्य होणार ही गोष्ट अल्पसंख्याकांच्या समितीलाही अखेरीस नमूद करावी लागली.

गोलमेज परिषदेच्या दुसऱ्या फेरीच्या वेळी गांधी–आयर्विन करार झालेला होता. काँग्रेसचे एकमेव प्रतिनिधी म्हणून गांधी परिषदेच्या कामकाजात सहभागी होते. सर्व हिंदुस्थानभर मुसलमानांना आणि पंजाबमध्ये शिखांना विभक्त मतदारसंघ व ठरावीक प्रमाणात राखीव जागा दिल्या गेल्याला बरीच वर्षे झालेली होती, आणि हिंदुस्थानच्या अलीकडच्या इतिहासात राजकीयदृष्ट्या या दोन जमातींचे एक विशेष स्थान निर्विवाद होते. हे विशेष स्थान व त्याचे कारण पुढे करून त्यांना देऊ केलेल्या राखीव जागा व विभक्त मतदारसंघ या गोष्टी निकोप राजकीय लोकशाहीच्या प्रस्थापनेच्या आड येणाऱ्याच गोष्टी होत्या याविषयी गांधींनाही शंका नव्हती. पण १८८० ते १९३० या जवळपास पन्नास वर्षांच्या काळातील घडामोडींमधून पक्की बनलेली बैठक बदलणे काँग्रेसच्या ताकदीच्या बाहेरचे होते. दुर्दैवाने पुरेशा मोठ्या संख्येने मुसलमान समाजास काँग्रेसच्या झेंड्याखाली



अनुक्रमणिका

आणण्यात अपयश आले होते. मुसलमान जमातीच्या भागीदारीशिवाय स्वातंत्र्याच्या दिशेने पाऊल पुढे पडणे अशक्य व्हावे इतके त्यांचे लोकसंख्येतील प्रमाण होते आणि अशा प्रकारे त्यांची हिंदुस्थानच्या काही भागांमध्ये बहुसंख्या होती. त्यामुळे गांधींना निखळ तर्कशुद्ध भूमिका घेता आली नाही. त्यांनी शीख व मुसलमान जमातींचा अपवाद केला, पण इतर कोणासही हा दर्जा देण्याचे अमान्य केले. काँग्रेस ही हिंदू संघटना नाही, ती राष्ट्रीय संघटना आहे हे आग्रहाने त्यांनी परिषदेपुढे मांडले. पण हिंदुस्थानी समाज हा प्रामुख्याने हिंदू व मुस्लिम अशा दोन धार्मिक जमातींचा मिळून बनलेला आहे ही वस्तुस्थिती त्यांना अमान्य नव्हती. मुस्लिमांच्या फुटीर जातीय राजकारणाला मर्यादेत ठेवून आधुनिक एकराष्ट्रीयत्व विकसित करावयाचे असेल तर मुस्लिमेतर 'सर्वसाधारण' जागांवर जातीय व धार्मिक फुटीर भूमिकेतून प्रतिनिधी निवडून न जाणे नितांत महत्त्वाचे होते. सर्वसाधारण जागांचे प्राधान्य आणखी धोक्यात आणणाऱ्या कोणत्याही प्रस्तावास मंजुरी देणे आत्मघातकी व देशाच्या अकल्याणाचे ठरेल ही गोष्ट गांधींना स्पष्ट दिसत होती.

अस्पृश्य समाजाच्या संदर्भात आणखी एक मुद्दा होता. अस्पृश्यत्वाच्या कसोटीवर जर काही जातींना एका स्वतंत्र राजकीय जमातीचा दर्जा देण्यात आला तर त्यांचा तो दर्जा टिकविण्यासाठी त्यांना सवर्ण हिंदूंनी निरंतर अस्पृश्य म्हणून वागणूक देणे आवश्यक ठरणार होते. 'अस्पृश्य' या कोटीत समाविष्ट विविध जातींना एकत्र बांधणारी धर्म, वंश वा संस्कृती यांसारखी दुसरी कोणतीच गोष्ट नव्हती. विधिमंडळांमध्ये त्यांना पाचपन्नास जागा मिळू शकतील, पण गावोगाव सवर्ण व अस्पृश्य असे दोन तट निर्माण होणार आणि त्यांच्यात शत्रुत्वाचे संबंध निर्माण होणार. खेड्यापाड्यांमधून अस्पृश्य समाज हा सवर्ण हिंदूंवर पोटापाण्यासाठी अवलंबून होता. तो दुबळाही होता. अस्पृश्यतेचे उच्चाटन या मार्गाने कसे होणार होते ? गांधींनी म्हटले की, अस्पृश्यतेच्या आधारे वेगळ्या अल्पसंख्याक जमातीचा दर्जा मागून त्यांच्या वतीने हितसंबंधी मागण्या पुढे ठेवणे ही 'सर्वांत निर्दय अशी गोष्ट आहे' कारण, 'ही महापातकी भेदरेषा चिरंतन काळपर्यंत कायम राहील अशी व्यवस्थाच करून ठेवण्यासारखे ते आहे. हिंदुस्थानचे स्वराज्य संपादन करण्यासाठीदेखील मी अस्पृश्यांच्या प्राणभूत हिताची अशी कायमची तिलांजली दिली जाण्यास राजी होणार नाही.'

गांधींचा आंबेडकरांशी खटका उडाला तो वेगळ्या मुद्द्यांवरून. वेगवेगळ्या जमातींचे पुढारी म्हणून ब्रिटिश सरकारने आमंत्रित केलेल्या व्यक्ती या लोकांच्या संघटना वा चळवळी यांच्यामधून पुढे आलेल्या, व त्या त्या जमातीच्या लोकांनी निवडून दिलेल्या नाहीत, याकडे गांधींनी लक्ष वेधले. अशा व्यक्तींनी परस्परांमध्ये वाटाघाटी करून काही ठरवावे याला कितपत महत्त्व द्यावयाचे; अशा व्यक्तींच्या वक्तव्यांना व त्यांनी केलेल्या मागण्यांना खरोखर जबाबदार व प्रातिनिधिक मानावे, अशी शंका पडते, असे सूचन गांधींच्या या विधानांमधून होत होते. गांधी असेही म्हणाले की, आपण हिंदी जनतेला स्वराज्याचे कोणते अधिकार देणार याविषयी ब्रिटिश सरकारने आपला पक्का निर्णय जर आधी जाहीर करून नवी व्यवस्था राबविण्याची जबाबदारी लोकांमध्ये काम करणाऱ्या व त्यांना जबाबदार असणाऱ्या प्रतिनिधींवर टाकली असती तर, मनमानी मागण्या पुढे ठेवून व त्यांच्याविषयी टोकाचा आग्रह राखून एकमताविषयी बेपर्वा वृत्ती बाळगणे अवघड गेले असते. कारण, आम्ही आपसांत एकमत बनवू शकलो नाही म्हणून स्वराज्याचे अधिकार आपणास प्राप्त होऊ शकत नाहीत असा जाब देण्याची प्रतिनिधींवर पाळी आली असती. गोलमेज परिषदेत एकत्र आलेल्या बव्हंश प्रतिनिधींना परत गेल्यावर कोणालाच जाब द्यावयाचा नसल्याने, एकमत बनविण्याच्या दिशेने प्रामाणिकपणे प्रयत्न व समंजस देवाणघेवाण करण्याऐवजी, प्रत्येकजण जास्तीत जास्त मागण्या पुढे ठेवण्याच्याच मागे लागलेला होता. गांधींच्या टीकेत फार मोठे तथ्य होते. पण तेथे जमलेल्या आमंत्रित पुढाऱ्यांच्या प्रातिनिधिकतेचाच मुद्दा उपस्थित केल्याने आंबेडकरांचा संताप होणे स्वाभाविक होते.

गांधींचा समाचार घेताना आंबेडकर म्हणाले, 'आम्ही सरकारनियुक्त आहोत हा आरोप आम्ही खोडून काढू शकत नाही. पण माझ्यापुरते तरी मी

अनुक्रमणिका

खचितच असा दावा करतो की, या परिषदेसाठी प्रतिनिधी निवडण्याची संधी जरी हिंदुस्थानातील दलितवर्गांना दिली गेली असती तरीदेखील माझी येथे निवड झालीच असती. म्हणून, सरकारने माझी नेमणूक केलेली असली तरी, माझ्या समाजाच्या आकांक्षांचे मी पूर्णपणाने प्रतिनिधित्व करतो असे माझे निश्चितपणे म्हणणे आहे.' एवढे म्हणून आंबेडकर थांबले नाहीत. अस्पृश्यांचे प्रतिनिधित्व काँग्रेसच इतर कोणाहीपेक्षा अधिक खऱ्या अर्थाने करते हा काँग्रेसवाल्यांचा दावा खोटा आहे, आणि (गांधींसारखी ?) बेजबाबदार माणसे तो करीत असतात, पण अस्पृश्य निरपवादपणे तो नाकारीत आले आहेत, असे त्यांनी ठासून सांगितले. अस्पृश्य समाज काँग्रेसबरोबर नाही, असाही त्यांनी दावा केला.

गांधींनी याला उत्तर दिले. काँग्रेस अस्पृश्यांचे प्रतिनिधित्व करीत नाही, बेजबाबदार माणसे हा खोटा दावा करीत आहेत, या आरोपाला प्रत्युत्तर देणे भागच होते. गांधींचे उत्तर असे होते : 'कोटय-वधी अस्पृश्य जनांचे प्रतिनिधित्व व्यक्तिशः माझ्या रूपाने मी करतो असा माझा दावा आहे. येथे मी केवळ काँग्रेसच्या वतीने बोलतो आहे असे नाही. मी व्यक्तिशः माझ्याही वतीने बोलत आहे. अस्पृश्यांचे जर सार्वमत घेतले तर मला सर्वाधिक मते अस्पृश्यांची पडतील असा माझा दावा आहे.' अस्पृश्यांचे सार्वमत घेतल्यास मलाच सर्वांत अधिक मते पडतील असे गांधींनी म्हणावे हे त्यांचा तोल ढळल्याचे लक्षण म्हटले पाहिजे. त्यांना सर्वाधिक मते पडली असतीही, पण असे त्यांनी म्हणणे गैर होते.

अस्पृश्य ही हिंदूंशी कोणताच संबंध नसलेली मुसलमानांप्रमाणेच स्वतंत्र जमात आहे हा आंबेडकरांचा मुद्दा चुकीचा होता. अस्पृश्य समाज हा हिंदू समाजाचा एक घटक मानला तरी, अस्पृश्यांच्या हितसंबंधांच्या जपणुकीच्या दृष्टीने त्यांचे म्हणून व त्यांच्याचमधून आलेले प्रतिनिधी पुरेशा संख्येने विधिमंडळांमध्ये असले पाहिजेत; आणि तसे ते निवडून यावयाचे असतील तर त्यांच्यासाठी जागा राखीव ठेवायला हव्यात एवढ्या मर्यादेपर्यंत आंबेडकरांचा मुद्दा योग्य होता. काँग्रेस वा शासन वा इतर सभासद यांच्या सदिच्छेवर व नाममात्र नेमणुकीवर ही बाब सोडून देण्यास ते तयार नव्हते हे योग्यच होते. पण काँग्रेस व सवर्ण हिंदू यांचा अतिरेकी अधिक्षेप करीत, प्रमाणाबाहेर जागा व विभक्त मतदारसंघ यांची मागणी करणे, व या मागणीचे समर्थन व्हावे म्हणून अस्पृश्य ही अस्पृश्य या नात्याने वेगळी जमात आहे असा दावा करणे बरोबर नव्हते.

ब्रिटिश सरकारने आमंत्रित केलेल्या व्यक्ती या त्या त्या जातिजमाती वा समाजघटक यांना जाबजबाब देण्यास बांधील नाहीत, त्यांना लोकांनी निवडलेले नाही कारण त्यांच्यामागे लोकशाही संघटना नाहीत, आणि म्हणून त्या जबाबदार प्रतिनिधी नाहीत, ही वस्तुस्थिती बहुतेकांच्या बाबतीत होती. पण या मुद्द्यावर मग काँग्रेसने गोलमेज परिषदेत सहभागी व्हायचे आधीच नाकारावयास हवे होते. एकदा सहभागी झाल्यावर, वाटाघाटींना अपयश आल्यावर हा मुद्दा पुढे आणणे गैर होते. त्यांची प्रातिनिधिकता आधी स्वीकारली व नंतर नाकारली असा प्रकार झाला.

१९३० सालच्या देशव्यापी लढ्याचा परिणाम हिंदुस्थान सरकारने काँग्रेसशी बरोबरीच्या नात्याने तह करण्यात झाला होता. म्हणजे, राष्ट्राचे प्रतिनिधित्व करण्याचा हक्क काँग्रेसने कमावलेला होता. गोलमेज परिषदेतील इतर बहुतेक जण सरळसरळच जातिजमातींच्या संकुचित हितसंबंधांचे प्रतिनिधित्व करण्यासाठी भाग घेत होते. त्यांच्या प्रातिनिधिकतेस आव्हान न देता काँग्रेसने (म्हणजे गांधींनी) राष्ट्रीय भूमिकेतून सर्वांचे प्रतिनिधित्व करण्याचा आपला हक्क बजावीत राहायचे, तसा आपणास हक्क असल्याचे ठासून सांगत राहायचे. गांधींनी सामान्यतः असाच पवित्रा कायम ठेवला. पण या एका प्रसंगी त्यांची सहनशीलता संपली व शांती ढळली असे म्हटले पाहिजे.

पंडित मोतीलाल नेहरूंच्या अध्यक्षतेखालील समितीच्या रिपोर्टात अस्पृश्यांच्या प्रतिनिधित्वाचा केलेला विचार अपुरा होता. अस्पृश्यांचे हित पाहणारे आपण आहोतच ही वृत्ती आत्मसंतुष्टतेची व अदूरदर्शीपणाची द्योतक होती. जातपात व स्पृश्यास्पृश्यता यांच्या मुळाशी असलेल्या राजकीय, आर्थिक हितसंबंधांची जाण काँग्रेसच्या [illegible]मध्ये फार

अनुक्रमणिका

होती. अस्पृश्यांना सरळसरळ सत्तेमध्ये सहभाग मिळण्याचे जे महत्त्व आंबेडकर प्रतिपादीत होते ते योग्य होते. अस्पृश्यांच्या सामाजिक, आर्थिक व राजकीय मुक्तीसाठी दीर्घकाळ संघर्ष करावा लागणार आहे ही आंबेडकरांची जाण अचूक होती. हा संघर्ष वा लढा हिंदू समाजाच्या आंतरिक पुनर्संघटनेचा होता, आणि म्हणून तो साम्राज्यवादी परस्थ शक्तींच्या आश्रयाने व साहाय्याने चालविण्याची नीती मात्र अयोग्य होती. दुसऱ्या गोलमेज परिषदेस जाण्यापूर्वी आंबेडकरांनी गांधींची भेट घेतली होती. संयुक्त मतदारसंघातच सर्वसाधारण जागांपैकी काही जागा अस्पृश्यांसाठी राखीव ठेवण्यासंबंधी त्याच वेळी गांधी जर आपली सहमती दर्शविते तर काय घडले असते सांगता येत नाही. पण गांधींनी आंबेडकरांचे व्यक्तित्व, त्यांचे १९१९ ते १९२९ या काळातील कार्य व त्यांची दृष्टी व भूमिका यांचा पुरेसा परिचय करून घेतला नव्हता आणि अस्पृश्यांच्या प्रतिनिधित्वाच्या मुद्द्याचा पुरेशा गांभीर्याने विचारही केला नव्हता, असे म्हणावे लागते.

अस्पृश्य या नात्याने अस्पृश्य ही एक वेगळी जमात आहे, आणि तिचा हिंदूंचा काही संबंध नाही; अस्पृश्यांचे, अस्पृश्य या नात्याने राजकीय हक्क आहेत, हे आंबेडकरांचे प्रतिपादन समाजशास्त्रीय-दृष्टचा अवास्तव व प्रत्यक्ष परिणामांच्या दृष्टीने असमंजस होते. अस्पृश्यतेच्या उच्चाटनाच्या दृष्टीने आणि अस्पृश्यांच्या भल्याच्या दृष्टीने या भूमिकेचा प्रतिवाद करणे आवश्यक होते. पण ब्रिटिशांनी अनुकूल भूमिका घेतली असल्याने तात्कालिक राजकीय लाभांच्या आकर्षणामुळे बौद्धिक युक्तिवाद प्रभावी ठरेल अशी शक्यता कमी होती. हे जाणून गांधींनी गोलमेज परिषदेच्या अल्पसंख्याक समितीत आपला निर्धार व्यक्त करताना म्हटले, 'अस्पृश्य हे चिरंतन काळपर्यंत अस्पृश्यच राहणार का ? त्यापेक्षा हिंदुधर्माचा नाश झालेला मी पत्करेन... साऱ्या पृथ्वीचे राज्य जरी कोणी देऊ केले तरी मोबदल्यात त्यांचे हक्क सोडून द्यायला, त्यांच्या हक्कांचा सौदा करायला मी कदापि कबूल होणार नाही. मी पूर्ण जबाबदारीने बोलत आहे, आणि मला असे म्हणावयाचे आहे की, हिंदुस्थानभरच्या साऱ्या अस्पृश्यांच्या वतीने बोलण्याचा हक्क सांगत डॉ. आंबेडकर त्यांच्या नावाने जो दावा करीत आहेत (की हिंदू समाजाशी कोणताच संबंध नसलेली अस्पृश्य ही एक पृथगात्म व स्वायत्त जमात आहे) तो योग्य नाही. त्यांचा दावा मान्य केला तर हिंदू समाजात दोन तट पडतील. ही विभागणी मी कोणत्याही प्रकारे स्वीकारू शकत नाही. अस्पृश्यांची तशी इच्छा असेल तर, धर्मांतर करून ते मुसलमान वा ख्रिस्ती बनले तर ती गोष्ट मानायला मी तयार आहे. ते मी सहन करीन, पण प्रत्येक खेड्यात दोन तट पडण्यामधून हिंदू समाजावर जे संकट कोसळेल ते मी खपवून घेऊ शकत नाही. अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांसंबंधी जे बोलतात त्यांना हिंदुस्थानचा परिचय नाही, आज हिंदी समाजाची बांधणी कशी झालेली आहे त्याची कल्पना नाही. आणि म्हणून जेवढे काही माझे वजन असेल तेवढे सर्व पणाला लावून मी असे म्हणतो की, या गोष्टीचा (विभक्त मतदारसंघ बहाल करून तट पाडण्याचा) प्रतिकार करणारा मी एकटाच असलो तरी बेहत्तर, पण मी याचा प्राणपणाने प्रतिकार करीन.'

– ६ –

विधिमंडळांमधील जागांचे वाटप कसे व्हावे यावरून हिंदी पुढाऱ्यांमध्ये एकमत न झाल्याने ब्रिटिश पंतप्रधान मॅक्डोनल्ड यांनी निवाडा दिला. या निवाड्याने अस्पृश्यांना राखीव जागा व विभक्त मतदारसंघ दिले.

या वेळी गांधी तुरुंगात होते. काँग्रेसला कायमचे नामशेष करण्याची आकांक्षा मनात ठेवून व्हाइसरॉय विलिंग्डन यांनी निर्घृण दडपशाही चालविलेली होती. गोलमेज परिषदेच्या वेळी जाहीर केलेल्या निर्धारानुसार गांधींनी प्राणांतिक उपोषण करण्याचा मनोदय जाहीर केला. देशात प्रचंड खळबळ माजली. ब्रिटिश सरकारने घोषित केले की, स्पृश्य व अस्पृश्य हिंदू यांनी जर आपापसांत समझोता केला तर आम्ही तो स्वीकारू. पण एरवी निवाडा एकतर्फी आम्हाला बदलता येणार नाही. अस्पृश्य पुढाऱ्यांमध्ये आंबेडकरांना पटविणे सर्वांत अवघड असल्याची जाणीव सर्वांनाच होती. यामुळे सर्व लक्ष व प्रयत्न त्यांच्यावर केंद्रित झाले. त्यांना विलक्षण महत्त्व प्राप्त झाले, तसे त्यांच्यावर प्रचंड दडपणही आले.

उपोषणाच्या निर्णयावर कडवट टीकाटिप्पणी आंबेडकरांनी केली. पण आपणास फेरविचाराला सरळसरळ नकार देता येणार नाही हे त्यांना स्पष्ट दिसत होते. 'जातिविषयक निर्णय बदलला जावा असा गांधीजींचा जर आग्रह असेल तर त्यांनी दुसरी योजना सादर केली पाहिजे व आज जे काही अस्पृश्यांना मिळाले आहे त्यापेक्षा आपल्या या योजनेत अस्पृश्यांचे अधिक हित आहे व ते हित अमलात येण्यासाठी लागणारी सर्व कायदेशीर तरतूद त्या योजनेत आहे, असे त्यांनी सिद्ध करून दाखविले पाहिजे' ही आपली भूमिका स्पष्ट करून त्यांनी जाहीर केले की, 'गांधीजींचा प्राण व माझ्या लोकांचे हक्क या दोहोंपैकी कोणत्या तरी फक्त एकाच गोष्टीची निवड करण्याचा दुर्धर व नाजूक प्रसंग आल्यास मी कोणत्या गोष्टीची निवड करीन हे न सांगताही समजण्यासारखे आहे. काहीही झाले तरी स्पृश्य हिंदूंच्या हवाली माझ्या लोकांचे भवितव्य सोपविण्यास मी कदापिही कबूल होणार नाही.'

राखीव जागा व विभक्त मतदारसंघ पदरात पाडून घेऊन आपण अस्पृश्यांसाठी राजकीय सत्तेचा लक्षणीय वाटा प्राप्त करून घेण्यात यश संपादन केले अशी आंबेडकरांची रास्त धारणा होती. स्पृश्य हिंदूंच्या व काँग्रेसच्या (म्हणजेच ओघाने गांधींच्या) कारवायांवर सवाई मात करून आपण विजय संपादन केला अशीही त्यांची आत्मगौरवाची भावना होती. जे पदरात पडले आहे त्यात आणखी भर पडत असेल तरच विभक्त मतदारसंघावर आंबेडकर पाणी सोडण्यास राजी होतील हे स्पष्ट झाले असणार. हिंदू समाजामधीलच एक घटकभाग, या गोष्टीस मान्यता असेल तर विधिमंडळांमध्ये त्यांना प्रमाणशीर प्रतिनिधित्व देण्यास गांधी जेवढ्या तत्परतेने तयार होते तेवढे इतर हिंदू पुढारी नव्हते. एका हाताने मिळणार असलेली राजकीय सत्ता दुसऱ्या हाताने निघून जाणार होती.

सवर्ण हिंदू वा काँग्रेस यांच्याविषयीचे आंबेडकरांचे मत कायमच होते. बहुमताचे राज्य म्हणजे सवर्ण हिंदूंचे राज्य म्हणजे अस्पृश्यांना गुलामीत डांबणारे राज्य ही समीकरणे त्यांच्या मनात तशीच होती. अस्पृश्यांना राजकीय सत्तेत वाटा हवा त्याचा प्रधान व सर्वप्रथम हेतू सवर्ण हिंदूंना खीळ घालता यावी हा आहे ही गोष्ट त्यांच्या मांडणीतून उघड होत आली होती. वाटाघाटींच्या वेळी आंबेडकरांविषयीचा मनातील कटू भाव वाढलाच असला पाहिजे. शेक्सपियरच्या 'मर्चंट ऑफ व्हेनिस' मधल्या शायलॉकची ('I mnst have my pound of flesh') आठवण सवर्ण हिंदू पुढाऱ्यांना झाली असणार. पण गांधींनी आपले प्राण पणाला लावले आहेत याचे त्यांना भान होते. विभक्त मतदार संघावर पाणी सोडावयाचे असेल तर त्या बदल्यात आपणास काय मिळणार, असा आंबेडकरांचा सवाल होता. निवाड्याने दिल्या त्याहून पुष्कळ अधिक जागा दिल्या जाव्यात अशी त्यांची अपेक्षा होती. अस्पृश्यांमधून निवडून जाणारे प्रतिनिधी हे सवर्णांचे हस्तक वा त्यांच्या हातातील बाहुली नसावेत यासाठी निवडणुकीस कोणास उभे राहता येईल हे ठरविण्यासाठी प्रथम केवळ अस्पृश्यांचेच मत घेतले जावे, आणि या मतमोजणीत ज्यांना पहिल्या चार क्रमांकांची मते पडतील त्यांनाच निवडणूक लढविता यावी, अशी पद्धती स्वीकारली तर विभक्त मतदार संघ सोडून दिल्यानंतरही आपली स्वतंत्रता टिकून राहील असे आंबेडकरांना वाटले.

'पुणे करारा'ने आंबेडकरांना त्यांना हवे होते ते सर्व सढळपणे दिले. करार झाल्या झाल्या त्यांनी जे भाषण दिले त्यात ते म्हणाले, 'आपणा सर्वांच्या सहकार्याने व आपण शोधून काढलेल्या उपाययोजनेमुळे मी आज खूष आहे. एकीकडे महात्मा गांधींचे जीवनही वाचवू शकलो आणि दुसरीकडे सुसंगतपणे दलितवर्गाच्या भावी कल्याणाचा व अवश्य त्या संरक्षणाचा प्रश्नही सोडवू शकलो. ह्या सर्व वाटाघाटीच्या श्रेयापैकी फार मोठा वाटा महात्मा गांधींना दिला पाहिजे. मी त्यांना भेटलो तेव्हा आम्हा दोघांच्या विचारांत बरेचसे साम्य आहे असेच मला आढळले; तेव्हा तर माझ्या आश्चर्याला पारावार राहिला नाही, हे कबूल केलेच पाहिजे.' करार झाल्यानंतर काही दिवसांनी आंबेडकर गोलमेज परिषदेच्या तिसऱ्या फेरीसाठी इंग्लंडला गेले. त्या वेळी बोटीवरून 'जनता' या त्यांच्या पत्रासाठी पाठविलेल्या वार्तापत्रात ते म्हणतात, 'या डावात अस्पृश्य समाजाची कल्पनातीत सरशी झाली...

अस्पृश्यांना मध्यवर्ती कायदे कौन्सिलात पुणे करारामुळे शेकडा १८ जागा मिळाल्याचे पाहून हा आपल्या योजनेला दुर्दैवाने दिलेला एक प्रखर तडाखाच आहे, असे सरकारी अधिकाऱ्यांना व मुत्सद्यांना वाटत असल्यास त्यात बिलकूल आश्चर्य नाही! २८ सप्टेंबर १९३४ रोजी 'पुणे करार स्मृतिदिन' साजरा करणारी सभा मुंबईस झाली. त्या प्रसंगी केलेल्या भाषणात बाबासाहेब म्हणाले, 'पुणे करार हा अस्पृश्यांच्या इतिहासात एक चिरस्मरणीय असा प्रसंग आहे. या कराराच्या द्वारे आपल्या समाजाने बेदरकार हिंदू समाजास आपले राजकीय अस्तित्व कबूल करण्यास भाग पाडले आहे. .. पुणे करारान्वये आपल्या समाजास मिळालेले अधिकार आपण योग्य रीतीने उपयोगात आणतो की नाही हे पाहण्याकरिता या दिवशी जमले पाहिजे.' १९३४ पावेतो पुणे करारामुळे जादा जागा (७१ च्या जागी १४८) अस्पृश्यांसाठी राखीव म्हणून सोडाव्या लागल्याबद्दल सवर्ण हिंदू पुढाऱ्यांना वाटणारा क्षोभ व्यक्त झालेला होता व या कराराच्या 'सापळचा'-तून आपण कसे सुटू शकू याचा विचारही काही पुढारी करीत होते असे दिसते. हिंदू पुढाऱ्यांविषयी आंबेडकरांचे उद्‌गार परत विखारपूर्ण निघू लागले होते. अशा वेळी पुणे कराराविषयी त्यांची भावना स्पृश्य हिंदू पुढाऱ्यांना चीतपट करून अस्पृश्यांना मिळवून दिलेली राजकीय सत्तेची सनद याच आशयाची होती, ही गोष्ट ध्यानात घेणे महत्त्वाचे आहे.

पुणे करारामुळे आंबेडकर आणि गांधी यांच्यामधील सर्व मतभेद मिटलेले नव्हते. आंबेडकरांचा भर राजकीय सत्ता हस्तगत करण्यावर, व सत्तेच्या जोरावर अस्पृश्यांची स्थिती बदलण्यावर अधिक होता. पुणे करारानंतरही राजकीय स्वातंत्र्य-प्राप्तीच्या राजकारणात काँग्रेसची साथ करण्याची भूमिका त्यांनी घेतलेली नव्हती. सवर्ण हिंदूंवर मात करण्यासाठी युद्ध करण्याचा त्यांचा पवित्रा व त्याला अनुरूप भाषा कायमच होती. अस्पृश्यता निवारणासाठी गांधींनी जी संस्था काढायचे ठरविले होते तिचे कामकाज कसे चालावे, त्या संस्थेची सूत्रे कोणाच्या हाती असावीत, संस्थेच्या कामाचा रोख काय असावा, या मुद्द्यांवरून गांधींचा व त्यांचा



लौकरच बेबनाव होणे यामुळे अटळच होते. शत्रुत्वाच्या भूमिकेतून आक्रमक हल्ले चढवून हिंदू समाजातून अस्पृश्यतेचे निर्मूलन न करता मित्रत्वाच्या भूमिकेतून सवर्णांचे आंतरिक हृदयपरिवर्तन घडवून आणण्याची गांधींची भूमिका होती. अस्पृश्यता हे एक पाप असून सवर्णांनी अस्पृश्यांची स्थिती सुधारण्यासाठी सेवाकार्य करून पापक्षालन करावयाचे आहे, व यासाठी ही नवी संस्था आहे अशी स्पष्टता गांधींनी केली; तर अस्पृश्यांची एक जहाल, संघर्षवादी सुधारक संघटना उभारण्यासाठी, उग्रवादी कार्यकर्त्यांची सेना उभारण्यासाठी गांधी हरिजन कार्यासाठी गोळा करीत असलेल्या पैशाचा विनियोग व्हावा अशी त्यांची सूचना होती. या संदर्भात ठक्कर बाप्पा यांना १९३२ च्या नोव्हेंबरात लिहिलेल्या पत्रात आंबेडकर म्हणतात, 'आपल्या हक्कांसाठी झगडण्यास अस्पृश्य जनतेला हे स्वयंसेवक उत्तेजन देतील व प्रवृत्त करतील. आणि सरकारी दरबारी अस्पृश्यांना न्याय मिळवून देण्यासाठी पैशाची व इतर आवश्यक मदतही या स्वयंसेवकांमार्फत अस्पृश्यांना मिळेल अशी व्यवस्था झाली पाहिजे.' '"आपल्याला आता बदललेच पाहिजे. जुन्या समजुतीचा, रूढाचाराचा त्याग केल्याशिवाय आता आपल्याला गत्यंतरच नाही." असा विचार करण्यास भाग पाडणारी परिस्थिती निर्माण झाल्याचे स्पृश्य जनतेच्या जेव्हा प्रत्ययास येईल तेव्हाच अस्पृश्यांच्या उन्नतीचा मार्ग खुला झाला असे समजता येईल.' हिंदू समाजसुधारणेचे व पुनर्रचनेचे गांधी व आंबेडकरांचे मार्ग भिन्न होते.

— ७ —

'पुणे करारा'च्या पार्श्वभूमीवर आंबेडकर काँग्रेसविषयीचा पूर्वीचा अविश्वास व शत्रुत्व सोडून देऊन चळवळीशी हातमिळवणी करतील अशी अपेक्षा काँग्रेसच्या पुढाऱ्यांनी राखली असली तर ती गोष्ट स्वाभाविक व उचित होती. काँग्रेसशी मतभेद असल्यामुळे लिबरल मंडळींनी हिंदी राजकारणात आपली वेगळी चूल १९१८ साली मांडली होती. श्रीनिवास शास्त्री, सप्रू, जयकर आदी मंडळी त्यांत प्रमुख होती. त्यांची भूमिका 'सनदशीर घटनात्मक सुधारणावादी' (constitutional reformist) या अर्थाने ब्रिटिश राज्यकर्त्यांशी



अनुक्रमणिका

सहकार्य करण्याची असतानाच दुसरीकडे त्यांचे कार्य काँग्रेसविरोधी कधी बनले नाही. काँग्रेसच्या मार्गाविषयी त्यांचे मतभेद असले तरी काँग्रेसच्या राष्ट्रीय बाण्याविषयी त्यांनी कधी शंका घेतली नाही. आंबेडकरांना आपली संघटना व चळवळ स्वायत्त ठेवूनही यासारखी भूमिका घेता आली असती. परस्परविश्वासाचे संबंध व वातावरण टिकवून धरण्याचे महत्त्व गांधींनी बाबासाहेबांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केला. दुर्दैवाने, सामंजस्य, विश्वास यापेक्षा हमखास खात्री बाळगता येईल अशा संरक्षक तरतुदींनी प्रत्येक गोष्ट पदरात पाडून घेण्याचा आग्रह धरण्याची त्यांची वृत्ती होती. पण व्यवहारात सर्वच गोष्टी घटनात्मक संरक्षक तरतुदींच्या आधारे मिळविता येत नसतात.

पुणे कराराच्या आधारे निवडणुका लढविण्यासाठी आंबेडकरांनी 'इंडिपेंडंट लेबर पार्टी'ची स्थापना केली. अस्पृश्येतर कामगार, मजूर, कुळे, शेतकरी यांना आपल्या पक्षात आणण्यात त्यांना यश आले नाही. या पक्षाच्या व्यासपीठावरूनही त्यांनी काँग्रेसशी वैरच पत्करले. काँग्रेसही सवर्ण हिंदू संघटनाच केवळ नसून ती भांडवलदार धनिकांची बगलबच्ची संघटना आहे अशी टीका भरीला ते करू लागले. राजकारणाच्या पातळीवर दिलेले आव्हान काँग्रेसला स्वीकारावयास हवेच होते. काँग्रेस ही केवळ उच्चवर्णीय सवर्ण हिंदूंची संघटना नाही, मुसलमान, अस्पृश्य, ब्राह्मणेतर, तसेच शेतकरी, कुळे, कामगार अशा विविध समाजघटकांचा तिला पाठिंबा आहे ही गोष्ट निवणुकांद्वारे सिद्ध करण्याचे, व आपले अग्रगण्य व एकमेव राष्ट्रीय संघटना म्हणून असलेले चारित्र्य प्रकट करण्याचे कर्तव्य काँग्रेसला पार पाडावयास हवेच होते. १९३२ ते ३४ या काळात व्हाइसरॉय यांनी काँग्रेससंघटना कायमची निकालात काढल्याची शेखी मिरवली होती. तीही खोटी पाडावयाची होती. 'पुणे करारा'ने अस्पृश्यांना जागा दिल्या होत्या व त्या मिळविण्यात आंबेडकरांचा मोठा वाटा होता, हे बरोबर. पण या जागा आंबेडकरांच्या पक्षाला काही बहाल केलेल्या नव्हत्या. किंवा केवळ अस्पृश्य समाजात कार्य करणाऱ्या राजकीय वळणाच्या अस्पृश्य संघटनांनीच या जागांसाठी निवडणुका लढवाव्यात असा तो करार नव्हता. मॅक्डोनल्ड यांचा निवाडाही हे बंधन घालणारा नव्हता. पण काँग्रेसने या जागांसाठीही आपले उमेदवार उभे करावेत व काँग्रेसी उमेदवार निवडून द्यावेत या दोन्ही गोष्टींनी आंबेडकरांना धक्का बसलेला दिसतो. याने आपला विश्वासघात झाल्याने, कराराचा जणू भंग झाल्यासारखे वाटले, असेही दिसते. आपल्या पक्षातील व आपल्याला एकनिष्ठ तेवढेच अस्पृश्य कार्यकर्ते वा अनुयायी तेवढे अस्सल, बाकी सर्व 'लेभागू' (आंबेडकरांचाच शब्द), भ्रष्ट, बदमाश, लाचार, हस्तक अशी त्यांची धारणा आढळते. स्वाभाविकच त्यांची घोर निराशा झाली व काँग्रेस व गांधी यांच्याविषयी त्यांच्या मनात विखार दाटला.

आपल्या अपयशाचे खापर आंबेडकर पुणे करार, आणि गांधी व काँग्रेस यांची कुटिल नीती यांच्यावर फोडीत राहिले. समर्थ देशव्यापी पक्ष बहुजिनसी घटकांमधून उभारण्यासाठी आवश्यक ते नेतृत्वगुण त्यांच्या ठायी पुरेशा प्रमाणात नव्हते याचे एक ठळक उदाहरण १९३७ च्या निवडणुकांच्या संदर्भातलेच आहे. इंडिपेंडंट लेबर पार्टीच्या वतीने उभे केलेले राखीव जागांसाठीचे सर्व चौदा उमेदवार महार होते. याचा खुलासा करण्याचा प्रसंग आला तेव्हा आंबेडकरानी केलेला युक्तिवाद अगदी असमंजस होता. वेगवेगळ्या अस्पृश्य जातींचे एकात्म राजकीय संघटन बांधावयाचे होते तर वेगवेगळ्या जातींमधील होतकरू तरुण हेरून त्यांना पुढे आणणे ही एक प्राथमिक आवश्यकता त्यांनी मानावयास हवी होती. स्वतंत्र मजूर पक्षाचे विधिमंडळात एकूण १४-१५ सभासद होते. त्यांच्यातील एकीबद्दल, त्यांनी बजावलेल्या कामाबद्दल आंबेडकर गौरवाने बोललेले आहेत. मग प्रश्न असा पडतो की स्वतंत्र मजूर पक्षाची ही वाट सोडून पुढे परत अनुसूचित जातींचाच फक्त राजकीय पक्ष काढण्याचा निर्णय का घेतला ? वस्तुस्थिती अशी दिसते की, अभ्यास, बुद्धिमत्ता, वकिली करण्याची हातोटी युयुत्सुवृत्ती या गुणांच्या जोरावर आंबेडकर प्रवक्तेपण समर्थपणे करू शकत असत. दुसऱ्या बाजूला आपल्या एकमेवाद्वितीय स्वयंसिद्ध पुढारीपणाविषयी ते इतके निःशंक होते की, प्रेषित व त्याच्या भोवतीचे शिष्य/भक्त व विभूतीची पूजा करणारे जनसामान्य ही रचनाच त्यांच्या पिंडाला

मानवणारी होती. ब्रिटिशांनी त्यांना त्यांच्या साम्राज्यवादी राजकारणात सोयीचे होते तेव्हा तेव्हा प्रवक्तेपण बहाल केले, वा त्यांना उठाव मिळेल अशी पदे देऊ केली. पण आंबेडकर या साऱ्या संधींचा लाभ उठवून समर्थ राजकीय पक्षाची बांधणी करू शकले नाहीत, वा अशी बांधणी करण्याची क्षमता असलेले सहकारी भोवती गोळा करू शकले नाहीत. पण त्यांना निकटवर्ती शिष्य व भक्त मिळाले, त्यांना विभूतिमत्व प्राप्त झाले, देवदेवतांच्या पंक्तीला ते जाऊन बसले.

काँग्रेस पक्ष ही एक राष्ट्रीय आघाडी होती. वर्गविग्रहाच्या मार्गाने समाजवादी क्रांती आणणारा तो पक्ष नव्हता. काँग्रेसच्या हाती ज्या प्रांतांमध्ये १९३७ साली कारभार आला त्या प्रांतांमध्ये काँग्रेसने आमूलाग्र सामाजिक, आर्थिक व राजकीय परिवर्तनाचा कार्यक्रम हाती घेतला नाही. हिंदी समाजामध्ये उच्चवर्णियांचे, सरंजामशाही वळणाच्या जमीनदारांचे, बूर्झ्वा भांडवलदारांचे–मालकांचे, मध्यमवर्गीय बुद्धिजीवी उच्चवर्णियांचे जे प्रभुत्व होते ते निपटून काढण्याच्या कार्यक्रमावर काँग्रेस निवडून आलेली नव्हती. सामाजिक व आर्थिक न्याय व समताप्रस्थापनेच्या दिशेने वाटचाल करण्याचे आश्वासन आणि उत्पातकारी क्रांती यांच्यात अर्थातच मोठे अंतर होते. क्रांतिकारक भूमिकेमधून काँग्रेसच्या चारित्र्याची, तिच्या राजवटीची तपासणी केली तर टीकेचे पुष्कळ मुद्दे सापडण्यासारखे होते. काँग्रेसी मंत्रिमंडळाच्या कारभारावर या भूमिकेतून परखड टीका काँग्रेसमधीलच समाजवादी विचाराच्या गटांनी काही कमी केली नाही. १९३७ साली मुख्य मुद्दा प्रांतिक पातळीवरील स्वायत्ततेच्या तरतुदीनुसार हिंदी मंडळींनी राज्य चालविण्याचा होता. अद्यापि केंद्रात जबाबदार मंत्रिमंडळाचे तत्त्व स्वीकृत व्हावयाचेच होते. आंबेडकरांनी काँग्रेसच्या 'उजवे'-पणाला धरून केलेली टीका, वेगळ्या अंगाने व वेगळ्या संदर्भात, गांधींनाही मान्य झाली असती.

पण काँग्रेसचा जय म्हणजे ब्राह्मणशाहीचा (पेशवाईचे पुनरुज्जीवन या अर्थाने) जय, किंवा काँग्रेसच्या हाती राज्य म्हणजे अस्पृश्यांना गांजणाऱ्यांच्या हाती राज्य, ही टीका अन्याय्य होती. काँग्रेसच्या राज्यामुळे 'इस्लाम खतरेमे है' असा प्रचार मुस्लिम लीग उत्तरप्रदेशात करीत होती; मुसलमानांचा मोठा छळ, मोठी दडपणूक चालली आहे असा आरडाओरडा करीत होती. मुसलमानांच्या मनात भीती उत्पन्न करून त्यांना लीगच्या पाठीशी संघटित करण्याचा तो प्रयत्न होता. आंबेडकरांचीही नीती काही प्रमाणात हीच होती असे त्यांच्या त्या काळातील भाषणांवरून आढळून येते. बागुलबोवा उभा करण्याचा हा प्रयत्न होता. आंबेडकर काँग्रेसच्या 'मायावी जाळ्या'मध्ये अस्पृश्यांनी फसू नये म्हणून तऱ्हेतऱ्हेच्या युक्तिवादाने व दृष्टांतांच्या आधारे श्रोत्यांना काँग्रेसचे भय घालताना पाहावयास मिळते. एकच उदाहरण आपण घेऊ : १९३८ सालच्या एका व्याख्यानात आंबेडकर म्हणतात, 'मला तुम्ही असे सांगा की, गावातील मारवाडी किंवा सावकार याने ४ आण्याची काँग्रेसची वर्गणी भरली किंवा गांधी टोपी डोकीवर चढवली म्हणजे तो आपला देहस्वभाव कसा विसरू शकेल ? तो आपल्या गरीब कुळांकडून व्याज उकळल्याशिवाय कसा राहील ? तुमच्या माना मुरगाळणे तो कसा सोडून देईल ? आणि आज काँग्रेस सांगत आहे की आम्ही सावकारांचे व गरिबांचेही हित साधणार आहोत. मांजर व उंदीर या दोघांनाही ती एके ठिकाणी कशी वागवणार व मांजराच्या पुढ्यात उंदीर ठेवून उंदराचा जीव कसा बचावणार ?' युक्तिवाद व दृष्टांत दोन्ही मोठे मार्मिक, प्रभावी व बिनतोड वाटतात. आंबेडकरांच्या टीकेत तथ्य आहेही. पण यावर असेही म्हणणे शक्य होते की, जो मारवाडी किंवा सावकार काँग्रेसची पताका खांद्यावर घेऊन संघटनेत सामील होई, प्रसंगी चळवळीत तुरुंगवासही भोगे, त्याचे वर्तन, पूर्वीच्या त्याच्याच वर्तनाच्या तुलनेत, वेगळे होत असल्याचा लोकांचा अनुभव होता. जे काँग्रेसमध्ये नाहीत अशा इतर पक्षांतील 'मारवाडी'-'सावकारां'च्या तुलनेत तर लोकांना फरक जास्तच ठळकपणे जाणवे. म्हणून व्यवहारात दृष्टांत पूर्ण खराही ठरत नव्हता. आणि साऱ्याच दृष्टांतांची हीच गोष्ट असते.

– ८ –

स्वतंत्र मजूर पक्षाचा प्रयोग खऱ्या अर्थाने यशस्वी झाला नाही. व्यवहारात तो जागोजागच्या महाराष्ट्रीय महार जातीयांचाच मुख्यत्वेकरून पक्ष राहिला

असे दिसून येते. निवडणुकांमध्ये अपेक्षेप्रमाणे आपले उमेदवार निवडून आणणेही त्यांना जमले नाही. एक प्रकारची निराशा त्यांच्या मनात दाटत आली असेल. असे म्हणण्याचे कारण असे की, काँग्रेसवर तोंडसुख घेण्याच्या बरोबर, पुणे कराराचे मूल्यमापन बदललेले आढळते. आपण मिळविलेला एक मोठा नेत्रदीपक विजय असे म्हणण्याऐवजी दडपणापुढे काही न चालून गांधींचा जीव वाचविण्यासाठी अनिच्छेने पत्करावी लागलेली ती एक आत्मघातकी तडजोड होती असे आता ते म्हणू लागले. त्यांचा खरा राग, काँग्रेसने अस्पृश्यांसाठीच्या राखीव जागा लढवाव्यात, आणि मंत्रिमंडळामध्ये त्यांच्या निवडीचा एखादा तरी अस्पृश्य आमदार मंत्री म्हणून घेतला जाऊ नये या दोन कारणांनी असावा असे त्यांच्या डिसेंबर १९३९ मधील एका वक्तव्यावरून वाटते. लौकरच आंबेडकर मुस्लिम लीगशी हातमिळवणी करून काँग्रेसच्या विरोधात राजकारण करण्यास राजी झाले. मुसलमानांच्या घातक अराष्ट्रीय राजकारणाची फोड आपणच पूर्वी पुष्कळ केली आहे ही गोष्ट ते विसरले. ज्या पुणे कराराला ते आता नावे ठेवीत होते त्या कराराने किती तरी अधिक जागा अस्पृश्य समाजाच्या वाट्याला आल्या होत्या, इतकेच नाही तर मुंबई इलाख्यात या जागांपैकी बव्हंश जागांवर त्यांचीच माणसे निवडून आली होती, ही गोष्टही ते विसरले. गोलमेज परिषदेने, वा १९३५ च्या कायद्याने त्यांच्या पदरात सत्तेमध्ये मोठा वाटा टाकला होता आणि तो काँग्रेसने काढून घेतला होता अशातली गोष्ट नव्हती, हेही ते विसरले. १९२८ साली सायमन कमिशनशी संलग्न मुंबई प्रांतिक कमिटीच्या अहवालाला जोडलेल्या भिन्नमतपत्रिकेत त्यांनी काँग्रेस-लीग यांच्यामधील ‘ लखनौ करारा’चे वाभाडे काढले होते. त्याच कराराचे आता ते कौतुक करू लागले. ‘ पाकिस्तान’च्या मागणीच्या राजकारणाचा एक भाग म्हणून १९३९ साली काँग्रेसने सत्तात्याग केला तो दिवस जीनांनी ‘ मुक्तिदिन ’ म्हणून साजरा केला. या प्रसंगात आंबेडकरही सहभागी झाले. या प्रसंगी केलेल्या भाषणातील पुढील युक्तिवाद आंबेडकर कोणत्या टोकाला गेले होते त्याचा निदर्शक आहे : ‘अल्पसंख्याकांचा प्रश्न समेटाने हातावेगळा करण्यास गांधींचा लय (?) लागत नाही. ब्रिटिश सरकारने आपली मागणी मान्य केली नाही तर आपण सत्याग्रह सुरू करू, अशी भाषा ते बोलू लागले आहेत. पण मी वेळीच त्यांना इशारा देत आहे. मिळकतीच्या बाबतीत तंटा चालू असता इस्टेटीची व्यवस्था नीट ठेवण्याकरिता कोर्ट रिसीव्हरची नेमणूक करते. हिंदुस्थान स्वराज्याबाबत ब्रिटिश सरकार हे अशा रिसीव्हरच्या जागी अधिष्ठित आहे. या रिसीव्हरच्या हातून संयुक्त मिळकत आपल्या वाट्यास यावी म्हणून रिसीव्हरला सतावण्याची कोणतीही ‘ कृती ’ अल्पसंख्याकांच्या वाजवी हक्कांविरुद्ध उठाव म्हणूनच गणली जाईल. आणि त्याचे पर्यवसान असे होईल की, आपणाला योग्य न्याय मिळावा म्हणून रिसीव्हरच्या पारड्यात अल्पसंख्याकांना आपले बळ घालावे लागेल. आणि त्या घटनेला जबाबदार काँग्रेसच राहील.’

पुणे करार झाल्यानंतर आंबेडकरांनी अनेक प्रसंगी बोलताना असे उद्‌गार काढले होते की अस्पृश्यांसाठी जे राजकीय हक्क व विशेषाधिकार प्राप्त करून घ्यावयाचे होते ते आता आपण मिळविले असून यापुढे एका समाजघटकाच्या वतीने संकुचित राजकारण न करता ते यापुढे साऱ्या देशाचे राजकारण करणार. त्यांची ही आकांक्षा अगदी रास्त होती. स्वतंत्र मजूर पक्षाच्या स्थापनेने त्यांनी याची जाणीवपूर्वक सुरुवातही केली होती. पण १९३९ साली ते परत अस्पृश्यांच्या वतीने राजकारण करण्याच्या भूमिकेवर आले.

वेगवेगळ्या हिंदी राजकीय पक्षोपपक्षांच्या पुढाऱ्यांचे मत न घेताच १९३९ साली व्हाइसरॉयांनी हिंदुस्थान दोस्तराष्ट्रांच्या बाजूने युद्धात उतरत असल्याचे जाहीर केले. ब्रिटिश साम्राज्यातील एक वसाहत हाच हिंदुस्थानचा दर्जा आहे असे आपण मानतो हीच गोष्ट व्हाइसरॉयनी आपल्या कृतीने उघड केली. हिंदुस्थानला वसाहतीचे स्वराज्य देण्याची भाषा किती दांभिक होती हेच यावरून सिद्ध होते असे कारण पुढे करून काँग्रेसच्या मंत्रिमंडळांनी व विधिमंडळ सभासदांनी राजीनामे दिले. स्वतंत्र मजूर पक्षाचे धोरण स्पष्ट करताना आंबेडकरांनी म्हटले की, व्हाइसरॉयनी परस्परनिर्णय केला ही गोष्ट खेदजनक आहे खरी; पण सारासार विचार करता, या प्रसंगी युद्धकार्यात सरकारला पूर्ण सहकार्य

देणे योग्य होईल असे पक्षाचे मत आहे. काँग्रेसने राजीनामे दिले असले तरी या युद्धात इंग्लंडची बाजू न्यायाची आहे, व म्हणून युद्धप्रयत्नात खीळ बसेल अशा प्रकारचे आंदोलन सुरू न करण्याचे काँग्रेसचे धोरण होते. मात्र, युद्धाचे कारण पुढे करून सरकारने विचार, भाषण व लेखनस्वातंत्र्यांवर जे निर्बंध परस्परवटहुकूम काढून लादले होते त्यांचा निषेध न करता गप्प बसणे अयोग्य होईल असा विचार करून काँग्रेसने १९४० साली वैयक्तिक सत्याग्रहाचे आंदोलन चालविण्याचा निर्णय केला.

काँग्रेसच्या या निर्णयाची टीकाटिप्पणी करणारे पत्र आंबेडकरांनी 'टाइम्स ऑफ इंडिया'त प्रसिद्ध केले. काँग्रेसच्या निर्णयाची कारणमीमांसा करताना त्यांनी म्हटले, 'विस्तारित कार्यकारी मंडळामध्ये बिगरकाँग्रेसी पक्षांना व अल्पसंख्य जमातींना समाविष्ट करून घेऊन देशाचा कारभार चालविण्याच्या प्रस्तावापासून व्हाइसरॉयना परावृत्त होण्यास भाग पाडण्याच्या उद्देशानेच काँग्रेसने एकाएकी ही लढ्याची घोषणा केली आहे... काँग्रेस देशाच्या मुक्तीसाठी लढा पुकारीत आहे ही गोष्ट शुद्ध बनवाबनवीची आहे. सत्तेची सारी सूत्रे आपल्या हातात घेण्यासाठी काँग्रेसचा सारा झगडा आहे.'

सत्ताच काँग्रेसला हवी होती तर ती आपखुषीने तिने सोडली नसती; काँग्रेसच्या मंत्रिमंडळांच्या कारभारावर ब्रिटिश शास्ते समाधानी होते. पण समजा की काँग्रेसने सत्याग्रह सुरू करण्यामागे हा हेतू होता, तरी त्यात गैर काय होते ? काँग्रेसने सत्ता सोडली तेव्हा या सुवर्णसंधीचा फायदा घेऊन काँग्रेसला नेस्तनाबूत करावयास आंबेडकर, जीना, रामस्वामी नायकर आदींबरोबर युती करायला सरसावले होतेच. काँग्रेस हाही एक राजकीय पक्षच होता. दुसरी गोष्ट अशी की, १९३७ च्या निवडणुकांनी काँग्रेस हा सर्व जातिजमातींचा पाठिंबा असलेला एकमेव राष्ट्रव्यापी व राष्ट्रीय पक्ष आहे ही गोष्ट पुरेशी सिद्ध झाली होती. अशा पक्षाने सत्ता हाती घेण्याचे राजकारण करणे हे गैर ठरायचे कारण नव्हते. किंबहुना मुस्लिम लीगचीदेखील निवडणुकीत जी दुर्दशा झाली होती तिने, मुस्लिम लीगसकट सर्व संघटनांची व पुढाऱ्यांची अप्रातिनिधिकता जाहीर झालेली होती. गोलमेज परिषदेत गांधींनी केलेल्या विधानाची पुष्टी होत होती.

आपापल्या समाजांचे वा जमातींचे आपण एकमेव प्रतिनिधी व प्रवक्ते आहोत हा दावा व्यवहारात शाबीत होईल अशा प्रकारे आपले अभेद्य एकमुखी संघटन कसे उभे करावयाचे असा पेच जीना, आंबेडकर, सावरकर, नायकर आदी पुढाऱ्यांसमोर होता. काँग्रेसच्या राजीनाम्याने सत्तास्थानी निर्माण झालेल्या अवकाशाचा फायदा उठवून ही गोष्ट साधण्याचा डाव टाकण्याची या पुढाऱ्यांची इच्छा होती. ब्रिटिशांचीही, विशेषतः येथील सनदी नोकरशाहीची याला अनुकूलता होती. या संधीचा फायदा उठविण्यासाठी आंबेडकर उत्सुक होते. व्हाइसरॉयनी त्यांच्या कार्यकारी मंडळाचा विस्तार केला तेव्हा त्यावर अस्पृश्यांच्या प्रतिनिधींची नेमणूक केली नाही तेव्हा, लढ्याची भाषा करण्याबद्दल काँग्रेसला फैलावर घेणाऱ्या आंबेडकरांनीही कोणती भाषा वापरली ते पाहण्यासारखे आहे. व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळावर अस्पृश्यांचा एकपण प्रतिनिधी न घेतल्याने अस्पृश्य जमातीचा विश्वासघात झालेला आहे, इंग्रजांचीही नीच करणी आहे, अशा प्रकारची टीका आंबेडकरांनी केली आहे. ही टीकाटिप्पणी केल्यानंतर आठवडाभरातच महार वतनाशी संबंधित 'जुडी' नावाच्या करामध्ये सरकारने केलेल्या वाढीविरुद्ध अटीतटीचा लढा देण्याचा आदेश आंबेडकर देतात ही गोष्ट बोलकी आहे. अस्पृश्य जमातीच्या सर्व वेगवेगळ्या पुढाऱ्यांना एकत्र आणून एक समर्थ संघटना निर्माण केल्याखेरीज अस्पृश्य जमातीला मुसलमान जमातीच्या बरोबरीने हिंदी समाजाचा तिसरा प्रमुख घटक (हिंदू, मुसलमान हे इतर दोन) म्हणून मान्यता मिळवून घेता यावयाची नाही ही जाणीव आंबेडकरांना तसेच इतरही काँग्रेसेतर अस्पृश्य पुढाऱ्यांना झाली. १९४२ साली राजकीय पेचप्रसंगावर तोडगा काढण्यासाठी ब्रिटिश मंत्रिमंडळातील एक सभासद सर स्टॅफर्ड क्रिप्स भारतात आले. त्यांनी केलेल्या शिष्टाईला यश आले नाही. त्यांनी मुस्लिम लीग व काँग्रेस या दोन पक्षांच्या पुढाऱ्यांशीच वाटाघाटी केल्याने आंबेडकरांचा संताप झाला. खरोखर सत्तांतर करावयाची वेळ येईल त्या वेळी ब्रिटिश आपली काय गत करणार याची

त्यांना विदारक जाणीव झाली. क्रिप्स शिष्टाईने ही गोष्टही प्रथमच निर्विवादपणे स्पष्ट केली की ब्रिटनच्या साम्राज्याचा सूर्य मावळण्याचा समय आला आहे.

या सुमारास, म्हणजे १९४१–४२ या काळात, त्यांची व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळावर नेमणूक होण्याअगोदरच्या दिवसांत, आपल्या राजकारणाची चहूबाजूंनी कोंडी झाल्याची तीव्र जाणीव आंबेडकरांना झाली, आणि त्यांचा धीर सुटल्यासारखा झाला. गांधी व काँग्रेसबद्दल सर्व प्रकारचे आरोप वर्षानुवर्षे करीत राहून, काँग्रेसला खच्ची करण्याच्या डावपेचात ब्रिटिश व मुस्लिम नेते यांची साथ करून काँग्रेसजनांचे शत्रुत्व विकत घेतले होते. ब्रिटिश राज्यकर्ते व मुस्लिम पुढारी या दोघांनाही अस्पृश्यांची खरी कदर नव्हती, पर्वाही नव्हती. वास्तविक आंबेडकरांना मनोमन आतमध्ये ही गोष्ट माहीत होती, हे त्यांच्या वेळोवेळच्या विश्लेषणावरून दिसून येते. सत्ता हस्तांतरित करण्याच्या वेळी काँग्रेस व लीग या दोन संघटनांचाच विचार घेतला जाणार म्हटल्यावर, अस्पृश्य समाजाचे भवितव्य काँग्रेसच्या हातात स्वराज्यात राहणार ही गोष्ट स्पष्ट झाली. त्यांनीच अनेक वर्षे केलेल्या पूर्वग्रहदूषित विषारी प्रचाराने त्यांचीदेखील इतकी पकड घेतली होती की, काँग्रेस ही वास्तवात कोणत्या प्रकारची संघटना आहे हे जाणून घेण्याचा डोळसपणा त्यांच्या ठायी उरला नव्हता. धीर सुटून सशस्त्र उठावाची भाषा करण्यापर्यंत ते गेले.

जुलै १९४२ नंतर चार वर्षे बाबासाहेब व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळामध्ये मजूर खाते सांभाळीत होते. यांपैकी तीन वर्षे काँग्रेसचे पुढारी तुरुंगातच होते. चलेजाव आंदोलनाच्या संदर्भात हिंदुस्थानच्या स्वराज्याची घटना करण्याचे काम स्थगित होते. अस्पृश्यांचा प्रतिनिधी केंद्रीय सरकारचा एक सभासद म्हणून घेतला गेला याचा आंबेडकरांनी असा अर्थ लावला की सरतेशेवटी आपले राजकारण यशस्वी झाले आहे. यापुढच्या त्यांच्या मांडणीमध्ये हिंदू, मुस्लिम व शेड्यूल्ड कास्ट्स (अस्पृश्य) हे तीन समाजघटक स्वराज्यात सत्तेचे वाटेकरी असले पाहिजेत याविषयी आग्रह जसा आढळतो, तसे त्यांनी हे गृहीत धरल्यासारखेही दिसते. अस्पृश्यांची लोकसंख्या सहा कोटी आहे असे त्यांच्या प्रतिपादनामध्ये येते.

जुलै १९४२ मध्ये नागपूर येथे भरलेल्या अखिल भारतीय शेड्यूल्ड कास्ट्स फेडरेशनच्या १ ल्या अधिवेशनातले ठराव पाहिल्यास त्यांच्या असुरक्षिततेच्या भावनेची व अविश्वासाची व्याप्ती किती मोठी होती ही गोष्ट दिसून येते. घटनात्मक तरतुदींद्वारा दलितांची वेगळी खेडी वसविली जावीत व त्यासाठी शासनाने दर वर्षी ५ कोटी रुपये काढून ठेवावेत अशी मागणी ठरावाद्वारे केलेली होती. मुख्य ठरावाद्वारे, घटनेतील तरतुदींद्वारा, अस्पृश्यांच्या प्राथमिक व उच्च शिक्षणासाठी ठरावीक रक्कम अग्रक्रमाने खर्च करण्याचे बंधन घातले जावे, प्रांतिक व केंद्रीय सरकारांमध्ये अस्पृश्यांची ' संख्या, गरज व महत्त्व यांच्या प्रमाणात ' त्यांना मंत्रिपदे देणे बंधनकारक असावे, सरकारी नोकऱ्यांमध्ये याच कसोटीवर त्यांना प्रमाणशीर जागा दिल्या जाव्यात, न्यायखाते, पोलिस व महसूल खात्यांमध्ये त्यांना ज्या प्रमाणात जागा देण्याचे निश्चित होईल तेवढ्या प्रमाणात दहा वर्षांच्या आत जागा भरल्या जाव्यात, याच कसोटीवर स्थानिक स्वराज्य संस्था व विधिमंडळे यांच्यात अस्पृश्यांना प्रतिनिधित्व राखीव असावे, या प्रतिनिधींची निवड विभक्त मतदारसंघाच्या पद्धतीने व्हावी, आणि लोकसेवा आयोगांवर (प्रांतिक व केंद्रीय) त्यांना प्रतिनिधित्व असावे, अशी मागणी केलेली होती. अशी घटना ब्रिटिश असतानाच केली जायला हवी हे त्यांच्या लक्षात आलेले होतेच. एकदा ब्रिटिश गेल्यावर, काँग्रेसच्या (व पर्यायाने येथील इतर समाजघटकांच्या) स्वेच्छापूर्वक दिलेल्या समंजस होकाराच्या अभावी, परकीय सत्तेच्या दडपणाखाली केलेल्या घटनेत तरतूद केली आहे म्हणून त्यांची अमलबजावणी होईल याची हमी कोणती होती ? याला आंबेडकरांपाशी खरे उत्तर एकच होते : हिंदुस्थानला पूर्ण स्वातंत्र्य मिळावे यासाठी अस्पृश्य समाज उत्सुक नाही असे ते पुनःपुन्हा सांगताना आढळतात. घटनात्मक तरतुदींची अमलबजावणी होत आहे हे पाहण्यासाठी ब्रिटिशांच्या हाती अंतिम सूत्रे रहायला हवीत या दृष्टीने ते अखेरपर्यंत वसाहतीच्या स्वराज्यापलीकडे काही

अनुक्रमणिका

मागणे कसे आवश्यक नाही हे पटवून द्यायचा प्रयत्न करीत होते, असे तर नाही ?

– ९ –

१९४५ साली, महायुद्ध संपल्यावर, इंग्रजांनी भारतावरचे राज्य सोडावयाची तयारी चालविली. गोलमेज परिषदेच्या धर्तीवर वेगवेगळ्या पक्षोपपक्षांच्या व गटांच्या पुढाऱ्यांची बैठक व्हाइसरॉय वेव्हेल यांनी बोलावली, पण गोलमेज परिषदेवेळचाच अनुभव परत आला : एकमत होणे अशक्य होते. पण या वेळी सत्ता हाती राखण्याचे एक समर्थन म्हणून या मतमतांच्या, मागण्यांच्या गलबल्याचे प्रदर्शन घडवीत राहण्यात ब्रिटिशांना रस नव्हता. सत्ता लौकरात लौकर हस्तांतरित करावयाची होती. सत्ता हाती घेऊन ती राबवू शकेल असे काँग्रेस व मुस्लिम लीग हे दोनच पक्ष होत ही गोष्ट १९४६ सालच्या निवडणुकांमधून उघड झाल्यावर वाटाघाटी या दोन पक्षांच्या नेत्यांबरोबरच करण्याचे धोरण ब्रिटिशांनी अंगीकारले. अस्पृश्य जमातीचे हितसंबंध समाधानकारकरीत्या संरक्षित राहतील अशी खात्री झाल्याखेरीज, या जमातीच्या संमतीशिवाय सत्ता हस्तांतरित केली जाणार नाही असे वेळोवेळी ब्रिटिश सरकारने व व्हाइसरॉयनी जाहीर केले होते. १९४६ च्या निवडणुकांमध्ये अस्पृश्य जातींसाठीच्या राखीव जागा मोठ्या बहुसंख्येने आंबेडकरांच्या पक्षाने जिंकल्या असत्या तर ब्रिटिशांना वाटाघाटींच्या वेळी आंबेडकरांना जीनांच्या बरोबरीने स्थान कदाचित द्यावेही लागले असते. पण मुसलमानांचा एक अपवाद सोडता, अस्पृश्य, ब्राह्मणेतर, सवर्ण, आदिवासी हे वेगवेगळे समाजघटक काँग्रेस हाच आपला पक्ष मानतात हे निर्विवादपणे सिद्ध झाल्याने, काँग्रेस आपले हितसंबंध सुरक्षित राखील व काँग्रेसच्या हाती सत्ता जाण्यास आपली संमती आहे, असा कौल अस्पृश्यांनी दिला हा युक्तिवाद ब्रिटिशांना करता येत होता. आम्ही आमचे अभिवचन पाळले आहे असे ते म्हणू शकत होते. अखेरचा निर्वाणीचा प्रयत्न करण्यास १९४६ साली आंबेडकर इंग्लंडला गेले. तेव्हा, आता तुम्ही काँग्रेसशी जुळवून घेणे बरे, असा सल्ला त्यांना मिळाला असावा.

'मोठा विजय' म्हणून आंबेडकरांनी वर्णन केलेल्या पुणे कराराचा पूर्ण आदर करून काँग्रेसने अस्पृश्यांच्या राखीव जागांवर आपले उमेदवार निवडून आणले होते. फक्त उमेदवारनिवडीच्या आधीच्या फेरीतील अस्पृश्यांच्या मतांचा हिशेब मांडला तर काय चित्र दिसते ते आंबेडकरांनी मांडून दाखविले. त्यांच्या म्हणण्यानुसार काँग्रेसला अस्पृश्यांची मते बहुसंख्येने पडली नव्हती. १९३७ च्या निवडणुकीच्या संदर्भातील हा त्यांचा युक्तिवाद स्वीकारला तरी, काँग्रेसेतर अस्पृश्य उमेदवार व पक्ष यांच्या तुलनेत अस्पृश्यांमध्येही काँग्रेस हाच देशव्यापी व सर्वांत मोठा पक्ष होता हीच गोष्ट दिसून येत होती. एकूण राखीव जागांपैकी ७३ जागा वास्तविक काँग्रेसला मिळाल्या होत्या. आंबेडकर हे प्रभावी प्रवक्ते असले तरी, त्यांनी वेळोवेळी केलेली वक्तव्ये व घेतलेल्या भूमिका अस्पृश्य समाजातील सर्व जातींना एका राजकीय संघटनेत बांधण्याच्या दृष्टीने समाधानकारक ठरल्या नव्हत्या. उलटपक्षी, काँग्रेस आपल्या पद्धतीने अस्पृश्य समाजातील पुष्कळांपर्यंत पोचू शकली होती. अस्पृश्य गणल्या जाणाऱ्या वेगवेगळ्या जातींमधील भेदाभेद, दुरावा, वैमनस्य इत्यादी गोष्टींचा फायदा काँग्रेसला मिळाला नाही असे नाही. पण हे आंतर्विरोध ध्यानात घेऊन आपला पक्ष बांधण्याचे आव्हान आंबेडकरांनाही पेलता आले नाही, ही गोष्ट त्यामुळे झाकली जात नाही. तात्पर्य असे की, १९४६ साली प्रातिनिधिकतेच्या कसोटीवर, सत्तांतराच्या वाटाघाटींच्या वेळी आंबेडकरांना एकमेवाद्वितीय असे स्थान प्राप्त होऊ शकले नाही.

१९४६–४७ साली आणखी एक गोष्ट स्पष्ट झाली. लीगच्या राजकारणाची अंतिम परिणती देशात ऐक्यभावनेने राज्य चालणे अशक्य होण्यात अनिवार्यपणे झालेली आहे, ही ती गोष्ट होय. काँग्रेसला काटशह म्हणून मुस्लिम लीगला जोपासत असताना याची कल्पना ब्रिटिश अमलदार व राजकारणी यांना आली नव्हती. 'घटनात्मक संरक्षक तरतुदी' मधून कोणते भूत मानगुटीला बसते ते लक्षात आल्यावर, आंबेडकरांच्या याच स्वरूपाच्या योजनांचे स्वागत पूर्वीसारखे झाले नसल्यास आश्चर्य नाही. कारण १९४२ नंतरच्या आंबेडकरांच्या मागण्या

अनुक्रमणिका

व योजना हिंदुस्थानची आणखी एक फाळणी करण्याच्याच वळणाने जाणाऱ्या होत्या. ( रामस्वामी नायकरांच्या द्राविडिस्तानच्या योजनेलाही आंबेडकरांनी आपली अनुकूलता दर्शविली होती हे येथे ध्यानात घ्यावे. ) जीनांच्या 'डायरेक्ट ॲक्शन'च्या 'पाकिस्तान' पदरात पाडून घेण्याच्या संदर्भातील आडमुठ्या राजकारणाचा एक अनपेक्षित परिणाम असा झाला की, उरलेल्या हिंदुस्थानवर एकच राज्यसत्ता व तीही काँग्रेसची, प्रस्थापित होण्याची इष्टता व आवश्यकता ब्रिटिशांच्या मनावर ठसली. अशा स्थिर व समर्थ केंद्रीय सत्तेच्या निर्मितीत त्यांचा राजनैतिक हितसंबंध उत्पन्न झाला. आधी त्यांनी संस्थानिकांना स्वतंत्र होता यावे म्हणून मोकळीक ठेवून तसे करण्यास प्रच्छन्न प्रोत्साहन दिले होते. पण अगदी अखेरच्या टप्प्यात ब्रिटिशांनी आपली भूमिका साफ बदलली, आणि संस्थाने विलीन व्हावीत यासाठी माऊंटबॅटन यांनी आपले वजन वापरले. आंबेडकरांच्या मागण्या व योजना ब्रिटिश राजकारणी नेत्यांनी उचलून धरल्या नसल्या तर ते स्वाभाविकच होते.

स्वातंत्र्य मिळणार व काँग्रेसच्या हाती सत्ता येणार असे म्हटल्यावर सर्वनाश ओढवणार असे आंबेडकरांना वाटले. घटनासमितीवर ते बंगालमधून निवडून आले होते. फाळणीमुळे त्यांना ती जागा गमवावी लागणार होती. काँग्रेसची व गांधींची त्यांनी इतकी वर्षे इतक्या तऱ्हांनी जहरी व कुत्सित टीकाटिप्पणी केली होती की राजकारणातून त्यांची उचलबांगडी होत असेल तर 'सुंठीवाचून खोकला गेला' असे काँग्रेसच्या पुढारी मंडळींनी समाधानाने म्हणावे अशी परिस्थिती होती. आणि असेच काही घडेल, आपणावर सूड उगविला जाईल अशीच आंबेडकरांचीही भीती व अपेक्षा होती.

स्वतंत्र हिंदुस्थानचे पहिले मंत्रिमंडळ हे पक्षीय मंत्रिमंडळ नसावे, ते राष्ट्रीय मंत्रिमंडळ असावे अशी कल्पना मुळात कोणाची असेल ते असो. पण ती मान्य झाल्यावर जी यादी बनली ती जेव्हा गांधींपुढे ठेवली गेली तेव्हा, त्यात आंबेडकरांचे नाव नाही हे पाहिल्यावर, त्यात आंबेडकरांचा समावेश असायलाच हवा असे गांधींनी म्हटल्याची हकीकत माऊंटबॅटन यांचा हवाला देऊन सांगण्यात आलेली आहे. राष्ट्रीय सरकार आंबेडकरांशिवाय पूर्ण होऊ शकत नाही असे ठामपणे म्हणण्याचा मोठेपणा गांधींखेरीज अन्य कोणत्याच काँग्रेसच्या वा हिंदी पुढाऱ्याच्या ठायी नव्हता असे म्हणणे अन्यायकारक होईल. पण गोलमेज परिषदेतील खटका ध्यानात असलेल्या गांधींच्या मनात ही गोष्ट येणे तर स्वाभाविकच होते. जयकरांच्या राजीनाम्याने रिकाम्या झालेल्या जागी मुंबई प्रांतिक असेंब्लीतील काँग्रेस पक्षाने आंबेडकरांना बिनविरोध निवडून दिले. ( आंबेडकरांचा समावेश घटनासमितीत व मंत्रिमंडळात असावा ही सूचना जयकरांचीही असू शकेल.) आंबेडकर पहिल्या राष्ट्रीय मंत्रिमंडळात कायदेमंत्री झाले. राज्यघटना तयार करण्याच्या कामाची जबाबदारी राष्ट्राच्या वतीने त्यांच्यावर सोपविण्यात आली.

काँग्रेस व गांधी यांच्याविषयीचा आंबेडकरांचा निवाडा न्याय्य नव्हता एवढे तर नक्कीच. काँग्रेसने वा गांधींनी आंबेडकरांवर व्यक्तिशः वा अस्पृश्य समाजावर, त्यांना मंत्रिपद देऊन उपकार केले नव्हते हेही तेवढेच खरे. आपल्या राजकीय हक्कांविषयी अस्पृश्यांमध्ये जागृती घडवून आणून, राज्यसत्तेत योग्य वाटा मिळण्याचे, महत्त्व ठरविण्याचे कार्य सातत्याने तीस-पस्तीस वर्षे करून त्यांनी त्या पदावर आपला हक्क प्रस्थापित केला होता. अस्पृश्य समाजामध्ये त्यांच्याइतक्या विद्वत्तेची दुसरी व्यक्ती नव्हती; इतकेच नाही तर भारतातील प्रखर बुद्धिमान पंडितांमध्ये त्यांची सहज गणना होत होती. मंत्रिपद देऊन काँग्रेसने राष्ट्रीय मंत्रिमंडळाचा मान वाढविला होता.

— १० —

कोणत्याही समाजात एखाद्या जातजमातीची, समूहाची जी सामाजिक–आर्थिक–सांस्कृतिक स्थिती –परिस्थिती असते तिचा अंगभूत संबंध सत्तेचे वाटप त्या समाजात कोणाकोणामध्ये कसकसे झालेले आहे याच्याशी पोचतो; म्हणून, पददलित समाजाचा उद्धार व्हावयाचा असेल तर, राजकीय सत्तेचा वाटा पुरेशा प्रमाणात त्या समूहाच्या पदरात पडायलाच हवा, हा मुद्दा आंबेडकरांनी लावून धरला ही त्यांची मोठी कामगिरी व त्यांचे विशेष योगदान म्हणावयास हवे. पण अशी कोणतीही पुनर्रचना करीत असताना जर बृहद् समाजाचे/राष्ट्राचे ऐक्य कायम

ठेवावयाचे असेल, वा, त्याहीपेक्षा, एकराष्ट्रीयत्व निर्माण करावयाचे असेल तर जातीयवादी फुटीर भूमिकेतून परस्थ शक्तींच्या भरंवशावर व घटनात्मक तरतुदींच्या क्लृप्तीने ही पुनर्रचना न करता, परिवर्तनाचे जोमदार प्रवाह समाजाच्या सर्व थरांमध्ये व घटकांमध्ये निर्माण करून अशा पुनर्रचनेला हात घालावा लागतो, व तसा घालता येतो ही गोष्ट काँग्रेसने आपल्या प्रदीर्घ कारकीर्दीत दाखवून दिली ही स्वातंत्र्यपूर्व काळातील काँग्रेसची मोठी कामगिरी व तिचे विशेष योगदान म्हणायला हवे.

**संदर्भ ग्रंथ**

(१) डॉ. बाबासाहेब आंबेडकर, रायटिंग्ज अँड स्पीचेस, खंड १ व २ ( संपादन : वसंत मून ), शिक्षण खाते, महाराष्ट्र शासन, मुंबई, १९७९ व १९८२.

(२) सोर्स मटिरियल ऑन डॉ. बाबासाहेब आंबेडकर अँड द मूव्हमेंट ऑफ अनटचेबल्स, खंड १, ( संकलन : डॉ. भा. ग. कुंटे ) शिक्षण खाते, महाराष्ट्र शासन, मुंबई, १९८२.

(३) डॉ. बाबासाहेब आंबेडकरांची भाषणे, खंड १ ते ६ ( संपादक : प्रा. मा. फ. गांजरे ), अशोक प्रकाशन, नागपूर, १९७४–७७.

(४) बी. आर. आंबेडकर, मि. गांधी अँड द इमॅन्सिमेशन ऑफ अनटचेबल्स, थॅकर्स, मुंबई, १९४३.

० ० ०



अनुक्रमणिका

# स्वातंत्र्याच्या चळवळीची फलश्रुती

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

वेदकालापासून अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत हिमाचलापासून कन्याकुमारीपर्यंतचा भूप्रदेश म्हणजे भारत हे एक राष्ट्र नव्हते. त्याला वेदकालापासून अठराव्या शतकापर्यंत भरतखंड असे म्हणत होते. परंतु एकराष्ट्र म्हणून हिंदुस्थान किंवा भारत ही संज्ञा एकोणिसाव्या शतकापासून रूढ झाली; तेव्हापासूनच हिंदुस्थान किंवा भारतराष्ट्र म्हणजे हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंतचा भरतखंड होय अशी जाणीव निर्माण झाली. परकीय सत्ताधाऱ्यांशी जनतेने संघर्ष दीर्घकाळ चालविला. विसाव्या शतकाच्या मध्याला परकीय सत्ताधाऱ्यांशी संघर्ष संपला; भारताची संविधान समिती स्थापन झाली. संविधान समितीने सर्वसंमत संविधान तयार केले व आधुनिक व स्वतंत्र भारत राष्ट्राचा उदय झाला. ही भारताच्या स्वातंत्र्यचळवळीची फलश्रुती होय. ही अपरिहार्यपणे घडलेली ऐतिहासिक परिणती होय.

ऐतिहासिक अर्थपूर्ण घटनांचा क्रम हा दोन प्रकारच्या घटनांनी भरलेला असतो. त्या क्रमात कार्यकारणभावाचा सिद्धांत अनुभवावयास येतो. परंतु हा कार्यकारणभाव दोन प्रकारे अनुभवाचा विषय होतो. एक अपरिहार्यपणे अस्तित्वात आलेली घटना असते, तर एक योगायोगाने अस्तित्वात आलेली घटना असते. प्रस्तुत संदर्भात भारत स्वतंत्र झाला; एक आधुनिक राष्ट्र म्हणून भारतदेश जन्मला हे स्वतंत्र होण्याच्या पूर्वीच्या एक शतकातील अनेक घटनांचा क्रम तपासला म्हणजे ध्यानात येते, की ही घटना अपरिहार्यपणे घडली. यापेक्षा अन्य पर्याय नव्हता. १८५७ सालचे शिपायांचे बंड ही घटना आणि १८८५ साली स्थापन होऊन एक शतकभर परिवर्तित, परिवर्धित आणि परिणत झालेली आणि अखेर लढाऊ बनलेली इंडियन नॅशनल कॉंग्रेस ही दुसरी घटना, तिसरी क्रमिक सत्तांतर म्हणजे ब्रिटिशांनी राणीचा जाहीरनामा काढल्यापासून क्रमाने आपल्या सत्तेचा विकास आणि सत्तेमध्ये एतद्देशीयांची परकीय सत्ताधाऱ्यांनी क्रमाने निर्माण केलेली भागीदारी आणि मधूनमधून परकीय सत्ताधाऱ्यांना पायरी पायरीने करावे लागणारे सत्तांतर आणि चवथी अखेरची दुसऱ्या जागतिक महायुद्धाची, सर्व मानवी जगाला हादरा देणारी, हुकूमशहांचा पराभव व पश्चिमी लोकशाहीला विजय देणारी घटना. एक अखंड आधुनिक भारतराष्ट्र जन्माला आले. त्याशिवाय कोणत्याही अन्य प्रकारांनी हे सत्तांतर झाले नसते, असे या घटना समुचितपणे तपासल्या असताना निश्चित करता येते. परंतु भारताची हिंदुस्थान आणि पाकिस्तान अशी जी फाळणी झाली ती अपरिहार्य नव्हती. तिला स्वतंत्र भारताचे मुसलमान बहुसंख्य प्रदेशराज्यांचा अन्तर्भाव करणारे संघराज्य हा पर्याय होता. हा पर्याय पाकिस्तानचे निर्माते महंमद अली जीना यांनी सुचविला होता. त्यांनी १४ सूत्री मागणीपत्र किंवा १४ मुद्दे डिसेंबर १९२८ च्या कलकत्त्याच्या सर्वपक्षीय परिषदेत मांडले होते. जीनांची ही मागणी हिंदूंकडून फेटाळून लावण्यात आली. त्या परिषदेतून मुस्लिम लीग बाहेर पडली. जीनांचे नेतृत्व लगेच दुबळे झाले. हे १४ सूत्री मागणीपत्र सारांशरूपाने सांगायचे म्हणजे पुढीलप्रमाणे होते : "प्रातिनिधिक संस्थांमध्ये मुसलमानांना द्यावयाचे प्रतिनिधित्व मुसलमानांच्या स्वतंत्र मतदारसंघांच्यामार्फत व्हावे. जोपर्यंत स्वत: मुसलमान संयुक्त मतदारसंघाची मागणी करीत नाहीत तोपर्यंत त्यात बदल होता कामा नये. स्वायत्त प्रदेशराज्ये व्हावी आणि शेष अधिकारही त्यांच्याकडेच रहावेत. वायव्य सरहद्द प्रांत आणि बलुचिस्तान यांनाही प्रादेशिक स्वायत्ततेचे अधिकार मिळावे. मुसलमानांची बहुसंख्याक वस्ती असलेल्या सिंधला स्वतंत्र प्रदेशराज्याचा दर्जा मिळावा. पंजाब व बंगालमधील मुसलमानांचे

अनुक्रमणिका

बहुमत विधानसभांमध्ये दृग्गोचर होईल, अशी व्यवस्था केली पाहिजे. बहुमत हे अल्पमत होता कामा नये, मग ते हिंदूंचे बहुमत असो अथवा मुसलमानांचे बहुमत असो. हा सिद्धांत अबाधित ठेवूनही अल्पसंख्याकांना संरक्षण दिले जावे. सिंध प्रांत, वायव्य सरहद्द प्रांत आणि बलुचिस्तान यांमध्ये मुसलमानेतरांना आणि हिंदू बहुसंख्य असलेल्या प्रांतांमध्ये मुसलमानांना विशेष प्रतिनिधित्व मिळावे. केंद्रीय संसदेच्या दोन्ही सभागृहांत मुसलमानांना १/३ प्रतिनिधित्व असावे. सांप्रदायिक प्रश्नांबाबतचे कायदे सांप्रदायिकांच्या बहुमताच्या पाठिंब्यावर मान्य करण्यात यावे. तात्पर्य असे की, संघराज्याजवळ सीमित अधिकार असावे व बाकीचे अधिकार प्रदेश-राज्यांना देण्यात यावेत." ही मुसलमानांची मुख्य मागणी होती. अशा तऱ्हेच्या मागणीकडे काँग्रेस ही दुर्लक्ष करीत होती. नंतर १९४२ मध्ये ही मागणी मान्य करावयास काँग्रेस तयार होती; परंतु वेळ निघून गेली होती. महंमदअली जीना काँग्रेसपासून फार दूर गेले होते. दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभी काँग्रेसने ६ प्रादेशिक राज्यांत असलेली आपली सत्ता राजीनामे देऊन सोडून दिली. त्यामुळे हिंदुस्थानच्या राजकारणातून निवृत्त होऊन आणि इंग्लंडमध्ये स्थायिक होऊन तेथे वकिली करू लागलेले जीना हिंदुस्थानात परतले आणि काँग्रेसने सत्ता सोडल्यामुळे मुक्तीचा दिवस मुस्लिम लीगने साजरा केला. जीना भारतीय राजकारणात प्रथम चमकू लागले तेव्हा समान नागरिकत्वाची कल्पना त्यांनी शिरोधार्य मानली होती. १९३६ पर्यंत भारतीय संघराज्य अटळ आहे असे त्यांचे मत होते; या विधानास पुष्कळ आधार मिळतो. धर्माला राजकारणात प्रवेश असता कामा नये, वंशभेदही राजकारणात मानता कामा नये, धर्म हा व्यक्ती आणि ईश्वर यांच्या दरम्यानचा मामला आहे, असे जीना मानत होते. महात्मा गांधींनी मुसलमानांचेही वरिष्ठ नेतृत्व दुसऱ्या कोणाकडेही न जाता आपणाकडेच राहिले पाहिजे, अशी आग्रही वृत्ती मनाशी बाळगली होती. त्यामुळे जीनांचे गांधींशी कधीही जमले नाही. लो. टिळकांशी मात्र त्यांचे खूपच जमले होते. कारण गांधींसारखा सार्वत्रिक नेतृत्वाचा खोल अभिमान टिळकांमध्ये नव्हता. तात्पर्य असे की, पाकिस्तान व हिंदुस्थान ही फाळणी अपरिहार्यपणे घडलेली ऐतिहासिक घटना नव्हे, असे मानण्यास इतिहासात भरपूर पुरावा आहे.

भारत हे पृथ्वीच्या पाठीवरील संसदीय लोकशाही असलेल्या राष्ट्रांमध्ये सगळ्यांत मोठे राष्ट्र आहे. सतराव्या शतकापासून राष्ट्रवाद हा ध्येयवाद, व कायद्याचे राज्य ही राज्यशास्त्राची मौलिक संकल्पना पुढारलेल्या राष्ट्रांमध्ये खोलपणे रुजायला लागली; परंतु यूरोपियन किंवा पश्चिमी राष्ट्रे ही प्रादेशिक भाषिक राष्ट्रवादाच्या मर्यादेतच राष्ट्र-राज्ये म्हणून निर्माण झाली. बहुतेक पश्चिमी राष्ट्रे एकभाषिक व एकधर्मी आहेत. बहुभाषिक आणि बहुधर्मीय असे आधुनिक राष्ट्र भारतच होय. हे एक मानवी इतिहासातील विलक्षण दृश्य आहे. असे बहुभाषिक व बहुधर्मी कोणतेही राष्ट्र पृथ्वीवर नाही. असे राष्ट्र निर्माण होण्याचे कारण १८५७ सालच्या शिपायांच्या बंडानंतर भारताच्या राष्ट्रवादाला धर्मभेद व भाषा-भेदापलीकडील व्यापक व स्थिर रूप येऊ लागले हे होय. त्याची मुळे खोल जाऊ लागली. याची दोन महत्त्वाची कारणे– एक म्हणजे सर्व हिंदुस्थानला, म्हणजे तिन्ही बाजूला समुद्र व एका बाजूला हिमालय यांच्यामधील भूप्रदेशाला, आधुनिक संस्कृतीच्या परकीय राज्याने एका समर्थ शासनाखाली बंदिस्त केले आणि आधुनिक पद्धतीची एकाधिकारशाही निर्माण केली. प्रथम देशी प्रजेला कसलेही मानवी अधिकार नव्हते; ब्रिटिशांच्या पूर्वी असलेली बेबंदशाही नष्ट करून सुयंत्रित राज्यव्यवस्था ब्रिटिशांनी स्थापन केली. विशेषतः ही सुव्यवस्था सामान्य जनतेच्या आणि साक्षर व सुशिक्षित वर्गांच्या मनास पटली. सुशिक्षितांचा सर्वश्रेष्ठ व सज्जन प्रतिनिधी म्हणजे महादेव गोविंद रानडे. यांनी या राज्याला ईश्वरी अनुग्रह असे म्हटले. याचे कारण ब्रिटिश-पूर्व भारताची राजकीय दुःस्थिती आणि गोंधळ त्यांच्या मनश्चक्षूपुढे विषाद उत्पन्न करीत होता. त्या विषादकारक परिस्थितीतून ब्रिटिशांच्या सत्तेमुळे भारत निभावून निघाला याचे त्यांच्या अंतश्चक्षूला दर्शन झाले. टिळक हे ब्रिटिश राज्याचे सर्वांत मोठे टीकाकार व राष्ट्रीय नेते होत. त्यांनी 'इंग्रजी राज्यात आम्हांस फायदा काय झाला' (केसरी,

अनुक्रमणिका

९ ऑगस्ट १८९२) या लेखात या एकतंत्री ब्रिटिश राज्याच्या फायद्याचे १२ मुद्दे सांगितले आहेत–

"इंग्रजी राज्यात आम्हांस झालेले फायदे म्हटले म्हणजे :

१) शांतता, २) कायद्याची सर्वत्र व्यवस्था, ३) अपराधांचा बंदोबस्त, ४) सार्वजनिक आरोग्य, ५) व्यापारसमृद्धी, ६) शेतकी सुधारणा, ७) खनिज व उद्भिज संपत्तीची अभिवृद्धी, ८) विद्यादानाच्या अनुपम सोयी, ९) स्वराज्यकारभाऱ्यांची प्राप्ती, १०) लेखनस्वातंत्र्य, ११) यंत्रादी सुखसामग्रीचा परिचय आणि १२) स्वातंत्र्याची अभिरुची हे होत."

या १२ फायद्यांच्या संबंधी वाद होऊ शकतो. परंतु आधुनिक ज्ञानविज्ञानाचे शिक्षण आणि त्यापासून प्राप्त होणारी लोकशाही जीवनाची आणि स्वातंत्र्याची ओढ या गोष्टी निश्चितच ब्रिटिशांच्या देणग्या होत आणि एवढा मोठा विशाल आधुनिक भारत सत्तांतराच्या वेळी अखंड व ताठ समर्थपणे उभा राहिला याचे कारण सबंध भारत भूखंडाची एकमुखी नियंत्रित राजकीय सत्ता ब्रिटिशांनी निर्माण केली होती हे होय. त्यामुळे व्यापक इहवाद असलेला भारतीय राष्ट्रवाद उत्पन्न झाला आणि त्यामुळे स्वातंत्र्याच्या लढ्याला जाति-धर्म-भाषाभेदांपलीकडे गेलेले अधिक व्यापक स्वरूप प्राप्त झाले.

⊙ ⊙ ⊙

## साभार पोच

* **घोडे** (कवितासंग्रह)– प्रसन्नकुमार पाटील; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे–३०; १९८५ ; पृ. ५१; किं. १५ रुपये.
* **ज्ञानदेवांचा आत्मसंवाद**– डॉ. वि. रा. करन्दीकर ; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे– ३०; १९८५ ; पृ. २५६ ; किं. ५० रुपये.
* **साहित्यसंवेद**– प्रा. चंद्रशेखर कपाळे; कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषद प्रकाशन, गुलबर्गा– २ ; १९८५ ; पृ. १०९ ; किंमत २० रुपये.
* **आलेपाक**– अरविंद गोखले; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे– ३०; १९८५; पृ. ११२; किं. ३० रु.
* **लोकमान्य टिळकांचे राजकीय विचारधन**– डॉ. ना. र. इनामदार; बहिःशाल शिक्षण मंडळ, पुणे विद्यापीठ, पुणे– ७; मार्च १९८५; पृ. ८०; किं. १६ रु.
* **आत्मनेपदी**– हेमा लेले; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगाव, मुंबई ४००००४; ऑक्टो. १९८५; पृ. ९४; किं. ४० रु.
* **मेघचाफा** (कवितासंग्रह)– अरविंद हसमनीस; अजिंक्य प्रकाशन, ३३१ यादोगोपाळ पेठ, सातारा; १९८५; पृ. ५६; किंमत ५ रुपये.
* **जंगलाचं देणं**– मारुती चितमपल्ली; साहित्य प्रसार केन्द्र, सीताबर्डी, नागपूर १२; १९८५; पृ. १३८; किं. ३६ रु.
* **मागोवा**– मा. गो. वैद्य; नारायण मुद्रणालय, धनतोली, नागपूर १२; १९८६ ; पृ. १५१; किं. ३६ रु.
* **व्ही. बी. कर्णिक**– द्वा. भ. कर्णिक; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०; १९८६; पृ. ११०; किं. ३५ रु.
* **विज्ञानयुग** (विज्ञानकथा विशेषांक– दिपावली १९८५)– संपा. गजानन क्षीरसागर; नोव्हें– डिसें. १९८५ ; पृ. ९५ ; किं. १५ रुपये.

अनुक्रमणिका

## परिशिष्ट १

# भारतीय राष्ट्रीय काँग्रेस ( १८८५–१९८५ ) : वाटचालीची रूपरेषा

अ. ना. ठाकूर

| अधिवेशन क्रमांक | तारीख व वर्ष | स्थळ व प्रतिनिधींची संख्या | अध्यक्ष | स्वागताध्यक्ष | सरचिटणीस | महत्त्वाच्या नवीन ठरावांचे विषय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २८–३० डिसें. १८८५ | मुंबई सुमारे १०० | उमेशचंद्र बॅनर्जी | — | ॲलन ऑक्टेव्हियन ह्यूम | शासनयंत्रणा व कायदेमंडळे ह्यांत सुधारणा, वाढता लष्करी खर्च, ब्रह्मदेशाचे सामिलीकरण. |
| २ | २७–३० डिसें. १८८६ | कलकत्ता ४३४ | दादाभाई नवरोजी | राजेंद्रलाल मित्र | ॲ. ऑ. ह्यूम | वाढते भारतीय दारिद्र्य, प्रांतिक व मध्यवर्ती अशा दोन कायदे-मंडळांची मागणी, प्रांतिक समित्या स्थापण्याचा निर्णय. |
| ३ | २७–३० डिसें. १८८७ | मद्रास ६०७ | बद्रुद्दीन तय्यबजी | राजा सर माधवराव | ॲ. ऑ. ह्यूम | काँग्रेसची घटना व नियमावली तयार करणे, न्यायसंस्था व शासन-संस्था अलग करणे, आयकराची मर्यादा वाढविणे, तांत्रिक शिक्षणाचा प्रसार करणे. |
| ४ | २६–२९ डिसें. १८८८ | अलाहाबाद १२४८ | जॉर्ज यूल | पंडित अयोध्यानाथ | ॲ. ऑ. ह्यूम | शिक्षणाची जबाबदारी सरकारने घेण्याची व देशाच्या औद्योगिक स्थितीच्या पाहणीसाठी आयोग नेमण्याची मागणी, मिठावरील करात झालेल्या वाढीबद्दल नापसंती. |
| ५ | २६–२८ डिसें. १८८९ | मुंबई १८८९ | विल्यम वेडरबर्न | फेरोजशहा मेरवानजी मेहता | ॲ. ऑ. ह्यूम | कायदेमंडळात सुधारणा व पुनर्घटना करण्यासाठीचा आराखडा, पक्षसंघटनेविषयीचे ६ नियम, शेतसाऱ्यातील वाढीचा निषेध. |
| ६ | २६–३० डिसें. १८९० | कलकत्ता ६७७ | फेरोजशहा मेहता | मनमोहन घोष | ॲ. ऑ. ह्यूम | सरकारी कर्मचाऱ्यांना निरीक्षक म्हणूनही उपस्थित राहण्याला मनाई केल्याबद्दलची नाराजी, काँग्रेसचे अधिवेशन इंग्लंडला घेणे, काँग्रेसचे प्रतिनिधी मंडळ इंग्लंडला पाठविणे. |
| ७ | २८–३० डिसें. १८९१ | नागपूर ८१२ | पी. आनंद चार्लू | सी. नारायणस्वामी नायडू | ॲ. ऑ. ह्यूम | दारिद्र्य व उपासमारीमागील कारणे स्पष्ट करणे, जंगलविषयक कायद्यांच्या जाचक अंमलबजावणीविषयी नाराजी. |

अनुक्रमणिका

| अधि-वेशन क्रमांक | तारीख व वर्ष | स्थळ व प्रतिनिधींची संख्या | अध्यक्ष | स्वागताध्यक्ष | सरचिटणीस | महत्त्वाच्या नवीन ठरावांचे विषय |
|---|---|---|---|---|---|---|
| ८ | २८–३० डिसें. १८९२ | अलाहाबाद ६२५ | उमेशचंद्र बॅनर्जी | पं. बिश्वंभर नाथ | ॲ. ऑ. ह्यूम | ब्रिटनच्या कनिष्ठ सभागृहात दादाभाईंची निवड झाल्याबद्दल अभिनंदन, चलनविषयक प्रश्न, अधिवेशनाच्या कामकाजाविषयीची नियमावली ठरविणे. |
| ९ | २७–३० डिसें. १८९३ | लाहोर ८६७ | दादाभाई नवरोजी | सरदार डी. एस्. मजिथिया | ॲ. ऑ. ह्यूम | भारतीय वैद्यकीय सेवा स्थापण्याची मागणी, काही टाकसाळी बंद केल्याबद्दल निषेध, वेठबिगारीचा प्रश्न. |
| १० | २६–२९ डिसें. १८९४ | मद्रास ११६३ | अल्फ्रेड वेब | पी. रंगय्या नायडू | ॲ. ऑ. ह्यूम | सुती कापडावरील अंतर्गत जकातीचा निषेध, वृत्तपत्रांवरील निर्बंधाचा निषेध, प्रतिनिधींची संख्या, पात्रता इत्यादींविषयींचे नियम तयार करणे. |
| ११ | २७–३० डिसें. १८९५ | पुणे १५८४ | सुरेंद्रनाथ बॅनर्जी | विष्णू मोरेश्वर भिडे | ॲ. ऑ. ह्यूम | राज्यकारभारावरील अवास्तव खर्चाविषयीची चौकशी पक्षपाती आहे, द. आफ्रिकेतील भारतीयांवरील अन्यायाचा निषेध, तिसऱ्या वर्गांच्या रेल्वे प्रवाशांच्या अडचणी. |
| १२ | २८–३१ डिसें. १८९६ | कलकत्ता ७८४ | रहिमतुल्ला मोहंमद सयानी | रोमेशचंद्र मित्तर | ॲ. ऑ. ह्यूम (दिनशा वाछा) | दुष्काळावर उपाय सुचविणे, प्रांतिक सरकारांना अधिक आर्थिक स्वातंत्र्य देण्याची मागणी, शैक्षणिक सेवा योजना व जमाबंदी-विषयक धोरण यांचा निषेध. |
| १३ | २७–२९ डिसें. १८९७ | अमरावती ६९२ | सी. शंकर नायर | गणेश श्रीकृष्ण खापर्डे | ॲ. ऑ. ह्यूम (दिनशा वाछा) | सरहद्द भागातील लष्करी मोहिमांविषयींचे धोरण बदलावे, राजद्रोहाविषयीच्या कायद्यातील दुरुस्त्या करताना इंग्लंडमध्ये घेतात तशी काळजी घ्यावी. |
| १४ | २९–३१ डिसें. १८९८ | मद्रास ६१४ | आनंद मोहन बोस | एन्. सुब्बाराव पंतुलू | ॲ. ऑ. ह्यूम (दिनशा वाछा) | वृत्तपत्रविषयक गुप्त समिती स्थापल्याबद्दल निषेध, प्रांतिक समित्या स्थापण्याचा निर्णय, प्लेगवर झालेला खर्च स्थानिक संस्थांवर न टाकता सरकारने सोसावा. |

अनुक्रमणिका

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १५ | २७–३० डिसें. १८९९ | लखनौ ७३९ | रमेशचंद्र दत्त | बाबू बन्सिलाल सिंग | ॲ. ऑ. ह्यूम (दिनशा वाछा) | भारतात सुवर्ण परिमाण लागू करण्याविषयीच्या निर्णयाबद्दल खेद, कलकत्ता नगरपालिका अधिनियम फेटाळणे, दारूगुत्त्यांचे परवाने देताना खबरदारी घेण्याची विनंती. |
| १६ | २७–२९ डिसें. १९०० | लाहोर ५६७ | नारायण गणेश चंदावरकर | काली प्रसन्न रॉय | ॲ. ऑ. ह्यूम (दिनशा वाछा) | भारतीयांना लष्करातील उच्च पदे देण्याची व लष्करी महाविद्यालय सुरू करण्याची मागणी, औद्योगिक व शैक्षणिक प्रश्नांसाठी अधिवेशनाचा अर्धा दिवस राखून ठेवावा. |
| १७ | २६–२८ डिसें. १९०१ | कलकत्ता ८९६ | दिनशा एडलजी वाछा | जगदींद्रनाथ रॉय | ॲ. ऑ. ह्यूम | प्रिव्ही कौन्सिलच्या न्यायदान समितीवर व शैक्षणिक आयोगावर भारतीयांची नेमणूक करणे, शेतीचा सर्वांगीण विकास करणे, खाणकामविषयक महाविद्यालय स्थापणे. |
| १८ | २३–२६ डिसें. १९०२ | अहमदाबाद ४७१ | सुरेंद्रनाथ बॅनर्जी | अंबालाल साकरला देसाई | ॲ. ऑ. ह्यूम (दिनशा वाछा) | विद्यापीठ आयोगाच्या अहवालातील प्रतिगामी सूचनांना आक्षेप, देशात संशोधन संस्था उभारण्याची मागणी, यंत्रमागावर बनणाऱ्या कापडावर लादलेला कर रद्द करणे. |
| १९ | २८–३० डिसें. १९०३ | मद्रास ५३८ | लाल मोहन घोष | नबाब सइद मोहंमद | ॲ. ऑ. ह्यूम (दिनशा वाछा गो. कृ. गोखले) | बंगालच्या फाळणीच्या निर्णयाविषयी तीव्र चिंता व्यक्त करणे, ब्रिटिश वसाहतीतील भारतीयांना युरोपियनांप्रमाणे हक्क व विशेषाधिकार देण्याची मागणी, सहकारी पतसंस्था विधेयकाबद्दल आभार. |
| २० | २६–२८ डिसें. १९०४ | मुंबई १०१० | सर हेन्री कॉटन | फेरोजशहा मेहता | ॲ. ऑ. ह्यूम (दिनशा वाछा गो. कृ. गोखले) | प्रशासकीय कामात लोकांचा अधिक सहभाग असावा, भारतमंत्र्याचा पूर्ण पगार इंग्लंडच्या तिजोरीतून द्यावा, करात कपात करावी, तिबेट मोहिमेचा खर्च भारतावर लादू नये. पोलीस अहवाल जनतेपासून दडविल्याबद्दल खेद. |
| २१ | २७–३० डिसें. १९०५ | बनारस ७५७ | गोपाळ कृष्ण गोखले | मुन्शी माधव लाल | ॲ. ऑ. ह्यूम (वाछा, गोखले) | बंगालची फाळणी व तेथील दडपशाहीचा कडक शब्दांत निषेध, स्थायी समिती (आताची कार्यकारिणी) नेमणे. |

अनुक्रमणिका

| अधि-वेशन क्रमांक | तारीख व वर्ष | स्थळ व प्रतिनिधींची संख्या | अध्यक्ष | स्वागताध्यक्ष | सरचिटणीस | महत्त्वाच्या नवीन ठरावांचे विषय |
|---|---|---|---|---|---|---|
| २२ | २६–२९ डिसें. १९०६ | कलकत्ता १६६३ | दादाभाई नौरोजी | राशबिहारी घोष | अॅ. आॅ. ह्यूम (वाछा गोखले) | चतु:सूत्रीचा (स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण) घटनेत समावेश, जमीन महसूल हा कर नसून खंड आहे या सरकारच्या मताचा निषेध. |
| (२३) सभा | (२६–२७ डिसें.) २८ डिसें. १९०७ | सुरत सु. १६०० | राशबिहारी घोष | त्रिभुवनदास माळवी | दिनशा एडलजी वाछा (गो. कृ. गोखले) | अधिवेशन बेमुदत स्थगित : घटना बनविण्यासाठी गो. कृ. गोखले यांच्या अध्यक्षतेखाली समितीची स्थापना. |
| २३ | २८–३० डिसें. १९०८ | मद्रास ५६२ | राशबिहारी घोष | के. कृष्ण स्वामी राव | दिनशा वाछा दाजी आबाजी खरे | मोर्ले सुधारणांविषयी समाधान, स्वदेशीच्या चळवळीला पाठिंबा, प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचे करणे तसेच तांत्रिक शिक्षणासाठी पुरेशा पैशांची तरतूद करणे. |
| २४ | २७–२९ डिसें. १९०९ | लाहोर २४३ | मदन मोहन मालवीय | हरी किशन लाल | दिनशा वाछा दा. आ. खरे | मोर्ले–मिंटो सुधारणांविषयी (उदा., मुसलमानांसाठी स्वतंत्र मतदार संघाची सूचना) नाराजी, लष्करातील उच्च पदे भारतीयांना न देण्याच्या धोरणाचा निषेध. |
| २५ | २६–२९ डिसें. १९१० | अलाहाबाद ६३६ | सर विल्यम वेडरबर्न | पंडित सुंदर लाल | दिनशा वाछा दा. आ. खरे | सरकारी खर्चातील वाढीची चौकशी करणे, धार्मिक उत्सवाच्या वेळी होणाऱ्या दंगली टाळण्यासाठी 'समेट मंडळे' स्थापणे, भारत–इंग्लंडमधील तारांचे दर कमी करणे. |
| २६ | २६–२८ डिसें. १९११ | कलकत्ता ४४६ | बिशन नारायण दार | भूपेंद्रनाथ बसू | दिनशा वाछा दा. आ. खरे | बंगालची फाळणी रद्द केल्याबद्दल आभार, जनतेच्या आरोग्यात सुधारणा करण्यासाठी उपाय सुचविणे, स्थानिक स्वराज्य संस्थांना निवडणुकीचे तत्त्व लागू करणे. |

अनुक्रमणिका

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २७ | २६–२८ डिसें. १९१२ | बंकीपूर २०७ | रंगनाथ नृसिंह मुधोळकर | मझहर-उल-हक | दिनशा वाछा दा. आ. खरे | हयूम यांच्या निधनाबद्दल शोक, द. आफ्रिकेतील गांधीजींच्या सत्याग्रहातील यशाबद्दल अभिनंदन, प्रांतामध्ये स्वायत्त प्रशासन लागू करण्याच्या प्रस्तावाविषयी समाधान. |
| २८ | २६–२८ डिसें. १९१३ | कराची ३४९ | नबाब सइद मोहंमद बहादूर | हरिचंद्राई विशिनदास | दिनशा वाछा दा. आ. खरे | द. आफ्रिकेतील स्थलांतरविषयक कायद्यातील जाचक तरतुदी तसेच ‘ कॅनडाचा थेट प्रवास नियम ’ यांचा निषेध, मुस्लिम-लीगने स्वयं-शासनाचे तत्त्व स्वीकारल्याबद्दल समाधान. |
| २९ | २८–३० डिसें. १९१४ | मद्रास ८६६ | भूपेंद्रनाथ बसू | एस्. सुब्रह्मण्यन् अय्यर | सईद मोहंमद एन्. सुब्बाराव पंतुलू | राजनिष्ठा व युद्धात सरकारला मदत करणे, भारतीय सैन्य प्रत्यक्ष युद्धावर पाठविल्याबद्दल समाधान, लष्करी शिक्षणासाठी सैनिकी शाळा व महाविद्यालये काढण्याची सूचना. |
| ३० | २७–२९ डिसें. १९१५ | मुंबई २२५९ | सत्येंद्र प्रसन्न सिन्हा | दिनशा वाछा | सईद मोहंमद एन्. सुब्बाराव पंतुलू | हत्यारबंदीचा कायदा शिथिल करणे, बंदमुदत मजूर पद्धती रद्द करणे, कायम सारा पद्धती देशभर लागू करणे, धंदेशिक्षणाची सोय करणे, प्रांतिक स्वायत्ततेची मागणी. |
| ३१ | २६–३० डिसें. १९१६ | लखनौ २२९८ | अंबिकाचरण मझुमदार | पं. जगत नारायण | सईद मोहंमद एन्. सुब्बाराव पंतुलू | लखनौ कराराचा पाठपुरावा व भारताचा दर्जा स्वयंशासित वसाहतीचा असावा अशी मागणी करणे, भारत संरक्षण कायद्याचा जपून वापर करणे, ॲनी बेझंट यांच्यावरील प्रांतबंदी उठविणे. |
| ३२ | २६–२९ डिसें. १९१७ | कलकत्ता ४९६७ | ॲनी बेझंट | बैकुंठनाथ सेन | सईद मोहंमद एन्. सुब्बाराव पंतुलू | लॉर्ड मॉंटेग्यू यांच्या हिंदुस्थानला जबाबदार राज्यपद्धती देण्याच्या घोषणेचे स्वागत, दलितांना जाचक ठरणाऱ्या रूढींना फाटा देण्याची भारतीयांना विनंती, स्थानबद्धतेविषयीच्या धोरणाविषयी तीव्र नाराजी. |

अनुक्रमणिका

| अधि-वेशन क्रमांक | तारीख व वर्ष | स्थळ व प्रतिनिधींची संख्या | अध्यक्ष | स्वागताध्यक्ष | सरचिटणीस | महत्त्वाच्या नवीन ठरावांचे विषय |
|---|---|---|---|---|---|---|
| खास–१ | २९ ऑगस्ट–१ सप्टें. १९१८ | मुंबई ३८४५ | सईद हसन इमाम | विठ्ठलभाई पटेल | जी. एम्. भरग्री<br>पी. केशव पिलाई<br>सी. पी. रामस्वामी अय्यर | माँटफर्ड सुधारणा अपुऱ्या व असमाधानकारक, जबाबदार राज्य-पद्धती प्रांतात व भारत सरकारात एकाच वेळी लागू करणे, रौलट समितीच्या शिफारशींचा निषेध, स्त्रीला ती स्त्री आहे म्हणून अपात्र न ठरविणे. |
| ३३ | २६–३१ डिसें. १९१८ | दिल्ली ४८६५ | पं. मदन मोहन मालवीय | हकीम अजमल खान | सी. पी. रामस्वामी अय्यर<br>केशव पिलाई | युद्धातील विजयाबद्दल सम्राटाचे व दोस्तांचे अभिनंदन व भारतीय सैन्याचा गौरव, भारताला स्वयं-निर्णयाचे तत्त्व लागू करणे, औद्योगिक व आर्थिक दृष्टचा देश स्वावलंबी करण्याची मागणी. |
| ३४ | २७–३० डिसें. १९१९ | अमृतसर ७०३१ | पं. मोतीलाल नेहरू | स्वामी श्रद्धानंद | विठ्ठलभाई पटेल<br>गोकर्णनाथ मिश्रा<br>एम्. ए. अन्सारी | जालियनवाला बाग हत्याकांडाचा तीव्र निषेध, रौलट कायदा रद्द करणे, लोकांवर खंडणी लादणाऱ्या कायद्याचा निषेध, चेम्सफर्ड यांना माघारी बोलाविणे, खादी उद्योगाचे पुनरुज्जीवन करणे. |
| खास-२ | ४–८ सप्टें. १९२० | कलकत्ता | लाला लजपत राय | बी. चक्रवर्ती | व्ही. पटेल<br>गोकर्णनाथ मिश्रा<br>एम्. ए. अन्सारी | असहकार चळवळ शिस्तीने चालविण्याची लोकांना विनंती, टिळकांच्या निधनाविषयी शोक, हंटर समितीच्या अहवालाविषयी नाराजी. |
| ३५ | २६–३१ डिसें. १९२० | नागपूर १४५८२ | सी. विजय राघव चारियार | जमनालाल बजाज | मोतीलाल नेहरू<br>एम्. ए. अन्सारी<br>सी. राजगोपालाचारी | 'न्याय आणि शांततेच्या मार्गाने स्वराज्य मिळविणे' हे काँग्रेसचे ध्येय ठरविणे, 'अखिल भारतीय टिळक स्मारक स्वराज्य निधी'ची स्थापना, राजकीय कैद्यांबद्दल सहानुभूती. |
| ३६ | २७–२८ डिसें. १९२१ | अहमदाबाद ४७२८ | देशबंधू चित्तरंजन दास (कार्यकारी अध्यक्ष अजमल खान) | वल्लभभाई पटेल | मोतीलाल नेहरू<br>एम्. ए. अन्सारी<br>राजगोपालाचारी | स्वयंसेवक म्हणून नावे नोंदवावीत व शांतपणे अटक करून घ्यायला तयार राहण्याचे आवाहन; असहकार मान्य नसणाऱ्यांसाठी अस्पृश्यता निवारण, जातीय ऐक्य, खादीचा प्रचार, दारूबंदी इ. कार्यक्रम सुचविणे. |

अनुक्रमणिका

| ३७ | २६–३१ डिसें. १९२२ | गया ३२४८ | देशबंधू चित्तरंजन दास | ब्रजकिशोर प्रसाद | मोतीलाल नेहरू एम्. ए. अन्सारी राजगोपालाचारी | कायदे मंडळावरील बहिष्कार चालू ठेवणे, हिंदुस्थानसाठी सरकारने काढलेले कर्ज नाकारणे, भारताच्या व मानवतेच्या गांधीजींनी केलेल्या सेवेबद्दल आदर, सविनय कायदेभंग हा लष्करी क्रांतीचा एकमेव सुसंस्कृत पर्याय मानणे. |
|---|---|---|---|---|---|---|
| खास-३ | २० सप्टें. १९२३ | दिल्ली — | मौ. अबूल कलाम आझाद | — | — | कायदेमंडळांत प्रवेश करण्यास मान्यता, हिंदु-मुसलमान दंग्यांच्या संदर्भात जिल्हा शांतता समित्या स्थापणे, नागपूर झेंडा सत्याग्रहींचे अभिनंदन. |
| ३८ | २८ डिसें.१९२३– १ जाने. १९२४ | कोकानाडा १६६१ | मौ. महंमद अली | कोंडा व्यंकटप्पा | मोअझम अली राजेंद्र प्रसाद वल्लभभाई पटेल | असहकाराच्या कार्यक्रमांना पाठिंबा व विधायक कामांवर भर देणे, सावरकरांच्या कैदेचा निषेध, प्रशिक्षण व शिस्तबद्ध स्वयंसेवक दल उभारणे, अ. भा. खादी मंडळाची स्थापना. |
| ३९ | २६–२७ डिसें. १९२४ | बेळगाव १८४४ | महात्मा गांधी | गंगाधरराव बाळकृष्ण देशपांडे | बी. बी. पोतदार एम्. आर. कंभावी एस्. एल्. सोमण | असहकार चळवळ स्थगित करून खादीचा प्रचार, जातीय ऐक्य, अस्पृश्यता निवारण व राष्ट्रीय शिक्षण या विधायक कार्यांवर भर देणे, गांधीजी व स्वराज्य पक्ष यांच्यातील करार. |
| ४० | २६–२८ डिसें. १९२५ | कानपूर २६८८ | सरोजिनी नायडू | मुरारी लाल | जवाहरलाल नेहरू शोएब कुरेशी बर्जोरी फ्रामजी बरूचा | काँग्रेसचा परराष्ट्र विभाग काढणे, काँग्रेसच्या कामकाजाची भाषा ठरविणे, द. आफ्रिकी भारतीय काँग्रेसच्या विषम लढ्याला पाठिंबा देणे. |
| ४१ | २६–२८ डिसें. १९२६ | गौहाती — | एस्. श्रीनिवास अय्यंगार | टी. आर्. फूकन | अन्सारी, ए. रंगास्वामी अय्यंगार के. संतानम् | श्रद्धानंदांच्या खूनाबद्दल संताप, काँग्रेसच्या देशातील व परदेशातील कार्याची दिशा ठरविणे, हिंदु-मुस्लिम ऐक्यावर उपाय योजण्यासाठी समिती नेमणे. |

| अधिवेशन क्रमांक | तारीख व वर्ष | स्थळ व प्रतिनिधींची संख्या | अध्यक्ष | स्वागताध्यक्ष | सरचिटणीस | महत्त्वाच्या नवीन ठरावांचे विषय |
|---|---|---|---|---|---|---|
| ४२ | २६–२८ डिसें. १९२७ | मद्रास २७११ | मुख्तार अहमद अन्सारी | सी. एन्. मुथुरंग मुदलियार | ए. रंगास्वामी अय्यंगार वल्लभभाई पटेल | राष्ट्रसंघाच्या स्थापनेचे स्वागत, संपूर्ण स्वराज्य हे भारतीय जनतेचे ध्येय जाहीर करणे, सायमन कमिशनचा निषेध व त्यावर बहिष्कार टाकणे, ब्रह्मदेश अलग करण्याबद्दल नाराजी. |
| ४३ | २९ डिसें. १९२८ १ जाने. १९२९ | कलकत्ता ५२२१ | पं. मोतीलाल नेहरू | जे. एम्. सेन गुप्ता | शोएब कुरेशी जवाहरलाल नेहरू सुभाषचंद्र बोस | सर्व पक्षीय नेहरू समितीच्या अहवालाचे स्वागत, बार्डोलीच्या लढ्यातील यशाबद्दल अभिनंदन, औद्योगिक कलह व सार्वजनिक सुरक्षिततेविषयीच्या विधेयकांचा निषेध. |
| ४४ | २९–३१ डिसें. १९२९ | लाहोर — | पं. जवाहरलाल नेहरू | सैफुद्दीन किचलू | एम्. ए. अन्सारी जवाहरलाल नेहरू | २६ जानेवारी 'संपूर्ण स्वराज्य दिन' म्हणून पाळण्याचे ठरले, अल्पसंख्य गटांचे समाधान झाल्याशिवाय घटनेत सुधारणा न करण्याचे आश्वासन, भारताकडे येणारी न्याय व समर्थनीय देणीच मान्य करणे. |
| ४५ | २९–३१ मार्च १९३१ | कराची — | वल्लभभाई पटेल | चोईथराम प्रतापराम गिडवानी | सईद महमूद श्रीप्रकाश | भारताच्या घटनेत समाविष्ट करावयाच्या बाबी ठरविणे (उदा; मूलभूत हक्क, धार्मिक तटस्थता, प्रौढ मतदान, मोफत प्राथमिक शिक्षण, नशाबंदी); भगतसिंग, राजगुरू व सुखदेव यांच्या शौर्याचा गौरव. |
| ४६ | २४ एप्रिल १९३२ | दिल्ली ४०० | मदन मोहन मालवीय (नियुक्त अध्यक्ष) | रणछोडदास अमृतलाल (प्रत्यक्ष अध्यक्ष) | जवाहरलाल नेहरू जयरामदास दौलतराम सईद महमूद | सविनय कायदेभंगाच्या पुनरुज्जीवनाला पाठिंबा, गांधीजींचे नेतृत्व व अहिंसेवर विश्वास, हुतात्म्यांना श्रद्धांजली. |
| ४७ | १ एप्रिल १९३३ | कलकत्ता २५० | मदन मोहन मालवीय (नियुक्त अध्यक्ष) | नेली सेनगुप्ता (प्रत्यक्ष अध्यक्ष) | नेहरू जयरामदास सईद महमूद | सरकारी श्वेतपत्रिकेने लोकांनी दिशाभूल करून न घेणे, सविनय कायदेभंग कायदेशीर साधन, मूलभूत हक्काविषयी जनजागृती करणे. |

अनुक्रमणिका

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ४८ | २६–२८ ऑक्टो. १९३४ | मुंबई – | राजेंद्र प्रसाद | के. एफ्. नरीमन | जयरामदास दौलतराम | भारतीय ग्रामोद्योग संघ काँग्रेसच्या कार्यक्रमाचा एक भाग म्हणून स्थापणे, गांधीजींच्या काँग्रेसमधून निवृत्त होण्याच्या निर्णयाला नाखुषीने मान्यता. |
| ४९ | १२–१४ एप्रिल १९३६ | लखनौ मु. ७०० | जवाहरलाल नेहरू | श्रीप्रकाश | आचार्य कृपलानी | स्वातंत्र्य मिळेपर्यंत लढा चालू ठेवण्याचा निर्धार, सरकारी श्वेतपत्रिका व १९३५ चा कायदा फेटाळणे, शेतकऱ्यांची गरिबी, बेकारी व कर्जबाजारीपणाविषयक प्रश्न तातडीने सोडविण्याचे आवाहन. |
| ५० | २७–२८ डिसें. १९३६ | फैजपूर — | जवाहरलाल नेहरू | — | आचार्य कृपलानी | काँग्रेस उमेदवारांना मते देण्याचे जनतेला आवाहन, राज्यारोहणाच्या संदर्भातील समारंभांवर बहिष्कार टाकणे, घटना समिती मागणे. |
| ५१ | १९–२१ फेब्रु. १९३८ | हरिपुरा – | सुभाषचंद्र बोस | दरबार गोपाळदास देसाई | आचार्य कृपलानी | संघराज्यविषयक योजनेचा निषेध, अल्पसंख्य गटांच्या हक्काचे रक्षण करणे हे काँग्रेसचे आद्य कर्तव्य व मूलभूत धोरण ठरविणे, अ. भा. शिक्षण मंडळ स्थापणे. |
| ५२ | १०–१२ मार्च १९३९ | त्रिपुरी – | सुभाषचंद्र बोस | सेठ गोविंददास | आचार्य कृपलानी | अध्यक्षांच्या निवडणुकीविषयीच्या मतभेदामुळे पक्षाचे सर्वसाधारण धोरण स्पष्ट करणे व गांधीजींच्या नेतृत्वावर विश्वास, ब्रिटनच्या परराष्ट्र धोरणाविषयी नापसंती. |
| ५३ | १९–२० मार्च १९४० | रामगड – | अबुल कलाम आझाद | राजेंद्रप्रसाद | आचार्य कृपलानी | युद्धासाठी मनुष्यबळ, संपत्ती व साधनसामग्री यांची मदत न करण्याचे आवाहन, मंत्रिमंडळातून बाहेर पडणे. |
| ५४ | २१–२४ नोव्हें. १९४६ | मीरत १३०६ | आचार्य कृपलानी | रघुबीर नारायण सिंग | मृदुला साराभाई बाळकृष्ण केसकर | सार्वभौम, स्वतंत्र प्रजासत्ताक देशाची घटना स्वातंत्र्य, प्रगती व समान संधी ही उद्दिष्टे डोळ्यासमोर ठेवून तयार करणे, स्वातंत्र्याचा जाहीरनामा मंजूर करणे, संस्थानांचा प्रश्न स्वातंत्र्यलढ्याचाच भाग मानणे. |

| अधि-वेशन क्रमांक | तारीख व वर्ष | स्थळ व प्रतिनिधींची संख्या | अध्यक्ष | स्वागताध्यक्ष | सरचिटणीस | महत्त्वाच्या नवीन ठरावांचे विषय |
|---|---|---|---|---|---|---|
| ५५ | १८ डिसें. १९४८ | जयपूर — | पट्टाभी सीतारामय्या | गोकुळभाई भट्ट | शंकरराव देव<br>जुगल किशोर | म. गांधींच्या हत्येबद्दल तीव्र दुःख व हुतात्म्यांना वंदन, मिश्र अर्थ-व्यवस्थेविषयीचे धोरण ठरविणे, भाषावार प्रांतरचनेसाठी समिती नेमणे. |
| ५६ | २१–२२ सप्टें. १९५० | नासिक — | पुरुषोत्तमदास टंडन | भाऊसाहेब हिरे | मोहनलाल गौतम<br>कला वेंकटराव | परराष्ट्र धोरणविषयक विस्तृत ठराव व संयुक्त राष्ट्रांत सामील होण्याचा निर्णय, धर्मनिरपेक्षतेच्या तत्त्वाचा पुरस्कार, कल्याणकारी राज्य व नियोजनाचा पुरस्कार. |
| ५७ | १८–१९ ऑक्टो. १९५१ | नवी दिल्ली सु, १४४० | जवाहरलाल नेहरू | चौधरी ब्रह्मप्रकाश | लालबहादूर शास्त्री<br>यू. एस्. मल्लया | अलिप्ततेच्या धोरणाला मान्यता, पंचवार्षिक योजनेच्या आरा-खड्याचे स्वागत, आर्थिक व सांस्कृतिक विषमता कमी करणे हे नियोजनाचे उद्दिष्ट. |
| ५८ | १५–१८ जाने. १९५३ | हैदराबाद — | जवाहरलाल नेहरू | रामानंद तीर्थ | बलवंतराय मेहता<br>एस्. एन्. आगरवाल<br>यू. एस्. मल्लया | भूदान चळवळीस मदत करणे, भाषावार राज्य पुनर्रचनेला मान्यता, जागतिक शीतयुद्धाबद्दल चिंता व शांततेसाठी प्रयत्न करण्याचे आवाहन. |
| ५९ | २३–२४ जाने. १९५४ | कल्याणी सु. १४०० | जवाहरलाल नेहरू | अतुल्य घोष | एस्. एन्. आगरवाल<br>बळवंतराय मेहता | कोरियातील युद्धबंदीच्या संदर्भातील सरकारचे धोरण व भारतीय सैन्याची कामगिरी यांबद्दल समाधान, अमेरिकेकडून पाकिस्तानला होणाऱ्या लष्करी मदतीबद्दल चिंता. |
| ६० | २१–२३ जाने. १९५५ | आवडी सु. १५०० | यू. एन्. ढेबर | एस्. अंबुजा-म्माल | श्रीमन नारायण<br>के. पी. माधवन नायर | देशात समाजवादी समाजरचना आणण्याच्या दृष्टीने नियोजनाची आखणी करणे, पंचशील तत्त्वाचा पुरस्कार, दुसऱ्या पंचवार्षिक योजनेतील मुद्दे. |

अनुक्रमणिका

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ६१ | ११–१२ फेब्रु. १९५६ | अमृतसर सु. १६०० | यू. एन्. ढेबर | गुरमुखसिंग मुसाफिर | के. पी. माधवन नायर, श्रीमन नारायण | निःशस्त्रीकरणविषयक प्रयत्नातील पीछेहाटीबद्दल खेद, इंपिरियल बँकेचे स्टेट बँकेत रूपांतर व आयुर्विम्याचे राष्ट्रीयीकरण यांबद्दल समाधान, खाजगी व सार्वजनिक ही दोन्ही क्षेत्रे नियोजनाची अंगे मानणे. |
| ६२ | ५–६ जाने. १९५७ | इंदूर सु. ११०० | यू. एन्. ढेबर | कन्हैयालाल खडीवाला | श्रीमन नारायण एम्. एम्. चौधरी के. पी. माधवन नायर | १८५७ च्या स्वातंत्र्य लढ्याची शताब्दी साजरी करणे, काँग्रेसच्या ध्येयात समाजवादाचा समावेश करणे, लोकशिक्षणाच्या दृष्टीने निवडणूक मोहीम चालविणे. |
| ६३ | १८–१९ जाने. १९५८ | गौहाटी – | यू. एन्. ढेबर | महेंद्र मोहन चौधरी | श्रीमन नारायण के. पी. माधवन नायर एम्. एम्. चौधरी | अणुचाचण्या लगेच बंद करणे, अधिकृत भाषेच्या प्रश्नांविषयीचे धोरण, लघु-उद्योग व ग्रामोद्योग यांच्याकडेही लक्ष देणे, जमीन सुधारणा व सहकारी चळवळ जोमाने पुढे नेणे, कृषि-उत्पादन वाढविणे. |
| ६४ | ९–११ जाने. १९५९ | नागपूर — | यू. एन्. ढेबर | गोपिकाबाई कन्नमवार | सादिक अली सुचेता कृपलानी ए. एस्. राजू तख्तमल जैन | पोलाद, दगडी कोळसा, वीज व वाहतूक या उद्योगांवर भर देणे, किंमती व लोकसंख्या काबूत ठेवणे, पंचवार्षिक योजनांची आखणी करताना नियोजन ही अखंड प्रक्रिया आहे हे लक्षात ठेवणे, कृषि-उत्पादनाचे मूल्य आधीच ठरवून देणे. |
| ६५ | १६–१७ जाने. १९६० | बंगलोर — | नीलम संजीव रेड्डी | एच्. के. विराना गौडा | जी. राजगोपालन् सादिक अली आभा मैती | कृषि व औद्योगिक विकासाला वेग देणे, देशाचे संरक्षण आर्थिक बळावर अवलंबून असते हे ध्यानात ठेवणे, पंचायत राज्य प्रस्थापिणे, शेतकरी व कामगारांच्या कल्याणाकडे लक्ष पुरविणे. |
| ६६ | ६–७ जाने. १९६१ | भावनगर — | नीलम संजीव रेड्डी | ठाकूरभाई देसाई | जी. राजगोपालन् सादीक अली | तिसऱ्या पंचवार्षिक योजनेविषयी चर्चा, उत्पादनाची साधने व संपत्तीच्या विकेंद्रीकरणाची गरज, चीनच्या आक्रमक हालचालीं-विषयी चिंता. |

| अधिवेशन क्रमांक | तारीख व वर्ष | स्थळ व प्रतिनिधींची संख्या | अध्यक्ष | स्वागताध्यक्ष | सरचिटणीस | महत्त्वाच्या नवीन ठरावांचे विषय |
|---|---|---|---|---|---|---|
| ६७ | ५–६ जाने. १९६२ | पाटणा — | नीलम संजीव रेड्डी | जगजीवनराम | के. के. शहा<br>जगन्नाथराव चंद्रिकी<br>सादिक अली | गोवा मुक्तीबद्दल सेनादल, सरकार व जनतेचे अभिनंदन, निवडणूक मोहिमेत शिस्तीने व समर्पणाच्या भावनेने सहभागी होण्याचे आवाहन, शेजारील देशांविषयीच्या धोरणाला पाठिंबा. |
| ६८ | ९–१० जाने. १९६४ | भुवनेश्वर — | के. कामराज | बिजू पटनाईक | के. के. शहा<br>जगन्नाथराव चंद्रिकी<br>जी. राजगोपालन् | चिनी आक्रमण व पाकिस्तानची वैरभावना पाहता संरक्षणव्यवस्था मजबूत करणे, अलिप्त देशांच्या परिषदेचे स्वागत, उद्योगांना प्रोत्साहन देताना ग्राहक, समाज व कामगार यांचे हितसंबंध जपणे. |
| ६९ | ९–१० जाने. १९६५ | दुर्गापूर — | के. कामराज | अजयकुमार मुखर्जी | टी. मानएन | अणुशक्तीच्या शांततामय कामांसाठी वापर करण्याच्या प्रयत्नाला गती देणे, राष्ट्र-पुनर्निर्माणाच्या कार्याविषयी चर्चा, नेहरू राष्ट्रीय स्मारक निधी उभारणे. |
| ७० | १० फेब्रु. १९६६ | जयपूर — | के. कामराज | हरिदेव जोशी | टी. मानएन<br>सादीक अली | ताश्कंद कराराचे स्वागत व शास्त्रीजींच्या कार्याचा गौरव, कृषिविषयक धोरणाला संरक्षणाखालोखाल महत्त्व देण्याच्या सरकारी निर्णयाचे स्वागत, गांधी जन्मशताब्दीसाठी समितीची स्थापना. |
| ७१ | १०–११ जाने. १९६८ | हैदराबाद — | एस्. निजलिंगप्पा | काकानी व्यंकट रत्नम् | सादिक अली<br>शंकर दयाळ शर्मा<br>पी. व्यंकट सुबय्या | विरोधकांच्या संयुक्त आघाडी सरकारांना संधी देणे, राजकीय स्थैर्यासाठी आर्थिक प्रगतीची गरज, प्रादेशिक, भाषिक, व जातीय प्रश्न शांततेने व तडजोडीने सोडविणे. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ७२ | २७–२८ एप्रिल १९६९ | फरीदाबाद — | एस्. निजलिंगप्पा | राम शरण चंद मित्तल | सादिक अली<br>शंकरदयाळ शर्मा<br>पी. व्यंकट सुब्बय्या | मध्यावधी निवडणुकांच्या निकालांचे विश्लेषण, राजकीय ध्रुवीकरण व आघाड्यांचे राजकारण, केंद्र-राज्य संबंध, पक्षांतर, बांधिलकीचे राजकारण. |
| ७३ | २८–२९ डिसें. १९६९ | मुंबई — | जगजीवनराम | वसंतदादा पाटील | शंकरदयाळ शर्मा<br>हेमवतीनंदन बहुगुणा | काँग्रेसमधील फूट, जातीय दंगे व काँग्रेसपुढील कामांची चर्चा, विज्ञान व तंत्रविद्याविषयक तपशीलवार धोरण ठरविणे; सामाजिक, आर्थिक व राजकीय न्यायावर आधारलेला वर्ग व जातिविहीन समाज उभारणे. |
| ७४ | २८–२९ डिसें. १९७२ | कलकत्ता — | शंकरदयाळ शर्मा | अरुणकुमार मोईत्रा | हेन्री ऑस्टीन<br>एम्. चंद्रशेखर<br>पूरबी मुखर्जी<br>अझीझ इमाम<br>चंद्रजित यादव | बांगला देश स्वतंत्र झाल्याबद्दल अभिनंदन, सिमला कराराचे स्वागत दहा कलमी कार्यक्रमाची अंमलबजावणी, विम्याचे राष्ट्रीयीकरण, संस्थानिकांचे तनखे रद्द, पाचव्या पंचवार्षिक योजनेविषयी चर्चा. |
| ७५ | ३१ डिसें १९७५ १ जाने. १९७६ | चंडीगड — | देवकांत बरूआ | निरंजनसिंग तालीब | पी. व्ही. नरसिंहराव<br>पूरबी मुखर्जी<br>एम्. चंद्रशेखर<br>अझीझ इमाम<br>चंद्रजित यादव | लोकसभेची मुदत १ वर्षाने वाढविण्याची सूचना व देशांतर्गत आणीबाणीचे समर्थन, वीस कलमी कार्यक्रमाची अंमलबजावणी, हिंदी महासागर हे शांतता क्षेत्र राखण्याचे आवाहन. |
| ७६ | १–२ जाने. १९७८ | नवी दिल्ली — | इंदिरा गांधी | एम्. चंद्रशेखर | सरदार बुटासिंग<br>अ. र. अंतुले | काँग्रेसमधील दुसऱ्या फुटीनंतर पक्ष कठीण कालखंडातून जात आहे याची जाणीव ठेवणे, जनता सरकारच्या धोरणावर टीका, राजकीय व आर्थिक लोकशाही ह्या एकाच नाण्याच्या दोन बाजू मानणे. |

अनुक्रमणिका

| अधि-वेशन क्रमांक | तारीख व वर्ष | स्थळ व प्रतिनिधींची संख्या | अध्यक्ष | स्वागताध्यक्ष | सरचिटणीस | महत्त्वाच्या नवीन ठरावांचे विषय |
|---|---|---|---|---|---|---|
| ७७ | २९–३० डिसें. १९८३ | कलकत्ता – | इंदिरा गांधी (कार्यकारी अध्यक्ष कमलापती त्रिपाठी) | आनंद गोपाळ मुखर्जी | राजीव गांधी<br>जी. के. मूपनार<br>राजेंद्रकुमारी वाजपेयी<br>सी. एम्. स्टीफन<br>चंदुलाल चंद्राकर | पंजाब व आसाम प्रश्नी चिंता व विरोधकांवर टीका, भक्कम केंद्र सरकारची गरज, पर्यावरणाचे रक्षण करणे, काँग्रेस शताब्दी साजरी करणे, श्रीलंकेतील तमिळांचा प्रश्न, अलिप्त राष्ट्र शिखर परिषद, राष्ट्रकुल देशांची परिषद. |
| ७८ | २७–२९ डिसें. १९८५ | मुंबई – | राजीव गांधी | शिवाजीराव पाटील निलंगेकर | जी. के. मूपनार<br>ए. के. अँटनी<br>जीतेंद्र प्रसाद | शताब्दी ठराव– सामाजिक न्यायाचा पाठपुरावा; शेती व उद्योगांत अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर; मानवी साधनसंपत्तीकडे लक्ष देणे; श्रीलंकेतील वांशिक प्रश्नाविषयी चिंता; द. आफ्रिका व नामिबियातील जनतेला पाठिंबा. |

■ ■ ■



अनुक्रमणिका

# परिशिष्ट २

## भारतातील ब्रिटिश गव्हर्नर जनरल आणि व्हाइसरॉय

### गव्हर्नर जनरल

वारन हेस्टिंग्ज (१७७३-८५)
सर जॉन मॅक्फर्सन (१७८५)
लॉर्ड कॉर्नवालिस (१७८५-९३)
सर जॉन शोअर (१७९३-९८)
सर अॅल्युअर्ड क्लार्क (१७९८)
लॉर्ड वेलस्ली (१७९८-१८०५)
लॉर्ड कॉर्नवालिस (१८०५)
सर जॉर्ज बार्लो (१८०५-०७)
लॉर्ड मिंटो (१८०७-१३)
लॉर्ड हेस्टिंग्ज (१८१३-२३)
जॉन अॅडॅम (१८२३)
लॉर्ड अॅम्हर्स्ट (१८२३-२८)
विल्यम बटरवर्थ बेली (१८२८)
लॉर्ड विल्यम बेंटिंक (१८२८-३५)
सर चार्ल्स मेट्काफ (१८३५-३६)
लॉर्ड ऑक्लंड (१८३६-४२)
लॉर्ड एलेनबरो (१८४२-४४)
लॉर्ड हार्डिंज (१८४४-४८)
लॉर्ड डलहौसी (१८४८-५६)
लॉर्ड कॅनिंग (१८५६-५८)

### गव्हर्नर जनरल व व्हाइसरॉय

लॉर्ड कॅनिंग (१८५८-६२)
लॉर्ड एल्जिन (१८६२-६३)
सर जॉन लॉरेन्स (१८६४-६९)
लॉर्ड मेयो (१८६९-७२)
लॉर्ड नॉर्थब्रुक (१८७२-७६)
लॉर्ड लिटन (१८७६-८०)
लॉर्ड रिपन (१८८०-८४)
लॉर्ड डफरीन (१८८४-८८)
लॉर्ड लॅन्सडाउन (१८८८-९४)
लॉर्ड एल्जिन (१८९४-९९)
लॉर्ड कर्झन (१८९९-१९०५)
लॉर्ड मिंटो (१९०५-१०)
लॉर्ड हार्डिंज (१९१०-१६)
लॉर्ड चेम्सफर्ड (१९१६-२१)
लॉर्ड रीडिंग (१९२१-२६)
लॉर्ड आर्यविन (१९२६-३१)
लॉर्ड विलिंग्डन (१९३१-३६)
लॉर्ड लिनलिथगो (१९३६-४३)
लॉर्ड वेव्हेल (१९४३-४६)
लॉर्ड माउंटबॅटन (१९४७-४९)

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका